हिंदुस्थानचा इतिहास

# HISTORY OF INDIA,

## The Hindu and Mahomedan Periods.

BY

THE HON. MOUNTSTUART ELPHINSTONE,

TRANSLATED INTO MARATHÍ

BY

VISHVANATH NÁRAYAN MANDLIK.

VOL. I.






BOMBAY:

PRINTED AT GANPAT KRISHNAJI'S PRESS.

1861.

# हिंदुस्थानाचा इतिहास.



( हिंदु व मुसलमान राजांचें वर्णन )

नामदार मौंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन् यांचा

मूळ ग्रंथावरून

**विश्वनाथ नारायण मंडलिक**

यांणीं.

मराठींत केला.

## भाग पहिला.



**मुंबईत**

गणपत कृष्णाजी यांचा छापखान्यांत छापला.

शा० श० १७८२,

इ० स० १८६१.

TO

HN HARKNESS, ESQ. LL.D.,

NCIPAL OF THE ELPHINSTONE COLLEGE,

This Volume

IS INSCRIBED

EN OF THE PROFOUND RESPECT AND ESTEEM

OF HIS EVER GRATEFUL PUPIL,

THE TRANSLATOR.

मेहेरबान जान हार्कनेस् साहेब इस्कायर,

एल् एल्. डी.,

एल्फिन्स्टन् विद्यालयाचे अध्यक्ष

यांस,

हा ग्रंथ,

त्यांचा निरंतर आभारी शिष्य

भाषांतरकर्त्ता, याणें,

अत्यन्त सन्मान व सत्कार पूर्वक,

नजर केला असे.

# PREFACE.

Instead of striving to render word for word, the Translator has endeavoured to express, in simple language, what appears to him to be the meaning of the Author. He does not presume to think that he has always succeeded; but he hopes that the [illegible] in which the sense of the original has been departed from will not be found to be very numerous. And he takes this opportunity of intimating that he will feel grateful to any [illegible] who will be kind enough to point out to him such as [illegible] in the translation, in order that they may be corrected, should the work come to a second edition. [illegible] the Notes as did not appear likely to be of interest to the general reader have been omitted.

The Translator thinks it right to mention that the work has been executed in the intervals of business during the last four [illegible] has, from various causes, been subject to frequent interruptions. For its appearance now he is indebted to the liberal patronage of Edward I. Howard, Esq., Director of Public Instruction, and of the Deccan Vernacular Society. He is also under great obligations to Bhâu Dâji, Esq., Graduate of Grant Medical College, for many useful suggestions, as well as for several books of reference and much valuable information.

The first three books, containing preliminary discussions on the Government, Religion, Manners, and Customs of the Hindoos, have been left for the present unpublished. Should encouragement offer they will be printed separately in the same form, so that they may be bound up as a Supplement.

*Bombay, 7th March 1864.*

# प्रस्तावना.

पुढील भाषांतरांत शब्दास शब्द न उतरतां सरळ मराठी भाषेंत ग्रंथकाराचा आशय कळविण्याचा यत्न केलेला आहे. तो यत्न सर्वत्र तडीस गेला आहे असा अभिप्राय भाषांतरकर्त्ता वागवित नाहीं; परंतु मूळांतील अर्थ अगदीं सोडून लिहिलेले असे लेख फार नसतील अशी त्याची आशा आहे; आणि अशा चुक्या जर कोणी गृहस्थ कृपाकरून त्यास कळवितील, तर (या ग्रंथाची दुसरी आवृत्ति छापल्यास तींत) त्या नीट करण्याचा यत्न त्याजकडून होईल. जा टीपा साधारण वाचणारांचा उपयोगी नाहींशा दिसल्या, त्या सोडून दिल्या आहेत.

हा ग्रंथ मागील चार वर्षांत सरकारी कामाचा वेळ खेरीज करून फावल्या वेळांत केला आहे, आणि कांहीं कारणानीं मध्यें अडचणी येऊन तो पुष्कळ वेळा बंदहि पडला होता. सांप्रत मेहेरबान **इ. ऐ. हवार्ड** साहेब **डैरेक्टर आफ् पब्लिक् इन्स्ट्रक्शन्** व **दक्षिणभाषेंत पुस्तकें प्रसिद्ध करणारी मंडळी** यांचा उदार आश्रयानें हा ग्रंथ बाहेर पडला, ह्मणून भाषांतरकार त्यांचा आभारी आहे. **तसाच डाक्तर भाऊ दाजी** यांणीं या ग्रंथसंबंधीं पुष्कळ उपयोगी माहिती सांगितली व पुष्कळ ग्रंथ पाहण्यास दिले, ह्मणून तो त्यांचाहि आभारी आहे.

हिंदुलोकांची राज्यरीति, धर्म, रीतिभाती, इत्यादि, यांप्रकरणी जे पहिले तीन भाग आहेत, ते सांप्रत तसेच ठेविले आहेत. जर उत्तेजन मिळालें तर पुढें ते याच सांचाचे छापले जातील; ह्मणजे या भागाचा पुरवणीदाखल ते बांधण्यास सुलभ पडतील.

ता० ७ मार्च १८६१.

# हिंदुस्थानाचा इतिहास.



## भाग १ ला.

### मुसलमानलोक हिंदुस्थानांत स्वाऱ्या करूं लागले तोंपर्यंत हिंदुलोकांचा प्राचीन इतिहास.

## प्रकरण पहिलें.

### उत्तरहिंदुस्थानांतील लोकांचा वृत्तान्त.



## प्रकरण दुसरें.

### दक्षिणेंतील इतिहास.

# भाग दुसरा.

## प्रकरण पहिलें.

### आरबलोकांचा स्वाऱ्या.



## प्रकरण दुसरें.

### खलीफांचें राज्य मोडल्यानंतर राजे झाले त्यांचीं वर्तमानें.

# गजनवी वंशाचें वर्णन.

## प्रकरण तिसरें.

### सुल्तान महमूद.

# प्रकरण चौथें.

## महमूदानंतरचे गजनवी राजे, व घोरी वंशाचे राजे यांचीं वर्तमानें.

### गजनवी वंशाचें वर्तमान.

# भाग तिसरा.

## मोगली वंशापर्यंत दिल्लीचा राजांचीं वर्तमानें.

### इ०स० १२०६—१५२६ पर्यंत.

# प्रकरण पहिलें.

### गुलाम राजांचें वर्णन.





# प्रकरण दुसरें.

## खिल्जी वंशाचें वर्तमान.

### जल्लालुद्दीन खिल्जी.

# प्रकरण तिसरें.

## तघलख, सय्यद, व लोदी, या वंशांचीं वर्तमानें.

### १ तघलख् वंश.

## तैमूरलंग याचा (ह्मणजे मोगल) वंशाचें वर्तमान.

# भाग चौथा.

### बाबर हा हिंदुस्थानांत राज्य करूं लागल्यापासून अकबर पादशाह सिंहासनारूढ होईपर्यंत हकीकत.

## प्रकरण पहिलें.

### बाबर याची कारकीर्द.

## प्रकरण दुसरें.

### हुमायून याची पहिली कारकीर्द.

## प्रकरण तिसरें.

### शीर शाह व दुसरे सूर वंशाचे पादशाह यांचीं वर्तमानें.

## प्रकरण चौथें.

### हुमायून यास पुनः राज्य प्राप्त झालें त्याविषयीं वर्तमान.

# भाग पांचवा.

## अकबर सिंहासनारूढ होईपर्यंत हिंदुस्थानाची स्थिति.

## प्रकरण पहिलें.

### दिल्लीचें राज्य मोडल्यानंतरचा हिंदुस्थानांतील स्वतंत्र राज्यांचा इतिहास



### १ दक्षिणेंतील राज्यें

## २ उत्तरहिंदुस्थान व त्याजवळील प्रांतांतील राज्यें.



## प्रकरण दुसरें.

### मुसलमानी राज्याची अंतर्गत स्थिति.

# भाग सहावा.

## अकबर पादशाह.

## प्रकरण पहिलें.

### इ० स० १५५६ पासून इ० स० १५८६ पर्यंत झालेलीं वर्तमानें.

## प्रकरण दुसरें.

### इ० स० १५८६ पासून अकबराचा मरणापर्यंत झालेलीं वर्तमानें.

# हिंदुस्थानाचा इतिहास.



## उपोद्घात.

हिंदुस्थानाच्या सीमा व विस्तार.

हिमालयपर्वत, सिंधुनद, व समुद्र ( ह्मणजे हिंदी-महासागर व त्याचे भाग ) या हिंदुस्थानाच्या सीमा आहेत. त्याची लांबी काश्मीरापासून कन्याकुमारिका टोंकापर्यंत सुमारें १९०० मैल ( ह्मणजे ९५० कोश ), आणि ब्रह्मपुत्रनदाच्या पलीकडील डोंगरापासून सिंधुनदाच्या मुखापर्यंत त्याची रुंदी १५०० मैल ( ह्मणजे ७५० कोशांहून ) वरीच जास्त आहे.

स्वाभाविक विभाग.

उत्तरहिंदुस्थान व दक्षिणहिंदुस्थान.

गुजराथच्या वायव्येकडील ओसाड प्रदेशाजवळून जवळून गंगेपर्यंत २३° व २५° या अक्षांशांमध्यें अशी एक विंध्याद्रि नामें पर्वतांची ओळ या देशांत पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत गेली आहे; या ओळीच्या उत्तरेकडील प्रदेशास उत्तरहिंदुस्थान व दक्षिणेकडील प्रदेशास दक्षिणहिंदुस्थान असें सांप्रत ह्मणतात.

उत्तरहिंदुस्थानाचे स्वाभाविक विभाग.

उत्तरहिंदुस्थानाचे चार विभाग आहेत; (१) **सिंधुनदाचें** तळवट (२) **गंगेचें** तळवट, (३) **सिंधुनदाकडील** ओसाड रेतीचें मैदान; आणि (४) जा उंच प्रदेशास अलीकडे **मध्यहिंदुस्थान** असें ह्मणतात तो.

सिंधुनदाचा तळवटाचा वरील विभाग, जास सांप्रत **पंजाब** असें ह्मणतात, तो देश **जहिलम**नदीचा पूर्वेस मैदान व सुपीक आहे; परंतु त्या नदीचा पश्चिमेस डोंगराळ आहे; आणि जेथें त्या पांचहि नद्यांचा संगम होतो, तेथें रेतड आहे. त्या पांच नद्या मिळून जेथपासून सिंधुनदाचा एक ओघ चालू झाला आहे, तेथपासून तो नद एके बाजूस पर्वत व दुसरे बाजूस ओसाड रेतीचें मैदान यांचामध्यें जो सपाट प्रदेश आहे त्यांतून वाहत आहे; त्या प्रदेशाचा जा भागास या नदाचें पाणी पोंचतें, तो भाग मात्र पिकाऊ आहे. पुढें हा नद जसजसा समुद्राजवळ आला आहे, तसतसे त्यास पुष्कळ फाटे फुटून जुवें (जांस इंग्रेजींत **डेल्टा** असें ह्मणतात तीं) झालीं आहेत. त्या जुवांतील जमीन पिकाऊ आहे, परंतु तेथें फारशी शेती नाहीं.

गंगेचा तळवटांत जा नद्या वाहत आहेत, त्यांतून पुष्कळांचा उगम डोंगराळ देशांत आहे; तसाच त्या तळवटाचा मध्यभागांत चढउतारहि आहे; तथापि एकंदराखालीं पाहतां हें तळवट एक मोठें व पिकाऊ मैदान आहे. हिंदुस्थानाचा इतिहासांत जा लोकांची प्रथम प्रख्याति झाली ते या प्रदेशांत राहत असत; आणि या देशाचा सर्व भागांमध्यें सुधारणेचा कामांत हा प्रदेश अद्यापिहि अग्रगण्य आहे.

एक डोंगरांची ओळ जिला जवळचे लोक **अरवली**

असें ह्मणतात तिशीं दुसऱ्या सखल ओळी लागून, त्या विंध्यपर्वताचा पश्चिमटोंकाशीं गुजराथचा सरहद्दीवर मिळतात. ही अरवलीपर्वतांची ओळ अजमीरापलीकडे पुष्कळ अंतरावर दिल्लीचा अंगास वाढत गेली आहे, आणि पश्चिमेकडील ओसाड मैदान व मध्यभागचा उंच प्रदेश यांचामध्यें व या अरवलीडोंगरांचा ओळीमध्यें एक तुकडा पडला आहे; त्याचा आग्नेयीकडील भागांत जोदपुर संस्थान आहे, हा देश चांगला सुपीक आहे. हा प्रदेश खेरीज करून, बाकी उत्तरेस सतलजनदीपासून दक्षिणेस समुद्रापर्यंत अरवलीपर्वत व सिंधुनद यांचा मधील सर्व देश, हा एक ओसाड रेतीचें मैदान आहे. त्यांत लहान मोठीं व निरनिराळ्या मगदूराचीं अशीं सुपीक ठिकाणें आहेत; त्यांसभोंवार रेती असून मध्यें तीं जुवांसारखीं आहेत. अशा प्रकारचें जसलमीर हें सर्वांत एक अति मोठें ठिकाण आहे. वरील ओसाड मैदान व समुद्र यांमध्यें कच्छ हा अरुंद देश आहे; तो गुजराथ व सिंध यांमध्यें जसा कांहीं एक पूल होऊन गेलेला आहे.

मध्यदेश हा उत्तरहिंदुस्थानाचा पूर्वीं सांगितलेल्या चार स्वाभाविक भागांपैकीं अति लहान भाग आहे. हा प्रदेश उंच असून याची सपाटी एकसारखी नाहीं. समुद्राच्या सपाटीपासून याचा पृष्ठभागाची उंची स्थलविशेषीं १५०० पासून २५०० फूटपर्यंत आहे. याचा पश्चिमेस अरवलीपर्वत व दक्षिणेस विंध्याद्रिपर्वत आहे; पूर्वेस याहून सखल अशा बुंदेलखंडांतील डोंगरांचा एका ओळीचा यास आधार आहे, हा ईशान्येकडे हळूहळू उतरत गेला असून तिकडे गंगेचा तळवटास मिळाला आहे. हा देश सर्वत्र एकसारखा

आहे असें नाहीं, परंतु सुपीक आहे.

दक्षिणहिंदुस्थानाचे स्वाभाविक भाग.

विंध्याद्रिपर्वत ही उत्तरहिंदुस्थानाची दक्षिणसीमा आहे; परंतु त्यापलीकडे नर्मदेचा खोल खोंडा दरम्यान असून पुढें विंध्याद्रीशीं समांतर रेषेनें अशी इंजाद्रि, ह्मणजे सातपुडा, या पर्वतांची ओळ आहे; ती उतरून पलीकडे गेलें ह्मणजे दक्षिणदेश लागतो, आणि प्रथम त्या देशांतील तापीनदीचें खोरें आपणास लागतें. तें खोरें लहान असून सखल आहे; परंतु बहुधा बाकी सर्व दक्षिणदेश उंच असून सर्व बाजूंस पर्वतांचा आधारावर टेंकलेला, व सपाट त्रिकोणाकृति आहे. त्याची उंची उत्तरहिंदुस्थानांतील मध्यदेशाचा मानाची आहे; त्याचा बाजूंस जा दोन अति लांब पर्वतांचा ओळी आहेत, त्या, त्या देशाचा आकाराप्रमाणेंच, दक्षिणेस लागत गेल्या आहेत; त्या ओळींचा व समुद्राचा दरम्यान एक नीच व अरुंद प्रदेश आहे; त्याचा सर्व समुद्रकांठीं एक पटाच होऊन गेला आहे. जा वर सांगितलेल्या टेंकड्यांचा दक्षिणेंतील प्रदेशास आधार आहे, त्यास घाट असें ह्मणतात. त्यांतून पश्चिमेकडील ( सह्याद्रि ही ) ओळ अति उंच असून चांगली ध्यानांत येण्यासारखी आहे, आणि तिचा खालचा जो सखल प्रांत, ( ह्मणजे कोंकण व मलबारकिनारा हा ), अति अरुंद व उंचसखल आहे.

घाटावरील देश जागजागीं उंचसखल असून पिकासहि सर्वत्र सारखा नाहीं; परंतु जेथें नागपुरचा वायव्येस सातपुडापर्वतामध्यें वर्धानदी उत्पन्न होत्ये, त्या उगमापासून तों तिचा गोदावरीशीं संगम होईपर्यंत, व तेथपासून त्या दोन्ही नद्या समुद्रास मिळतपर्यंत, अशा त्या प्रवाहाचा

दुबाजूंस या घाटावरील देशाचे दोन भाग परस्परांपासून स्पष्ट रीतीनें भिन्न पडले आहेत. त्यांची सरहद्द वर सांगितल्याप्रमाणें प्रथम वर्धानदी आहे, व पुढें वर्धा व गोदावरी या एकत्र झालेल्या नद्या आहेत. या नद्यांचा उत्तरेकडील व पूर्वेकडील सर्व देश हें एक मोठें अरण्य आहे, त्यांत मध्यें कोठें कोठें खेडीपाडीं आहेत, व ठिकठिकाणीं लांबच लांब असे वसाहतीचेहि प्रदेश आहेत. वरील नद्यांचा वायव्येकडील प्रांत हा जरी सर्वत्र एकसारखा नाहीं, तरी बहुतकरून सपाट व वसलेला आहे.

गुजराथ व बंगाल्ल यांची एतद्देशीय लोक उत्तरहिंदुस्थान व दक्षिण यांतून कोणत्याहि भागांत गणना करित नाहींत; हे दोन्ही प्रांत परस्परांपासून पुष्कळ भिन्न आहेत, परंतु जे हिंदुस्थानाचे भाग त्या त्या प्रांतांजवळ आहेत त्यांशीं ते कांहीं मिळत आहेत.

वास्तविक पाहूं गेलें असतां विंध्याद्रीचा दक्षिणेकडील सर्व देशाचा समावेश दक्षिण या भागांत व्हावा; तथापि तो पर्वत व कृष्णा यांमधील प्रदेशास बहुतकरून दक्षिण हें नाव देण्याचा अर्वाचीन काळीं प्रचार पडून गेला आहे.

हिंदुस्थानाचा पृष्ठभाग सुमारें १२,८७,४८३ चौरस मैल आहे, व त्यांतील लोकांची संख्या १४,००,००,००० धरिली असतां चालेल; परंतु हें सांप्रतचें वस्तीचें मान. हिंदूंचा कारकीर्दीचा अगदीं अखेलीस लोकांची संख्या याहून खचित पुष्कळ कमी होती, व पुढील कारकीर्दींत बहुधा

हिंदुस्थानाचा विस्तार व त्यांतील लोकांची संख्या.

याहून बरीच जास्त होती.[१]

---

१ ब्रिटिश् सरकाराचा हिंदुस्थानांतील राज्याचा विस्तार व त्यांतील वस्ती.

| | क्षेत्रफळ (चौरस मैल) | लोकसंख्य. |
|---|---|---|
| खुद नेकनामदार गव्हर्नर जनरल साहेब यांचा प्रत्यक्ष हुकुमतींतील प्रदेश. | २,४६,०५० | २,३२,५५,९७२ |
| नामदार बंगालचे लेफ्टेनंट गव्हर्नर यांचा ताब्यांतील प्रांत. | २,२१,९६९ | ४,०८,५२,३९७ |
| नामदार वायव्येकडील प्रांतांचे लेफ्टेनंट गव्हर्नर यांचा ताब्यांतील प्रांत | १,०५,७६९ | ३,३६,५५,१९३ |
| मद्रास सरकारचा ताब्यांत. | १,३२,०९० | २,२४,३७,२९७ |
| मुंबई सरकारचा ताब्यांत. | १,३१,५४४ | १,१७,९०,०४२ |
| एकंदर ब्रिटिश् सरकारचा मुलुकाचे मान. | ८,३७,४१२ | १३,१९,९०,९०१ |
| बंगाल इलाक्यांतील एतद्देशीय संस्थानें. | ५,१५,५३३ | ३,८७,०२,२०६ |
| मद्रास इलाक्यांतील. | ५१,८०२ | ५२,१३,६७१ |
| मुंबई इलाक्यांतील. | ६०,५७५ | ४४,६०,३७० |
| एतद्देशीय संस्थानाचें एकंदर | ६,२७,९१० | ४,८३,७६,२४७ |
| फ्रेंच संस्थानें. | १,८८ | २,०३,८३७ |
| पोर्तुगीस संस्थानें. | १,०६६ | ३,१३,२६२ |
| या दोहोंचें एकंदर | १,२५४ | ५,१७,१४९ |
| सर्व हिंदुस्थानाचें एकंदर. | १४,६६,५७६ | १८,०८,८४,२९७ |

मूळग्रंथांतील वस्तीचीं व देशांचीं मानें अलीकडे फिरल्यामुळें वर लिहिलेली हकीकत ही " अनालूस आफ् इंडियन् आडमिनिस्ट्रेशन, सन १८५६।५७ " यांतून उतरून घेतली आहे. मा० क०.

हिंदुस्थानांत सर्वत्र एकसारखी वस्ती नाहीं. ठिकठिकाणचा वस्तींत फार तफावत आहे. खास बंगाल देशांतील बर्दवान नामें एका विस्तृत प्रान्तांत दर चौरस मैलास ६०० लोकांची वस्ती आहे, असें खचित झालें आहे; आणि कितीएक रानवट प्रदेशांत दर चौरस मैलास दहाहि मनुष्यें धरलीं असतां अतिशयोक्ति होईल.

हिंदुस्थानामध्यें मोठमोठे गांव व शहरें पुष्कळ आहेत, अशी प्रसिद्धि आहे; तथापि त्यांतील एकहि शहर मोठ्या भर वस्तीचें नाहीं. सांप्रत त्यांचा मोडत्या काळीं, त्यांतील प्रजा युरोपांतील दुसऱ्या प्रतीचा नगरांहून जास्ती नाहीं. कलकत्ता शहरांत, वेशीबाहेरील वस्ती खेरीज करून फकत २६५,००० लोक आहेत; आणि दुसरी २००,००० हून अधिक स्थाईक वस्तीचीं अशीं दोन किंवा तीन यांहून अधिक शहरें नाहींत.

हवा आणि ऋतु.

जो प्रदेश ८° उत्तरअक्षांशांपासून ३५° उत्तरअक्षांशपर्यंत पसरलेला आहे, आणि समुद्राचा सपाटीपासून हिमालयाचा शिखरापर्यंत ज्याची उंची अधिक उणी झाली आहे, त्यांत शीत व उष्ण यांची साहजिकच परमावधि झाली आहे; परंतु हिंदुस्थानाचा उत्तरेकडेस जी मोठी पर्वतांची सांकळी आहे, तिचा पोटांतील मैदान पाहिलें असतां तारतम्यानें त्यांत हवेमध्यें इतकी तफावत नाहीं.

युरोपखंडाचा हवेशीं हिंदुस्थानांतील हवेची तुलना करून पाहतां एथील हवा विलक्षण उष्ण आहे. या देशाचा बहुतेक भागांत वर्षांतून तीन[२] महिनेपर्यंत पदार्थ करपून

२ अति उष्ण दिवशीं उष्णमापकांत कांहीं वेळपर्यंत १००° अंशा-

जाण्याजोगी उष्णता असत्ये, वाराहि उष्ण येतो, जमीन भरकड व करपटलेली असत्ये, धूळ वाऱ्यानें उडून चक्राकार फिरत्ये ( त्यास झसासूर असें ह्मणतात ), सर्व ओहोळ आटून जातात, लहान नद्यांचे ओघ बहुधा वाहतनासे होतात, आणि अति मोठ्या नद्यांचीं पात्रेंहि सरासरी मानानें अरुंद होऊन रेतीचा तळवटांतून वाहत जातात.

हिंवाळ्यामध्यें केव्हां केव्हां सूर्योदयाचा सुमारास तास दोन तासपर्यंत थोडथोडें हिम पडतें, परंतु जे देश अगदीं उत्तरेस आहेत त्यांत, अथवा ज्यांची समुद्राचा सपाटीपासून फार उंची आहे त्यांत मात्र, हें पडतें; जे दक्षिणेकडील नीच देश आहेत, त्यांत सामान्य उष्णता झाली ह्मणजे हिंवाळ्यांतील थंडी पडली असें समजावें; सर्व हिंदुस्थानाची सरासरी घेतां इंग्लंडांतील उष्णमापकांवर " मध्यम उष्णता" ह्मणून जी खुणा असत्ये, तितकी हिंदुस्थानांतील अतिशय हिंवाळ्यांतील उष्णता होईल; तथापि त्याहि ऋतूंत दिवसांत जो महत्तम उष्णतेचा वेळ असतो, त्या वेळीं इंग्लंडचा उन्हाळ्यापेक्षां विशेष उष्णता असत्ये. हिंदुस्थानांतील थंडी ही उष्णमापकावरून जितकी समजत्ये त्याहून इंद्रियांस विशेष जाणवत्ये. जे अति हिंवाळ्याचे व अति उन्हाळ्याचे महिने नसतात, त्यांत एथील उष्णतेचें मान इटालीदेशांतील ग्रीष्मऋतूंतील उष्णतेहून जास्त असतें.

हिंदुस्थानामध्यें नियमित काळीं पावसाळा येतो, हा एथील हवेमध्यें दुसरा विलक्षण धर्म आहे. त्या पावसास हिंदीमहासागरांतून नैर्ऋत्येकडील वारा आणतो; त्या वा-

---

वर पारा चढतो; तो १२०° अंशपर्यंतहि कोठें कोठें चढल्याची माहिती मिळत्ये.

ऱ्यास मुसूम असें ह्मणतात. ती जूनपासून आक्टोबरपर्यंत[३] वाहत्ये. जे देश समुद्रतीरीं आहेत, तेथें पावसाचा झड होतो; त्यांतहि मुख्यत्वेंकरून जे खोलगट प्रदेश आहेत, तेथें विशेष होतो. ज्या देशांस डोंगरांचा आश्रय असतो, तेथें मात्र तसा पाऊस पडत नाहीं. उदाहरण **कारोमांडेलचा** (ह्मणजे **चोलमंडलचा**) किनाऱ्यास पश्चिम घाट, व घाटावरील प्रदेश यांचा आश्रय आहे; ह्मणून तेथें नैर्ऋत्येकडील वाऱ्यानें पाऊस पडत नाहीं; जेव्हां **बंगालचा** उपसागरावरून **आक्टोबर** व **नोवेंबर** महिन्यांत ईशान्येकडून वायु वाहतो तेव्हां त्या देशांत पाऊस पडतो. **हिंदुस्थानांत** किती कडाक्यानें पाऊस पडतो, याविषयीं युरोपांत कल्पना देखील करवणार नाहीं. जरी या पावसाची मर्यादा चारच महिने आहे, आणि त्यांतहि प्रत्येक महिन्यांत बरेच दिवस व प्रत्येक दिवशीं बरेच तास उघाडी असत्ये, तरी **हिंदुस्थानामध्यें** जो सर्व पाऊस पडतो, त्याचें मान **इंग्लंडांत** जो सर्व बारा महिने पडत असतो त्याचा दुपटीहून पुष्कळ जास्त आहे.

वर सांगितल्या फेरफारामुळें वर्षांचे तीन काळ होतात: उन्हाळा, पावसाळा, आणि हिंवाळा. यांतून हिंवाळा हा बहुधा समशीतोष्ण काळ आहे, आणि त्याची मर्यादा दुसऱ्या दोहोंपैकीं प्रत्येकापेक्षां जास्त आहे.

स्वाभाविक उत्पन्न होणारे पदार्थ.

हिंदुस्थानांतील सुपीक जमीन व तींत उत्पन्न होणारे उत्कृष्ट पदार्थ, यांची प्राचीन काळापासून प्रख्याति आहे.

---

३ ह्मणजे सुमारें ज्येष्ठापासून आश्विनापर्यंत. भा० क०.

वृक्ष. एथील रानांत पुष्कळ इमारती झाडें आहेत. त्यांत साग हा गलबतें बांधण्यास व बहुतेक दुसऱ्या कामांस उपयोगी पडतो. साल* हा उंच व उपयोगी इमारती वृक्ष आहे. चंदन, टेंबुरणी, व दुसरे इतर देशांत दुर्मील व सुंदर असे वृक्ष कोठें थोडे असतात, परंतु बहुतेक ठिकाणीं पुष्कळ सांपडतात. वड, शिस्वा, सांवर, आंबा, चिंच, व दुसरे शोभिवंत आणि उपयुक्त वृक्ष सर्व वसाहतीचा प्रदेशांत पसरले आहेत. बाभूळ या वृक्षाचें फूल पिवळें व सुवासिक आहे. हें झाड रानांमध्यें व इतर मैदानामध्येंहि पुष्कळ होतें; व त्याचप्रमाणें खैर, शमी इत्यादि व दुसरीं नानाप्रकारचीं फूलझाडें होतात. एथें तुतींचीं झाडें पुष्कळ होतात; त्यांपासून ( किड्यांची उपजीविका होऊन ) पुष्कळ रेशीम उत्पन्न होतें. नारळमाड, ताड, व माडाचा दुसऱ्या जातींचीं झाडें हीं जिकडे तिकडे पसरलीं आहेत, त्यांतून पहिल्या झाडाचा फळांत ( ह्मणजे नारळांत ) दुधासारखें पातळ पाणी असतें. व आंत खोबऱ्याचें दळ बांधलेलें असतें. हें लोकांस खाण्याचा उपयोगी पडतें, व याचें तेलहि पुष्कळ काढतात. त्याचा करटीचे प्याले व दुसरीं भांडीं करितात, त्यांतून कांहींचा सर्वत्र उपयोग करितात. नारळाचा सभोंवती जी जाड साल असत्ये, तिला चोड ह्मणतात; त्यांत जे तंतु असतात त्यांस काथा ह्मणतात, त्यापासून चांगलें सुंभ निघतें, व त्याचे गलबताचा कामास उत्कृष्ट शेंडे होतात. याचें लांकूड सुतारकामास लावण्याजोगें नाहीं; तरी पाणी आणावयास पऱ्हळ,

* हा ओक नामें इंग्लंडांतील झाडाचा निदान बरोबरीचा आहे, असें मूळग्रंथांत आहे. भा० क०

व रुंद परंतु हलके लांकडी सांकव बांधायास वांसे, व अशींच दुसरीं पल्ल्याचीं कामें, जांत विशेष मजबूदीचें कारण नसतें, तशीं करण्यास याचा विलक्षण उपयोग पडतो. बांबू हा पोकळ, हलका, व बळकट आहे; त्यामुळें वरील झाडाप्रमाणें याचाहि सर्वांस उपयोग आहे. याचा लहान मोठ्या नानाप्रकारचा जाती आहेत; त्या योगेंकरून शिपायाचा भाल्यांचा दांड्याला, अथवा त्याचा डेऱ्याचा खांबाला, अथवा सरदार लोकांचा निशाणांचा काठीला; तसाच गांवढेकऱ्याचा काठीला, किंवा त्याचा झोंपडीचा वांशांना, हा उपयोगी पडतो. हिंदुस्थानामध्यें सर्व परांचा बांबूचा करितात. त्यांना बंद दोऱ्यांचे असतात, खिळ्यांचे नसतात. तो पिंजला ह्मणजे त्याचा लांब व नरम सऱ्या निघतात, तेणेंकरून, टोपल्या व हांतऱ्या विणण्यास व दुसऱ्या असंख्य कामांस त्याचा उपयोग घडतो. जर (मोठा) कळक पेराशीं कापला तर त्याचीं चांगलीं नळकंडीं होतात; तेल, दूध, व मद्य ठेवण्यास पुष्कळ लोक त्यांचा उपयोग करितात.

पूर्वी माडाचा लांकडांचा उपयोग कसा करितात तें सांगण्यांत आलें आहे, त्याचप्रमाणें ताडाचा उपयोग करितात. ताडाचे झांप घरशाकारणीस लावतात, व त्यांचे कूड करितात. याची पोय कापली असतां आंतुन जो रस येतो, तो, व तसाच शिंदीचा रस, यांपासून हिंदुस्थानामध्यें बहुतेक खपापुरतें मद्य उत्पन्न होतें.

मोह हें ओक झाडाचा मानाचें इमारती झाड आहे; हें सर्व अरण्यामध्यें पुष्कळ असतें; याचें फूल जाड पाकळ्यांचें असतें; त्यापासून पुष्कळ दारू काढतात; शिवाय पहाडी लोक हे हें फूल खाऊन त्यांवर निर्वाह करितात.

माडाची दुसरी एक सुंदर जात आहे तिला पोफळ असें ह्मणतात. या वृक्षाचा फळांत ( ह्मणजे सुपारींत ) तिखट व सुवासिक असें नागवेलीचें पान व कात (या नावाचा एकडीक), असें मिश्रित करून हिंदुस्थानांतील सर्व प्रकारचे लोक खातात. माडाचा दुसऱ्या एका जातीपासून सेगू ऊर्फ साबू दाणे हे करितात.

हिमालयपर्वतामध्यें याहून अगदीं निराळ्या जातींचा वनस्पति आहेत. देवदार व ओक, व युरोप व एशिया या खंडांतील रानांत होणारीं दुसरीं झाडें व तशींच ऱ्हाडोडेनूड्रान्[अ] व दुसरीं शोभिवंत ठेंगणीं झाडें त्या पर्वतावर सर्वत्र पसरलीं आहेत, व तीं कोठें कोठें अतिशय आहेत.

मसाल्याचे पदार्थ इ०. काळीं मिऱ्यें व वेलदोडे पश्चिमचा किनाऱ्यावर पुष्कळ होतात; दालचिनी सिंहलद्वीपांत होत्ये; मिरची, सुंठ, जिरें, धने, हळद व दुसरे मसाल्याचे पदार्थ, हे लोक सर्वत्र सहज पिकवितात. हिंदुस्थानांत पुष्कळ प्रकारचे सुवासिक पदार्थ उत्पन्न होतात. कितिएक अतिशय डोंगरानें भरलेल्या जंगलांतून एक अति सुवासिक गवत पसरलेलें असतें त्यापासून जें तेल काढितात त्यास प्राचीन काळचे लोक जटामावसीचें तेल असें ह्मणत असत.

कापूर, बाहवा, काळा बोळ इत्यादि औषधि पुष्कळ झाडांपासून प्राप्त होतात; दुसऱ्या कांहीं झाडांपासून उपयोगी राळ, डींक, व रोगणें मिळतात.

एथें रानांमध्यें नानाप्रकारचे वृक्ष व वेली हीं भरलेलीं आहेत, त्यांवर तऱ्हतऱ्हेचा आकृतींचीं व रंगांचीं फुलें होताहेत; कण्हेर, कळलावी, तशींच दुसरीं सुंदर झाडेंझुडपें

(अ) यास बुरान हें हिंदुस्थानी नाव असावें. (१) भा० क०.

उजाड प्रदेशामध्यें आपोआप होताहेत; सरोवरें व तलाव यांच्या पृष्ठभागावर कमळें व कमोदें विकासताहेत; यांशिवाय या देशांत पुष्कळ सुगंध देणारीं फुलें आहेत; त्यांचा वास एरव्हीं उत्कृष्ट आहे, परंतु तो युरोपीयन लोकांस बहुधा सोसत नाहीं.

शेतकीचें उत्पन्न.

कापूस, तंबाकू व अफिणीकरितां खसखशीचीं झाडें, यांहींकरून तळ्यांचे तळ भरलेले आहेत; कोठें कोठें अत्तर व गुलाबपाणी हें करण्याकरितां गुलाबाचींहि मोठीं शेतें करिताहेत. या पिकांपेक्षां उसाचें पीक पुष्कळ आहे, तथापि यास जमीन दमदार व पाण्याचा सोईची अशी लागत्ये, यामुळें वर सांगितलेल्या पदार्थांप्रमाणें याचा मुलुखभर पसारा नाहीं. पुष्कळ जमीनींत नीळ करितात; व याहूनहि सफाईदार दुसरे रंग शेतांमध्यें उत्पन्न होतात. अळशी[ब], राई, तीळ, एरंड, व दुसरीं झाडें यांपासून तेलाचा पुरवठा पुष्कळ होतो; तें तेल स्वयंपाकास व दुसऱ्याहि कारणांस उपयोगीं पडतें.

उत्तरहिंदुस्थानांतील लोकांचें मुख्य खाणें गहूं आहे, व दक्षिणेंतील लोक ज्वारी व बाजरी खातात. बहुतेक उपजीविका तांदूळांवर चालविण्याचा प्रचार बंगाल व कांहीं बहार प्रांत व सर्व हिंदुस्थानदेशाचा समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेश, एवढ्यांमध्यें मात्र आहे. हिंदुस्थानांतील बहुतेक प्रदेशांत तांदूळ हें एक श्रीमंतीचें खाणें आहे; दक्षिणदेशाचा दक्षिणभागांत बहुतेक लोक रागी ह्मणून एका निःसत्त्व व बारीक धान्यावर उपजीविका करितात.

---

(ब) कोंकणांत जें झाड होतें त्यास सण ऊर्फ ताग ह्मणतात; देशांतल्यास अंबाडी ह्मणतात, व बंगाल्यांतल्यास जुत ह्मणतात. भा० क०.

वर सांगितलेलीं धान्यें हीं त्या त्या प्रदेशांत मूळ उपजीविकेचे पदार्थ खरे, परंतु ते तेवढ्याच प्रदेशांत उत्पन्न होतात, असें नाहीं. उत्तरहिंदुस्थानांतील लोक जितका गहूं खातात त्याच मानानें बहुधा बाजरी व ज्वारी खातात. तसेंच जा देशांत भात पिकतें, तेथेंहि बाजरी व ज्वारी उत्पन्न होत्ये; परंतु कांहीं कमी होत्ये. दक्षिणेंत गहूं असाधारण आहे असा नाहीं, व तोहि भात होतें त्या प्रदेशांत होतो. हिंदुस्थानामध्यें सर्वत्र सोईवार ठिकाणीं भात थोडें बहुत होतें. डोंगरांचा आश्रयास, अथवा जेथे कत्रिम साधनांनीं पुष्कळ पाणी साधण्याजोगें असतें तेथें हें धान्य होतें.

एथील लोक जव फार खात नाहींत, आणि ओट, धान्याची अलीकडेसच यांस माहिती झाली आहे, पूर्वी नव्हती; परंतु सजगुरे, कांग, व दुसऱ्या जातीचीं पुष्कळ बारीक धान्यें आहेत, त्यांस इंग्रेजींत नावें नाहींत. कडबा करण्याकरितां मका पिकवितात; व त्याचीं कणसें नवीं व कोंवळीं असतात, तेव्हां गांवढेकर लोक तीं भाजून मोठ्या गोडीनें खातात; परंतु मक्याची कधीं भाकरी करितात किंवा नाहीं याविषयीं मला संशय आहे.

या देशांत पुष्कळ जातींचें कडदण उत्पन्न होतें, त्याचा सर्व प्रतीचा लोकांत पुष्कळ खप होतो; तसेंच नानाप्रकारचे कंद व भाजा यींत साधारण जातींचे पुष्कळ मसाले

५ पुष्कळ लोक भाकरी करून खातात. भा॰ क॰.

६ वांगी, वेलवांगीं, कौन, रताळीं, गाजरें, मुळे, कांदे, लसूण, व मायाळूची भाजी व दुसऱ्या युरोपांत परिचित व अपरिचित अशा भाजा शेतांत लावून अथवा आपोआपहि उत्पन्न होतात.

घालून गरीब लोक आपल्या भाकरीशीं तोंडिलावणीं करितात. या देशांत गरीब लोकांस पुष्कळ जातींचीं फळें मिळतात; त्यांत मुख्यत्वेंकरून आंबे, तरबुजें, व कलिंगडें, हीं मिळतात; त्यांतून तर्बुजें व कलिंगडें हीं उन्हाळ्यांत नद्यांचा विस्तीर्ण पात्रांमध्यें पिकवितात. भोंपळे व कांकड्या हीं अतिशय होतात. यांचा बिया गरीब लोक हे आपल्या झोंपड्यांभोंवत्या पेरितात व पुढें वेल आले ह्मणजे घरावर लावून देतात, तेणेंकरून सर्व घरावर हिरवीं पानें व मोठीं पिवळीं फुलें पसरलेलीं असतात. हिंदुस्थानांतील फळां-मध्यें आंबा हा उत्तम आहे, व तो बहुधा सर्व फळांपेक्षां पुष्कळ होतो. याचे वृक्ष राईमध्यें व एकेरी असे सर्वत्र लाव-लेले असतात; व त्यांची पुढें विशेष तजवीज ठेविल्याशिवा-य ते होतात. केळीं, पेरू, शिताफळें, बोरें, व दुसरीं उष्ण देशांतील फळें हीहि एथें साधारण आहेत. [७] द्राक्षें हीं बागांमध्यें पुष्कळ पिकतात, परंतु दारू करण्याकरितां कोणी लावित नाहींत. नारिंगें, ईडनिंबें, महाळुंगें, हींहि पुष्क-ळ आहेत, व त्यांतून कांहीं जाती उत्तम आहेत. अंजीर इतके पुष्कळ नाहींत, परंतु बहुतेक ठिकाणीं होतात, आणि पुण्यासारख्या कित्येक ठिकाणीं इतके उत्कृष्ट अंजीर मिळ-तात, कीं तसे पृथ्वींतहि कोठें मिळत नाहींत. अननस

---

७ फणस हें एक अति चमत्कारिक फळ आहे, व हें कितीएक ठिकाणीं अतिशय होतें. हें फळ अतिशय उमदें व रसाळ आहे, व हें व हे एका उंच वृक्षाचा खुंटापासूनच होतें, व याचें वजन केव्हां केव्हां ६० पासून ७० रतल पर्यंत असतें.

सर्वत्र होतात, आणि पेगुप्रांतांमध्यें रानांतहि आपोआप होतात.

घोडे, उंटें, व बैल इत्यादि बारबरदारीचीं जनावरें यांना कडदण चारितात. त्यांस गव्हांचा पेंढा वैरणीस घालितात, व ज्वारीचा व बाजरीचा कडबाहि घालितात; त्यांत साकरेचा गोडीलपणा पुष्कळ असतो त्यामुळें तें गवत जोरदार असतें. घोड्यांस पैण ह्मणून उन्हांत सुकविलेलें हिरवें गवत घालितात, परंतु गवताचा गंजा सर्वत्रच सांठवून ठेविलेल्या असतात, असें नाहीं.

कांहीं ठिकाणीं तीन पीकें येतात, आणि सर्वत्र दोन होतात[९]. बाजरी, ज्वारी, भात, व दुसरीं कांहीं धान्यें हीं पावसाळ्याचा अवेलीस पेरतात व अखेरीस कापतात. गहूं, जव व दुसरीं कांहीं धान्यें आणि कडदण हीं हिंवाळ्यांत पिकतात, व वसंतऋतूंत यांची लाणी करतात.

जनावरें. हत्ती, गेंडे, आस्वल, व गवे, हे रानांत मात्र असतात; वाघ, चिते, बिबळ्ये वाघ व दुसरे कांहीं वनपशु हेहि रानांत असतात, व कोठें झाडझुडुपाचा आश्रयाला जाळ्यांतून, अथवा कसणूकीचा जमीनींत उंच शेतें झालीं असतां त्यांतूनहि राहतात. त्याचप्रमाणें रानडुकर, तरस, लांडगे, व सर्व जातीचे मृग हेहि अतिशय असतात. सिंह हे कोठें कोठें मात्र आढळतात. पुष्कळ तऱ्हेचे सांबर

८ उत्तरहिंदुस्थानांत चणे घालतात, हें झाड लहान असून याचा प्रत्येक शेंगेंत एकेक दाणा असतो; व याचा पाल्यापासून आंब होते. दक्षिणेंत कुळीत घालतात परंतु ते शिजवून घातले पाहिजेत.

९ कित्येक ठिकाणीं एकच पीक येतें व कोठें तेंहि नेहमीं येत नाहीं.

व हरिण यांचे मोठे कळप सर्वत्र पाहण्यांत येतात. वानर जंगलांत पुष्कळ असतात, व तसेच शेतकीचा प्रदेशांत व शहरांतहि असतात. साळू, मुंगुसें, खवळीं माजरें, घोरपडी, व पालीचा दुसऱ्या जाती हे जीव सर्वत्र असतात; त्याच प्रमाणें सर्प, व दुसरे, उरग प्राणीहि अतिशय असतात, त्यांतून कांहीं विषारी असतात, व कांहींपासून अगदीं उपद्रव होत नाहीं.

या देशांत घोडे पुष्कळ आहेत; परंतु ते बसावयाचा मात्र कामास लावतात. नांगर, गाडे, तोफा, एतद्देशीय रथ इत्यादि ओढण्याचा सर्व कामांत, व तसेंच सर्व तऱ्हेचें बारबरदारीचें सामान व व्यापाराचा जिन्नस नेण्याचा सर्व भार बैलांवर असतो. तशांत कित्येक प्रदेशांत खडकळ वाटा पुष्कळ असतात, व दुसऱ्या प्रदेशांमधील रस्ते वर्षास पावसानें बिघडून जातात; यामुळें जितका गोणिबैलांचा उपयोग होतो, तितका गाडिबैलांचा होत नाहीं; व त्याच कारणामुळें धान्य, मीठ, व दुसरे व्यापाराचे जिन्नस एका देशांतून दुसऱ्या देशांत नेत असतांना असंख्य बैलांचे कळप चालून पांथस्थांचे रस्ते वारंवार अडवून टाकितात.

उंट बैलांपेक्षां जलद चालतात, व त्यांहून ओझेंहि अधिक नेतात. हे श्रीमंतांचा पदरीं असतात, व लश्करांमध्येंहि पुष्कळ असतात. हत्तींचाहि त्याचप्रमाणें उपयोग पडतो. मोठे तंबु, जड सत्रंजा, व दुसरे कांहीं जिन्नस जांचीं खंडें करितां येत नाहींत, ते नेण्यास हत्ती लाविल्याशिवाय चालत नाहीं. या देशांत ह्मशी अतिशय आहेत, परंतु लोक बहुतकरून यांस दुधाकरितां बाळगतात, व त्या दुधापासून नाना प्रकारचे पदार्थ करतात. गाडे ओढण्यास रेडे

पुष्कळ लावित नाहींतसें नाहीं, व खोलगट व पाणथळ जाग्यांत नांगरांस जुंपितात; परंतु गाड्यांस विशेषेंकरून लावित नाहींत; युरोपांतील देशाप्रमाणेंच एथें मेंढे पुष्कळ आहेत, व बकरे त्यांहून जास्त आहेत. अति नीच जातीचे लोक डुकरें बाळगतात. कोंबडीं इत्यादि गृहपक्षी हे तितके पुष्कळ नाहींत. त्यांतूनहि हिंदुलोकांस पाखरांची चीड आहे, यामुळें लहानसहान खेड्यापाड्यांत तर विशेष नाहींतच. रान कोंबडे पुष्कळ सांपडतात; ते 'बांतम' जातीचा विलाइती पक्ष्यासारखे दिसतात. मोर हा पक्षीहि रानांत पुष्कळ सांपडतो; शुभ्र क्रौंच व, ईग्रेट, हे हमेशा अतिशय असतात तसेंच करडे क्रौंच, हंस, लावे, आर्टोलान्, व दुसरे आगंतुक येणारे पक्षी हे आपआपल्या ऋतूंमध्यें असंख्य येतात. कांहीं जागीं कुररी असतात; तसेंच पुष्कळ जातींचे ससाणेहि आढळतात. गिधाडें पुष्कळ आहेत, व घारी असंख्य आहेत. इंग्लंडांतील गाणारे पक्षी खेरीज करून बाकी तिकडील बहुतेक पक्षी इकडे आढळतात. याशिवाय लहान लहान पोपट व दुसरे उमद्या पिसाऱ्याचे नाना प्रकारचे पक्षी या देशांत आहेत, त्यांस इंग्रेजीमध्यें नावेंहि नाहींत.

एथें मत्स्य पुष्कळ आहेत, आणि बंगाल व दुसऱ्या कांहीं देशांतील लोक त्यांवर बरीच उपजीविका करितात.

नद्यांत व मोठ्या तलावांमध्यें पुष्कळ ठिकाणीं मगर असतात.

खनिज पदार्थ.

हिरे व लोखंड खेरीज करून हिंदुस्थानांतील दुसऱ्या खनिजांची विशेष प्रख्याति झालेली नाहीं. प्राचीन काळचे लोक हिंदुस्थानांतील तिख्यावर मोठा हेतु ठेवित असत; फारसीमध्यें जें अति

जुनाट काव्य आहे, त्यांत तिख्याची मख्याति केलेली आहे; आणि अद्यापिहि खुरासान व दमास्कस एथील निमचे याच पोलादाचे केलेले असतात. क्षीरस्फटिक, याकूत, लाल याकूत, लसण्या, विरोजा, अकीक, गोमेद, इत्यादि जीं हिऱ्यापेक्षां हलक्या मतीचीं रत्नें, तीं पुष्कळ सांपडतात. पृथ्वीवरील बहुतेक मोत्यें व त्यांतहि जीं उत्कृष्ट आहेत तीं, सर्व सिंहलद्वीपाजवळील खाणींत सांपडतात. पंजाबमांतांत एका डोंगरांचा ओळींत सेंधेलोण सांपडतें, व अजमीराजवळ सांबर नामें तलाव आहे त्याचा पाण्यापासून पुष्कळ खावयाचें मीठ करितात, तसेंच समुद्राचा पाण्यापासूनहि पिकवितात. एथें सोरा इतका पुष्कळ आहे, कीं दुसऱ्याहि पुष्कळ देशांचा तो पुरवठ्यास येतो.

देशाचा रचनेमुळें आणि हवा व ऋतु यांचा विलक्षण धर्मामुळें हिंदुस्थानांत लढाईचा कामांत पुष्कळ फेरफार होतो. जा डोंगरांनीं या देशाचे तुकडे तुकडे पडलेले आहेत, त्या डोंगरांचा ओळींतून जा खिंडींचा वाटा आहेत, त्यांचा धोरणानें रस्ते मळतात, व बहुधा त्याच कारणामुळें लढायांचीं ठिकाणेंहि मुकरर होतात. लढाईचीं कामें बहुधा पावसाळ्यांत बंद राहतात; व त्या ऋतुचा अखेरीस दाणावैरण पुष्कळ झाली, ह्मणजे पुनः सुरू होतात. पाण्याचा पुरवठ्यावरून छावणी द्यावयाचें धोरण पुष्कळ ठेवावें लागतें; कारण मत्येक फौजेबराबर सामान नेण्याकरितां हजारों बैल वगैरे जातात, त्यांस आयासाशिवाय तें पाणी मिळण्याजोगें असलें पाहिजे. आपला शत्रु जेथें छावणी देणार असेल, तें पाणी आपण घेतलें असतां आपल्या शत्रूस आपल्याबराबर लढाई केल्याशिवाय परिणाम नाहीं असें

असेल तेथें शत्रूचें पाणी अडवितात, ह्मणजे त्यास लढाई क-
रणें जरूर पडतें. वर्षांत जो चातुर्मास्यांत पाऊस पडतो तो
एकाद्या वर्षीं नाहींसा झाला, ह्मणजे दुष्काळ पडून, त्या
बरोबरील येणाऱ्या सर्व विपत्ति प्राप्त होतात.



# हिंदुस्थानाचा इतिहास.



## भाग पहिला.

### मुसलमानलोक हिंदुस्थानांत स्वाऱ्या करूं लागले तोंपर्यंत हिंदुलोकांचा प्राचीन इतिहास.

## प्रकरण पहिलें.

### उत्तरहिंदुस्थानांतील लोकांचा

वृत्तान्त.

कोणा एका काळीं हिंदुलोक हे दिल्लीचा वायव्येस सुमारें ५० कोशांवर सरस्वती, आणि दृषद्वती, या दोन नद्यांमधील प्रदेशांत राहत असत. तो देश सुमारें साडे बत्तीस कोश लांब, आणि दहांपासून वीस कोशपर्यंत रुंद होता. असा हिंदूंचा इतिहासाविषयीं पहिला वृत्तान्त, मनुस्मृतींतील एका लेखावरून मिळतो; या पूर्वींच्या हिंदूंच्या इतिहास मिळत नाहीं, तेव्हां हाच प्रथमच्या वृत्तान्त असें ह्मटलें पाहिजे. वरील देशांत देवांचें येणें जाणें असे, ह्मणून त्यास ब्रह्मावर्त ह्मणत; आणि त्या देशांतील परंपरागत आचार पाहून सर्व धार्मिक लोकांनीं चालावें असें मनूचें ह्मणणें आहे. तसाच तो प्रदेश व यमुनानदी, यांमधील प्रांत व उत्तरबहारसुद्धां, गंगा व यमुना यांचा उत्तरेकडील सर्व देश, एवढ्यांच्या

(१) अ० २रा, श्लोक १७ व १८

ब्रह्मर्षि या नावांत समावेश होतो; आणि लोकांचा निरनिराळ्या व्यवहाराविषयीं उपदेश करण्यास एथें जन्मलेले ब्राह्मण योग्य होत; याप्रमाणें त्याच ग्रंथांत दुसरा[२] लेख आहे.

यावरून सरस्वतीतीरचा प्रदेश घेतल्यानंतर प्रथम हा प्रदेश हिंदुलोकांनीं घेतला असावा, असें दिसतें. या प्राचीन गोष्टींविषयीं पुराणांतरीं वर्णन नाहीं. पुराणांमध्यें काय तो अयोध्येपासून आरंभ. हा देश ब्रह्मर्षि ह्मणून जो शेवटील देश सांगितला, त्याचा सुमारें मध्य भागास आहे. एथें सूर्यचंद्रवंशांची उत्पत्ति झाली; आणि त्यांपासून पुढें दुसऱ्या सर्व देशांतील राजे झाले.

सूर्यवंशाचा ५० पासून ७० पिढ्यांपर्यंत, निरनिराळ्या राजांचा शुद्ध भाकडकथांशिवाय, आणखी कांहीं इतिहास सांपडत नाहीं. इतके राजे झाल्यानंतर राम झाला; त्याची वास्तविक इतिहासांत गणना करणें योग्य आहे, असें दिसतें.

रामाची स्वारी. रामाचें पुष्कळ चरित्र वर्णन केलेलें आहे त्यांत कांहीं कल्पित आहे, व कांहीं भाषालंकारामुळें विलक्षण दिसतें; परंतु सर्व कल्पना, व अलंकार एकीकडे ठेवून पाहिलें असतां, राम हा उत्तरहिंदुस्थानांत मोठा राजा होता; त्याणें दक्षिणेंत स्वारी केली, आणि सिंहलद्वीपापर्यंत जाऊन, तें बेट जिंकून घेतलें, असें दिसून येतें.

यांतून प्रथम गोष्टीविषयीं संशय घेण्याचें कांहीं कारण दिसत नाहीं; आणि रामानें दक्षिणेंत स्वारी केली, या

(२) अ० २ श्लोक १९ व २०

गोष्टीवरहि आपल्याचानें भरवसा ठेववेल. परंतु जर यापूर्वी कोणी हिंदु राजे दक्षिणेंत आले नसून, याची ही प्रथमचीच स्वारी असेल, अथवा जरी अगदीं प्रथमची नसली, तरी पहिल्या हिंदुराजांनीं जा स्वाऱ्या केल्या, त्यांतील ही असेल; तरीहि याची गति सिंहलद्वीपापर्यंत होऊन, तें याणें जिकिलें, ही गोष्ट फार असंभाव्य दिसत्ये. कारण राम हा वेदांची रचना होण्यापूर्वी झाला, असें बहुधा सर्वांचें मत आहे. तेव्हां जर वरील गोष्ट प्रमाण धरिली, तर या मतास बाध येतो. कारण मनुस्मृति झाली, तेव्हांहि दक्षिणेमध्यें हिंदुलोकांची वसाहत नव्हती; यास्तव जा चरित्रकारांनीं रामाचें वर्णन केलें आहे, त्यांणीं त्या वर्णनाची मोठी इमारत लहानशा पायावर बांधिलीशी दिसत्ये; आणि त्या वेळीं जा देशांत पराक्रम केले असतां लोकांत वर्णनीय असे वाटत असत, तेथें रामानें मोठीं कृत्यें केलीं असें त्यांणीं लिहिलें आहे, असें संभवतें.

रामायण हा निःसंशय फार प्राचीन ग्रंथ आहे; ह्मणून त्यांतील चरित्र फार प्राचीन काळीं झालें असावें, यास हेंच उत्तम प्रमाण आहे; तथापि जर रामानें दक्षिणेंत मोठी स्वारी केली असली, तर ती मोठ्या सामग्रीवांचून झाली नसावी; परंतु बहुत सामग्री मिळण्यास लोकांची स्थिति बरीच सुधारलेली असली पाहिजे; याजवरून हिंदुलोक चांगले नावारूपास आल्यानंतर राम झाला असावा, असें दिसतें.

रामानंतर त्याचा वंशांतील ६० पुरुषांनीं राज्य केलें. या राज्यास कधीं कधीं कोसल अशी संज्ञा दिलेली आहे; परंतु यापुढें कोठें ग्रंथान्तरीं अयोध्येचें नाव येत नाहीं; यावरून तें राज्य दुसऱ्या राज्यांत मिळविलें असावें,

आणि राजधानीची जागा अयोध्येहून उठवून कनोज एथें आणिली असावी, असा संभव दिसतो.

भारती-य युद्ध. रामानंतर पुढें कौरवपांडव यांचें युद्ध झालें, तेथपर्यंत इतिहासांत वर्णन करण्याजोगी दुसरी कांहीं गोष्ट झालेली नाहीं. त्या युद्धाचें वर्णन महाभारतांत आहे.

तें असें. पूर्वीं हस्तिनापुरनगरींत सोमवंशाचे राजे होते, त्यांचा वंशांत पांडव आणि कौरव असे दोन वंश उत्पन्न झाले. तेव्हां राज्यांत कलह होऊन मोठें युत्ध झालें. त्या वेळीं दोहीं पक्षांकडे बहुत राजे सहायार्थ आले होते, त्यांत कांहीं अति दूर देशचे होते.

त्या वेळीं हिंदुस्थानांत पुष्कळ संस्थानें होतीं असें दिसतें, ( गंगेचा कांठीं एकाच प्रदेशांत सहा राज्यें हीं तर होतींच ) या सर्व संस्थानांचा परस्परांशीं पुष्कळ संबंध आणि व्यवहार असे, असें दिसतें. वरील युत्धांत कृष्ण हा पांडवांचा एक सहाकारी होता. याचा जन्म यमुनातीरीं असतां, याणें गुजराथेमध्यें एक राज्य स्थापित केलें होतें. दुसरे उभय पक्षांकडे सहायार्थ जे राजे आले होते, त्यांमध्यें कित्येक सिंधदेशचे, कित्येक दक्षिणेमधील कलिंगदेशचे, आणि कित्येक सिंधुनदापलीकडील देशींचेहि होते असें दिसतें. दुसरे त्या युत्धांत यवननावाचे राजे आले

---

( ३ ) हस्तिनापुर, मथुरा, पांचाल ( हें अयोध्या आणि खालचा दुआब या देशांचें भाग मिळून झालें होतें) काशी, मगध व बंगाल, अयोध्या, आणि कनोज, ( कन्याकुब्ज ), यांविषयीं भारतांत वर्णन नाहीं, परंतु मनुस्मृतींत ( अ० २ श्लो० १९ ) असें वर्णन आहे, कीं पांचाल हें कनोजचें नाव; तसें असेल तर पांचाल हें नाव भारतांत आहे.

होते. हे बहुधा युनानी ह्मणजे ग्रीसदेशांतील लोक असावे, कारण सर्व प्राचीन ग्रंथांत यवन हें नाव ग्रीक लोकांस लाविलेलें आहे, असें हिंदुस्थानाविषयीं बहुतेक माहितगार अशा विद्वान् लोकांचें मत आहे. या युद्धांत पांडवांचा जय झाला. परंतु युद्धांमध्यें त्यांचे इष्टमित्र, सुहृत्संबंधी, व सेना, यांचा नाश झाल्यामुळें, ते फार दुःखी झाले, आणि सर्वस्वत्याग करून हिमालयामध्यें बर्फांत गळ घेऊन मरण पावते झाले. इकडे त्यांचा मुख्य सहायकर्ता कृष्ण याचाच देशामध्यें यादवी झाली; तेव्हां लोकांचा आपआपल्यांमध्यें लढाया होत असतां, त्यांत हा मरण पावला. याचा वंशजांस सिंधुनदापलीकडे पळून जावें लागलें होतें, अशा कित्येक हिंदुकथा आहेत. ही गोष्ट प्रथम फारशी सप्रमाण वाटत नाहीं; परंतु अर्वाचीन काळीं सिंधुनदापलीकडून जे राजपूत लोक सिंध, व कच्छ, या देशांत आले, ते यादववंशांतीलच होते; यावरून वरील कथा कांहीं अधिक विश्वास ठेवण्याजोगी दिसते. आतां पाहूं गेलें असतां, या इतर कथांपेक्षां महाभारताचें प्रमाण मोठें धरिलें पाहिजे. त्या ग्रंथांत पाहिलें, तर यादव हे यमुनेजवळील प्रदेशांत गेले. असें वर्णन आहे.

महाभारतांतील कथा रामायणांतील कथेपेक्षां अधिक विश्वास ठेवण्याजोगी दिसते. भारतांत हिंदुस्थानदेशाचा स्थितीविषयीं बरेंच वर्णन आहे; आणि त्यांतील कथा या बहुधा झालेल्या गोष्टींवरून रचिलेल्या आहेत, असें दिसतें. सांप्रत आपले पूर्वज महाभारतीय योद्ध्यांमधील होते, असें सिद्ध करण्याविषयीं पुष्कळ हिंदुराजेरजवाडे यत्न करितात. एवढें त्या गोष्टींचें अद्यापि लोकांत

माहात्म्य आहे. हें युद्ध बहुधा खिस्तापूर्वी १४ व्या शतकांत झालें असावें.

पांडवांमागें त्यांचा वंशाचे २९ राजे झाले, असें कांहीं ग्रंथकार ह्मणतात; आणि कांहीं ६४ झाले असें ह्मणतात; परंतु या राजांचीं नावेंमात्र राहिलीं आहेत. या वेळीं राजधानी दिल्ली एथें गेली होती, असें दिसतें.

मगध. यावरील लढाईत एका पक्षाकडे मगधदे[४]शचे राजे होते. यांचे वंशज पुढें विशेष प्रख्यात झाले. मगधदेशाचा राजांचें राज्य बहुधा नेहमीं मोठें असे, असें दिसतें. यांतील प्रथम पुरुष पुष्कळ मांडलिक राजांचा, व पुष्कळ जातींचा लोकांचा मुख्य होता, असें भारतांत वर्णन आहे. परंतु हे सर्व राजे, व लोक बहुधा बंगाल आणि बहार याच प्रांतांतील असावे, असें संभवतें. कारण गंगेचा कांठींहि अशींच दुसरीं पांच स्वतंत्र राज्यें होतीं असें पूर्वी याच भागांत सांगितलें आहे.

शेकडों वर्षेपर्यंत, मगध देशचे राजे क्षत्रिय वंशांतील होते, परंतु शेवटीं नंद राजा हा एका शूद्रीपासून झाला. त्याला पुढें चंद्रगुप्तानें मारिलें, आणि आपण गादीवर बसला, तोहि नीच जातीचा होता. यापुढें मगधदेशांत क्षत्रियांचा मोड झाला, आणि पुढें जे राजेरजवाडे झाले, ते सर्व शूद्र होते, असें पुराणान्तरीं वर्णन आहे.

याप्रमाणें क्षत्रियवंशाचे राजे पदच्युत होऊन शूद्र राजें झाल्यामुळें, राज्याचें महत्व कमी झालें, असें दिसत

(४) हल्लीं त्यास बहार ह्मणतात. (भाषांतरकर्ता.)

५ यवन ह्मणजे ग्रीक लोक हे मगधराजाचे दोस्त होते असें वर्णन आहे; ही गोष्ट चमत्कारिक ध्यानांत ठेवण्याजोगी आहे.

नाहीं. कारण चंद्रगुप्तापासून पुढें जे शूद्र राजे झाले, त्यांणीं एकछत्री पृथ्वी केली, असें पुराणान्तरीं वर्णन आहे. यावरून जरी हें वर्णन अतिशयोक्तिक असलें, तरी त्या राजांचें राज्य मोठें होतें, असें आपणास यावरून अनुमान करायास चिंता नाहीं. या शूद्रवंशांत अशोक ह्मणून तिसरा पुरुष झाला. त्याचा अधिकार नर्मदेचा उत्तरेकडील सर्व राज्यांवर चांगला चालत असे, असें मानायास सबळ कारण दिसतें. लोकांस आपल्या आज्ञा कळावयाकरितां त्याणें दूरदूर देशांत जे स्तंभ उभारिलेले आहेत, त्यांवरून त्याचें राज्य विस्तीर्ण होतें, असें दिसतें. त्या हुकुमांमध्यें सर्व राज्यभर आजारी लोकांकरितां घरें बांधावीं, व दवाखाने चालवि; मोठ्या रहदारीचा रस्त्यांवर विहिरी खणाव्या, व दोहोंबाजूंस झाडें लावावीं; याप्रकारचे हुकूम आहेत. यावरून तो राजा सुज्ञ होता, आणि त्याचें लक्ष लोकांचा कल्याणाकडे होतें, असें दिसून येतें.

या मगधदेशाचे राजे हे हिंदुस्थानांत सार्वभौम होते — ह्मणजे यांचा अधिकार या देशांत सर्वत्र चालत असे - असें कित्येकांचें ह्मणणें आहे; परंतु यास विशेष प्रमाण मिळत नाहीं. महाभारतीय युद्धाचा वेळीं मगधराज्य, व अशींच दुसरीं लहान लहान पांच राज्यें, गंगाकांठचा एका प्रदेशांत होतीं. तसेंच हस्तिनापुर एथील लहानशा राज्याशीं युद्धकरणाऱ्यांमध्यें मगधराजे होते, आणि त्यांत त्यांचा पराजय झाला. यावरून वर सांगितलेली सार्वभौम पदवी त्या वेळची नाहीं, असें सिद्ध होतें. पूर्वीं अशोकराजाचें वर्णन केलें, त्याची सत्ता फार वाढली होती; यावरूनच वरील मतास काय बळ येत असेल तें असो;

दुसरा त्यास कांहीं मागील आधार नाहीं. कर्नल विल्फोर्ड ह्मणून एका ग्रंथकारानें या मगधराजांविषयीं जितके लेख मिळाले तितके टिपून ठेविले आहेत; तथापि त्यांवरूनहि पाहतां अशोकराजापूर्वी कोणी मोठा बलाढ्य मगधराजा झाला, अथवा वर सांगितल्याहून मोठा देश कधीं त्यांचा हस्तगत होता असें दिसत नाहीं.

पुढें सिकंदर पादशाहा हिंदुस्थानांत आला. तो जितक्या देशांतून फिरला, तितक्या देशांत त्याला कोणी सार्वभौम राजा आढळला नाहीं; आणि बियानदीपलीकडे जीं त्या वेळीं राज्यें होतीं, तीं बहुधा मानकरी लोकांचा मंडळ्यांनीं चालविलीं होतीं. आर्यानं[६] व स्ट्रेबो, यांचा ग्रंथांत प्राच्य ( ह्म० पूर्वेकडील ) या नावाचे लोक त्यावेळचा हिंदुस्थानांतील सर्व लोकांत मख्यात होते, असें वर्णन आहे. परंतु यांचें दुसऱ्या कोणावर वर्चस्व होतें, असा त्यांतून एकाचाहि ग्रंथांत उल्लेख नाहीं. आर्यन हा प्राच्य लोक, व त्यांचे राजे, यांचा मख्यातीविषयीं वर्णन करितो खरें; परंतु त्यांचा राजाहून पौरस[७] राजा मोठा होता, असें तोच सांगतो. हिंदुस्थानांत ११८ निरनिराळे लोक होते, असें मेगास्थिनीस[८] या ग्रंथकारानें वर्णन केलें आहे; परंतु त्यांतून कोणीहि प्राच्यलोकांचा सत्तेखालीं होते, असें तो सांगत नाहीं. तशांत मेगास्थिनीस हा चंद्रगुप्ताचा दरबारांत राहत असे, म्हणून त्याचें महत्व वाढविणें,

---

६ दोन ग्रीक इतिहास कर्ते. भा० क०

७ ह्मणजे पौरव अथवा पंवार. ( बाळशास्त्री जांभेकर यांचा ग्रंथावरून. ) भा० क०

८ हा एक युनानी वकील आला होता. भा० क०

हें यास इष्टच होतें, असा याचा कल दिसतो; तेव्हां जर मगधराजांचा अधिकार त्यांचा स्वतांचा देशाबाहेर कांहींतरी चालत असता. अथवा त्यांजकडे सार्वभौमत्व असतें, तर तो आपले ग्रंथीं लिहिण्यास चुकता, अशी कल्पना करणें हें अशक्य आहे.

आतां हिंदुलोकांचा ग्रंथान्तरीं पहावें तर त्यांमध्यें चंद्रगुप्ताची विशेष प्रख्याति दिसत नाहीं. त्यावर नेहमीं शत्रु स्वाऱ्या करित असत, त्यांचा पराभव करण्यास त्याजवळ सैन्यहि तादृश नसे, परंतु त्याचा प्रधान होता, तो आपल्या चातुर्याचा बलानें परराज्यांचें चालूं देत नसे. तथापि पुढें त्याचा नातु अशोक याचा वेळीं जें मगधराज्याचें माहात्म्य वाढलें, त्याचा पाया याणें घातला असें संभवतें. चंद्रगुप्त राज्य करित असतां, सिकंदर बादशाहाचा सरदार सेल्यूकस निकेतर हा बाक्ट्रिया प्रांताचा अधिकारी असें, त्याजपासून सिंधुनदावरील जें ग्रीक लोकांचें ठाणें होतें, तें याणें संपादिलें; यावरून याणें आपले हेतु किती पार पाडले हें कळून येतें. तसेच पुढें तरी या राजांचा अधिकार वाढतच गेला असावा; कारण अशोक हा लहानपणीं उज्जनी ह्मणजे माळव्यांत याचा सुभेदार होता, तेव्हां तो देश अर्थात् त्याचा बापाचाच राज्यांतला असावा.

दुसऱ्या पुष्कळ वंशांचा राजांनीं, आपण हिंदुस्थानांत सार्वभौम आहों असें ताम्रपटादि कोरींव लेखांमध्यें लिहून ठेविलें आहे; आणि कित्येक युरोपीयन ग्रंथकार ही पदवी पोरस यास देतात; कित्येक काश्मीर, दिल्ली, कनोज, बंगाल, माळवा, गुजराथ, आणि दुसरे देश

१ मुद्राराक्षस नाटक पहा.

यांचाहि राजांस सार्वभौम ह्मणतात. परंतु त्यांमधून एकाहि मतास मजबूद आधार दिसत नाहीं.

आतां चंद्रगुप्त हा मौर्यवंशांतील होता. या वंशानें दहा पिढ्यांपर्यंत राज्य केलें. पुढें तीन शूद्रवंश झाले, त्यांतून शेवटल्याचें नाव आंध्र. या आंध्रराजांनीं पुष्कळ वर्षें राज्य केलें.

पुढें इ. स. ४३६ त या वंशाची समाप्ति झाली. त्या नंतर या देशांत पुष्कळ वंशांचे राजे झाले, असा पुराणांत घोटाळा आहे. परंतु ते बहुधा हिंदु नव्हते असें दिसतें. त्या वेळीं अमुक काळीं अमुक राजा झाला, असें कालमानाचेंहि बरोबर धोरण लागत नाहीं; यावरून तेव्हां कोणी परदेशांतील शत्रु येऊन हें राज्य घेतल्यामुळें, बहुतकालपर्यंत धांदल झाली असावी असें दिसतें. यानंतर पुष्कळ शतकेंपर्यंत मगधराजांचा इतिहास समजतच नाहीं. पुढें मगधदेश कनोजचे गुप्तनामक राजे यांचा स्वाधीन झाला असावा, असें दिसतें. यापुढें या देशाचें कोठें इतिहासान्तरीं निराळें वर्णन नाहीं.

मगधदेशांत बुद्धाचा जन्म झाला. याणें बौद्ध ह्मणून एक धर्म स्थापित केला, त्याचा प्रसर अतिशय झाला आहे. त्यांतील धर्मपुस्तकें व जैन लोकांचीं धर्मपुस्तकें हीं मगधदेशाचा भाषेंत ( ह्मणजे मागधी ऊर्फ पाली भाषा ईत ) आहेत. या दोन गोष्टींवरून अद्यापि मगधदेशाची कीर्ति राहिली आहे.

बंगाल. महाभारतीय युद्धांत मगध राजाचे सहाकारी पुष्कळ होते; त्यांत एक बंगालचा राजा होता, असें ग्रंथान्तरीं वर्णन आहे. यापुढें मुसलमान

लोक हिंदुस्थानांत येत तोंपर्यंत बंगाल देशांत पांच वंशांचे राजे राज्य करित होते, असें अयीनी अकबरी नामक फारसी इतिहासावरून कळतें. अकबराचा अबुल फजल नामक प्रधानानें या राजांचा वंशावळ्यांचें फारसींत भाषांतर केलें आहे, ह्मणून पूर्वीं जें हिंदुग्रंथांचा आधारानें वर्णन केलें, त्यावर जितका भरवसा ठेवितां येतो, तितका या वंशावळ्यांवर ठेवितां येत नाहीं. परंतु आतां कांहीं जुने खोदींव लेख सांपडले आहेत, त्यांवरून वरील वंशावळ्यांतील निदान चौथी तरी वंशावळी ही खरी असावी असें दिसतें, आणि तिजवरून पाल या आडनावाचा राजांची माळिका जुळतां येथे; ते राजे बंगाल देशांत बहुधा नवव्या शतकापासून अकराव्या शतकाचा शेवटापर्यंत राज्य करित होते, असें संभवतें.

या पालवंशाविषयीं ताम्रपट व दुसरे तसेच प्राचीन खोदलेले लेख दूरदूर देशांत सांपडले आहेत; त्यांचा विचार करू गेलें असतां, ते लेख खरे आहेत, याविषयीं संशय घेण्यास जागा राहत नाहीं; परंतु त्यांमध्यें चमत्कारिकच वर्णन आहे. त्या वर्णनाशीं आणि इतर ठिकाणीं जो हिंदुस्थानाविषयीं इतिहास मिळतो त्याशीं मेळ मिळविण्यास कठीण पडतें. हिमालयापासून कन्याकुमारिकाभूशलाकेपर्यंत, आणि ब्रह्मपुत्रनदापासून सिंधुनदापर्यंत, एवढ्या हिंदुस्थानाचें आधिपत्य बंगालचा राजांकडे होतें, असें कांहीं ताम्रपटांत आहे. दुसरें या राजांनीं स्वाऱ्या करून पूर्वेकडेस तिबेट आणि पश्चिमेकडे कांभोज असे देश

घेतले, असेंहि वर्णन आहे. हा कांभोज देश सिंधुनदापलीकडे होता असें कित्येकांचें मत आहे.[१०]

वर सांगितल्याप्रमाणें बंगालचा राजांचें राज्य एवढें मोठें असणें अशक्य आहे; कारण त्याच वेळीं कनोज, दिल्ली, अजमीर, मेवाड आणि गुजराथ, या ठिकाणीं स्वतंत्र राज्यें होतीं; व शिवायहि दुसऱ्या ठिकाणीं राज्यें असतील. कदाचित् या राजांनीं आपला अधिकार दुसऱ्या

---

(१०) या लेखांतून अगदीं जुना असा जमीन दिल्याबाबद ताम्रपट मोंगीर एथें सांपडला आहे. तो इसवी सनाचा नवव्या शतकांत लिहिला असावा असें दिसतें. त्या वेळीं राजा देवपालदेव होता. त्याचें राज्य गंगेचा उगमापासून लंकेचा सेतूपर्यंत, आणि मेग्ना अथवा ब्रह्मपुत्र यांपासून पश्चिमसमुद्रापर्यंत होतें, असें त्या ताम्रपटांत स्पष्ट आहे. दुसरें बंगाल, कर्नाटक, तिबेट एथील लोक हे याची रयत होती असें त्यांत आहे. आणखी या राजाची सेना कांभोज देशांतून जात येत असे, असेंहि सांगितलें आहे. हा कांभोज देश बहुधा सिंधुनदापलीकडे होता असें ह्मणतात. कदाचित् जरी पलीकडील नसला, तरी हिंदुस्थानाचा अगदीं पश्चिमसीमेवरील खचित असावा. गंगेचा उत्तरेस सारणप्रांतांत एका छिन्नविछिन्न झालेल्या स्तंभावर दुसरा लेख आहे. हा स्तंभ एका राजानें बांधिला. तो राजा गौड ह्मणजे बंगालचा राजाचा आश्रित होता, आणि रेवाजनक (हा कोणता देश तो बरोबर समजत नाहीं) देशापासून हिमालयापर्यंत, आणि पूर्वसमुद्रापासून पश्चिमसमुद्रापर्यंत याचा राज्याचा विस्तार होता, असें त्यांतहि लिहिलेलें आहे. दुसरें औड्यप्रांत, हूणलोकांचा देश; चोलमंडल (ह्मणजे कारोमांडेल) किनाऱ्याचा दक्षिण भाग, आणि गुजराथ, एवढा मुलुक बंगालचा राजानें जिंकिला असेंहि त्यांतच वर्णन आहे. हा राजा बहुधा वरील देवपालराजाचा मुलगा असावा असें वाटतें. तिसऱ्या लेखामध्यें इतकेंच लिहिलेलें आहे, कीं याच वंशांतील एका बंगालचा राजानें इसवी सन १०२६ त काशींत एक बुद्धाचें मोठें देवालय बांधिलें. हे सर्व राजे बौद्धमतानुसारी होते, असें पूर्वीचा लेखांवरून दिसतें.

राजांवर बसविण्याविषयीं यत्न केला असेल आणि हिंदुस्थानाचा अगदीं पश्चिमेकडील देशांत, व दक्षिणेमध्येंहि त्यांणीं स्वाऱ्या पाठविल्या असतील; कारण जर असें नसतें तर त्याचवेळचा ताम्रपटांसारिख्या लेखांत इतक्या देशाचें आधिपत्य आपलें आहे, असा उगाच मोठेपणा यांचानें मिरवला नसता. या सर्व गोष्टींचा विचार करून पाहतां असें दिसून येतें, कीं बंगालचे राजे मोठे बलाढ्य होते, आणि जसे इतर वंशांचे राजे हिंदुस्थानाचा सार्वभौमत्वाविषयीं हक्क दाखवितात, तसाच यांचाहि आहे. आतां ही सार्वभौम पदवी कोणासहि नव्हती, असें ह्मणायास बरींच प्रमाणें वर सांगितलीं आहेत. त्यांजमध्यें वरील इतिहास हाहि गणिला पाहिजे. पाल या वंशाचे राजे झाल्यानंतर सेन या आड नावाचे राजे झाले; त्यांचा वंशाची मुसलमानलोकांनीं इ० सन १२०३ चा सुमारें समाप्ति केली.

आतां माळवादेशाचा इतिहास सांगतों.

माळवा.

पूर्वी सांगितलेल्या राजांसारिखे माळव्याचे राजे आपणास फार प्राचीन असें ह्मणवित नाहींत; परंतु हिंदूंचा इतिहासाविषयीं जें वास्तविक कालमान आपणास प्रथम कळलें, तें या राज्यांविषयींचें आहे. या देशांत उज्जनीनामक नगर आहे; तेथें विक्रम राजा झाला. त्याचा शकास संवत ह्मणतात. तो विक्रमाचा कारकीर्दीचा आरंभापासून, ह्मणजे इसवी सना पूर्वी ५६ वर्षांवर चालू झाला; आणि अद्यापि नर्मदेचा उत्तरेकडील देशांत चालतच आहे.

जसा सर्व फारसी अथवा इराणी गोष्टींमध्यें हरून् उर् रशीद बादशाहा आहेच आहे, त्याच प्रमाणें हिंदु-

लोकांत कांहीं विलक्षण गोष्ट आली, कीं विक्रम राजाचें घोडें त्यांत ढकललेलेंच असतें. अशाच गोष्टींतून मजकूर जुळवून, त्याचा खरे खोटेपणाविषयीं फारशी खटपट न करितां, कर्नल् विल् फोर्ड याणें एक ग्रंथ रचिला आहे. त्यांत सांगितलेल्या सर्व कथा त्या त्या काळीं झाल्या असें धरिलें असतां, तितकें चरित्र होण्यास जितका काळ लागेल, तितक्या काळांत आठ तरी विक्रम झाले असावे, अशी कल्पना करणें जरूर येतें. परंतु यांतून विक्रम हा बलाढ्य राजा होता; त्याचा राज्यांतील लोक सुधारलेले होते; त्याचा देश सुखी होता; आणि तो विद्वान् लोकांस मोठा आश्रय देत असे, इतक्या गोष्टी मात्र विद्वान् लोक सांप्रत खऱ्या मानितात.

विक्रमराजानंतर सुमारें सहाशें वर्षेपर्यंत कोणी नामांकित राजा झालेला दिसत नाहीं. जे राजे झाले त्यांचीं नावें अयीनी अकबरी या फारसी इतिहासांत, व दुसऱ्या हिंदी इतिहासांत वर्णिलेलीं आहेत; त्यांमध्यें चंद्रपालराजानें सर्व हिंदुस्थान देश जिंकिला असें वर्णन आहे; परंतु त्याचा संबंध नीट जुळत नाहीं, यामुळें या वृत्तान्ताचा फारसा उपयोग होत नाहीं. शोध करून पाहिला असतां माळव्यांतील राजांनीं हिंदुस्थानांतील मध्यदेश, व पश्चिमेकडील प्रांत यांतील बहुतेक प्रदेशावर आपली सत्ता बसविली होती, असें खचित दिसतें. परंतु सार्वभौमत्वाविषयीं झटलें, तर विक्रमराजा हा सार्वभौम होता, अशा सर्व हिंदुस्थानभर दंतकथा विशेष प्रसिद्ध आहेत.

भोजराजा. याप्रमाणें हकीकत झाल्यावर विक्रमासारिखा वर्णन करायाजोगा कायतो एक राजा झाला. त्याचें नाव भोज. त्याची कीर्त्ति हिंदुस्थानांत सर्वत्र गाजत आहे;

परंतु त्याचा पराक्रमाचें कोठें लेखीं वर्णन आढळत नाहीं. हा राजा पुष्कळ वर्षें राज्य करून, सुमारें अकराव्या शतकाचा शेवटीं मृत्यु पावला.

भोजराजानंतर एके वेळीं त्याचा नातू राज्य करित असतां गुजराथचा राजानें त्यावर स्वारी करून त्यास कैद केलें, आणि त्याचा सर्व देश घेतला; परंतु पुढें माळव्यांत दुसऱ्या वंशाचा एका पुरुषानें पुनः आपल्या देशाचें स्वातंत्र्य स्थापित केलें, आणि त्या वंशाचे राजे राज्य करूं लागले. शेवटीं इसवी सन १२३१ त मुसलमानलोकांनीं हा देश घेऊन, त्या राज्याची समाप्ति केली.

आतां गुजराथदेशचा वृत्तान्त सांगतों. कृष्ण हा गुजराथेंत राहत असे; यावरून, आणि त्यावेळचा दुसऱ्या हकीकतीवरून गुजराथेमध्यें फार प्राचीन काळीं एक राज्य स्थापित झालें असावें असें वाटतें. दुसरें गुजराथ देश हा एका राजाचा स्वाधीन होता, असें दुसऱ्या शतकांतील एक युनानी ग्रंथकार वर्णन करितो. कर्नल टाड् याणें "राजस्थानाचा इतिहास" ह्मणून एक ग्रंथ केला आहे. त्यांत कित्येक राजपूत लोकांतल्या दंतकथा लिहिलेल्या आहेत; त्यांवरून गुजराथेंत दुसरें एक राज्य होतें, असें समजतें. हें राज्य अयोध्येमध्यें जे सूर्यवंशी राजे होते त्यांतील कनकसेननामक एका पुरुषानें इसवी सन १५० चा सुमारें वल्लभीनगरींत स्थापिलें. भूमिदानाचा वेळीं लोकांस करून दिलेल्या ताम्रपटांचीं भाषांतरें वाथेन साहेबानें केलीं आहेत. त्यांवरून सेन या उपनावाचे राजे वल्लभीपुरांत इ० स० १४४ पासून ५२४ पर्यंत राज्य करित होते, असें खचित सिद्ध होतें. शेवटीं सन ५२४ त इराण

गुजराथ.

देशाकडून कांहीं रानट लोकांनीं येऊन, त्यांची राजधानी घेऊन, त्या राजांस पळविलें. तेव्हां या वंशाचे राजे गुजराथेंतून पळून मेवाड देशांत गेले, आणि तेथें राज्य स्थापितें झालें. तें राज्य अद्यापि चालत आहे. जा वर सांगितलेल्या रानट लोकांनीं वल्लभीपुरीचा राज्याचा नाश केला, ते पार्थी लोक होते असें टाडु साहेब सांगतो; व हिंदुबक्त्री असावे, असें वाथेन साहेब सांगतो. हे लोक खचित पार्थी नसावे, कारण हे अलीकडील आहेत. परंतु हे बहुधा सासानी वंशाचे इराणी नसतीलसें नाहीं. कारण सासानी वंशाचा नौशेरवान बादशाहा हा इराणांत इसवी स० ५३१ पासून इ० स० ५७९ पर्यंत राज्य करित होता. सर जान माल्कम याणें पुष्कळ फारसी ग्रंथांतून वेंचे घेतले आहेत, त्यांवरून हा बादशाहा इराणाचा उत्तरेस फर्घाण प्रांतांत व पूर्वेस हिंदुस्थानांत स्वाऱ्या करित असे, असें दिसतें; व त्यांतून फर्घाणांतील स्वाऱ्यांस चिनी इतिहासांतहि प्रत्यंतर मिळत आहे, याजकरितां दुसऱ्या स्वाऱ्यांचा हकीकतीविषयींहि त्या ग्रंथकारांचा बेभरवसा करण्यास कांहीं कारण दिसत नाहीं. दुसरें सर हेनरि पाटिंजर साहेब आपल्या प्रवासाचा वृत्तान्तामध्यें वर्णन करितो, कीं नौशेरवान बादशाहानें मकरान प्रांताचा किनाऱ्यावरून येऊन सिंधदेशावर स्वारी केली, तेव्हां वल्लभी हें शहर सिंधदेशाजवळच होतें, तें त्याणें उद्ध्वस्तकरून टाकिलें असावें, असें संभवतें. दुसरें मेवाडचे राणे हे नौशेरवान बादशाहाचे वंशज आहेत, अशी दंतकथा लोकांत चालत आहे; व त्या बादशाहानें यांस जेव्हां वल्लभी पुरींतून घालविलें, तेव्हां ते मेवाडांत गेले, इतका ती कथा जुळण्यास त्याचा

यांचा कांहीं संबंध आहे. आतां कोणी ह्मणेल कीं वल्लभीनगर हें इ० स० ५२४ त मोडलें, आणि नौशेरवान बादशाहाचा राज्यास मुळीं आरंभच इ० स० ५३१ त झाला, तर त्याणें येऊन वल्लभीपुर कसें घेतलें? तर सात वर्षांचें अंतर, हें हिंदुलोकांचा कालगणनेंत केवळ यःकश्चित् आहे!!

वल्लभी एथील राज्य मोडल्यावर चौरे नावाचे राजपूत राजे गुजराथेंत राज्य करूं लागले. या राजांनीं इ० स० ७४६ त आपली राजधानी अनलवाडा एथें स्थापिली तें शहर सांमत पाटण या नावें प्रसिद्ध आहे. पुढें या वंशाची सर्व हिंदुस्थानांत मोठी प्रख्याति झाली.

या वंशाचा शेवटील राजा इ० स० ९३१ त मरण पावला. त्यास पुत्रसंतान नव्हतें. त्याचा मागें दक्षिणेंत घाटावरील कल्याण एथील संस्थानी साळोंके अथवा चालुक्य या जातीचा राजपूत वंशांतील त्याचा जावई त्याचा गादीवर बसला.

या चालुक्यवंशांतील एका राजानें माळवा प्रांत घेतला. याच वंशाचा राजांस सार्वभौम अशी पदवी कर्नल् विल्फोर्ड याणें दिली असावी, असें वाटतें. जेव्हां महमूद गजनवी हा हिंदुस्थानांत आला, तेव्हां त्याणें या राजांचा पराजय करून त्यांपासून कर घेतला; तथापि हे चालुक्य राजे इ० स० १२२८ पर्यंत गादीवर होते. पुढें दुसऱ्या वंशाचा राजांनीं यांस घालवून आपण राज्य बळकाविलें. त्याहि वंशाचा इ० स० १२९७ त मुसलमानलोकांनीं शेवट केला.

कनोज. कन्याकुब्ज ह्मणजे कनोज या राज्या इतकी दुसऱ्या प्राचीन हिंदुराज्यांतून थोड्यांचीच, प्रख्याति झाली असेल. कनोज हें सर्व हिंदुस्थानामधील फार प्राचीन शहरांतील एक होय. एथील ब्राह्मणांस कनोजी ह्मणतात. ही जात मोठी व जिकडे तिकडे पसरलेली आहे. जे मुसलमानलोक प्रथम हिंदुस्थानांत स्वाऱ्याकरून आले, त्यांची धाड ज्या शहरांवर पडली त्या सर्वांमध्यें बहुधा कनोज हें अति संपत्तिमान होतें; आणि तेथील राजांचा, त्यांचे शेजारी दिल्लीचे राजे यांशीं ज्या लढाया होत असत, त्या हिंदूंचा स्वातंत्र्याचा नाश लवकर होण्यास कारणीभूत झाल्या. प्राचीन काळीं या राज्यास पांचाल अशी संज्ञा असे, असें, दिसतें. हा देश लांब व अरुंद आहे. याची पूर्वसीमा नेपाळदेश, (तोहि यांतच असे;) आणि पश्चिमेस अजमीरपर्यंत चंबळा, व बनास, या नद्यांचा कांठचा प्रदेश, हाहि यांतच असे. कांहीं राजपूतलोकांचा बखरी, व दंतकथा, व तसेंच ताम्रपट, व दुसरे लेख, यांशिवाय या राज्याचा इतिहास वर्णन करायास कांहीं आधार नाहीं. त्या दंतकथांवरून असें समजतें, कीं कनोज एथें कोणी हिंदुराजे होते, त्यांपासून राठोरनामक राजपूत राजांनीं इ० स० ४७० त हें राज्य घेतलें. पुढें इ० स० ११९३ त मुसलमानलोकांनीं हें राज्य जिंकून घेतल्यानंतर, ते राठोरलोक मारवाडदेशामध्यें गेले, तेथें ते अद्यापि आहेत.

कांहीं लेखांवरून असें दिसतें, कीं इसवी सनाचा ११ व्या शतकांत एका आगंतुक राजपूतानें मध्येंच येऊन गादी बळकाविली; आणि त्याचा वंशाचा पुढें मुसलमानांनीं

नाश केला. या गोष्टीचा वरील वर्णनाशीं विरोध येतो.

कनोजमध्यें राज्य नांदत असतां, तेथील राजांनीं पूर्वेकडे बंगाल व औंढ्या देश, आणि पश्चिमेस सिंधुनदापर्यंत देश एवढा घेतला होता, असें दिसतें. कनोजशहर हें हल्लीं अगदींच मोडलें आहे; त्याचें मागील वैभव मुसलमान व राजपूत ग्रंथकार फारच वर्णितात, परंतु सांप्रत पाहिलें तर त्यांतील कांहींच राहिलें नाहीं, असें म्हटलें असतां चालेल.

इतरराज्यें.

उत्तरहिंदुस्थानांत दुसरीं पुष्कळ लहान लहान राज्यें होतीं, परंतु तीं कशीं होतीं व कधीं झालीं, याचें फार वर्णन करावयास लागलें असतां वाचणारांस कंटाळा येईल म्हणून थोडक्यांत सांगतों.

१ मगध ( ह० बहार ) राज्य.—याविषयीं महाभारतांत वर्णन आहे, व युनानी ग्रंथकार इ० स० पूर्वी ३०० वर्षांवर याचें वर्णन करितात. याविषयीं विष्णुपुराणांतहि लेख आहेत. या राज्याविषयीं शेवटला लेख सुमारें इसवी सनाच्या पांचव्या शतकांतला आहे.

२ गौड ( ह० बंगाल )— एथील प्रथम लेख इसवी सनाच्या नवव्या शतकांतील मोंगीर एथें सांपडला आहे. याविषयीं शेवटील लेख इ० स० १२०३ मधील आहे.

३ माळवा— याविषयीं प्रथमचा लेख इसवी सनाच्या पूर्वीं ५६ वर्षां अगोदरचा अकरा पिढ्यापर्यंतचा आहे, आणि शेवटील इ० स० १२२१ मधील आहे, असें अयीनी अकबरीवरून कळतें.

४ गुजराथ एथील राज्याविषयीं महाभारतांत वर्णन

आहे. याविषयीं प्रथमचा लेख इ० स० १४४ तील, व शेवटील १२९७ मधील आहे.

**कनोज**—एथील प्रथमचा लेख इ० स० ४७० तील आणि शेवटचा इ० स० ११९३ मधील आहे.

टीप—या राज्याविषयीं बरेंच वर्णन वर सांगितलेलें आहे. भा० क०

**६ मिथिला**— हें राज्य रामाचा वेळीं होतें. मिथिला ही रामाचा सासरा जनक याची राजधानी होती. एथील लोक मोठे विद्वान् होते. त्यांची प्रख्याति मुख्यत्वेंकरून धर्मशास्त्रामध्यें असे. मैथिल भाषा ही हिंदुस्थानांतील जा दहा[११] प्रसिद्ध भाषा त्यांतील एक होय. या राज्याविषयीं इ-

---

(११)— यांचे दोन वर्ग आहेत, त्यांतून प्रत्येकांत पांच पांच भाषा आहेत, त्या येणें प्रमाणें:

१. पंच गौड भाषा.
   १. सारस्वती. (इचा सांप्रत लोप झाला आहे.)
   २. कनोजी.
   ३. गौड, ह्मणजे बंगाली.
   ४. मैथिल, ह्मणजे तिरहुती.
   ५. उर्य.
२. पंच द्रविड भाषा.
   १. तमिळ.
   २. मराठी.
   ३. कर्नाटकी.
   ४. तैलंगी
   ५. गुजराथी.

(मुंबई यांच रायल् एशियाटिक् सोसैटीची हकीकत, जान्युआरि १८५२) — भा० क०—

तिहासांत फारसें वर्णन नाहीं. याविषयीं शेवटाचा लेख इ० स० १३२५ मधील आहे.

७. काशी—एथील राज्याविषयीं महाभारतांत वर्णन आहे.

कौरवपांडवांचें युद्ध झालें, ते वेळीं काशीचे राजे स्वतंत्र होते असें दिसतें. पुढें ते अनुक्रमेंकरून मगध आणि गौड एथील राजांचा आश्रयानें होते असें दिसतें. यांतून प्रथमाविषयीं कदाचित् संशय; दुसऱ्याविषयीं तर भ्रांतिच नाहीं. पुढें जेव्हां मुसलमानांनीं हें राज्य घेतलें, तेव्हां हें स्वतंत्र होतें. याविषयीं शेवटील लेख इ० स० ११९२ मधील आहे.

८. दिल्ली— या राज्याविषयीं प्रथम महाभारतांत वर्णन आहे. त्यानंतर कांहीं वेळपर्यंत एथील इतिहास समजत नाहीं. पुढें कांहीं राजपूत लोकांनीं येऊन हें शहर घेतलें तेथें त्या वंशाचे २० राजे झाले. पुढें विशालनामक अजमीरचा राजानें इ० स० १०५० त यांस पदच्युत केलें. याच वंशांत पृथुराय ह्मणून राजा झाला, त्यास मुसलमानलोकांनीं जिंकून, त्याचें राज्य घेतलें. या राज्याविषयीं शेवटील लेख इ० स० ११९२ मधील आहे.

९. अजमीर— एथें इ० स० ६९५ त माणिकरायनामें राजा राज्य करित होता. याचा पूर्वीं याच वंशाचा सात पिढ्या झाल्या होत्या. याचा वंशज विशालराजा याणें, वर सांगितल्याप्रमाणें, दिल्ली घेतली. पुढें दोनहि राज्यें एकत्र झालीं; आणि त्यांचा शेवटहि तसाच झाला, ह्मणून याहि राज्याविषयीं शेवटचा लेख इ० स० ११९२ मधील आहे.

१०. मेवाड ( ह्मणजे उदेपूर )-इ० स० ७२० चा पूर्वीं हा प्रांत माळव्याखालीं होता असें दिसतें. पुढें जा राजपुतांनीं अयोध्येहून येऊन गुजराथेंत राज्य स्थापिलें, त्यांणींच एथें-हि स्थापिलें. हें राज्य सांप्रत नांदत आहे.

११. जसलमीर— या राज्यांविषयीं प्रथमचा लेख इ० स० ७३१ मधील आहे. हें राज्य यादववंशांतील कांहीं लोकांनीं हिंदुस्थानाचा वायव्येकडून येऊन स्थापिलें आणि तें अद्यापिहि त्याच लोकांकडे चालत आहे.

१२. जयपूर— या विषयीं प्रथम इ० स० ९६७ तील वर्णन आहे. हें राज्य कोणी रामाचा वंशांतील पुरुषानें स्थापिलें. तें अद्यापि चालत आहे.

१३. सिंध— एथील राज्याविषयीं महाभारतांत वर्णन आहे. इसवी सनाचा पूर्वीं ३२५ वर्षांवर ह्मणजे सिकंदरबादशाहाचा वेळीं, याचे चार भाग झाले होते; परंतु जेव्हां इ० स० ७१२ त मुसलमानलोकांनीं स्वारी करून हें घेतलें, तेव्हां चारहि राज्यें एकत्रच झालीं होतीं. पुढें इ० स० ७५० त सुमरे जातीचा एका राजपूत राजानें तो देश पुनः जिंकिला, तो गोरी वंशाची समाप्ति होईपर्यंत मुसलमानलोकांस परत मिळाला नाहीं.

१४. काश्मीर.— या देशाचा हिंदुस्थानाशीं फारसा संबंध नसे. एथील प्रथम लेख इसवी सनापूर्वी १४०० चा आहे. काश्मीरचे इतिहासकर्ते याहूनहि १२०० वर्षें वाढवितात; परंतु त्याप्रमाणें मागील राजांचीं नावें, अथवा कांहीं घडलेल्या गोष्टी, सांगत नाहींत. काश्मीरचा इतिहास हिंदी इतिहासापासून अगदीं निराळा आहे, व भरपूर आहे; तो एथें थोडक्यांत सांगतां येत नाहीं. एथील राजां-

नीं कित्येक वेळीं हिंदुस्थानांत स्वाऱ्या केल्या, आणि सर्व देशहि जिंकिला, असें तद्देशीय ग्रंथकारांनीं वर्णन केलें आहे परंतु त्याविषयीं बराच संशय दिसतो. या देशांत पांच वंशांचा राजांनीं राज्य केलें. शेवटीं महमूद गजनवी याणें इ० स० १०१५ त हें राज्य घेतलें, असें फिरिस्ता याणें वर्णन केलें आहे.

१५. पंजाब.— प्राचीन काळीं त्रिगर्त ह्मणून राज्य या देशांत स्थापित झालें होतें; परंतु याविषयीं फारसें हिंदी इतिहासांत वर्णन नाहीं. शिकंदर बादशाहाचा वेळीं त्याचे लहान लहान विभाग झालेले होते, आणि पौरस ह्मणून त्यांमध्यें मोठा राजा होता; त्याचे सर्व सगेसोयरे व अनुयायी यांचा मुलुक मिळून त्याकडे सर्व देशाचा अष्टमांशहि नव्हता. पुढें मुसलमानलोकांचा वेळेस पुनः सर्व देश एकत्र झाला होता.

# प्रकरण दुसरें.

## दक्षिणेंतील इतिहास.

दक्षिण देशाचे प्राचीन विभाग आणि तेथील लोकांची स्थिति.

दक्षिण देशाचा इतिहास फार जुना नाहीं, यामुळें तो तादृश गोड लागत नाहीं. परंतु उत्तरहिंदुस्थानाचा इतिहासापेक्षां हा अधिक संगतवार समजायासारिखा आहे. दक्षिणेमध्यें हिंदुलोक प्रथम नव्हते, ते मागाहून वसाहती करून राहिले; यामुळें एथें त्यांची स्वदेशाप्रमाणें कीर्ति झाली नाहीं. दक्षिणेंतील मूळचा राहाणाऱ्यांचा इतिहास फारसा मिळत नाहीं. कांहीं दंतकथा चालत आल्या आहेत; आणि कोठें बखरा वगैरे जुने लेख सांपडतात. त्या सर्वांवरून, प्रथम हिंदुलोक एथें नव्हते; एथील मूळचे लोक रानटी व डोंगरी होते; ते केवळ भूतपिशाचांची उपमा देण्याजोगे असत; आणि पुढें हिंदुलोकांनीं येऊन त्यांस सुधारिलें, असें दिसून येतें.

परंतु दुसऱ्या कांहीं गोष्टींचें प्रमाण पाहिलें तर दक्षिणेंतील प्राचीन लोक केवळ इतक्या रानट अवस्थेमध्यें होते, असें वाटत नाहीं. प्रथम तर कर्नाटकाकडील प्रांतांमध्यें मुख्य भाषा तमिळ (अथवा द्राविडी) ही, संस्कृत भाषेचा तिकडे संसर्ग लागण्यापूर्वीं, सिद्ध होऊन पूर्ण दशेस आली होती. आतां भाषा सुधारली होती, इतक्याचवरून लोक सुधारले होते, असें आमचें ह्मणणें नव्हे. कारण उत्तरअमेरिकेंतील इंडियन् लोकांची भाषा सुधारलेली असून ते रानटच आहेत. परंतु या तमिळ भाषेमध्यें ग्रंथ

संग्रहहि पुष्कळ आहे; तेव्हां ज्या लोकांची भाषा चांगली, व ग्रंथसंग्रह बराच, ते लोक जंगली, वनचरांसारिखे होते, असें आपल्याचानें कसें ह्मणवेल?

हिंदुलोकांच्या दंतकथा पुष्कळ आहेत. त्यांत राम हा दक्षिणेंत आला, तेव्हां रावण हा सिंहलद्वीप, आणि दक्षिणहिंदुस्थान, यांचा राजा होता; त्याच्या राज्यांतील लोकांची स्थिति चांगली असे; आणि त्याचें राज्य बलाढ्य होतें, असें सांगितलेलें आहे; परंतु तो हिंदु असून शिवभक्त होता; यावरून हें सर्व वरील वर्णन राम आणि रावण यांच्या वेळचें नसावें; ज्या वेळीं ज्या ग्रंथकारानें हें लिहिलें, त्या वेळच्या स्थितीवरून हें त्याणें कांहीं तरी लिहिलें असावें, असें अनुमान होतें.

मनुष्य कोठें गेला असतां, त्याला सुपीक जाग्यांत राहणें स्वभावतः आवडतें. या न्यायानें उत्तर हिंदुस्थानांतून जे लोक दक्षिणेंत वसाहत करण्यास आले, ते प्रथम वरील तारतम्यानें नापीक देश सोडून, कर्नाटक व तंजावर या उत्तम प्रदेशांमध्यें गेले असावे. नंतर जवळ समुद्रतीर पडल्यामुळें, तेथें व्यापाराच्या संबंधानें बाहेरील लोक येऊन त्यांच्या यांच्या व्यवहार झाला असावा; असें होतां होतां सहजच समुद्रकांठची वस्ती वाढून, जागोजागीं शहरें वसलीं असावीं. आतां याप्रमाणें तेथील स्थिति होती, असें इसवी सनाच्या आरंभीं या देशाची स्थिति प्लिनी, आणि पेरिप्लस हा ग्रंथ करणारा, यांणीं वर्णन केली आहे त्यावरून समजतें.

सिकंदरबादशाहा हिंदुस्थानांत आला त्या वेळीं त्याच्या बराबरील लोकांनी समुद्रतीरापासून दूरच्या प्रदेशावि-

१ एक रोमन तत्ववेत्ता. २ एक युनानी ग्रंथ.

षयीं जे लेख लिहिले आहेत, ते स्ट्रेबो आणि आर्यान या युनानी ग्रंथकारांनीं आपल्या पुस्तकांत घेतले आहेत. त्यांवरून दक्षिणेकडील, आणि उत्तरेकडील लोकांमध्यें जा तफावती हल्लीं आहेत, त्याच त्या वेळीं होत्या असें दिसतें; परंतु दक्षिणेकडील लोक त्या वेळीं अनाडी होते, अथवा त्यांचा आणि उत्तरेकडील लोकांचा स्थितींत विशेष अंतर होतें, असें दिसत नाहीं.

इसवी सनापूर्वीं दहा शतकांवरहि, दक्षिणेमधील लोक सुधारलेले असावे, असें प्रोफेसर विल्सन् यांणीं धोरण बांधिलें आहे.

दक्षिणेमध्यें पूर्वीं पांच भाषा चालत असत. या पांच भाषांची जेथें व्याप्ति होती, ते अर्थात् निरनिराळे पांच प्रदेश पूर्वीं असावे. त्या देशांचा मर्यादा सांगतों.

द्रविड अथवा तमिळ देश.

द्रविडदेशांत तमिळ भाषा बोलतात. हा देश हिंदुस्थानाचा अगदीं दक्षिणटोंकास आहे. याची उत्तरेकडील सीमा मद्रासेजवळ पलीकोटगांवापासून, बंगळूर आणि पलीकोट यांमध्यें; जे घाट आहेत, तेथपर्यंत जात्ये. तेथून त्याच घाटसरीनें पश्चिमेकडे मलबार आणि कानडा या प्रांतांचा मर्यादेवर येऊन, तेथून त्याच लोटानें मलबारप्रांत पोटांत घालून समुद्रास मिळत्ये.

कर्नाटक.

या देशांत कानडी भाषा बोलतात. याचा दक्षिणेस द्रविडदेश आहे; याची पश्चिमेस मर्यादा, गोव्यापर्यंत समुद्र, नंतर पुढें कोल्हापुरचा लगत्यापर्यंत सह्याद्रिपर्वत आहे; उत्तरेस बेदर आणि कोल्हापुर

(१) एक इंग्लिश विद्यागुरु.

यांमध्यें रेषा काढिली असतां ती सरासरी मर्यादा होईल; आणि बेदरेहून रेषा काढून अध्वाणी, अनंतपुर आणि नंदिदुर्ग यांतून नेऊन, पूर्वी पलीकोट आणि बंगळूर यांचामधील जी घाटाची सीमा सांगितली, तेथपर्यंत नेऊन मिळविली, ह्मणजे ती पूर्वेकडील सीमा होईल.

वर जी शेवटली रेषा सांगितली ही रेषा वर्धानदीचा कांठीं चंद्रशहरापर्यंत वाढविली, ह्मणजे तीच्य तैलंगणाची पश्चिमसीमा झाली. या हद्दीचा टोंकापासून महानदीवर सोहनपुर ह्मणून गांव आहे, तेथ-पर्यंत रेषा कल्पिली असतां, ती तैलंगणाची उत्तरमर्यादा होईल. ही मर्यादा चांगली उमगण्याजोगी नाहीं. तैलं-गणाची पूर्वसीमा सोहनपुरापासून सिकाकोलापर्यंत, व तेथून समुद्रकांठानें पलीकोटापर्यंत येत्ये; तेथपासून पुढें तमिळ भाषा लागत्ये. तैलंगण.

या देशाची दक्षिणमर्यादा गोव्यापासून रेषा काढून कोल्हापुर व बेदर यांतून नेऊन चंद्नगरास मिळविली असतां, ती होत्ये. याची पूर्वसीमा वर्धानदीचा कांठानें सातपुडा अथवा विंध्याद्रि या पर्वता-पर्यंत गेली आहे. उत्तरेस नर्मदेचा कांठीं नांद्रड गांवाप-र्यंत सातपुडापर्यंत आहे; आणि नांद्रडापासून दमणपर्यंत सूत्र टाकून, तेथ समुद्रकिनाऱ्यानें गोव्यापर्यंत नेलें असतां, तें त्याची पश्चिममर्यादा होईल. महाराष्ट्र.

याची दक्षिणमर्यादा तैलंगण; पूर्वेस समुद्र, आणि सोहनपुरापासून बंगालप्रांतांत मिदनापुरापर्यंत सूत्र टाकिलें असतां, तें याची कांहींशी पश्चिम आणि उत्तरेकडील मर्यादा दाखवील. ओड्यादेश.

महाराष्ट्र, आणि औंढ्यादेश यांमध्यें जो विस्तीर्ण प्रदेश आहे, तो बहुधा जंगली आहे. त्यांत गोंड ह्मणून रानवट लोक राहतात, ह्मणून त्यास गोंडवण ह्मणतात. त्या गोंड-लोकांची भाषा इतर लोकांपासून भिन्न आहे; परंतु ती केवळ डोंगरी लोकांची हेंगाडी भाषा आहे. यास्तव दक्षिणेंतील पांच भाषांत तिची गणना करित नाहींत. गोंडवणाचा उत्तरेकडील सपाट देशांत जी भाषा बोलतात, ती हिंदुस्थानीचा एक अपभ्रंश आहे.

दक्षिणेंतील राज्यें आणि संस्थानें.

सर्वांहून फार प्राचीन राज्यें हिंदुस्थानाचा दक्षिणटोंकास होतीं. त्यांमध्यें तमिळभाषा बोलत असत.

पांड्यराजे.

त्यांतून प्रथमचा राज्यास पांड्य अशी संज्ञा आहे. हें नाव राज्यस्थापकपुरुषापासूनच त्या राज्यास मिळालें. हा कोणी शूद्रवंशांतील होता, आणि तो इसवी सनापूर्वी पांचव्या शतकांत झाला असावा, असें दिसतें; परंतु त्याविषयीं खचितार्थ सांगवत नाहीं. पुढें या वंशाचें नाव पांड्य असेंच चालत गेलें, असें दिसतें. त्यांतून एका राजानें रोमनलोकांचा बादशाह आगस्टस सीझर याकडे वकील पाठविला होता, असें वर्णन आहे. एका वेळीं या राजाची सत्ता मलबारकिनाऱ्याचा कांहीं भागांवर होती, परंतु ती फार दिवस चालली नाहीं. बहुधा घाट हीच या राज्याची पश्चिमेकडील सीमा असे. सांप्रत मधूरा, आणि तिणवल्ली म्हणून जे प्रांत आहेत, तेवढें तें राज्य होतें. याची राजधानीची जागा एक दोन वेळा बदलून, शेवटीं मधूरा एथें स्थापिलेली होती. ती सुमारें शंभर वर्षांचा पूर्वी तेथेंच होती.

पांड्यराजे हे आपल्याजवळील चोलराजांशीं कलह करित असत. परंतु ख्रिस्ती शकाचा आरंभीं हीं दोन्हीं राज्यें एकत्र होऊन, पुढें तशींच बराच वेळपर्यंत चालली होतीं असें दिसतें. नंतर हे राजे स्वतंत्र झाले, आणि इसवी सनाचा नवव्या शतकापर्यंत मोठे बलाढ्य होते. पुढें त्यांचें महत्व कमी होऊन ते कधीं स्वतंत्र असत, व कधीं त्यांला करहि द्यावा लागत असे. या राजांचा शेवटील वंशास नायक असें ह्मणत. या नायकवंशाचा शेवटल्या राजास इ० स० १७३६ त अर्काटचा नबाबानें जिंकून, या राज्याची समाप्ति केली.

चोलराज्य.

या राज्याचा प्रसर पांड्यराज्याहून विशेष झाला होता. सुमारें इ० सनाचा आरंभीं, जेथपर्यंत तमिळ भाषा चालत होती, तेथपर्यंत या राज्याची सीमा होती, असा आधार मिळतो; पुढें आठव्या शतकामध्यें या राजांनीं कर्नाटक आणि तेलंगण या देशांचे कांहीं विभाग घेतले; आणि तेथपासून नंदिदुर्गपर्वताचा पूर्वेकडील गोदावरीपर्यंत जितका प्रदेश होता, त्यावर आपली सत्ता चालविली. सुमारें बाराव्या शतकांत यांचा पराजय झाला, आणि शेवटीं नवीन संपादित मुलुक सोडून यांस आपल्या पूर्वीचा हद्दींत जावें लागलें. तेथें ते कांहीं काळपर्यंत स्वतंत्रतेनें, व कांहीं वेळ विजयनगरचा राजांचा आश्रयानें राज्य करित होते. शेवटीं सत्राव्या शतकाचा अंतीं शिवाजीचा भाऊ व्यंकाजी हा विजापुरसरकारचा सरदार असतां, याला शेवटल्या चोलराजाला मदत करावयास पाठविलें होतें, तेव्हां यानें तेथें जाऊन त्या राजाचें राज्य बळकाऊन घेऊन, तांजावरमें राज्य स्थापित

केलें. चोलराजांची राजधानी मद्रासेचा पश्चिमेस कांचीनामक एक नगर होतें.

चेरराज्य. पांड्यराज्य आणि पश्चिमसमुद्र यांचामध्यें चेर ह्मणून एक लहानसें संस्थान होतें. या राज्याखालीं त्रावणकोर, मलबारचा कांहीं भाग, आणि कोइंबितूर, हे प्रांत होते. याविषयीं मिश्रदेशामध्यें लेख आहेत, आणि इ० सनाचा आरंभीं हें राज्य असावें असें अनुमान होतें. कोणे एका काळीं याची सत्ता कर्नाटकाचा बहुतेक भागांवर चालत होती. हें राज्य १० व्या शतकांत नष्ट झालें, आणि त्याचा मुलुक सभोंवतील राजांनीं वांटून घेतला.

केरल. केरल ह्मणजे कोंकण, आणि चेर यांमधील प्रदेश, यांत मलबार व कानडा या प्रांतांचा समावेश होतो. कथाकार असें वर्णन करितात, कीं परशुरामानें हा, व कोंकण हे देश समुद्रापासून अद्भुत रीतीनें जिंकून घेऊन त्यांमध्यें ब्राह्मणांची वसाहत केली. दुसरें असें वर्णन आहे, कीं इसवी सनाचा पहिल्या अथवा दुसऱ्या शतकाचा सुमारास उत्तरकेरलप्रांतांतील एका राजानें हिंदुस्थानांतून कांहीं ब्राह्मण आपल्या मुलुकांत राहण्याकरितां आणिले. ही गोष्ट वरील गोष्टीपेक्षां सुयुक्तिक दिसत्ये, आणि सांप्रत मलबार, व कानडा, एथील जे ब्राह्मण आहेत, ते बहुधा उत्तरेकडील पांच जातींचे आहेत, यावरून या गोष्टीस प्रमाण मानण्यास बराच आधारहि दिसतो.

एथील वस्ती, ही कोणीकडूनहि येऊ; परंतु केरल हा प्रथमपासून कोंकणापासून निराळा देश होता. एथें सत्ता ब्राह्मणांची होती. त्यांणीं या देशाचे चवसष्ट विभाग

केले असत, आणि राज्यांतील जमीन कनिष्ठ वर्णांचा लोकांस धाऱ्यानें देऊन, आपण सर्व जातींतून एक मंडळी करून राज्याचा कारभार चालवीत. दर तीन वर्षांनीं सर्वांचा समुच्चयानें एक नवीन ब्राह्मण अधिकारी नेमीत आणि त्यास मदतीकरितां दुसरे चार ब्राह्मण प्रधान नेमीत; मग तो ब्राह्मण त्या चौघांचा मदतीनें सर्व राज्याचा कारभार चालवी. कालेंकरून ते क्षत्रियजातीचा मुख्य नेमूं लागले. हा देश कांहीं वेळ पांड्यराजांचा सत्तेखालीं असावा; परंतु जरी याची भाषा तमिळ आहे, तथापि हा कधींहि चोलराजांचा अधिकाराखालीं होता असें दिसत नाहीं.

या देशाचे दक्षिण आणि उत्तर भाग हे कधीं निराळे झाले, हें बराबर समजत नाहीं; परंतु नवव्या शतकाचा सुमारें, दक्षिण भाग ह्मणजे मलबारप्रांत, एथील राजा मुसलमान झाला, ह्मणून त्या लोकांनीं बंड करून त्याचा अधिकार नष्ट केला; आणि सर्व देशाचे लहान लहान विभाग केले. त्यांतून एक मुख्य संस्थान झामोरीनचा राजाचें होतें. जेव्हां पंधराव्या शतकाचा शेवटीं वासको डि गामा आला, तेव्हां यांतील एक वंशज कालीकोट एथें राज्य करित होता. इ० सनाचा आरंभीं उत्तरकेरल ह्मणजे कानडाप्रांत यामध्यें एक स्वतंत्र राज्य स्थापित झालें होतें, असें दिसतें; तें पुढें बाराव्या शतकामध्यें कर्नाटकचे बल्लाळ राजे यांणीं मोडिलें. शेवटीं तें विजयनगरचा राजांचा स्वाधीन झालें.

फार प्राचीन काळापासून कोंकण हा देश जंगली असून, यांत वसाहत थोडी होती असें दिसतें; आणि हल्लींहि बहुधा तसेंच आहे. एथील लोक प्रथमपासून बहुधा मराठे असावे. कोंकण.

सर्व कर्नाटकामध्यें एकच भाषा आणि एकसारिख्या रीतिभाती आहेत, यावरून बहुधा एथें सर्व प्रांतामध्यें एका तद्देशीय राजाची सत्ता कोणे एके वेळीं असावी असें संभवतें, परंतु त्या वेळचा इतिहास नाहीं. पुढें पांड्य, चेर, व कानडा, या देशांतील राजांनीं या देशावर आपली सत्ता चालविली होती. नंतर आणखी लहान लहान संस्थानें त्यांत झालीं. शेवटीं इ० सन १०५० चा सुमारें यादवनामक राजपूतवंशांचे ह्मणविणाऱ्या बल्लाळराजांनीं हा देश घेतला. पुढें या राजांची सत्ता सर्व कर्नाटक, मलबार, तमिळ प्रांत, व तैलंगणाचा कांहीं भाग, इतक्यांवर होती. शेवटीं इ० स० १३१० चा सुमारें मुसलमानांनीं या राज्याची समाप्ति केली.

कर्नाटक आणि तैलंगण.

बल्लाळराजे.

इ० सनाचा नवव्या शतकाचा आरंभापासून अकराव्या शतकाचा शेवटापर्यंत एका यादवनामक वंशाची सत्ता तैलंगणाचा पूर्वभागावर चालत होती असें दिसतें; परंतु या वंशाविषयीं फारसें वर्णन कोठें आढळत नाहीं.

यादव.

कर्नाटक आणि महाराष्ट्र यांचा सीमेवर बेदरशहराचा पश्चिमेस कल्याण एथें चालुक्यनामक राजपूत वंशाचे राजे राज्य करित होते. त्यांचें राज्य १० व्या शतकाचा शेवटापासून १२ व्या शतकाचा शेवटापर्यंत चालत होतें, असें ताम्रपटादिलेखांवरून निश्चित होतें. पश्चिमेकडील घाटाजवळ वणवासी ह्मणून एक गांव आहे, तेथपर्यंत यांचें आग्नेयी दिशेकडे राज्य होतें. या राजांनीं चोल आणि गुजराथ हीं घेतलीं, असें एका

कर्नाटकचे चालुक्यराजे.

ताम्रपटांत वर्णन आहे. कोठें यांचा अधिकार नर्मदेपर्यंत सर्व महाराष्ट्रदेशावर व तैलंगणांतील पश्चिमभागावर चालत होता, असेंहि वर्णन आहे. याच वंशांतील एका पुरुषाचें गुजराथेंतील चौरेनामक राजाचा कन्येशीं लग्न होऊन, तो देश त्यास मिळाला. या शेवटील चालुक्यराजास त्याचा प्रधानानें मारून आपण गादी बळकाविली. त्या वेळीं लिंगाइत ह्मणून जातीचा लोकांचें प्राबल्य वाढत होतें. त्यांणीं त्या प्रधानाचा वध केला. शेवटीं तें राज्य देवगिरीचा यादवांचा हातीं गेलें.

कलिंग एथील चालुक्यराजे.

द्रविडदेशापासून ओंढ्याप्रांतापर्यंत समुद्रकांठानें कलिंग ह्मणून जो तैलंगणाचा पूर्वेकडील भाग, त्यावर चालुक्यवंशाचा दुसऱ्या एका कुळीची सत्ता चालत होती. हे राजे कल्याणचा चालुक्य राजांचे संबंधी असावे. यांचें राज्य बहुधा १० व्या शतकापासून १३ व्या शतकापर्यंत चालत होतें. पुढें आंध्रदेशचा गणपतीराजांनीं यांची सत्ता बरीच कमी केली. शेवटीं कटकचा राजांनीं या राज्याची समाप्ति केली.

आंध्रदेशचे राजे.

आंध्रदेशचा राजांची राजधानी वरंगूळनामक शहर होतें. हें हैदराबादेचा ईशान्येस सुमारें चाळीस कोशांवर आहे. मगधदेशांत जे आंध्रराजे होते, त्यांचे हे संबंधी असावे. एथील लोकांचा हकीकतीमध्यें प्रथम विक्रम, आणि शालिवाहन, यांचीं नावें आहेत. त्यानंतर चोलवंशाचे राजे झाले. त्यांमागून इ० स० ५१५ चा सुमारें यवनवंशाचे राजे झाले. या वंशाचा नऊ पुरुषांनीं इ० स० ४५८ पासून ९५२ पर्यंत राज्य केलें. या सुमारास गणपतीनामक राजांची सत्ता

चालू झाली. परंतु ११ व्या शतकाचा शेवटीं या वंशांत काकतीनामक मख्यात राजा झाला, तेव्हांपासून यांचा इतिहास भरवसा ठेवण्याजोगा लिहिलेला आहे. काकतीनें हें राज्य रूपास आणिलें, त्यावरून या वंशासच काकतीय वंश असें ह्मणत असतात. काकतीराजा चालुक्यांचा पदरीं सरदार होता, आणि याणें चोलराजांस पराजित करून पळविलें, असेंहि कोठें कोठें वर्णन आहे. या राज्याचा उत्कर्ष १२ व्या शतकाचा अखेरीस झाला. त्यावेळीं गोदावरीचा दक्षिणेकडील सर्व देशावर यांची सत्ता होती, अशा तद्देशीय दंतकथा आहेत. परंतु प्रोफेसर विल्सन् याचें असें मत आहे, कीं यांचें राज्य १५ आणि १८ या दोन अक्षवृत्तांमध्यें जो हिंदुस्थानाचा भाग आहे, तितकें होतें. इ० स० १३३२ त दिल्ली एथून एका मुसलमानाची फौज येऊन, यांची राजधानी घेती झाली, तेव्हां यांचें महत्व नाहींसें होऊन, त्याबरोबर यांची सत्ताहि नाहींशी झाली. यानंतर कांहीं काळपर्यंत औंढ्यादेशाचा राजांस हे कर देत असत. शेवटीं गोवळकोंड्याचा मुसलमानराजांनीं हा मुलुक घेतला.

औंढ्यादेश. दक्षिणेंतील दुसऱ्या राज्यांचा वृत्तान्ताप्रमाणें एथील वृत्तान्तासहि पांडवकौरवांचा युद्धप्रसंगापासून आरंभ होतो. पुढें आंध्रराजांचा इतिहासाप्रमाणें, एथील इतिहासाचाहि गोंधळच आहे; त्यांत विक्रम आणि त्यामागून शालिवाहन यांणीं या देशाचें राज्य केलें, असें वर्णन आहे. इ० सनाचा पूर्वीं सहाव्या शतकापासून, त्या सनाचा चवथ्या शतकापर्यंत, या देशामध्यें दिल्ली, बा-

बुल ( ह्मणजे बहुधा इराण, ) काश्मीर आणि सिंध, या देशांतील यवनांनीं या देशावर पुष्कळ हल्ले केले; त्यांतून शेवटील हल्ला जाहाजांतून येऊन केला; त्यांत त्यांचा जय झाला. त्यानंतर ओंढ्याप्रांतांत १४६ वर्षेंपर्यंत ते लोक सत्ता चालवित होते.

या यवनलोकांस ययाति केसरी राजानें इ० स० ४७३ त हांकून दिलें. तेव्हांपासून एथील वृत्तान्त भरवसा ठेवण्याजोगा आहे, असें ह्मटलें असतां चालेल. ययाति राजानंतर केसरी वंशाचा ३५ राजांनीं ६५० वर्षें राज्य केलें. शेवटीं इ० स० ११३१ त गांग वंशाचा एका राजानें त्यांची राजधानी घेतली. हे राजे तैलंगणाकडून आले असावे, असें एक ग्रंथकार ह्मणतो; परंतु एका ताम्रपटावरून असें सिद्ध होतें, कीं तम्लूक आणि मिदनापुर, या स्थलांमध्यें जें अंतर आहे, तितक्या गंगाकांठचा प्रदेशाचे हे राजे होते. यांणीं ११ व्या शतकाचा शेवटीं ओंढ्यादेशावर स्वारी केली होती. पुढें १२ व्या शतकाचा अखेरीस यांचा बराच उत्कर्ष झाला. परंतु त्या वेळीं चालुक्य व आंध्रराजेहि चांगल्या स्थितीमध्यें होते, यावरून जितक्या मुलुकावर त्यांचें राज्य होतें असें वर्णन आहे, तें खरें असेल, असें संभवत नाहीं.

ओंढ्यादेशाचा राजांनीं इ० स० १४५० चा सुमारें कांचीनगरापर्यंत फौजा पाठविल्या होत्या, आणि सुमारें त्याच वेळीं तेथील राजा बेदराजवळील हिंदु रजवाड्यांस मदत करण्याकरितां तेथपर्यंत आला होता. या गोष्टी होण्याचा सुमारास गांग वंशाची समाप्ति होऊन सूर्यवंशांतील राजपूत राजे या देशांत राज्य करित होते. त्यांणीं पु-

ष्कळ स्वाऱ्या करून जय मिळविले; परंतु शेवटीं त्यांचा राज्यावर बंगाल्यांतून, आणि दक्षिणेंतून मुसलमानलोकांचे हल्ले येऊं लागले; त्यामुळें राज्यांमध्यें गोंधळ झाला. त्या धांदलीमध्यें इ०स० १५५० त एका तैलंग सरदारानें राज्य बळकाविलें. शेवटीं इ०स० १५७८ त मोगललोकांचा बादशाह अकबर याणें हें राज्य जिंकून आपल्या राज्यांत मिळविलें.

वर यवनलोकांचें वर्णन केलें, त्यांस एतद्देशीय लोक मुसलमान असें ह्मणतात; आणि सुमारें इ० सनाचा पूर्वीं ५०० वर्षांवर इमरातखान आणि दुसरा एक खान, या सरदारांनीं महम्मदी लोकांचा फौजा आणून दोन स्वाऱ्या केल्या, असेंहि वर्णन करितात. परंतु हें त्यांचें बोलणें किती असमंजस आहे, हें विचार करणारांचा लक्षांत येईल. कांहीं लोक तें यवनांविषयींचें वर्णन सिकंदर बादशाहाचा सरदार सेल्यूकस निकेतर यास लावितात, अथवा बाक्त्रियामधील ग्रीक ह्मणजे युनानी लोकांस लावितात. परंतु ज्या ग्रंथकारानें असें लिहिलें, त्यास वास्तविक इतिहासाची, व कालमानाची, व भूगोलवर्णनाची कांहींच माहिती नव्हती; तेणेंकरून ज्या खऱ्याखोट्या गोष्टी सुचल्या त्या एकत्र करून, त्यांची त्याणें एक कादंबरी केली असावी असें दिसतें.

महाराष्ट्रदेश. हा दक्षिणेचा सरहद्दीवर आहे, आणि यांतील मुख्य भाषा मराठी इचा प्रसर फार झालेला आहे. हें पाहून सहजच असें मनांत येतें, कीं इतिहासामध्यें याविषयीं सर्वांहून अगोदर वर्णन केलेलें असेल, आणि हा मोठा प्रख्यात प्रांत असेल. परंतु पाहूं जातां मुसलमान येण्याचा पूर्वीं

महाराष्ट्रदेशसंबंधी इतिहासांत जमेस धरण्याजोग्या दोनच गोष्टी आपणास कळलेल्या आहेत; व त्या दोन गोष्टींत महाराष्ट्र हें नाव एक वेळहि आलेलें नाहीं. एथील इतिहासांत रामाविषयीं बऱ्याच भाकड कथा आहेत. राम हा गोदावरीचा उगमाजवळ पंचवटी एथें अरण्यवासांत राहिला होता. यानंतर तगरनामक नगराचें वर्णन आहे. हें इ०सनाचा दुसऱ्या शतकांत व्यापाराचें मोठें ठिकाण होतें, आणि १२ व्या शतकापर्यंत याची प्रख्याति होती असें ताम्रपटांवरून कळतें. या शहराचें नाव अद्यापि प्रसिद्ध आहे, परंतु याचें ठिकाण कोणास माहित नाहीं. गोदावरीतीरचा पैठणनामक शहराचा पूर्वेस ५० कोशांचा सुमारें हें शहर असावें अशी एका ग्रीक ग्रंथावरून केवळ अटकळमात्र करितां येत्ये. त्या वेळीं दक्षिणेमधील जीं दोन मोठीं शहरें त्यांमधील हें एक होतें. दुसरें एक प्लिठण ह्मणून व्यापाराचें मुख्य स्थान होतें, असें दिसतें. हें बहुधा सांप्रतचें पैठणनामक शहर असावें, असा संभव दिसतो. या दोहोंमधून कोणतीहि राजधानीची जागा होती, असें दिसत नाहीं. तगर.

पुढें तगर एथें सिलारनामक कुळीचे राजपूतराजे राज्य करूं लागले. यांचा सोइरगती ११ व्या शतकांत मुंबई जवळचा कल्याणचा राजांशीं, आणि १२ व्या शतकांत कोल्हापुराजवळील पन्हाळा एथील राजांशीं झाल्या होत्या. पुढें शालिवाहन राजा झाला. याशिवाय महाराष्ट्रदेशाचा इतिहासामध्यें सांगण्याजोगी दुसरी गोष्ट आढळत नाहीं.

शालिवाहन हा कुंभाराचा पुत्र होता. याणें बंड

करून, एका राजाचें राज्य हरण करून, आपली गादी गोदावरीचा कांठीं पैठणनामक नगरींत स्थापिली, असें ह्मणतात. याणें माळव्याचा राजा विक्रम यास जिंकिलें, आणि एक मोठें राज्य स्थापिलें, असें वर्णन आहे. यांतून विक्रमास जिंकिल्याची गोष्ट अशक्य दिसत्ये. कारण या दोघांचा शकांत १३५ वर्षांचें अंतर आहे, आणि विक्रमानंतर दुसऱ्या कोणत्या माळव्याचा राजाशीं याचें युद्ध झालें, असें वर्णन नाहीं. शालिवाहन हा मोठा बलाढ्य राजा होता, तथापि याचा इतिहासप्रकरणीं विश्वास ठेवण्याजोगी सप्रमाण अशी एकहि गोष्ट आढळत नाहीं. याचें राज्य बहुधा दक्षिणेंत होतें, आणि तेथें सांप्रत याचें नाव प्रसिद्ध असून, याचा शकहि चालतो. याचा शकास शालिवाहनशक असें म्हणतात. त्याचा आरंभ इसवी शकानंतर ७८ वर्षांनीं झाला. यानंतर कल्याण आणि पन्हाळा, एथील रजवाड्यांचा हकीकती ताम्रपटांत सांपडतात याखेरीज इसवी सनाचा ११ व्या शतकाचा शेवटापर्यंत महाराष्ट्रदेशाचें वर्णन सांपडत नाहीं. पुढें १२ व्या शतकाचा आरंभीं यादवनामक राजांनीं देवगिरि एथें राजधानी स्थापिली. हे राजे बहुधा बल्लाळ राजांचे वंशज असावे. पुढें इ० स० १२९४ त दिल्ली एथून मुसलमानलोकांचा सरदार अल्लाउद्दीन खिल्जी याणें महाराष्ट्रदेशांत स्वारी केली, त्या वेळीं यादववंशाचा रामदेवरावनामक राजा देवगिरि येथें राज्य करित होता. त्यापासून त्याणें तेव्हां अथवा इ० स० १३०६ त खंडणी घेतली. शेवटीं इ० स० १३१७ त मुसलमानांनीं त्याची राजधानी घेऊन, त्याचा राज्याची समाप्ति केली.

देवगिरि.

या सुमारास मराठेलोकांची इतर लोकांप्रमाणें निराळी गणती होऊं लागली. यापूर्वीं त्यांविषयीं कोठें निराळें वर्णन नाहीं. याचें कारण असें संभवतें, कीं हा वेळपर्यंत त्यांचें ऐक्य होऊन मोठें राज्य झालें नव्हतें. यामुळें इतर राजांप्रमाणें यांजवळ ग्रंथसंग्रह, अथवा यांचा इतर रीतीची सुधारणूकहि झाली नव्हती. हल्लीं[२] तरी या लोकांत विशेष ग्रंथकार नसून, यांचा रीतिभाती सुधारलेल्या नाहींत. जी काय सुधारणा झाली आहे, ती मुसलमानांपासून यांणीं घेतलेली आहे, हिंदूंची नव्हे. जरी रीतिभातींची विशेष माहिती नव्हती, तरी हे मराठेलोक मोठे तत्पर व उद्योगी होते, असें दिसतें; कारण त्यांणीं विलक्षण श्रमांनीं पर्वतांमध्यें मोठ्या गुहा, व देवालयें खोदून केलीं आहेत; त्यांतून वेरूळ एथील गुहा ही मुसलमानलोक प्रथम आले, तेव्हां त्यांस माहित झाली होती. असें होतें, तथापि जे परकीय लोक प्रथम दक्षिणेंत येत, ते सर्व देशास दक्षिण असें ह्मणत, कारण त्या वेळीं त्यांतील निराळ्या लोकांची त्यांस माहिती नसे.

मराठेलोकांची प्रख्यातीस येण्याची वेळ अद्यापि आली नव्हती. ती आली, त्या वेळीं इतर सर्व हिंदुराष्ट्रांपेक्षां यांणीं मोठीं पराक्रमाचीं कृत्यें केलीं, आणि भरतखंडाचा सार्वभौमत्वाजवळजवळ चालू केली, अशी इतिहासकारांनीं वर्णिलेल्या दुसऱ्या कोणत्याहि लोकांनीं पूर्वीं केली नव्हती.

---

२ सांप्रत मराठींत बरेच ग्रंथकार असून भाषाहि सुधारलेली आहे. भा० क०

# हिंदुस्थानाचा इतिहास.



## भाग दुसरा.

## प्रकरण पहिलें.

मुसलमानी धर्माची प्रवृत्ति आणि वृद्धि.

हिंदुस्थानांत युनानीलोक आणि दुसरे रानटलोक येऊन हल्ले करून गेले, परंतु देशाचा सरहद्दीअलीकडे त्यांचा विशेष व्यापार झाला नाहीं, त्यामुळें त्यांचा येण्यापासून या देशामध्यें सांगावयासारिखा कांहीं परिणाम झाला नव्हता. असेच या एकलकोंडे हिंदुलोकांचे बरेच स्वस्थ दिवस गेले असते, परंतु त्यांसारिख्याच दुसऱ्या एका एकलकोंड्या लोकांत नवीन धर्माची प्रवृत्ति होऊन त्यांणीं या देशावर चाल केली. ते लोक कोण ह्मणाल, तर आरबलोक.

आरबलोक हे पूर्वीं दरिद्री होते, त्यामुळें त्यांजवर शत्रूंचा डोळा जात नसे. त्याहि लोकांचा गरीबीमुळें फारसा जमाव होणें कठीण पडे. या कारणानें त्यांच्यानें कोणावर तरवार चालवत नसे. जसा कोणी ह्मणेल, कीं हा काय वालुकामय समुद्रच आहे, तसा आरबलोकांचा मुलुक असून त्यांत कोठें कोठें बेटांसारिख्या डोंगरी खडकाळ जागा, व कोठें कोठें सुपीक जमीनीचे तुकडे लांब लांब अंतरावर असून कोठें मध्यें व कोठें सभोंवार रेतीचें मैदान, याप्रमाणें असे. या मैदानांत जेथें कोठें खारट तुरट पाण्याची विहीर सांपडे,

तेथें धनगर लोकांचे लहान लहान तळ पडत. ते सार्वकाळ एके ठिकाणीं राहत नसत. कांहीं दिवस राहून मग तंबू तेथून काढून दुसरे ठिकाणीं नेत. त्यांजवळ बोजा नेण्यास उंटें असत. हीं जनावरें मोठीं सोसक व कष्टाळू, त्यामुळें त्यांचीमात्र या ओसाड देशांत उपजीविका होऊं शके.

यांशिवाय कांहीं लोकांची या देशांत स्थाईक वस्ती झालेली होती. ते यांपेक्षां जाणते खरे, परंतु बहुधा साधेपणांत यांसारिखेच असत, त्यांमध्यें निरनिराळ्या स्वतंत्र टोळ्या असत, त्यांचा परस्परांशीं फारसा व्यवहार नसे. कोणास एका टोळीचा प्रदेशांतून दुसरीचांत जाणें झाल्यास, घोड्यावरून दौड करून, अथवा लमाणाचा सोबतीनें जावें लागे.

प्रत्येक टोळीचा मूळपुरुषाचा घराण्यांतला जो मुख्य पुरुष त्याचा त्या टोळीवर साहजिक अधिकार असे; परंतु त्यास सत्ता चालविण्यास बाहेरून दुसरें बळ नसे, यामुळें त्या टोळींत जा आणखी फळ्या असत, त्यांचा त्यांचा मुख्यांचा सहायानें त्यास आपले बेत तडीस न्यावे लागत. पुनः त्या फळ्यांत तरी जा कुळांतील पुरुषांचें मोठें वजन पडे, त्यांचें मत घेऊन कामें उलटावीं लागत. याप्रमाणें लोकांची मर्जी संपादून राज्यकारभार करावा लागे. सर्व लोक स्वतंत्र असत; आणि सर्व मुलकासच अडचण आली तरमात्र तेथें कोणा पुरुषाचा स्वातंत्र्यास धक्का पोंचे.

अशा मुलुकांतील लोकांस कष्ट व दरिद्र यांची तर पुरी गोडी समजली होती. त्यांचा स्वतंत्र टोळ्या, व त्यांतील निरनिराळीं कुटुंबें, यांचे आपसांत कलह होत; तेणेंकरून महादुर्घट संकटांचीहि त्यांस क्षीत नसे. दुसरें, हे लोक

स्वभावानें साहसी, व यांची कल्पना अचाट, यामुळें जेवढें यांचें सामर्थ्य असे, तेवढें सर्व, प्रसंगीं, बाहेर पडे.

आरबलोक हे मेहनती व अल्पाहारी आहेत, त्यामुळें त्यांचा बांधा आटोपसर, व त्यांचे स्नायु टणक व मांसविरहित आहेत. त्यांची दृष्टि तीक्ष्ण, मुखचर्या तिखट, आणि वर्त्तणूक गंभीर आहे. या गुणांवरून यांचामध्यें जें साहस आहे तें स्पष्ट होतें. यांसारिखे एशियाखंडांत दुसरे मनाचे कठीण लोक नाहींत. या लोकांत महंम्मद[1] ह्मणून एक ढोंगी पैगंबर झाला. त्याचें मत पुष्कळ लोकांमध्यें पसरून बहुत काळपर्यंत आपला पराक्रम गाजवित आहे. कोरेश् ह्मणून टोळीचा एका मुख्य कुळांत महम्मदाचा जन्म झाला. हा लहानपणीं गरीब असे. आरबलोकांचा साध्या व सरळ रीतीप्रमाणें त्या काळीं श्रीमान् लोकांसहि उंटें घेऊन कष्ट करून व्यापार करण्याकरितां प्रवासास लांब जावें लागे. याप्रमाणें महम्मदाचा चुलत्याचीं उंटें जेव्हां जात, तेव्हां हाहि त्याबरोबर जात असे. पुढें याचें लग्न झालें, तेव्हां यास श्रीमान् बायको मिळाली. यामुळें हा स्वतंत्र झाला, आणि याला मनापासून जे उद्योग आवडत ते करायास संधि सांपडली.

या सुमारास आरबलोक हे बहुतेक मूर्तिपूजक, व नक्षत्रपूजक होते. त्यांचा रीतिभातीस कायद्याचा अथवा धर्माचा कांहींच बंध नव्हता. कांहीं यहुदी व ख्रिस्ती टोळ्यांची या देशांत वसाहत झाली होती, त्यामुळें त्यांचा

(१) याचा मूळ उच्चार मुहम्मद असा आहे, परंतु प्रवृत्तींत महम्मद आहे सबब तसाच या ग्रंथांत लिहिला आहे. भा० क०.

मतांत व वृत्तींत कांहींसा चांगला फेर पडला होता, आणि मूर्तिपूजकांमध्येंहि सर्व देवांचा प्रमुख कोणी परमेश्वर आहे, असें ते मानित असत. परंतु या मताचें वजन विशेष पडत नसे, आणि महम्मदाचा धर्माची गति प्रथम अगदीं मंद होती यावरून त्या धर्माचीं मतें स्वीकारण्याजोग्या दशेस त्यावेळचे लोक आले नव्हते, असें दिसतें.

आरबस्तान हा देश ओसाड, यामुळें तेथें मनास वेधक अशा वस्तु दृष्टीस पडत नाहींत. यामुळें बाह्य कर्मणूक नाहींशी होऊन स्वभावतःच आरबलोक विचारांत निमग्न होतात, आणि त्यांतच मनोत्साह करून घेऊं पाहतात. याप्रमाणें महम्मद हा हिरापर्वतावर गुहेंत जाऊन बसत असे, आणि एकांतांत समाधि लावून विचार करित असे. त्याचा बायकोचा चुलत भाऊ यहुदीविद्येंत निपुण होता. त्याणें ख्रिस्ती लोकांचा धर्मपुस्तकाचें यहुदींतून आरबींत भाषांतर केलें होतें, असें ह्मणतात. या पुरुषाशीं महम्मदाचें संघट्टण असे, त्यावरून त्याद्वारें महम्मदाचें लक्ष ईश्वराचा एकत्वाकडे लागलें असेल, असें दिसतें; परंतु तें कसेंहि असो, याचे समाधिस्थ विचार ईश्वरप्रेरित असोत, किंवा नसोत, परंतु त्या विचारांची इतकी सीमा झाली, कीं हा वेड लागण्याचा बेतावर आला. शेवटीं याचे उद्गार यास सहन न होऊन, याणें प्रथम आपल्या स्त्रीला व नंतर कुटुंबांतील दुसऱ्या कांहीं मनुष्यांस सांगितलें, कीं जो खरा एक ईश्वर त्याणें आपली शुद्ध भक्ति व सेवा हीं लोकांत पुनः चालू करण्याची मला आज्ञा केली आहे. त्या वेळीं महम्मद सुमारें चाळीस वर्षांचा होता. पुढें सुमारें तीनचार वर्षांनां आपणास ईश्वरी आज्ञा झाली आहे, असें

प्रसिद्धपणें याणें सांगितलें, त्यामुळें लोक याची निर्भर्त्सना व नानाप्रकारें छळ करूं लागले. याप्रमाणें दहा वर्षें लोटलीं. इतक्यांत याचा धर्मांचा हळुहळु प्रसर होऊं लागला, व अबू तालेब ह्मणून जो याचा पोशिंदा चुलता होता, तो मरण पावला. असें पाहून मक्केचा राज्यकर्त्यांनीं यास ठार मारण्याचा निश्चय केला. आतां पाहूं जातां जर अशा गोष्टी घडून न येत्या, तर महम्मद हा प्रसिद्धीस नयेतां, जसा एकादा क्षुद्र पिसाळलेला देवभक्त्या असतो, तसाच राहिला असता. परंतु असा प्रसंग आपणावर गुजरला, असें पाहून हा मदीना शहरास पळून गेला, आणि आपणावर जापक्षीं शत्रु बलात्कार करितात, त्यापक्षीं आतां आपणहि त्यांवर करावा असा याणें निश्चय केला. यापूर्वीं जेव्हां हा उपदेश करी, तेव्हां जें यामध्यें लीनत्व असे, तें याणें पुढें सोडून दिलें, आणि आपल्या स्वभावाचें पूर्ण तेज प्रकट केलें. नंतर पूर्वीं धर्मोपदेशकाचा स्थितींत असतां उत्कंठा व सहनशीलता यांविषयीं जी याची प्रख्याति असे, त्यांहून आपल्या पक्षाची सरदारी बजावण्याविषयीं चातुर्य व शौर्य यांविषयीं याची मोठी ख्याति झाली.

महम्मदानें जेव्हां धर्मोपदेश करण्यास आरंभ केला, तेव्हां जें आपण करितों, तें यथार्थ आहे अशी याची निष्कपट खातरी होती असें दिसतें. पुढें यास लोक आड आल्यामुळें आपलीं ढोंगें लबाडीनें चालविण्यास हा उद्युक्त झाला. असें होतां उत्तरोत्तर दंभ व गारुड यांची यास सवय लागली. त्यामुळें तीं यास साहजिक प्राप्त झालीं. असें असतांहि जें यास मूळ पिसें लागलें होतें, तें शेवटपर्यंत अंशतः तरी यामध्यें वसत होतें, आणि कांहीं तरी त्या

स्फुरणानें तो कामें करी, असें संभवतें. तें कसेंहि असो, त्याची उत्कंठा खरी असो, अथवा खोटी असो; याच्या मताची योग्यता कशीहि असो, परंतु या मताच्या उपदेश करण्याविषयीं जो याणें जुलूम सुरू केला, आणि त्या जुलुमापासून जो दुराग्रह उत्पन्न झाला आणि जे रक्ताचे पूर वाहले त्यांवरून महम्मद हा एक मानवांचा दुष्टतम शत्रु असें मानावयास योग्य आहे.

आपल्या पक्षास जबरदस्तीचें सहाय नको असें मदीनेस पळून जाईपर्यंत महम्मद हमेशा सांगत असे. नंतर स्वसंरक्षणार्थ शस्त्र हातीं धरावें अशी मला आज्ञा झाली आहे, असें हा सांगूं लागला. पुढें थोडक्याच दिवसांनीं माझ्या धर्मावर जे भरवसा ठेवित नसतील, त्यांस बाळगावें व न वाटत, तर त्यांचा शिरच्छेद करावा, अशी देवाची आज्ञा झाली आहे, असें त्याणें पिकविलें. या शेवटच्या आज्ञेचा कल महम्मदाच्या स्वदेशीय लोकांचा स्वभावाशीं मिळाला असें दिसतें. कारण प्रथम जेव्हां याणें स्वारी केली, तेव्हां याजवळ नऊ अनुयायी होते. असें असून हा मरावयाच्या पूर्वीं याणें सर्व आरबस्तान पादाक्रांत करून रोमन बादशाहाच्या राज्यावर हल्ला सुरू केला होता. महम्मदास पहिलें स्फुरण झाल्यापासून तेविसाव्या वर्षीं, आणि हा मदीनेस पळाल्यापासून दहाव्या वर्षीं याचा काळ झाला.

महम्मदावर जी लोकांची श्रद्धा बसली, ती केवळ याच्या लढाऊ स्वभावानेंच बसली असें नाहीं. हा जसजसे देश जिंकित जाई, तसतशा लोकांच्या रीतिभातीहि सुधारित जाई. ख्रिस्ती लोकांच्या जुन्या कराराच्या प्रगल्भ ईश्वरी सिद्धांतांच्या आधारानें याणें आपला धर्म रचिला होता. या-

ची नीति अर्वाचीन ख्रिस्ती (वगैरे सुधारलेल्या) लोकांस कशीहि दिसो, परंतु त्या वेळीं जो आरबलोकांचा आचार होता, त्याहूनहि शुद्ध होती. दुसरें याचा नीतीचें एक उदाहरण सांगतों. आरबलोकांस आपसांत लढाया करण्याची सवय असे, त्यामुळें कोणाचा सूड घेणें झाल्यास त्यांस न्याय इनसाप लागत नसे. महम्मदानें तें बंद केलें, आणि असें ठराविलें कीं चौकशी होऊन शिक्षा कायम झाल्याशिवाय कोणी एकमेकांचा सूड घेऊं नये. असें झाल्यानें जे आरबलोकांचे कडवे स्वभाव, त्यांचा आवर झाला. ही गोष्ट महम्मदानें मोठी धिटाईची केली असें ह्मटलें पाहिजे.

क्रमेंकरून बहुधा सर्व आरबलोक महम्मदाच्या मतास अनुसरले, आणि त्यांणीं तो धर्म मनापासून स्वीकारिला असावा, असें वरील गोष्टींवरून दिसतें. नवीन पंथांत शिरल्यावर त्यांचें धर्मसंबंधी औत्सुक्य जागृत झालें. तेणेंकरून त्यांचा साहसी वृत्तीचा ओघ एकाच मार्गानें वाहूं लागला. ईश्वराचा कार्यार्थ जय मिळवावा, नाहींतर त्याचें एकत्व व महत्त्व यांचा झेंडा उभारण्याचा कामांत प्राण द्यावा, हा सर्व मुसलमानांस हव्यास लागला. तशांत राजपदप्राप्तीचा व लुटीचा लोभ, कीर्तीची आकांक्षा, आणि स्वर्गसुखाची आशा, हीं सर्व पूर्वोक्त औत्सुक्यरूपवृत्तींचा अग्नींत घृतवत् पडलीं, त्यामुळें त्या वडवानलाची ज्वाला चहूंकडे पसरली.

दुसरें त्या वेळीं असें झालें कीं आसपासचा लोकांची राजकीय व धर्मसंबंधी स्थिति चांगली नव्हती, त्यामुळें या वेडगळ मुळें लोकांस आपलें मनोगत सिद्धीस नेण्यास उत्तेजन आलें.

त्या वेळीं रोमनलोकांचा राज्याचा ( जंगली लोकांनीं ) विध्वंस केला होता; तसेंच ख्रिस्ती धर्मांत भ्रष्टाकार होऊन त्याचें तेज कमी होत चाललें होतें; व त्यांत परस्परविरुद्ध नवे पंथ निघून त्यांचा वादानीं तो धर्म जर्जर झाला होता; इराणदेशाला तर त्रिदोषच झाला होता; तेथील मृतवत् दांभिक धर्माचें तारूं बुडण्यास उगीच त्याला थोडी तोंडचा वाऱ्याची झुळूक पाहिजे होती; त्यामुळें इराणदेशांत आरबलोकांचा धातुमय शस्त्राइतका तरी धर्मरूप शस्त्रानें जय मिळविला. इराणदेशांत असा आरबलोकांचा राजकीय अम्मल पुरा बसला, त्याप्रमाणें तेथें महम्मदी धर्म सर्वत्र प्रसृत झाला. पुढें इराणदेशाचा धर्मसंबंधी कित्ता दुसऱ्या पराक्रमी लोकांनीं घेतल्यामुळें, तातार, चीन, मलायाप्रांत, व एशियाखंडांतील बेटें, या देशांत आरबलोकांचा धर्माची प्रवृत्ति आपोआप झाली; नाहींतर असें होण्यास त्या लोकांवर आरबांचा ऐहिक सत्तेचा कांहीं पगडा नव्हता.

रोमनलोकांचा राज्यांतील सिरिया प्रांतावर महम्मदानें प्रथम हल्ला केला. पुढें तो मेल्यापासून सहा वर्षांत ( ह्मणजे इ० सन ६३८ पावेतों, ) त्याचा अनुयायी लोकांनीं सिरियाप्रांत व मिश्रदेश हे काबीज केले. त्यामागुन इ० सन ६४७ पासून ७०९ पावेतों पश्चिमेकडे पूर्वी रोमनलोकांनीं जितकें आफ्रिकाखंड जिंकिलें होतें तितकें जिंकून इ० सन ७१३ त स्पेनदेश हस्तगत केला, आणि त्यांचा मूळपुरुष महम्मद मेल्यास शंभर वर्षें झालीं नाहींत, तंव महम्मदी लोक फ्रान्सदेशाचा मध्यावर आऊन ठेपले[१].

( १ ) तेथें फ्रान्सदेशाचा बादशाहा चार्लस् मार्टेल् यानें पैटियर्स व

याप्रमाणें पश्चिमेकडे वर्त्तमान झालें. इकडे पूर्वेस इ० सन ६३२ त मुसलमानलोकांनीं इराणावर स्वारी करून खदीशिया एथील मोठ्या लढाईत तेथील फौजेचा मोड केला.

इराणदेश घेतला.

हें वर्तमान इ० सन ६३६ त झालें. नंतर इ० सन ६३७ त जल्लाल एथें, व सन ६४२ त नाहावंद एथें अशा त्यांणीं दुसऱ्या दोन लढाया करून, इराणदेशाचें राज्य फस्त करून, तेथील बादशाहास वक्षूनदीपलीकडे स्वदेशपार हांकून लाविलें. याप्रमाणें होतां होतां महम्मदामागून उमर, ह्मणून जो दुसरा खलीफा[3] झाला, तो इ० सन ६४४ त मरण पावला, ते समयीं पूर्वेस हिरातशहरापर्यंत सर्व इराणदेश आरबलोकांनीं हस्तगत केला होता.

पुढें इ० सन ६५० त इराणदेशांत एक बंड झालें तेणेंकरून परागंदा झालेल्या बादशाहास आपल्या नशिबाची एकदां पारख पहावी अशी बुद्धि झाली; परंतु त्याचा यत्न सिद्धीस न जातां वक्षूनदीजवळ तो मारला गेला, आणि आरबांचा राज्याची सरहद्द त्या नदीपर्यंत पोंचून बल्कप्रांत, व हिंदुकुशपर्वताचा उत्तरेकडील सर्व प्रदेश त्यांचा सत्तेखालीं आला. हिंदुकुशपर्वतापासून समुद्रापर्यंत दक्षिणोत्तर व इराणी वाळवंटा-

इ० स० ६५० हिजरी सन ३०.

इ० स० ६५१ हि० स० ३१. सरहद्द सिंधुनदापर्यंत आली.

---

टूर्स, या शहरांमध्यें सन ७३२ त मुसलमानांचा पराजय करून पुढें त्यांची गति कुंठित केली.

(३) महम्मदाची गादी जे चालविणारे त्यांस खलीफा असें ह्मणतात. भा० क०

पासून सिंधुनदापर्यंत जो खडकाळ प्रदेश आहे, तेथपर्यंत पूर्व-पश्चिम अशी त्यावेळचा आरबी राज्याची हद्द येऊन ठेपली.

हिंदुकुशपर्वताचा भागामध्यें जो प्रदेश आहे, त्याचे त्या वेळीं तीन विभाग पडलेले होते, उत्तरविभागांत जेथें हल्लीं ऐमाक व हजारे लोक राहतात, त्यास त्या वेळीं घोर पर्वत ह्मणत असत; मध्यविभागाचा सुलेमानपर्वतांत समावेश होत असे, आणि दक्षिणविभागास मकरानचा पर्वत ह्मणत. या मकरानपर्वतापासून समुद्रापर्यंत रेतीचें मैदान आहे. सुलेमानपर्वतामध्यें मोठीं उंच तळवटें आहेत, त्यांतील एक तळवट सुलेमान, व घोर, या पर्वतांचा सरहद्दीवर आहे, तें पश्चिमेस गजनीशहरास लागलें आहे.

जेव्हां मुसलमानलोक स्वाऱ्या करूं लागले, तेव्हां मकरानचा पर्वतावर बलूची लोक राहत असत; सुलेमान पर्वतावर अफगाणलोक राहत असत; घोरपर्वतावर कोण असत. याचा निश्चय सांगवत नाहीं, परंतु बहुधा अफगाणलोक असावे, असें दिसतें. घोरपर्वतापासून पूर्वेस सिंधुनदापावेतों जे हिंदुकुशपर्वतास लागलेले दुसरे पर्वत आहेत, त्यांवर त्या वेळीं पारोपमिसादी लोकांचा वंशांतील कोणी हिंदुलोक राहत असावे, असा संभव दिसतो. डोंगर सोडून सपाटीवरील वस्ती पाहूं लागलें तर मकरान व सुलेमान पर्वतांचा, व सिंधुनदाचा मध्यें जाट लोक राहत असत; आणि वरील पर्वतांचा पश्चिमेस जो सपाट प्रदेश आहे, त्यांत इराणी लोकांची वसाहत असे, असें हल्लींचा वस्तीवरून अनुमान होतें.

या वरील स्वतंत्र मुलुकावर हिजरी सन ४४ मध्यें प्रथम स्वारी झाली. तींत मर्वशहराहून आरबलोकांचें एक लश्कर येऊन त्याणें काबुलापर्यंत चाल केली, व १२००० लोकांस बाटवून मुसलमान केले. या स्वारींत यांणीं काबूलचें राज्य घेतलें, अथवा तेथील राजापासून खंडणी तरी घेतली असावी, असें दिसतें. कारण पुढें कांहीं दिवसांनीं काबूलचा राजानें बंड केल्यावरून हिजरी सन ६२ मध्यें मुसलमानलोकांनीं त्यावर दुसरी स्वारी केली, असें लिहिलेलें आहे. परंतु या स्वारींत काबूलचा राजानें आरबलोकांस एका खेंडींत आणून, तेथें त्यांचा पराजय केला; तेव्हां शरण येऊन पुष्कळ निष्क्रय द्रव्य देऊन आपली सुटका करून घेणें हें आरबलोकांस प्राप्त झालें. त्या प्रसंगीं पैगंबराचा एक जुना चेला यांणीं शरण जाणें अयोग्य असें जाणून लढाईंत स्वधर्मशत्रूंचा तलवारीखालीं आपला प्राण दिला.

अशी आपल्या लोकांची फजीती झाली हें पाहून सिस्तानचा अधिकारी एक आरब सरदार होता, त्याणें लश्कर पाठऊन चांगला सूड घेतला. पुढें खुरासानचा सुभेदार अब्दुर्रहिमान याणें हिजरी सन ८० मध्यें स्वतः मोठ्या फौजेनिशीं काबुलावर स्वारी केली. तेव्हां त्यास फसविण्याविषयीं शत्रूंनीं पुष्कळ युक्ति केल्या त्यांमध्यें फसून न गुंततां, त्याणें पुष्कळ प्रयत्न करून बहुतेक देश हस्तगत करून घेतला. त्या वेळीं बसा एथील सुभेदार हुजाज हा होता. तो स्वभावानें तापट व क्रूर असे, असें आरबी इ-

---

४ इ० स० ६६४. ५ इ० स० ६८२

तिहासांत वर्णन आहे. हा अब्दुरहिमानाचा वरिष्ठ होता. त्यास अब्दुरहिमानाचा वरील कृतीनें राग आला; तेव्हां आतां आपणावर बेतल्ये अशा धास्तीनें अब्दुरहिमानानें बंड केलें, आणि बसा शहर घेऊन, क्यूफा ह्मणून जी अर्वाचीन राजधानी ती बळकाविली. शेवटीं दमास्कस ह्मणून जें त्या वेळीं खलीफांचें राहण्याचें ठिकाण, त्या शहरावर आतां हा येऊन पडतो अशी धास्ती पडली. याप्रमाणें ( इ० सन ६९९ पासून ७०५ पावेतों ) सहा वर्षें याणें युद्ध केलें, त्यांत यास काबूलचा राजाचें सहाय होतें. शेवटीं याचा पराजय झाला तेव्हां आपला सहाकारी काबूलचा राजा याची आपणास पाठीस घालण्याची शक्ति नाहीं, असें पाहून अब्दुरहिमान याणें आपला जीव दिला. या वेळचे अफगाणलोक मुसलमान होते, असें फिरिस्ता ह्मणून फारसी इतिहासकार वर्णन करितो, आणि बहुधा अफगाणलोकांचाच दंतकथांवरून त्यांस खुद्द महम्मद पैगंबरानें आपल्या धर्मांत आणिलें असावें, असा त्या ग्रंथकाराचा अभिप्राय आहेसें दिसतें. या अफगाणलोकांनीं हिजरी सन ६२ मध्यें हिंदुस्थानांत स्वाऱ्या करण्यास आरंभ केला, तेव्हांपासून लाहोरचा राजाचें व त्यांचें युद्ध चाललेंच असे. शेवटीं सिंधुनदाचा पूर्वकांठचा डोंगरांत गकर ह्मणून लोक राहत असत, त्यांशीं मिळून अफगाणलोकांनीं त्या राजास हरवून त्यापासून कांहीं मुलुक घेतला, आणि त्या ऐवजीं दुसऱ्या मुसलमानलोकांचा उपद्रवापासून तुझें संरक्षण आह्मी करूं, असा त्याजबरोबर गुप्त करार केला. या करारामुळेंच पुढें समानी वंशाचे राजे सिंधमुलुकांतमात्र लुटण्यास जात, परंतु त्यांणीं कधीं उत्तरहिंदुस्थानावर स्वा-

री केली नाहीं; याप्रमाणें फिरिस्ता वर्णन करितो. दुसरे हिजरी सनाचा दुसऱ्या शतकांत सिंधमुलुकांतून जे आरब पळून आले, त्यांस अफगाणलोकांनीं पाठीस घातलें.

आतां विचार करून पाहूं गेलें असतां, बहुधा हे सर्व किंवा यांतून थोडे तरी अफगाणलोक हे मुसलमानी धर्मांत लवकर आलेले असावे, असें या ग्रंथकर्त्यानें सांगितलें आहे, परंतु पैगंबरानें यांस मुसलमानी धर्मांत आणिलें ही कादंबरी आहे; बाकी वरील वृत्त झालें असावें, असा संभव दिसतो. या लोकांचा मुलुक डोंगरी आहे, त्यांतून परचक्रास येण्याजोगा असा मुलुक कदाचित् आरबलोकांनीं पहिल्या हुशींत घेतला असेल; परंतु साऱ्या मुलुकाविषयीं ह्मणाल, तर अद्यापपावेतोंहि कित्येक ठिकाणीं डोंगरांतून अफगाणांचा स्वतंत्र टोळ्या आहेत. पुढें या लोकांबरावर लढाई करून सुल्तान महमूद याणें त्यांस जिंकिलें.

अफगाणलोकांचा प्राचीन धर्म कोणता होता याविषयीं कांहीं माहिती लागत नाहीं; परंतु हे बल्क प्रांतानजीक राहत आणि यांचा इराणदेशाशींहि संबंध असे. यावरून हे अग्निपूजक असावे, असें अनुमान करण्यास जागा आहे. मुसलमानी इतिहासकार हे सर्व परधर्मी लोकांचा काफर या एका नावांत समावेश करितात, यामुळें त्यांचाहि ग्रंथांतून याविषयीं आणखी निर्णय करण्याजोगा आधार मिळत नाहीं.

मुसलमानलोकांची हिंदुस्थानावर पहिली स्वारी इ० स० ६६४

पूर्वीं मर्व शहरांतून काबुलावर मुसलमानांनीं स्वारी केली, असें वर्णन केलें आहे; त्याच स्वारींत हिंदुस्थानांतहि मुसलमानलोक आले. त्या प्रसंगीं सर्व इराण व आरबस्तान यांमध्यें

जो पुढें प्रख्यात झाला असा मोहालीबनामक सरदार हा कांहीं फौज घेऊन निघाला, तो मुलतानपर्यंत आऊन तेथून पुष्कळ बंदीवान् घेऊन स्वदेशास माघारा गेला. काबुलापासून मुलतानपावेतों देश कसा आहे याचा शोध लावावा, एवढाच याचा उद्देश होता, असें संभवतें. मग पुढें हा परत गेल्यावर याणें इकडील वर्त्तमान सांगितलें तें नाउमेद होण्याजोगें सांगितलें, किंवा कसें, हें बराबर समजत नाहीं, परंतु त्यामुळें असो, अथवा दुसऱ्या कारणामुळें असो, यानंतर आरबलोकांचें वर्चस्व होतें तेथपावेतों, उत्तरहिंदुस्थानावर त्यांणीं पुनः हात टाकला नाहीं.

आरब लोकांनीं सिंधदेश घेतला.

जरी हिंदुस्थान सोडिलें, तरी सिंधदेशावर खलीफा उमर याचा कारकीर्दीपासून आरबलोक हे जहाजांतून येऊन हल्ले करित असत. तेव्हां त्यांणीं कोठें स्थाईक वस्ती धरली नव्हती, परंतु या देशांतील स्त्रिया स्वरूपवान् असत, अशी आरबस्तानांत ख्याति असे, यामुळें त्या पळवून नेण्याचा कामाकरितां कदाचित् ते येत असत.

दुसऱ्या खलिफांचा वेळेसहि हा देश जिंकण्याकरितां कांहीं टोळ्या मकरानांमधून पाठविलेल्या होत्या. परंतु हा देश ओसाड यामुळें त्यांचानें कांहीं झालें नाहीं. पूर्वी सिकंदर बादशाहाचा फौजेचे याच मुलुकांत पराकाष्ठेचे हाल झाले, यामुळें त्यास गिड्रोसिया असें युनानी ग्रंथकारांनीं नाव दिलें आहे.

सिंधदेशामध्यें दाहिर ह्मणून राजा होता, त्याची राजधानी बकर किल्ल्याजवळ अरोड ह्मणून शहर होतें. त्याची सत्ता मुलतान प्रांत, सारा सिंधदेश, आणि त्याजव-

ळील बहुधा कालबागपर्वतापर्यंत सिंधुनदाचें तळवट इतक्या प्रदेशांवर चालत होती. त्याचा हाताखालीं त्याचे सगेसोयरे उमराव असत, ते बहुधा राजपूतलोकांचा सांप्रतचा चालीप्रमाणें त्यास करभार देत असत. शेवटीं खलीफा वालीद याचा कारकीर्दींत मुसलमानलोकांनीं मोठ्या ईर्षेस पडून इराणदेशाचा दक्षिणेंतून स्वारी केली. या वेळीं मुसलमानलोकांस अशी जितीस पडण्याजोगी जी गोष्ट झाली, ती प्रकार असाः—

सिंधदेशांत देवलनामक बंदरीं तेथील लोकांनी एक आरबी जहाज पकडलें; तें परत आमचा हवालीं करावें, असें मुसलमानलोकांनीं राजा दाहिर याजवळ मागणें केलें. राजानें उत्तर दिलें, कीं देवल बंदर हें माझा राज्यांत नाहीं. हें त्याचें निमित्त मुसलमानलोकांनीं कबूल न करितां १००० पायदळ व ३०० स्वारांची त्याजवर मोहसल पाठविली. परंतु हें लश्कर अगदीं थोडें होतें, ह्मणून पूर्वींचा प्रमाणेंच नाश पावलें. हें पाहून हिजाजनामक बस्रा प्रांताचा सुभेदार, याणें शिराज एथें ६००० लश्कर तयार केलें, आणि त्यावर आपला पुतण्या महम्मद कासीम यास नेमिलें. त्या वेळीं महम्मद कासीम याचें वय २० वर्षांवर नव्हतें; असें असून त्याणें वरील सैन्य देवल एथें सुरक्षित आणिलें. त्या शहरास वेढा घालण्याकरितां, तटांवर जोरानें धोंडी फेंकण्याचीं व दुसरीं यंत्रें अशी सर्व सामग्री त्याजवळ होती, परंतु त्याणें तें सर्व सोडून प्रथम गांवाजवळ एक देवालय होतें, त्याजवर हल्ला केला. हें देवालय मोठें प्रख्यात होतें; त्यासभोंवती मोठी उंच दगडी पोवळी बांधले-

ली होती; त्यांत पुष्कळ ब्राह्मण राहत असत, व त्याशिवाय तेथें राजपूतलोकांचा मजबूद पाहारा असे.

याप्रमाणें आपणास संकटें आड आलीं, याचें निवारण कसें होईल या विवंचनेंत महम्मद कासीम आहे, इतक्यांत त्याजवळ जे प्रतिपक्ष्यांकडील बंदीवान् होते, त्यांतून त्यास कोणी सांगितलें, कीं देवालयाचा कळसावर जें निशाण आहे, तें आहे तोंपर्यंत आपणास शत्रूंची भीति नाहीं, असा या लोकांचा समज आहे. हें ऐकून त्याणें त्या निशाणावर तोफा चालविल्या, तेव्हां कांहीं वेळानें तें निशाण पडलें, तें पाहून आंतील लश्कर घाबरून गेलें. तेणेंकरून थोडक्याच वेळांत तें देवालय शत्रूंनीं घेतलें.

कासीम याणें तेथील ब्राह्मणांस सांगितलें, कीं तुह्मीं सुनता करून आमचा धर्मांत या; तें ब्राह्मणांनीं नाकबूल केल्यावरून त्यास क्रोध येऊन, त्याणें असा हुकूम केला, कीं सत्रा वर्षांवर जेवढे पुरुष असतील, त्यांची कतल करावी, आणि जे त्याहून लहान असतील ते, व सर्व बायका, यांस गुलाम करून न्यावें. याप्रमाणें देवालयाची दशा झाल्यावर जवळचें शहरहि शत्रूंचा हातीं लागलें. तेथें मुसलमान लोकांस पुष्कळ लूट मिळाली. त्यांतून चालीप्रमाणें हिजाजचा[६] एक पंचमांश काढून, बाकी त्यांणीं सारखी वांटून घेतली. देवल एथें दाहिर राजाचा एक मुलगा धन्नीपणाचा अथवा साह्यकारीपणाचा नात्यानें आलेला होता, तें शहर शत्रूंनीं घेतल्यावर, तो ब्रह्मणाबादेस गेला. तेथें त्या मागून कासीम याणें त्याचा पाठलाग करून त्यास जिंकून त-

६ आरबस्तानांत एक प्रदेश आहे, तेथें मुसलमान यात्रेकरू जात असतात. भा० क०

ह करून सोडून दिलें. नंतर कासीम याणें नेरूण शहर, जास सांप्रत हैदराबाद ह्मणतात, त्यावर स्वारी केली, आणि तेथून सेहवाणावर चाल करून त्या शहरास वेढा दिला. तें शहर स्वभावतःच मजबूर होतें. असें असतांहि सातवे दिवशीं शहर ओसाड टाकून देऊन त्यांतील लश्कर सालीमचा किल्ल्यावर पळून गेलें. पुढें कासीम याणें तोहि किल्ला घेतला.

याप्रमाणें विशेष हरकती नयेतां कासीम देश जिंकित चालला. पुढें दाहिर राजाचा वडील पुत्र बलाढ्य सैन्य घेऊन त्यास आडवा आला. इकडे त्याचीं बारबरदारीचीं उंटें वगैरे कमी पडत चाललीं, लढाईची सामग्री खुटत चालली, आणि पाठबळ कमी झालें; त्यामुळें त्यास तळ देऊन राहणें प्राप्त झालें. कांहीं दिवसांनंतर त्यास इराणांतून २००० घोडेस्वारांची कुमक आली; तेव्हां त्याणें पुनः युद्धास आरंभ केला, आणि पुष्कळ लहान लहान लढाया मारून चाल करित शेवटीं तो अरोडानजीक येऊन ठेपला. तेथें आपल्या राजधानीचा संरक्षणार्थ दाहिर ५०००० फौज सिद्ध करून स्वतः युद्धास आला. अशा समयीं आपणापेक्षां शत्रूंची संख्या फार आहे आणि कदाचित् पराजय झाला तर आपल्याचानें परत जाववणार नाहीं, हें पाहून कासिमानें आपल्या फौजेस उभें राहण्यास चांगली मजबूद जागा पाहिली, आणि आपल्या शत्रूंची वाट पाहत तो तेथेंच उभा राहिला. पुढें लढाई सुरू झाली, इतक्यांत त्याचा नशिबाचा जोरानें एक गोष्ट घडून आली, त्यामुळें त्याचें पुष्कळ कार्य झालें; आणि त्याणें जी दीर्घदृष्टीनें चांगली जागा शोधून काढिली होती, तिचें सार्थक झालें. तें असें, कीं राजाचा

सैन्यानें जेव्हां कासिमावर प्रथमच भडमार केला, तेव्हां ज्या हत्तीवर राजा बसला होता, त्यास एक गोळा लागला; त्यामुळें तो हत्ति भिऊन स्वारासुद्धां पळाला, आणि कांहीं केल्या थांबेना. शेवटीं त्याणें जाऊन जवळच्या नदींत बुडी मारिली. इकडे एशियाखंडस्थ फौजेच्या रीतीप्रमाणें सेनापति दिसेनासा झाला, असें पाहून जिकडे तिकडे हाहाकार झाला. इतक्यांत राजा बाणानें घायाळ झाला असतांहि पुनः घोड्यावर बसून सिद्ध होऊन आला, आणि मोठ्या शौर्यानें पुनः युद्ध करूं लागला. तथापि जें एकदां वारें फिरलें, तें नीट होईना. असें होतां होतां शेवटीं शत्रूंचा लश्कराचा मध्यभागीं मोठ्या पराक्रमानें युद्ध करित असतां राजा दाहिर पडला गेला.

तेथें राजाचा मुलगा होता त्याणें पुढें व्हावें, तें एकीकडे राहून उलटा भित्र्यासारिखा तो ब्रम्हणाबादेस पळून गेला. याप्रमाणें त्याणें बांगड्या भरल्या, हें पाहून राणीनें आपल्या नवऱ्याची पराजित सेना एके ठिकाणीं आणिवली; शहराचा तटाची वगैरे मरामत केली; आणि शत्रूंचे पुष्कळ हल्ले हटविले. याप्रमाणें तिणें तलवारबहादरी केली; परंतु शेवटीं शहरांत सामग्री मिळेनाशी झाली, त्यामुळें आणखी लढाई चालविणें अशक्य झालें. असाहि प्रसंग गुजरला असतां, तिणें धीर सोडिला नाहीं; आणि तिच्यें उदाहरण पाहून तिचा सर्व लश्करचा राजपूतलोकांस त्वेष चढून, त्याणीं आपल्या लोकांचा चालीप्रमाणें मरून जाण्याचा निश्चय केला. नंतर त्याणीं मोठी खाई खणून त्यांत प्रथम सर्व स्त्रिया व मुलें यांस अग्नीला अर्पण केलीं; मग सर्व पुरुषांनीं स्नानें करून आपल्या धर्माप्रमाणें सर्व विधि केले, आणि

एकमेकांचा भेटी घेऊन इहलोकास पाणी सोडिलें; नंतर शहराचे दरवाजे उघडून, ते राजपूत तलवारा उपसून बाहेर निघाले, आणि शत्रूवर घुसून त्यांचा शस्त्रांखालीं सर्व मरण पावले. जे लश्करांतील लोक आपल्या मतें बचावाचा विचार करून या साहसी कृत्यास अनुसरले नाहींत, त्यांचा या प्रपंचसुज्ञतेपासून कांहीं फायदा झाला नाहीं. कारण पुढें तरी हल्ला करून मुसलमानलोकांनीं तें शहर घेतलें; त्या झपाट्यांत सर्व हत्यारबंद लोकांची त्यांणीं कतल केली, आणि त्यांचा बायकामुलांस बंदीवान् केलें.

पुढें दुसऱ्या हिंदुलोकांची निराशा होऊन ते जीवावर उदार झाले, आणि शेवटीं अशकंद्रा एथें कासिमाबरोबर लढले. तेथें त्यांचा मोड झाल्यावर, मुलतान एथें कोणी कासिमास आडवा आला नाहीं. याप्रमाणें कोणी शत्रू नाहींसा झाल्यावर, मुसलमान लोक देश जिंकित चालले, आणि क्रमेंकरून दाहिरराजाचें सर्व राज्य हस्तगत करून घेते झाले.

आरबलोकांनीं पहिल्या दुर्शीत जे देश घेतले, त्यांतील लोकांशीं कितिएक बाबदींत ते शांतपणानें चालत, व कितिएक ठिकाणीं आपलें विशेष क्रौर्य प्रकट करीत. असा या लोकांचा विलक्षण स्वभाव असे. एकाद्या शहराजवळ आले, ह्मणजे तेथील लोकांस सांगून पाठवीत, कीं तुह्मी महम्मदी धर्म स्वीकारा, नाहीं तर खंडणी द्या; अशी त्यांची चाल असे. जर त्यांणीं ऐकिलें, तर बरें, नाहीं तर त्या शहरावर ते हल्ला करीत; त्या समयीं जर आंतील लोकांनीं समजूतीस येऊन तहाचें बोलणें लाविलें, तर ठीकच, नाहीं तर शहर हातीं येतांच सर्व लढाऊ लोकांची कतल करून

त्यांचा मुलांमाणसांस गुलामांप्रमाणें विकून टाकीत. याप्रमाणें चार शहरांची दशा झाली. दोन शहरांत प्रत्येकी ६००० लश्करी लोक जीवें मारिले गेले. जेव्हां हे हल्ला करून एकादें शहर घेत, तेव्हां त्या गर्दीत इतर लोकांचें सहजच नुकसान होत असे; परंतु तें खेरीज करून शहरांतील व्यापारी, कारागीर वगैरे कसबी लोक, व तसेच इतर राहणारे लोक, यांस आणखी कांहीं इजा होत नसे. एकदां खुशीनें अथवा जुलमानें खंडणी द्यावयास लोक कबूल झाले, म्हणजे मग त्यांचे पूर्वींचे सर्व हक्क कायम ठेवीत, आणि त्यांस आपल्या धर्मानें स्वेच्छ चालण्याचीहि मोकळीक देत असत. तसेंच जर एकाद्या राजानें खंडणी देण्याचें कबूल केलें, तर त्याचा मुलुक त्याजकडे कायम ठेवीत. मग तो करभार देणाऱ्या मांडलिक राजांचा पायरीनें यांशीं वागत असे.

जीं शहरें यांणीं गर्दी करून घेतलीं, त्या शहरांतील देवालयें जमीनदोस्त करून टाकिलीं होतीं; तेथील पूजा बंद केल्या होत्या; आणि तेथील ब्राह्मणलोकांचा जमीनी व वर्षासनें खालसा केलीं होतीं; तेव्हां याबाबद पुढें कसें करावें, हा विचार पडला. कारण जर आपण धर्माचा बाबदींत मुळींच हात घातला नसता, तर ती गोष्ट निराळी होती; परंतु आपण केलें तें जर पुनः फिरविलें, तर तेणेंकरून मूर्तिपूजकांस आपण प्रत्यक्ष मदत केली, असें होईल. असें वाटून कासीम यास पुढें काय करावें हें सुचेना; तेव्हां त्याणें या प्रकरणीं आरबस्तानांत लिहून पाठविलें. तिकडून असा जबाब आला, कीं तुह्मी लिहिता त्या शहरांचा लोकांनीं खंडणी दिली आहे, तेव्हां ते आपली प्रजा आहेत; या-

स्तव आतां त्यांस त्यांचे प्रजेचा नात्याचे सर्व हक्क असावे. त्यांणीं आपलीं देवळें बांधावीं; आपल्या धर्माप्रमाणें सर्व संस्कार करावे; ब्राह्मणांचा जमीनी सोडाव्या; त्यांचीं वर्षासनें परत द्यावीं; आणि एकंदर जमाबंदींतून शेंकडा तीन टक्के जे हिंदूंचा राज्यांतून धर्माचा कामास मिळत असत ते मुसलमानांनीं चालवावे.

कासीम हा वयानें लहान होता, परंतु शहाणा, आणि मनमिळाऊ होता. वरील लढाई चालत असतां पुष्कळ हिंदुराजांस याणें आपल्या पक्षाकडे ओढून घेतलें आणि लढाई संपल्यानंतर जो हिंदु दाहिर राजाचा मुख्य प्रधान होता, तो जुन्या हक्कांस, रीतिभातींस, व कारखान्यांस वाकबगार, सबब त्याचा हातून चांगला बंदोबस्त होईल असें समजून, त्यासच याणें आपल्या प्रधानगिरीचें काम सांगितलें.

कासीम याणें कनोज शहरावर स्वारी करण्याचा बेत केला होता, असें मुसलमान ग्रंथकार वर्णन करितात; आणि या बेताप्रमाणें कासीम हा, सांप्रत उदेपुर ह्मणून जा शहरास ह्मणतात तेथें जाऊन पोंचला, असें त्या वेळचा एक प्रत्यक्ष पाहणारा इतिहासकार लिहितो; परंतु पाहूं जातां मुळीं याची फौज ६००० तींत मागाहून २००० भर पडल्यामुळें मेले गेले वजा करून सरासरी जितक्यास तितकी राहिली असेल; तशांत याणें सिंध देश नवा घेतला होता, त्यांत आपल्यामागें बंदोबस्ताकरितां यास लश्कर ठेवावें लागलें असेल; कदाचित् तेंहि नवें न ठेवून जरी याचें चाललें असलें, तरी इतक्या लहान फौजेनिशीं एवढ्या मोठ्या स्वारीचा आव याणें कसा घातला असेल तें समजत नाहीं.

हे त्याचे सर्व बेत चालले असतां, त्याचें दुर्दैव येऊन पुढें उभें राहिलें. कासीम याणें सिंधमध्यें जा पुष्कळ स्त्रियांस बंदींत घातलें, त्यांमध्यें राजा दाहिर याचा दोन मुली होत्या, त्या रूपलावण्यानें युक्त असून मोठ्या घराण्यांतल्या असें समजून, त्या आपला "अमीरिल्मोम्नीन्"[७] यांस नजर कराव्या असा त्याणें विचार केला. त्याप्रमाणें त्या दोघींस दरबारांत नेऊन जनानखान्यांत प्रविष्ट केल्या. त्यांतून वडील कन्येचा सौंदर्याविषयीं खलीफानें[८] गोष्टी ऐकिल्यावरून, तिला पाहण्याची अत्यंत उत्सुकता त्यास प्राप्त झाली होती. नंतर तिला जेव्हां खलीफासमोर आणिली, तेव्हां तिणें रडून आसवांचा पूर सोडिला, आणि शवटीं सांगितलें, कीं मला स्वदेशाहून इकडे पाठविण्यापूर्वींच कासिमानें मजवर जुलूम केला; याकरितां आतां मी आपल्या नजरेसमोर उभी राहण्यास योग्य नाहीं. तिचें सौंदर्य पाहून खलीफास दया आली, आणि आपल्या चाकरानें आपला असा अपमान केला, ह्मणून क्रोधायमान होऊन त्याचा सूड घ्यावा अशी त्या संतापाचा पहिल्या लहरींत त्याची वृत्ती फिरून, कासिमास कच्चे कातड्याचा गोणांत शिवून तसाच दमास्कस एथें पाठऊन द्यावा, असा त्याणें हुकूम केला. तो हुकूम बजावून कासिमाचें शव आल्यावर, तें त्याणें त्या राजकन्येस दाखविलें. तें पाहून तिला परमानंद झाला. नंतर तिणें खलीफास सांगितलें, कीं कासिमानें

७ महम्मदाची गादी चालविणारे जे खलीफा, त्यांस हा किताब देतात. याचा अर्थ इमानी लोकांचा सरदार असा होतो.

८ या वेळीं या वंशांतील सहावा पुरुष वालीद हा खलीफा होता.

कांहीं मजवर जुलूम केला नव्हता; तो निर्दोषी होता, परंतु त्याणें माझा बाप मारिला, व आमचा वंशच्छेद केला, त्याचा सूड उगवावयाचा होता, ह्मणून मी असें केलें; तें ऐकून खलीफा चकित झाला.

कासीम मेल्यावर मुसलमानलोकांची चाल खुंटली. त्याणें जे देश जिंकिले होते, त्यांचा कारभार त्याचा मागें तेमीमनामक सरदारास सांगितला. पुढें उम्मेयानामक खलीफांचा कुळीची समाप्ति होई पावेतों, सुमारें छत्तीस वर्षेंपर्यंत, तो प्रांत तेमिमाचा वंशाकडे राहिला. त्यानंतर कांहीं बंड होऊन सुमरे (अ॰ सुमेर) वंशाचा राजपूतलोकांनीं मुसलमानांस हांकून देऊन, त्यांणीं जो हिंदूचा देश घेतला होता, तो परत घेतला. मग पुढें ५०० वर्षेंपर्यंत हिंदूच राज्य करित होते. वरील बंड कसें झालें त्याची तफ़सीलवार हकीकत समजत नाहीं.

इ॰ स॰ ७१४ हि॰ स॰ ९६ पासून इ॰ स॰ ७५० हि॰ स॰ १२२ पर्यंत.

आरब लोकांस हांकून दिलें.

आपला धर्म प्रसृत करण्याचा व आपली सत्ता वाढविण्याचा पहिल्या भरांत आरबलोक हे मुलूतानापर्यंत आले असून, पूर्वीं जसा या लोकांनीं इराणदेश एका सपाट्यानें घेतला, तसा सर्व हिंदुस्थान देश कसा घेतला नाहीं, आणि उलटा जो प्रदेश एकदां घेतला होता, त्यांतून हिंदुलोकांनीं यांस पराजित करून कसें काढून लाविलें, या गोष्टी पाहिल्या असतां विलक्षण दिसतात. परंतु विचार करून पाहतां हिंदुस्थान व इराण यांची स्थिति सारिखी नव्हती. हिंदुस्थान ह्मणजे द्रव्याचें कोठार आहे, अशा लौकिकावरून आणि एथील लोक स्वभावानें गरीब आहेत अशा स-

मुसलमानांची हिंदुस्थानांत गति मंद कां झाली, त्याचीं कारणें.

मजुतीनें शत्रूंस या देशावर डोळा टाकायाची वासना होई; परंतु अशा लोकांस या देशांत पुष्कळ गोष्टी प्रतिकूळ होत्या. त्या योगानें त्या मदांध आरबलोकांचेहि पराक्रम थकले असावे, असें दिसतें.

इराणदेशांत धर्म आणि राजसत्ता या दोहींवर जरी मुसलमानांनीं हल्ला केला होता, तरी त्यांचें परस्परांस सहाय नव्हतें. कारण इराणी लोक हे अग्निपूजक असून, ते आपल्या उपाध्यांस तुच्छवत् मानितात. त्यांचा धर्मांत मनास आल्हादकारक अथवा उत्तेजन देणारें असें कांहीं नाहीं. दुसरें त्यांचांत ओर्मझ्द व अहिरिमान ह्मणून जे पुण्यपुरुष, व पापपुरुष आहेत, त्यांची शक्ति बहुधा समान आहे; तेव्हां आपला देव दुर्बल त्यामुळें दुष्ट भूतांची बाधा होऊं नये ह्मणून सार्वकाल प्रत्येक मनुष्याचें चित्त क्षुल्लक विधि करण्यामध्यें गुंतून राहतें. जेव्हां मुसलमानलोकांनीं आमचा परमेश्वर अत्यंत शक्तिमान् व परम दयालु आहे, असें अशा धर्मावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांस सांगितलें, तेव्हां आपल्या ओर्मझ्दाचाच जय झाला असें त्यांस वाटून त्यांणीं तो धर्म स्वीकारिला असेल.[१] इकडे एका राजाचा पराजय झाला तसें सर्व राज्यकारभाराचें गाडें बसलें; तेव्हां सहजच सर्व देश हातांत येऊन लोकहि मुसलमान झाले.

हिंदुस्थानांत पाहिलें तर धर्मोपदेशकांचें (ह्मणजे ब्राह्मणांचें,) बलाढ्य वृंद; त्यांचा राजसत्ताधीशांशीं निकट संबंध; लोकांमध्यें त्यांची मानप्रतिष्ठा मोठी; हिंदूंचें धर्मजाल

१ पूर्वी तसें असेल तर असो, सांप्रत केवळ तसें आहे असें ह्मणवत नाहीं. भा० क०

तर लोकांचे कायदे व त्यांचा रीतिभाती यांस वेष्टून राहिलेलें, त्यामुळें त्यांचा प्रत्येक विचारांत धर्माचा अंश नाहींसा नाहींच; त्यांतून स्थित्यंतर झटलें ह्मणजे जसें कांहीं यांला कोणी खाळेंच, असा त्याचा त्रास आणि स्वतः उद्योग करण्याचें धारिष्ठ नाहीं, परंतु दुसऱ्या शत्रूनें मोठ्या निकरानें जरी यांवर हल्ला केला, तरी त्याला पडून आड येण्याविषयीं यांचें मोठें शौर्य; या सर्व कारणांमुळें त्या शत्रूची सहजच प्रथमची उमेद खचे. तशाच हिंदुलोकांमध्यें फळ्या पडलेल्या असल्यामुळें त्यांचा तोटा व्हावा, तोहि उलटा फायदाच होई. एक राजा पडला, तर त्याचामागें दुसरा राजा तयार आहेच. उलटा त्या दुसऱ्या राजाचा प्रतिस्पर्धी मेल्यामुळें त्यास एक शत्रु नाहींसा होई. तेणेंकरून असें होई कीं कोणी परदेशांतील शत्रु आला, तर त्याची दिवसेंदिवस फौज कमी होत जाई, आणि जसजसा तो पुढें जाई, तस तसा त्याचा देश लांब राहिल्यामुळें कुमक लांब राही; आणि पुष्कळ राजे असल्यामुळें एका लढाईनें त्याचें कार्य होत नसे.

जे मुसलमानलोक प्रथम हिंदुस्थानांत आले, त्यांणीं या सर्व वरील गोष्टींचा किती विचार केला असेल तो असो; तथापि ज्याला या देशाचा प्राचीन इतिहासाचा शोध लावणें असेल, त्याणें यांजकडे पूर्ण लक्ष लाविलें पाहिजे. कारण वरील गोष्टींमुळेंच मुसलमानलोकांचा धर्म हिंदुस्थानांत लवकर पसरला नाहीं, आणि जरी पुढें चालू झाला, तरी एथील मुसलमानलोक हे वृत्तीनें सौम्य होऊन त्यांचामध्यें इतर मुसलमानलोकांसारिखा आपल्या धर्माविषयीं हट्टाग्रह नाहींसा झाला.

पुढें मुसलमानांची बढती लवकर न होण्यास दुसरींहि कारणें जमत चाललीं. एक तर त्यांचा सरकाराची दानत फिरली; दुसरें त्यांचे खलीफा हे पूर्वी मोठे उत्सुक धर्मोपदेशक असत; ते तो वेश सोडून मोठे कारस्तानी राजे बनले, आणि आपला धर्म प्रसृत करायाची तजवीज सोडून आपल्या कुळाचें वैभव कसें वाढेल याकडे विशेष लक्ष देऊं लागले. असें झाल्यामुळें प्रथम जो त्यांचा जंगली शिपाइगिरीचा बाणा होता, तो सुटला आणि ते मोठे डौलदार व आयिषारामी राजे झाले.

प्रथम त्यांस लढाई करून जय मिळविला ह्मणजे आनंद होत असे; पुढें विषयभोग व त्यापासून होणारे जे आनंद त्यांची त्यांस गोडी लागली. याविषयीं एक गोष्ट सांगतों. महम्मदामागून उमरनामक दुसरा खलीफा झाला; त्याची फौज यरूसलेम् शहराजवळ होती, तेथें तो जेव्हां जावयास निघाला, तेव्हां तो आपलीं हत्यारें व शिधासामान आपल्या बसायाचा उंटावर घेऊन गेला. त्याचा मागून ओसमाननामक खलीफा झाला. तो आपलें नित्याचें काम संपलें ह्मणजे स्वतांचा ख्यालीखुशालीसाठीं सरकारी तेल खर्च होऊं नये, ह्मणून आपला दिवा स्वतः मालवित असे, असें वर्णन आहे. असें असून तोच ओसमान मेल्यापासून शंभर वर्षें झालीं नाहीं, तंव अल्महदीनामक खलीफा झाला. त्याला फकत बर्फ बराबर नेण्याकरितां ५०० उंट लागूं लागले. पुढें अबीसैद वंशाचे खलीफा झाले, ते फारच उधळे निघाले. ते असे कीं त्यांतून एकाचा एक दिवसाचा खर्चानें, मूळ पहिल्या चारहि खलीफांचा सर्व उमरींमधील खर्च भागला असता. याप्र-

माणेंच व्युत्पत्ति, तत्वविचार, इत्यादिकांविषयींहि त्यांचा समज फिरून गेला. पूर्वीं उमर या **ख**लीफानें **आलेक्सांड्रिया**शहरांतील पुस्तकालय भाजून टाकिलें, अशी कथा आहे. त्याचे मुसलमानांमध्यें **अल् मामुन** याणें सर्व युनानी तत्ववेत्त्यांचा ग्रंथांचें भाषांतर केलें. यावरून मुसलमानांची पहिली वृत्ति, किती फिरली हें उघड होईल. याप्रमाणें गोष्टी घडून येऊं लागल्यामुळें **आर**बलोकांचें पूर्वेकडील राज्य नाहींसें झालें. **आर**बांची सदी संपल्यावर, त्यांमागून दुसरे लोक **हिंदुस्थानांत** स्वाऱ्या करूं लागले. त्यांचा वर्णनास आतां आरंभ करितों.

तातारलोक इ०स० ६५१ हि० स० ३१

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें **आरबांनीं इराण** घेतल्यावर त्यांचें राज्य वक्षूनदीपर्यंत वाढलें. त्या नदीपलीकडील प्रदेशास ते **मावरुल्न्नहर**, (ह्मणजे नदीपलीकडील प्रांत) असें ह्मणत असत. त्यास युरोपियन् लोक **ट्रान्स आक्सियाना** ह्मणतात. या देशाचा उत्तरेस **यक्षू**नदी, पश्चिमेस **क्यास्पियन्**समुद्र, आणि पूर्वेस **इमौस्**पर्वत, याप्रमाणें आहेत. या प्रदेशाचा पुष्कळ भाग ओसाड आहे, व कांहीं मोठा सुपीक आहे. हा देश जा वेळीं **आर**बलोकांचा ताब्यांत होता, तेव्हां पृथ्वींतील अति सुपीक देशांप्रमाणें या देशांत पैदास्त असे. त्या वेळीं या देशांतील वस्ती कांहीं स्थाईक, व कांहीं फिरते मेंढराख्यांची अशी असे. स्थाईक लोक बहुतकरून **इराणी** होते व फिरते लोक बहुधा **तातार** होते. याचप्रमाणें या देशाची सांप्रतहि स्थिति आहे. बहुधा फार प्राचीन काळापासून या देशांतील वसाहतहि अशीच होती, असा संभव दिसतो.

मावरुल्नहरभांतांतील तातारलोक हे पुढें मोठे विख्यात झाले, आणि आसपासचा देशांत, व हिंदुस्थानांत, यांणीं पुष्कळ खेळ केला; याकारणास्तव हे लोक कोठून निर्माण झाले, व पूर्वी यांची स्थिति कशी होती, याचा कांहींसा शोध लावण्याची उत्कंठा प्राप्त होत्ये; परंतु हा शोध लावण्यास मध्यें पुष्कळ अडचणी येतात. तुर्की, मोगल व मांचू, या तिन्ही लोकांस आपण तातारलोक असें ह्मणतों. परंतु या प्रत्येक लोकाची भाषा निराळी आहे; व सांप्रत आणखीहि दुसऱ्या गोष्टींवरून त्यांस परस्परांपासून ओळखतां येतात. तथापि त्या सर्व लोकांचा शरीराकृतींत व रीतिभातींत कांहींसा सारखेपणा आहे; व युनानी आणि संस्कृत भाषा जशा परस्परांपासून भिन्न आहेत, तथापि एकाच मूलभाषेपासून उत्पन्न झाल्याशा दिसतात, त्याचप्रमाणें यांचाहि भाषा भिन्न आहेत, परंतु त्यांस एकाच कुटुंबाचें वळण आहे असें दिसतें. त्यामुळें कोणी दुरून पाहूं लागल्यास त्या लोकांस परस्परांपासून ओळखणें कठीण पडतें; तेव्हां या तीन जातींतून कोणत्या जातीपासून वरील तातारलोकांची उत्पत्ति झाली? जर हल्लींचा वस्तीवरून कांहीं धोरण बांधावें. तर त्याचाहि मेळ मिळत नाहीं. कारण सांप्रत मांचू हे पूर्वेस, मोगल हे मध्यभागीं, व तुर्की हे पश्चिमेस, याप्रमाणें आहेत. परंतु पूर्वी मोगल हे कांहींसे पश्चिमेस होते, व तुर्की मध्यभागीं होते; अशी बराबरइतिहासाची माहिती लागूं लागली; त्या वेळापासून हल्लींपर्यंत त्या दोहोंची स्थिति बदलली आहे. तेव्हां त्यापूर्वी हे कोठें होते, हें कांहीं सांगवत नाहीं. आपल्या कळपांस चरण्यास नवीं कुरणें पाहण्याकरितां, अथवा हवा बदलण्याकरितां, आरबलोक व

एशियाखंडाच्या दक्षिणेकडील दुसरे फिरते लोक लांब प्रवासास जातात. परंतु प्रत्येकाचें एक मूळचें ठिकाण असतें; तें आपलें असें ते मानितात. यांतील कांहीं लोक कदाचित् मूळचाच ठिकाणीं अद्यापिहि असतील. तातारलोकांची स्थिति अशी नव्हती. यांचे निरनिराळे जमाव अथवा टोळ्या असत, व निरनिराळीं राज्येंहि असत. त्यांत जा टोळीचें प्रमुखत्व असे, तिजवरून त्या राज्याचें नाव पडे. कालेंकरून त्या टोळीचें प्राबल्य मोडलें, आणि दुसऱ्या टोळीनें येऊन तीस हरविलें, ह्मणजे तें राज्य बदले, व त्याबराबर सर्व जमावाचें नावहि बदले. याप्रमाणें या लोकांचा टोळ्या कधीं आपआपल्या मुलुकांतून फिरत, आणि कधीं दुसऱ्यांचीं राज्यें घेण्याकरितां इकडून तिकडे व तिकडून इकडे जात असत. आज यांणीं दुसऱ्यांस जिंकून घालविलें, व उद्यां दुसऱ्यांनीं येऊन यांचा मुलुक घेतला असें होई. तेव्हां आज एक टोळी वोल्गानदीचा कांठीं असे, तीच उद्यां चीनचा उत्तरतटावर जाऊन बसे; आणि जी टोळी प्रथम आल्तैपर्वताचा एका लहानशा खोऱ्यांत राहत असे, ती थोडक्याच वर्षांत सगळ्या तातारदेशांत प्राईनाशी होई.

याप्रमाणें या लोकांची स्थिति असे. असंख्य मुंग्यांचा वारुळामध्यें जसे एका मुंगीचे व्यापार बराबर समजत नाहींत, त्याचप्रमाणें या तातारलोकांचा टोळ्यांचा शोध पाहूं जातां वरील गोंधळांमुळें लागत नाहीं.

सांप्रतचे तुर्कीलोक हे इतर तातारलोकांपेक्षां अधिक गोरे आहेत, व यांचा रीतिभातीहि अधिक सुधारलेल्या आहेत. तसाच यांचा चेहेराहि विशेष तातारी नाहीं; परंतु या गुणांवरून जर यांस ओळखावें, तर पश्चिमेक-

डील दुसऱ्या लोकांशीं यांचा विशेष सहवास झाल्यामुळें, व त्यांत हे विशेष मिसळल्यामुळें हे गुण यांचा अंगीं आले असतील असें वाटतें; आणि पूर्वींचा काळीं दुसऱ्या जातीचे तातारलोक जर यांचा ठिकाणीं पश्चिमेकडील देशांत राहत असले, तर तेहि कदाचित् यांसारिखे कशावरून तेव्हां नसतील? परंतु याविषयीं कांहीं निश्चय सांगवत नाहीं.

सांप्रत मावरुल्नहर्‌परगण्यांत उझबेगलोक राज्य करिताहेत ते; तसेंच वक्षू नदीचा कांठीं, व एशिया मैनर प्रांतांत तुर्कमान लोक आहेत; तसेंच इराणाचा उत्तरेकडील फिरत्या लोकांचे जमाव, आणि इस्तंबूलचे तुर्की लोक, हे सर्व तुर्की जातीचे तातारलोक आहेत. तसेंच तैमूरलंगाचा फौजेंतील बहुतेक लोक तुर्की होते. त्याचप्रमाणें जेंगीझ्[1]खान याची बहुतेक फौज, व त्याचा टोळीचे सत्ताधारी हे मोगल होते; आणि सांप्रत चीनदेशांत जे तातारवंशाचे राजे राज्य करित आहेत ते, व चीनाजवळील तातारदेशांतील लोक, हे मांचू जातीचे तातार आहेत. या वर्णनावरून पूर्वीं सांगितलेल्या जातींची निवड करायास कांहींसें सुलभ पडतें.

ख्रिस्ती शकापूर्वीं पुष्कळ वर्षांवर तुर्की लोकांची मावरुल्नहर्‌प्रांतांत वस्ती झाली होती. त्यानंतर पुष्कळ मोगलांचा वसाहती झाल्या, व मोगलाई लश्करें येऊन गेलीं; तथापि त्या लोकांचें ठाणें सुटलें नाहीं. शेवटीं त्या देशांत आरबलोकांची स्वारी होण्याचा सुमारास, बहुतेक फिरती व कांहीं स्थाईक अशी त्या लोकांची वस्ती होती, असें सर्व

मावरुल्नहरमध्यें तुर्कीलोकांची वसाहत.

१० याचा मूळ उच्चार चेंगीझखान असा आहे. (भा० क०)

गोष्टींचा विचार करून पाहिला असतां अनुमान होतें.

आतां **आरब**लोकांचें वरील प्रांतांत प्रथम येणें झालें, तेव्हां जा कुळांतील तुर्की राजे राज्य करित होते, त्या कुळांतील पुरुष नवथर आलेले होते; व त्या लोकांनीं दुसऱ्या एका जमातीशीं मिलाफ केला होता; ती जमात शंभर वर्षांपूर्वीं **इराणाचा** बादशाहास खंडणी देत असे. पुढें **क्यास्पियन** समुद्र व **वक्षू** नदी यांपासून **बैकल** सरोवर व **सिबीरिया** प्रांतांतील **येनिसी**नदीचीं मुखें यांपर्यंत, त्यांणीं आपलें राज्य वाढविलें होतें. परंतु तें थोडक्याच काळांत नष्ट झालें; आणि पुढें **मुसलमान**लोक येण्याचा सुमारास त्यांमध्यें पुष्कळ फळ्या पडून, ते **चीन**देशास खंडणी देऊं लागले होते. याप्रमाणें **मावरुलूनहर**प्रांताची हकीकत होती.

मावरुलूनहर प्रांत आरबलोकांनीं घेतला इ० स० ७०६-७१२ हि० स० ८७-९३

पुढें वर सांगितल्याप्रमाणें **आरबांनीं इराण** देश घेतल्यावर पंचावन्न वर्षांनीं, व **सिंध** घेतल्यापूर्वीं पांच वर्षांवर **खतीब**नामक **खुरासान**चा सुभेदार हा एक **आरबांचें** लश्कर बराबर घेऊन **वक्षूनदी** उतरला, आणि **बल्क** शहरासमोर **हिस्सार** म्हणून शहर आहे, तें घेता झाला. पुढें आणखी सहा वर्षांत **समरकंद** व **बुखारा** हीं याणें घेतलीं; **वक्षूनदीचा** उत्तरेकडील प्रदेश उद्ध्वस्त केला; आणि **आरल्सरोवराचा** कांठचें **खारिझमचें** राज्य जिंकून मिळविलें. या सरदाराबरोबर तुर्की लोक खूब लढले, आणि कांहीं वेळपावेतों कोणाचा जय होतो याविषयीं अंदेशाच दिसत होता; परंतु शेवटीं तुर्की लोकास हटवून **खतिबानें फरघाण**प्रांत घेतला, व आपलें राज्य **वक्षूनदी** व **इमौसपर्वत** यांपर्यंत वाढविलें.

इ० स० ७१३ हि० स० ९४

त्याच वर्षी मुसलमानांनीं स्पेनदेश घेतला; तेव्हां मुसलमानी राज्याचा कळस झाला. त्यापूर्वींच त्यांचा राज्याचा इमारतीस आंतून वाळवी लागली होती, त्यावरून ती लवकरच पडेल असें भविष्य दिसूं लागलें होतें.

हिजरी शकाचा पहिल्या शतकार्धांतच ओसमान खलीफाचा खून झाला. पुढें खलीफा अली याचा अंगीं पाणी नाहींसें पाहून लोकांनीं तुफान करून आर्बस्ताना बाहेरील खलीफास गादी मिळवून दिली. या बंडामुळें उम्मेयाचा वंशास खलीफापणा मिळाला; त्याच्या त्यांचा वंशजांनीं ९० वर्षे उपभोग घेतला. परंतु इतक्या मुदतींत पैगंबराची मुलगी फतिमा इचा वंशाच्या या अधिकारावर हक्क आहे, या मिषानें पुष्कळ बंडें व कज्जे होऊन राज्यांत धुमाळी होत चालली. शेवटीं इ० स० ७५० मध्यें खुरासानांत बंड झालें, तेव्हां त्या उम्मेयाचा वंशाची सत्ता नाहींशी होऊन, पैगंबराचा चुलता अब्बास याचा वंशजांस राज्य मिळालें. स्पेनदेशांतील लोक जुन्या वंशांतील खलीफाचा पक्ष धरून राहिले, त्यामुळें पुढें हें राज्य एकछत्री असें कधींहि झालें नाहीं.

इ०स० ६५८
हि० स० ३८

---

# प्रकरण दुसरें.

## खलीफांचें राज्य मोडल्यानंतर राजे झाले त्यांचीं वर्तमानें.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें **अब्बास** याचा वंशास गादी मिळाल्यानंतर **हरूनउर्रसीद** नामक त्या कुळी-
इ० स० ८१६ हि० स० १९० च्या पांचवा **खलीफा** राज्य करित असतां **माव-रुलूनहर**प्रांतांत बंड झालें, तें कांहीं केल्यानें मोडेना; तेव्हां **खलीफानें** स्वतः स्वारी केली. शेवटीं **खलीफा**च्या पुत्र **मामून** याणें तें बंड मोडिलें. परंतु या स्वारींत जी **हरून** यास इजा झाली त्यामुळें तो पुढें लवकर मरण पावला. **हरूनाचा** कारकीर्दीत **मामून** हा **खुरासानांत** स्वतः राहून तेथील कारभार पाहत असे, त्यामुळें तो प्रांत **खलीफांचा** ताब्यांत राहिला होता. पुढें **हरून** वारल्यावर **मामून** याणें **खुरासानांत** बंड करून आपला भाऊ **अमीन** याजपासून **खलीफाची** गादी हिसकून घेतली. **मामून** याणें आपली राजधानी **बगदादेस** नेली. यास एवढी पदवी मिळण्यास **ताहीर**नामक सरदाराची मुख्य मदत होती; परंतु **मामून बगदादेस** गेल्यावर **ताहीर** हा **खुरासानांत** आपली
इ० स० ८२० हि० स० २०५ सत्ता चालवूं लागला, आणि लवकरच स्वतंत्र झाला, त्यामुळें **खुरासान** व **मावरुलूनहर**, हे प्रांत **खलीफांचा** राज्यांतून सुटले, ते पुनः त्यांस कधीं मिळाले नाहींत. कालेंकरून जवळचा **तुर्की** लश्कराचें प्राबल्य वाढून **खलीफा** हे सोंगासारिखे नामधारी राहिले,

तेव्हांपासून **आरबी** राज्याची समाप्ति झाली, इ० स० ८६१
असें ह्मटलें असतां चालेल. हि० स० २४७

**ताहीराचा** वंशजांनीं पन्नास वर्षांवर स्वस्थपणें फार-
शी धामधुम नकरितां राज्य केलें. पुढें **सुफरी** ताहीरीराजे
वंशाचा राजांनीं यांची समाप्ति केली. या वं- इ० स० ८२०
शाचा मूळपुरुष **लीथ्**; त्याचा मुलगा **याकूब** हा पासून ८७०
**सिस्तान**प्रांतांत पितळेचें काम करित असे. पुढें पर्यंत.
त्याणें **सिस्तानांत** बंड केलें, आणि क्रमेंकरून इ० स० ८७२
सर्व **इराणदेश** लुटून फस्त केला. पुढें **बगदादेस** हि० स० २५९
**खलीफावर** चढून जात असतां तो मरण पावला. सुफरी राजे
त्याचा भाऊ **उमर** यास **समानी** राजांनीं जिंकून इ० स० ८७२
कैद केलें, तेव्हांपासून या वंशाचें वैभव संपलें. पासून ९०३
परंतु या कुळांतील धाकटे घराण्यातला एक पुरु- पर्यंत.
ष, बाकी सर्व राज्य गेल्यावर, **सिस्तानांत** आप- इ० स० ९०३
ला अधिकार चालवित होता. हि० स० २९०

**सुफरी** वंशाची कारकीर्द एकंदर चाळीस वर्षांवर
चालली नाहीं, तथापि **सिस्तानप्रांतांतील** लोकांस यांचा
विसर पडला नव्हता असें दिसतें. कारण सुमारें
पन्नास वर्षांनंतर **सुफरी** वंशाचा एका पुरुषानें इ० स० ९६४
**सिस्तानांत** स्वतंत्र गादी स्थापिली. शेवटीं हि० स० ३५३
**सुल्तान महमूद गजनवी** याणें या राज्याची समाप्ति
केली. यावरून पहिला वंश राज्यभ्रष्ट झाल्या-
वर या वंशाचें नाव १०० वर्षांहून जास्त राहि- इ० स० १००६
लें होतें. हि० स० ३९६

पुढें **समानी** वंशाचे राजे झाले. यांणीं १२० वर्षां-

चे राजे इ०स०८९२पासून ९९९ पर्यंत.

स्वाऱ्या केल्या नाहीत; परंतु हिंदुस्थानाचा इतिहासाशीं पूर्वींचा राजांपेक्षां यांचा संबंध जवळ आहे, असें पुढें दिसून येईल. या वंशांतील कोणी पुरुषापासून, अथवा बुखारा किंवा बल्क या प्रांतांतील एकाद्या गांवावरून यांचें नाव समानी हें पडलें असावें; परंतु त्याविषयीं निश्चय सांगवत नाहीं. यांचा कुळांतील प्रथम जा पुरुषाचें इतिहासांत वर्णन आहे, तो मूळचा संभावित गृहस्थ होता. पुढें खलीफा मामून हा खुरासानांत राहत असतां, त्याची याजवर मेहेरबानीची नजर होऊन, त्याणें याचा तीन मुलांस वक्षूनदीपलीकडे सुभे दिले, व एकास हिरातचा कारभार सांगितला. हीं कामें ताहीरी राजांचा कारकीर्दीत याजकडे चाललीं.

इ०स०८१७ तागाईत८२०
हि०स०२०२ तागाईत २०५.

ताहीरी वंशाचा मोड झाल्यावर, याकूब लीथ् मरेपावेतों मावरुन्नहर्प्रांत यांचा ताब्यांत राहिला. नंतर बहुधा आपल्या तुर्की रयतेचा मदतीनें मोठी घोडेस्वारांची फौज जमाकरून, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें उमर लीथ् यास यांणीं कैद केलें, आणि त्याणें जिंकिलेला सर्व देश हस्तगत करून घेतला. त्याचा कारभार हे स्वतंत्रतेनें करीत, परंतु खलीफाचें नावमात्र लावित असत.

इ०स०९०० हि०स०२८७

क्यास्पियन्समुद्रांत मच्छीमारी धंदा करणारा असा एक कोळी माझंदरानप्रांतांत राहत असे; त्याचा कुळीस बूया म्हणत; किंवा जा परगण्यांत तो राहत असे, त्याचा नावावरून कधीं दीलमी असेंहि म्हणत. माझंदरानप्रांताचा व इराणाचा म-

बूये म्हणजे दीलमी लोक



च उंच पर्वत आहेत, त्यामुळें या दोहों देशांमध्यें फारसा संबंध नसे; आणि या देशासभोंवतीं मोठीं अरण्यें आहेत, व एथील हवा खराब आहे, यामुळें हा प्रांत कोणाचा हातीं पुरा लागला नव्हता. तसाच एथें मुसलमानी धर्म कधींहि सर्वत्र पसरला नाहीं. या प्रांतांत हमेशा बंडें होत; अग्निपूजक फारसीलोक हेहि बहुधा हा प्रदेश बळकावून बसत; आणि सार्वकाल अंदाधुंदी असे; त्या योगानें दीलमी लोकांचें साधून, त्यांचा भरभराट झाला. मग जसें अवसान आलें, तसें त्यांणीं इराणाचा पश्चिमेकडील प्रांत समानी राजांपासून हिसकले; खलीफाची राजधानी बगदाद ही बळकाविली; आणि खलीफालाहि पकडला. याप्रमाणें मोठें राज्य मिळवून तें यांणीं खलीफाचा नावानें १०० वर्षांवर चालविलें.

इ० स० ९३२ नागाईन १०५५ हि० स० ३२१ नागाईन ४४८.

वर सांगितल्याप्रमाणें दीलमी लोकांनीं कांहीं मुलूक घेतल्यावर, खुरासान व मावरूलनहर हे दोन प्रांत समानी राजांकडे राहिले. या समानी राजांपासून गजनवी वंशाचे राजे झाले; त्यांणीं पुढें हिंदुस्थानांत मुसलमानी राज्याचा पाया घातला.

अब्दुल् मलिक्नामक समानी वंशाचा पांचवा राजा राज्य करित असतां, त्याजवळ अल्पतगीन नावाचा तुर्की गुलाम होता. त्याचें, मुळचें काम उड्या मारून, व गारूड विद्या करून, बादशाहास खुश करावें, असें होतें. त्या काळीं गुलाम लोकांस भरवशाचीं कामेंहि सांगत असत; तशांत अल्पतगीन हा शहाणा, शूर, व सचोटीचा मनुष्य होता; यामुळें हा एकदां कारभारांत पडल्यावर याची बढती होत होत,

गजनवी वंशाचा मूळपुरुष अलप्तगीन.



कालेंकरून खुरासानची सुभेदारी यास मिळाली. पुढें अब्दुल् मलिक् वारला, तेव्हां त्याचा कुटुंबापैकीं कोणाला गादीवर बसवावें, याची विवंचना पडली; दरबारचा दुसऱ्या उमराव लोकांनीं मनसूर याची योजना केली होती; परंतु अल्पगीन यास विचारावयास गेले, तेव्हां याणें मनसूराचा विरुद्ध आपला अभिप्राय दिला. त्यामुळें मनसूर याची अवकृपा होऊन, त्याणें राज्यावर येतांच अल्पगीनाकडून सुभ्याचें काम काढिलें. पुढें अल्पगीनास कैद करण्याविषयीं, व साधल्यास मारून टाकण्याविषयींहि शत्रूंनीं पुष्कळ इलाज केला; परंतु हा लढाऊ कामांत हुशार, त्यामुळें मोठ्या चतुराईनें आपल्या शत्रूंतून सुटून, आपली थोडीशी विश्वासू फौज होती ती बराबर घेऊन निघाला, तो सुलेमानपर्वताचा मध्यभागीं गजनीस आला, आणि एथें आपणास कोणाची भीति नाहीं असें पाहून तेथें राहिला. पुढें अल्पगीनाचा जाग्यावर राजानें दुसरा सुभेदार नेमला. त्याचा हुकुमांत बल्क, हिरात, व सिस्तान, हे प्रांतसुद्धां सपाट प्रदेश एवढामात्र राहिला; परंतु या देशाचा व सिंधुनदाचा मधील कडव्या प्रांतानें समानी राजास धूर दिला; आणि त्यांणीं जे हल्ले केले, ते सर्व हटविले. हा सर्वच प्रांत अल्पगीनाचा ताब्यांत नव्हता; तथापि याला स्वतंत्र होण्यास त्या सर्व प्रांतांतील लोकांची मदत होती. जेव्हां अल्पगीन गजनीकडे पळून आला, तेव्हां याजबरोबर ३००० कवाईत शिकलेले ममलूक (ह्मणजे गुलाम) होते, असें एक इतिहासकार ह्मणतो. हे लोक याचाच सारिखे मूळचे तुर्की गुलाम होते. या-

इ०स०९६१
हि०स०
३५०

अल्पगीनाचें बंड.

शिवाय पूर्वीं हा सुभेदार असतां, जा लोकांनीं याचा हाताखालीं चाकरी केली होती, त्यांतूनहि लोक वेळोवेळीं याजवळ येऊन राहिले असतील, असें दिसतें; परंतु हा जा देशांत येऊन राहिला होता, तेथीलच बहुतेक फौज याणें ठेविली होती, असें संभवतें. कारण त्या प्रांतांत जेथें शेतीभाती होत असे, तेथील लोकहि लढाऊ असत; दुसरे पहाडी अफगाणलोक हे कांहीं याचा ताब्यांतील असत, व कांहीं पगाराचा आशेनें यास मिळावयाजोगे असत. असें असून, अलप्तगीनानें आपला मुलुक वाढविण्याचा उद्योग केला नाहीं; आणि स्वतंत्र झाल्यापासून चौदा वर्षांआंत तो मृत्यु पावला. इ० स० ९७६ हि० स० ३७५.

अलप्तगीनाजवळ **सबक्तगीन** ह्मणून गुलाम होता. त्यास प्रथम तुर्कस्तानांतून कोणी सावकारानें आणिला होता, त्यापासून अलप्तगीनानें विकत घेतला. पुढें त्याजवर भरवसा पडून अलप्तगीनानें त्यास वाढविलें; शेवटीं अलप्तगीनाचा मरणसमयीं सर्व राज्यकारभार पाहणें याजकडे आलें होतें, आणि पुढें क्रमेंकरून यास गादीहि मिळाली. सबक्तगीन.

अलप्तगीनानें सबक्तगीनास आपली मुलगी देऊन आपल्यामागें यास गादीचा वारीस ठरविला, असें बहुतेक ग्रंथकार सांगतात. कांहीं सबक्तगीन हा अलप्तगीनामागून लागलाच गादीवर बसला, असें वर्णन करितात; परंतु पूर्वीं लग्न झालें, याविषयीं कांहीं लिहित नाहींत.

फिरिस्ता ह्मणून एक इराणी इतिहासकार फार वर्षे हिंदुस्थानांत राहिला होता. त्याणें इसवी सनाचा सोळाव्या शतकाचा अखेरीस, तेथपर्यंत झालेल्या सर्व मुसलमान रा-

जांचा वृत्तान्त लिहिला आहे; त्यांत सबक्तगीनाविषयीं लिहिलें आहे. तो प्रकार असाः—अलप्तगीन हा इ० स० ९७५ ह्मणजे हि० स० ३६५ त मेला. त्याचामागें त्याचा मुलगा इसाक होता; त्यास बराबर घेऊन सबक्तगीन बुखाऱ्यास गेला. तेथें समानी वंशाचा मनसूर राजानें इसाकास गजनीचा सुभेदारीचीं, व सबक्तगीनास त्याचा दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. पुढें इ० स० ९७७ ह्मणजे हि० स० ३६७ त इसाक मरण पावला; तेव्हां त्याचा मागें सबक्तगीनास तो अधिकार मिळाला. नंतर त्याणें अलप्तगीनाचा मुलीशीं लग्न केलें. सबक्तगीन गादीवर बसला नाहीं, तंव त्याला राज्याचा संरक्षणार्थ कमर बांधणें प्राप्त झालें.[1]

आपल्या नजीक गजनीस मुसलमानी राज्य झालें, असें पाहून सिंधुनदकांठचा हिंदुलोकांस सहजच काळजी उत्पन्न झाली. तशांत वारंवार देश लुटण्याकरितां मुसलमानलोक स्वाऱ्या करीत, तेणेंकरून हिंदुलोक त्रासून गेले. शेवटीं गजनीचा जवळ हिंदूंचें राज्य लाहोरचें होतें; तेथील राजा जयपाळ याणें मुसलमानांवर स्वारी करण्याचा निश्चय केला; आणि मोठी फौज तयार करून, पेशावरापासून काबुलापर्यंत जी खिंड आहे, तिचा तोंडावर लघमाणांत जाऊन तेथें डेरे दिले. तेथें सबक्तगीन त्यास आडवा आला. पुढें दोन्ही लष्करें उभीं राहिलीं, आणि युद्धास आरंभ करण्याची चांगली संधि पाहूं लागलीं, इतक्यांत प्रचंड वारा सुटला, पाऊस पडूं लागला, विजा कडाडूं लागल्या; तेणेंकरून हिंदुलोक भिजून सहजच

लाहोरचा राजा जयपाळ याची स्वारी.

(१) यापुढें बहुधा फिरिस्ता या ग्रंथकाराचा इतिहासावरून एथें वर्णन केलें आहे.

विशेष थंडावले, आणि हा आपणावर कांहीं ईश्वरी क्षोभ आहे असें त्यांस वाटून, ते विरस झाले. असें पाहून जयपाळानें तहाचें बोलणें लाविलें. तें ऐकण्याची प्रथम सबक्तगीनाची मर्जी नव्हती; परंतु हिंदुलोक एकदां निराश झाले, ह्मणजे पुढें काय करितील तें नकळे, हें जेव्हां त्याला जवळच्यांनीं नीट समजाविलें, तेव्हां तो कबूल झाला. मग जयपाळानें पन्नास हत्ती दिले, आणि दुसरें पुष्कळ द्रव्य देण्याचें कबूल केल्यावर तो माघारा गेला.

त्या स्थानीं सबक्तगीन जिंकला.

परत स्वदेशीं आल्यावर आतां आपणास कोणाचें भय नाहीं असें पाहून जयपाळानें रुपये देत नाहीं ह्मणुन सांगितलें, आणि जे मागणेकरी आले होते, त्यांस बंदीखान्यांत घातलें.

याप्रमाणें जयपाळानें आपला अपमान केला, व स्वतांचा शब्द मोडिला, असें पाहून सबक्तगीनानें पुनः फौज तयार केली; आणि आपण सिंधुनदाकडे निघाला. इकडे जयपाळ हा दिल्ली, अजमीर, कालिंजर, व कनोज, एथील राजांस मदतीस बलावून १,००,०००. घोडेस्वार, व शिवाय अतिशय पायदळ इतकें सैन्य घेऊन लघमाणांत गेला. आपल्या शत्रूंच्या अजमास करण्याकरितां सबक्तगीन हा एका टेंकडीवर चढला, आणि पाहतो तंव सगळा तळ हिंदूंचा असंख्यसेनेनें भरला आहे. असें असतां, तो मनांत अगदीं दचकला नाहीं; आणि आपले लोक शूर व लढाईच्या कामांत वाकिफ आहेत यावर भरवसा ठेऊन, आज आपण जयश्री मिळवूं, अशा संकल्पानें त्याणें युद्ध आरंभिलें. सबक्तगीनानें हिंदूंच्या सेनेच्या एक भाग लक्षून त्या

वर घोडेस्वारांचा भडमार केला, त्यामुळें कांहीं वेळानें तेथील लोक डळमळूं लागले; असें पाहून सर्व लश्करावर एकदम हल्ला करावयाचा त्याणें हुकूम दिला. तसें होतांच हिंदुलोक हटून पळत सुटले. त्यांचामागून मुसलमानांनीं सिंधुनदापर्यंत पाठलाग करून मोठी भयंकर कतल केली. सबक्तगीनास हिंदूंचा छावणींत भरपूर लूट सांपडली. शिवाय त्याणें आसपासचा देशांचा राजांपासून भारी खंडण्या वसूल केल्या; सिंधुनदापर्यंत सर्व देश ताब्यांत घेतला; आणि पेशावर एथें १०,००० घोडेस्वारांनिशीं एका सरदारास आपला सुभेदार नेमून ठेवून तो स्वदेशास माघारा गेला.

इतकें होत आहे, तंव लघमाण परगण्यांतील आफगाण व खिल्जी लोक त्यास शरण आले, व त्याचा हुकूम कबूल करूं लागले; तेणेंकरून त्यास आपल्या लश्करांत नवीन चांगले लोक ठेवण्यास पुष्कळ मिळूं लागले.

याप्रमाणें सबक्तगीनाचें राज्य वाढलें. तें पश्चिमेस कंदहारचा पलीकडे गेलें. वरील स्वाऱ्यांनंतर त्या राज्याचा बंदोबस्त करण्याचा कामास सबक्तगीन लागला. इतक्यांत त्याचा नामधारी राजावर संकट येऊन पडलें; तेव्हां त्याणें यास बलावणें पाठविलें. त्या वेळीं त्याचा पक्ष उ-

(२) खिल्जी अथवा खल्जी ही एक तातारलोकांची जात आहे. इसवी सनाचा दहाव्या शतकांत यांतील कांहीं लोक वक्षू नदीचा उगमाजवळचा प्रदेशांत होते; व कांहीं सिस्तान व हिंदुस्थान यांमधील अफगाण लोकांचा मुलुकांत पुष्कळ वर्षें वसाहत करून राहिले होते. त्या वेळीं ते तुर्की भाषा बोलत. पूर्वींपासून ते अफगाणलोकांत अगदीं मिसळून गेलें होते असें दिसतें. यामुळें बहुधा खिल्जी व अफगाण हे लोक एकच असें समजूं लागले आहेत.

चालून याणें लागलेंच धावणें घेतलें. त्यांत याला आपलें घर भरावयाची संधि सांपडली. तो प्रकार असाः—

समानी वंशांतील नुः अथवा नोहानामक सातवा राजा राज्य करित असतां, इमौसपर्वताप- लीकडील चीनदेशापावेतों बहुतेक तातारदेश हा हैके तातार लोकांचा ताब्यांत होता. त्यांचा सरदार बोग्रा खान याणें नोहा राजावर स्वारी केली, आणि युद्ध करून त्यास बुखाराप्रांतांतून घालविलें; तेव्हां नोहा यास वक्षूनदीपलीकडे पळून जाणें भाग आलें. पुढें दैव अनुकूल होऊन बोग्रा खान आजारी पडून स्वदेशीं गेला, तो तेथें मरण पावला; तेव्हां नोहा यास पुनः आपलें राज्य मिळालें. जेव्हां नोहा याजवर वरील प्रसंग गुजरला, तेव्हां खुरासानप्रांतांत जो त्याचा सुभेदार होता, त्याणें खांका वर केल्या होत्या; तें मनांत ठेवून नोहा याणें पुनः गादीवर बसल्यावर, त्याचें पारिपत्य करण्याची तयारी केली. त्या वेळीं बुखारा एथें दुसरा फैकनामक एक उमराव होता, तो हा समानी राजांचा पडत्याकाळांत बहुत दिवस मोठें तुफान करित असे, अशी त्याची इतिहासांत प्रख्याति आहे. जेव्हां खुरासानचा सुभेदारानें पाहिलें कीं आपणावर बेतत्ये, तेव्हां त्याणें या उमरावास बगलेस मारिलें; आणि दोघांहीं मिळून, राज्याचें कांहीं होऊ परंतु सद्यः आपलें हित साधावें या हेतूनें इराणदेशांतील आपल्याजवळच्या प्रांतांत दीलमी राजा राज्य करित असे त्यास आपल्या मदतीस बोलाविलें. त्याणें पाहिलें कीं आपल्या शेजाऱ्यांचा तंटा जेवढा अधिक पेटेल, तेवढें आपणास

पूर्वेकडील तातारलोकांवर युद्ध करण्यास मवकडीन समानी राजास सहाय झाला.

इ॰ स॰ ९९१. हि॰ स॰ ३८१.

कांहीं तरी आपला मुलुक वाढवायास साधेल, या बुद्धीनें त्याणें यांचें बलावणें खुशीनें कबूल केलें. आपल्या शत्रूंचा मोठा जोर झाला असें पाहून नोहा याणें सबक्तगीनास सांगून पाठविलें, कीं तूं मला सहाय करायास ये. तेव्हां रयतेच्चें नातें सोडून बराबरीचा नात्यानें सबक्तगीन हा आपली फौज घेऊन बुखाऱ्याकडे चालिला. मी हल्लीं अशक्त झालों आहें, यामुळें भेटीचा वेळीं मी घोड्यावरून उतरणार नाहीं असें निमित्त करून, सबक्तगीनानें पूर्वीं न उतरण्याचा करार करून ठेविला होता; परंतु आपला राजा नजरेस पडतांच सबक्तगीनानें घोड्याखालीं उडी घेतली, आणि राजाचा रिकाबीचें चुंबन करावयास गेला; परंतु नोहानें त्यास वारिलें, आणि आपण त्वरेनें घोड्यावरून उतरून त्यास आलिंगन दिलें.

नोहा व सबक्तगीन या दोघांचाहि फौजेपेक्षां त्यांचा शत्रूंची फौज अधिक बलाढ्य होती, त्यामुळें यांचें कांहीं चाललें नसतें; परंतु लढाई सुरू झाल्यावर दीलमी लोकांचा सरदारानें विश्वासघात करून युद्ध मोठ्या भरांत आलें असतां आपली ढाल पाठीवर टाकिली, आणि आपल्या स्वारांनिशीं सबक्तगीनास जाऊन मिळाला[१]. तेव्हां अर्थातच बंडवाले लोकांचा मोड झाला, आणि त्यांणीं जो मुलुक बळकाविला होता, तो सोडून दिला. या प्रसंगीं सबक्तगीन हा आपणास उपयोगी पडला, ह्मणून त्यास कांहीं इनाम द्यावें या हेतूनें नोहा याणें त्याची सुभेदारी कायम ठेविली, आणि त्याचा मुलगा महमूद यास खुरासानचा सुभेदार नेमिलें.

(१) ढाल पाठीवर टाकणें ही लढाई तहकूब करण्याची निशाणी आहे.

वर सांगितल्याप्रमाणें बंडवाल्यांचा त्या वेळीं जरी मोड झाला, तरी त्यांणीं पुनः आपल्या फौजा जमा केल्या, आणि दुसऱ्या वर्षी अकस्मात् छापा घालून निशापुर एथें महमूद याचा पराजय केला; तेव्हां सबक्तगीनास पुष्कळ तयारी करून त्यांसमोर उभें राहणें प्राप्त झालें. त्या दोन्हीं सैन्यांचा प्रसंग तूस ह्मणजे जास सांप्रत मेशहद्द असें ह्मणतात, त्या शहराजवळ झाला. त्या लढाईत शत्रूंचा सर्वस्वीं मोड झाला; आणि फेक हा आपलें पूर्वीचें सर्व वैभव सोडून बोग्रा राजाचा गादीचा धनी इलीक खान याकडे पळून गेला. मग इलीक खानानें मध्यस्थी करून नोहाचा व त्याचा बेबनाव नाहींसा केला. नंतर नोहा याणें फेक यास समर्कंदचा सुभ्याचें काम सांगितलें. इ० स० ९९५ हि० स० ३८७.

इतका बंदोबस्त झाल्यावर लागलाच नोहा मरण पावला, तेव्हां इलीक खान याणें नवा राजा होण्याचा घालमेलीची ही संधि आहे असें पाहून, बुखाऱ्यावर चढ केला. त्या वेळीं त्याचा दोस्त समर्कंदचा सुभेदार हाहि त्यास सहाय झाला. शेवटीं त्यांणीं दुसऱ्या मनसुराकडून त्याचा राज्याचा सर्व कारभार जबरदस्तीनें फेकाचा हातीं देवविला.

इकडे हीं वर्तमानें होताहेत तों सबक्तगीन गिजनीस जात असतां वाटेंत मरण पावला. सबक्तगीनाचें मरण.

सबक्तगीनाविषयीं एक चमत्कारिक गोष्ट सांगतात. ती अशी कीं हा घोडेस्वार असतां एके दिवशीं शिकारीस गेला होता. तेथें पाठलाग करून याणें एका हरणाचा पो-

(४) नोहापासून एक महिन्याचा अंतरानें हा मेला इ०स० ९९७ हि०स० ३८७.

रास पाडाव केलें, आणि त्यास बराबर घेऊन जाऊं लागला; परंतु पाहतो तों त्याची आई आपल्या घोड्यामागून येत आहे, आणि मोठी कष्टी दिसत आहे; त्यावरून यास फार दया आली, आणि यानें पकडलेलें हरण सोडून दिलें. नंतर त्याची आई आपल्या पोरास रानामध्यें परत घेऊन जात असतां वारंवार याजकडे परतून पाही; ही तिची कृतज्ञता पाहून यास फार आनंद झाला. त्या रात्रीस हा निजला असतां, स्वप्नांत पैगंबर आला आणि यास सांगता झाला, कीं तुझा दयालु स्वभाव पाहून ईश्वरानें तुला राज्य बक्षीस दिलें आहे, यास्तव जेव्हां तूं राज्यपदावर बसशील, तेव्हां या दयेचा वृत्तीस विसरूं नको. या गोष्टीवरून सबक्तगीन हा मोठा दयालु होता, असें दिसतें; अथवा ही गोष्ट लिहिणारा ग्रंथकार तरी मनाचा कोमल होता असा संभव दिसतो.

# गजनवी वंशाचें वर्णन.



## प्रकरण तिसरें.

### सुलतान महमूद.

**महमूदाचा** बाप जिवंत असतां त्याजबराबर हा स्वाऱ्या करण्यास जात असे; त्यावरून हा लढाऊ आहे, व याचा स्वभाव निग्रही आहे, असें प्रथमच दिसून आलें होतें. याचें सांप्रत वय ३० वर्षांचें होतें; आणि हा युद्धांत शूर, व राजकारभारांत कुशल, असा सर्वांस अनुभव आलेला होता; तेव्हां यास गादीवर बसवावें हें योग्य होतें. परंतु हा बहुधा अनौरस होता, आणि बाप मरावयाचा वेळीं **निशापुर** एथें आपल्या सुभ्यावर होता, त्यामुळें याचा धाकटा भाऊ **इस्मायल** यानें आपला बाप **सबक्तगीन** याजकडून त्याचा मागें आपण गादीवर बसावें असें मरते वेळीं ठरावून घेतलें, असें कांहीं ग्रंथकार वर्णितात. पुढें **सबक्तगीन** मरण पावला, तेव्हां **इस्माइलानें** राज्य बळकावून आपण राजा झालों अशी द्वाही फिरविली. दुसरें यांचा बापाचा जामदारखाना सर्व त्याचा स्वाधीन होता; तेव्हां मोठ्या उमराव लोकांस नजराणे पाठवून त्यांचीं मनें वळविणें, लश्कराचा पगार वाढविणें, आणि सर्व लोकांस खुश करण्याकरितां मा-

गादीविषयीं तंटे.
इ० स० ९९७
हि० स० ३८७

ठमोठ्या मेजवान्या व नाचतमाशे करणें, या सर्व कामांत पाहिजे तसा पैसा उधळण्यास त्यास सवड झाली होती-कांहीं या योगानें, परंतु मुख्यत्वेंकरून गादी त्याचा स्वाधीन आणि औरसपणाचाहि त्याचा हक्क जास्त यामुळें, महमूदाचा हाताखालचा तेवढा मुलुक खेरीज करून बाकीचा सर्व राज्यांतील लोक त्यास अनुकूल झाले.

याप्रमाणें आपला हक्क तुच्छवत् मानिला असें पाहून महमूदानें आपल्या भावास कळविलें, कीं माझी तुजवर अतिशय प्रीति आहे, आणि जर एवढें कठीण काम करण्याजोगी तुझी उमर असती, तर मीहि कबूल झालों असतों. परंतु तूं लहान आहेस, व तुझापेक्षां मला अनुभव विशेष आहे, याकरितां जर तूं राज्य माझा हवालीं करिशील तर त्याबदल मी तुला बल्क व खुरासान हे प्रांत देईन. आपला वारसा बराबर पोंचत नाहीं असें समजून किंवा स्वाभाविक अथवा ओढूनताणून या वेळीं असा निर्लोभीपणा महमूदानें दाखविला हें समजत नाहीं; परंतु हें महमूदाचें बोलणें इस्माइलानें लागलेंच नाकबूल केलें, तेव्हां आतां आपली गोडीनें समजूत होत नाहीं, असें पाहून महमूदानें राजधानीवर हल्ला करण्याचा निश्चय केला. त्या वेळीं इस्माइल बल्क एथें होता. त्यास याचें इंगित समजतांच, तो आपली फौज घेऊन महमूद व गजनीशहर यांमध्यें आडवा आला; तेव्हां महमूदास तेथें युद्ध करणें प्राप्त झालें. त्या वेळीं उभयपक्षांचा सेनापतींचा कौशल्यांत मोठी तफावत होती, त्यामुळें एवढें रण माजेल असें वाटलें नव्हतें; तथापि मोठी लढाई झाली, तींत शेवटीं महमूदाचा जय झाला, गजनीशहर याचा हस्तगत झालें, आणि इस्माइल कैदेंत

सांपडून जन्मपर्यंत अटकेंत राहिला; तेथें त्या स्थितीस यो-ग्य अशा कोणत्याहि सुखाची महमूदानें त्यास वाण पडूं दि-ली नाहीं.

हे यांचे सात महिनेपर्यंत आपसांत तंटे चालल्यामुळें इलीक खानाचें फावलें. त्याणें फैकू यास दुसऱ्या मन-सुराकडून आपला दिवाण करविला; अथवा पुढें फैकाची जी सत्ता चालूं लागली, त्यावरून मनसुरानें त्यास आपला यजमान नेमिला, असें ह्मटलें तरी चालेल. त्या योगानें मनसुराचा दरबारांत इलीक खानाचा पगडा चालू झाला. हे सर्व महमूदाचे शत्रु असतां त्यांची सत्ता मोठी आहे असें ढोंग करून, आपल्याकडे खुरासानचा सुभ्याचें पूर्ववत्प्रमा-णें काम चालवावें, ह्मणून मोठ्या गरीबीनें महमूदानें मन-सुरास विनंति केली; ती नाकबूल होऊन नवीन कारभा-ऱ्यांचा एका आश्रिताची तेथें नेमणूक झाली.

असें झालें तरी महमूदानें आपला सुभा सोडिला ना-हीं. जेव्हां नवीन सुभेदार आला, तेव्हां त्यास हटवून म-हमूदानें वाटेस लाविलें. पुढें याचा शत्रूंनीं स्वतः मनसुरा-बराबर फौज देऊन याजबराबर लढायास आणिलें; तेव्हां याची भरपूर तयारी होती, परंतु याणें मनसुराबराबर लाग-लीच लढाई केली नाहीं. पुढें दरबारांत कांहीं तंटे लागून, व लोकांचीं वैमनस्यें पडून मनसुरास पदच्युत करून त्याचे डोळे काढून टाकिले, आणि फैकाचा वगीनें अब्दुल् म-लिकास गादीवर बसविलें. असें होतांच महमूदानें समा-नी राजांचें नाव आपल्या लोकांचा निमाजांतून काढून टा-कविलें, आणि खुरासानप्रांताचा आपल्या नावानें कार-भार करूं लागला. नंतर त्या वेळचा नामधारी खलीफास

स्वतः अधिकार तर नव्हता, परंतु लोकांस त्याकडून मिळत असे अशी चाल होती; त्याप्रमाणें त्याणें महमूदास वस्त्रें पाठवून दिलीं. तेव्हां तो स्वतंत्र झाला, आणि आपणास सुल्तान[1] असें ह्मणवूं लागला. हा किताब याचा पूर्वीं कोणास नव्हता. यापुढें मुसलमानी राजांमध्यें हा अगदीं साधारण होऊन गेला आहे.

महमूद आपणास स्वतंत्र असें ह्मणवूं लागला. इ० स० ९९९ हि० स० ३८९

अशी लूट माजलीसें पाहून त्यांतून आपणहि कांहीं मिळवावें या हेतूनें अब्दुल् मलिकास मदत करायाचें निमित्त दाखवून इलीकखानानें बुखाऱ्यावर चढाई केली; आणि सर्व मावरुल्नहर् प्रांत हस्तगत करून घेऊन समानी वंशाची समाप्ति केली. तेथपर्यंत समानी वंशाचा राजांनीं एकंदर १२० वर्षांवर राज्य केलें होतें.

असें झाल्यावर महमूदास आपल्या राज्याविषयीं कांहीं काळजी राहिली नाहीं. नंतर आपलें राज्य कोणीकडेहि वाढविण्यास महमूदास त्या वेळीं चांगली संधि होती. पश्चिमेकडील राज्यांचा प्रथमपासून मुसलमानी धर्माशीं संबंध, व तीं प्राचीनकाळापासून प्रख्यात, त्यामुळें त्यांजवर मुसलमानांचा डोळा लागे; परंतु हीं राज्यें अव्यवस्थेमुळें अगदीं मोडकळीस आलीं होतीं, तीं बहुतेक तलवार मारल्याशिवायच याच्या हातास आलीं. बाकी राहिलेलीं सल्जूकलोकांनीं विशेष आयासाशिवाय मिळविलीं. हे लोक पूर्वीं महमूदाचाच ताब्यांतील रयतें-

(१) जरी महमूदापूर्वीं मुसलमानलोक या शब्दाचा उपयोग करित नसत, तरी हा जुना आरबी शब्द आहे याचा अर्थ राजा असा होतो.

तले होते; यावरून पश्चिमेस हेलेसूपांट ह्मणजे डार्डनलूचा सामुद्रधुनीपर्यंतहि महमूदास आपलें राज्य वाढविण्यास फारशी अडचण नव्हती.

परंतु यापेक्षां विशेष कीर्ति मिळविण्याची व अलौकिक कृत्यें करण्याची जागा हिंदुस्थान आहे असें त्या वेळीं दिसे. कारण मुळीं या देशाचा पुरता शोध लागलेला नव्हता; यामुळें एथें काय आहे कोण जाणें असें वाटे; दुसरें हा देश सोईवार असून मोठा हा केवळ लक्ष्मीचें भांडारच अशी आवाई; एथील जमीन मोठी सुपीक; एथें नाना तऱ्हेचे जिन्नस उत्पन्न होतात; अशा अशा गोष्टींनीं हिंदुस्थान देश हा जवळपासचा लोकांस अलकापुरीसारखाच वाटत असे, आणि याविषयीं ते लोक पाहिजे तसे आपले तर्क चालवीत. तशांत कोणी राजानें अथवा सरदारानें नवीन लोकांत मुसलमानी धर्म चालू केला, ह्मणजे कीर्तीचा झेंडा लागला, असा त्या वेळीं समज असे; तेव्हां हिंदुस्थानासारिख्या देशांत मोठी तलवार मारायाला सांपडून धर्मवृद्धिहि होईल हीं दोन्हीं कारणें एकत्र मिळालीं होतीं. तशांत पूर्वीं महमूदाचा हिंदूंबराबर लढाया होऊन त्यांचें पाणी याणें जोखलें होतें; त्यामुळें, आणि हिंदुस्थानांत पुष्कळ लूट मिळेल या लोभानें भुलून हिंदुस्थानाकडेच स्वारी करण्याचा याचा विचार झाला. नंतर तो हेतु तडीस जावा ह्मणून महमूदानें इलीक खानाबराबर तह केला, आणि सर्व मावरूलूनहर् प्रांत त्याकडेसच ठेविला. दुसरें इलीक खानाचा मुलीशीं आपण लग्न करून उभय पक्षांचा स्नेहबंध दृढ केला. पूर्वीपासून सिस्तानप्रांतांत सुफरी वंशाचा कांहींसा स्वतंत्र अम्मल असे. त्यावर दुसऱ्या वरिष्ठ राजांनीं लक्ष दिलें न-

ऱ्हतें, परंतु या सुमारास त्या वंशाचा जो पुरुष राज्य करित होता, त्याणें बंड केलें, तें महमूदानें मोडिलें. नंतर पुढें त्याणें दुसरें बंड केलें, त्या वेळीं महमूदानें त्यास धरून कैदेंत टाकिलें.

इ.स. १००२

इराणदेश मुसलमानांनीं जिंकून ३५० वर्षें झालीं होतीं, तेव्हां वरील लिहिल्या बंडांतून पहिलें बंड मोडल्यावर महमूदानें हिंदुस्थानावर प्रथमचीं स्वारी केली; तेव्हां त्याजबराबर १०,००० निवडक घोडेस्वार होते. त्यांनिशीं गजनीहून येत असतां, वाटेंत पेशावराजवळ याचा बापाचा जुना शत्रु लाहोरचा राजा जयपाळ हा यास आडवा आला. ते समयीं त्याचें व महमूदाचें युद्ध झालें. त्यांत महमूदानें जयपाळास जिंकून कैद केलें. नंतर महमूद पुढें चालता झाला, आणि सतलजनदी उतरून बतिंदा शहरास गेला. तें शहर त्याणें हल्ला करून घेऊन लुटून फस्त केलें, आणि तेथील छावणींतील व आसमंतातूचा प्रदेशांतील लुटीचें अपार द्रव्य घेऊन हा गजनीस माघारा गेला. तेथें गेल्यावर राजानें पुनः खंडणी देण्याचें कबूल केल्यामुळें बंदीवानांतील हिंदुलोकांपासून कांहीं द्र-

महमुदाचीप हिली स्वारी. इ० स० १००१ हि० स० ३९१.

(३) बतिंदा हें शहर जंगली प्रदेशांत होतें, तथापि बरेंच नामांकित ठिकाण होतें. लाहोरचे राजे हे कांहीं दिवस एथें रहात, व काहीं दिवस लाहोरास रहात असे कर्नल टाडु वर्णन करितो. वर सांगितलेली पेशावरची लढाई २७ वे नवंबरास झाली. यावरून महमूद हा बतिंदा शहरास हिवाळ्याचा अखेरीस पोंचला असेल, असें दिसतें. त्या ऋतुंत पंजाबांतील कांहीं नद्यांस पायउतार असतो, आणि जरी कांहींस नसला तरी घोडेस्वारांस उतरण्यास विशेष अडचण पडत नाहीं.

व्य घेऊन त्यांस सोडून दिलें; परंतु जे अफगाणलोक त्यांस मिळाले होते, त्यांस ठार मारून टाकिलें. बंदींतून सुटून आल्यावर वारंवार आपत्ति प्राप्त झाल्यामुळें त्रासून, आणि कांहीं आपल्या रयतेचा मूर्ख समजुतीमुळें असें करणें अवश्य आहे असें जाणून, जयपाळराजानें आपला मुलगा अनंगपाळ यास आपल्या गादीवर बसविलें; आणि आपण चिता तयार करवून तींत प्रवेश केला, आणि तिला स्वतः अग्नि लावून आपला प्राण दिला.

आपल्या बापाच्या करारापमार्णे चालण्यास अनंगपाळ कबूल होता, परंतु त्याचा पोटचा हिसेदार मुलतानचा दक्षिणेस भाटियाचा राजा होता; तो आपल्या वांटणीची खंडणी देईना, आणि महमूदाशीं नियहानें वांकडेपणा करूं लागला. यास्तव महमुदानें त्यावर स्वतः स्वारी केली. तेव्हां प्रथम तो जेथें सभोंवार खंदक खणून तळ देऊन राहिला होता, तेथें चांगली लढाई होऊन त्यास हटून आपल्या मुख्य किल्ल्यावर जावें लागलें. तेथेंहि महमूदानें त्याजवर पडून त्यास पळविलें. पुढें त्या राजानें सिंधुनदाच्या रानांत जाऊन जीव दिला; आणि त्याचे पुष्कळ अनुयायीहि त्याच्या सूड उगवण्याकरितां लढत असतां तेथें मरण पावले.

महमूदाची दुसरी स्वारी.

इ० स० १००४.
हि० स० ३९५.

मुलतान एथें महमूदाचा सुभेदार एक अफगाण सरदार[४] होता. तो मुसलमान असून त्याणें अनंगपाळाशीं

(४) त्याचें नाव अब्दुल् फते लोदी. त्याचा आजा हमीद खान लोदी त्यास मुलतान व लघमाण हे दोन प्रांत दिल्यावरून तो आपले धर्मद्रोही (हिंदु) यांस मिळाला. पुढें सबक्तगीनानें हिंदूंचा पराभव केल्यावर तो सबक्तगीनाच्या हुकुमानें वागूं लागला.

महमूदाची तिसरी स्वारी.

मोठी दोस्ती करून बंड केलें; तेव्हां त्याचा शासनार्थ महमूदास तिसरी स्वारी करणें प्राप्त झालें. त्या वेळीं पहाडी लोक बहुधा महमूदाचा पक्के ताब्यांत आले नव्हते, यामुळें त्यास गजनीहून समोर मुलुतानास जाण्यास रस्ता मिळेना, तेव्हां आड वाटेनें जात असतां बंडखोर सुभेदारांचा प्रतिपक्षी लाहोरचा राजा याणें त्यास मध्येंच गांठलें. त्यांचा लश्करांची पेशावराचा जवळपास चकमक झडली, त्यांत राजा हरला. त्याचा महमूदानें चिनाबनदीवर वजीराबादेनजीक सोद्रानामक शहरापर्यंत पाठलाग केला; तेव्हां शेवटीं आपला बचाव करण्याकरितां त्यास काश्मीरदेशास पळून जावें लागलें. नंतर महमूदानें मुलुतानास वेढा दिला. तेव्हां सात दिवसपर्यंत आंतील लोक लढले. शेवटीं तो सुभेदार शरण आला; आणि पूर्ववत्प्रमाणें खंडणी देण्याचें कबूल करिता झाला. इकडे आपल्या मागें इलीक खानाचा फौजांनीं आपल्या राज्याचा विध्वंस केला, अशी महमूदास बातमी लागली. तेव्हां त्या सुभेदाराचें बोलणें जरी विशेष फायदेवार नव्हतें, तरी तें कबूल करून महमूद माघारा गजनीस गेला.

इ० स० १००५ हि० स० ३९६.

तातारलोकांचा राजा इलीक खान याणें याचा राज्यावर हल्ला केला.

इलीक खान हा महमूदाचा फार जवळचा सगा, असें असतां महमूदाचें सर्व लक्ष हिंदुस्थानाकडे लागलें आहे, असें पाहून खुरासानप्रांत सहज मिळवावा अशी त्यास इच्छा झाली, आणि त्याणें एक फौज हिरात घेण्याकरितां, व दुसरी बल्क घेण्याकरितां, अशा पाठविल्या. परंतु इलीक खानास आपल्या शत्रूचें सामर्थ्य बराबर समजलें नव्हतें.

महमूदास ही बातमी समजतांच त्याणें सिंधुनदाकांठचा आपल्या देशाचा कारभार सेवक उर्फ सूक पालनामक एक हिंदु मुसलमान झाला होता, त्याजवर संपविला, आणि दौड करून खुरासानांत येऊन इलीक खानाचे सरदार हटवून वक्षूनदीपार त्यांचाच मुलुकांत घालविता झाला.

नंतर महमूद आपणावर येतो अशी इलीक खानास भीति पडली, तेव्हां त्याणें खोटें एथील कादिर खाननामक सरदाराजवळ मदत मागितल्यावरून तो ५०,००० लष्करासहित येऊन त्यास मिळाला. याप्रमाणें आपली बळकटी झालीशी पाहून इलीक खान मार्गें पुढें नपाहतां वक्षूनदी उतरला. पुढें महमुदाची व त्याची बल्क शहराजवळ गांठ पडली. त्या लढाईंत महमुदानें ५०० हत्ती आणिले, आणि आपल्या फौजेंत गोंधळ नहोऊं देतां आपल्या शत्रूंस त्यांचीं भव्य शरीरें व विलक्षण स्वरूपें पाहण्याची सवय नाहीं यामुळें ते व त्यांचे घोडे त्यांस पाहून भिऊन जात अशा ठिकाणीं मोठ्या चतुराईनें त्या हत्तींची रचना केली. पुढें लढाई सुरू झाली तेव्हां समोर हत्ती पाहून तातारलोकांचे घोडे थबकले, तेव्हां त्यांचा हल्ला हटला. तसें होतांच महमुदाचे हत्ती पुढें सरसावले, आणि शत्रूंचा मध्यभागीं जाऊन दाणादाण करून भडमार करूं लागले, आणि जें आड येईल त्यास पायांखालीं रगडित चालले. महमुदाचा हत्तीनें इलीक खानाचा निशाणदारास सोंडेंत धरून इलीक खान व त्याचे भयाभीत झालेले लोक पाहत असतां फेंकून दिला, अशी गोष्ट सांगतात. इलीक खानानें हा गोंधळ नीट करावा, तंव इतक्यांत दोन्ही फौजा भिडल्या; ते समयीं गजनवी लोकांनीं मोठ्या जलदीनें व निकरानें भडमार

केला; तेव्हां तातारलोक चारी दिशांस पळूं लागले. शेवटीं त्यांची मोठी कतल करून, त्यांस गजनवी लोकांनीं रणभूमीवरून पळविलें. इलीक खान हा बराबर थोडे लोक घेऊन वक्षूनदीपलीकडे पळाला, आणि त्यानंतर कधीं महमूदासमोर लढाईस उभा राहिला नाहीं. महमूदाचा इरादा प्रथम शत्रूंचा पाठलाग करण्याचा होता; परंतु हिंवाळा आला, तेणेंकरून यास तो बेत सोडावा लागला. पुढें परतल्यावर गजनीस येई तंव अतिशय थंडी पडून वाटेंत याचे शेंकडों लोक व घोडे मेले गेले.

इ० स० १००६ हि० स० ३९७

इलीक खान हरला.

इतकें होत आहे तंव सूक पाल याणें बंड केलें, आणि पुनः हिंदुधर्म स्वीकारिला. तें वर्तमान महमूदास समजतांच हा अकस्मात् त्यावर येऊन पडला, आणि सूक पाल यास कैद करून एका किल्ल्यावर जन्मभर बंदींत ठेविता झाला.

पूर्वीं मुल्तानचा सुभेदाराचें बंड मोडिलें ते वेळीं त्याचा पक्षाचा अनंगपाळ याचा सूड उगवण्यास इलीक खानाचा हल्यामुळें महमूदास संधि सांपडली नव्हती; परंतु आतां हिंदुस्थानाचा कारभाराकडे लक्ष देण्यास फुरसुद मिळाल्यामुळें महमूद मोठी फौज जमा करून इ०स० १००८ चा शिशिरऋतूंत त्या राजावर स्वारीची तयारी करून निघाला. इकडे अनंगपाळास वरी आपण गांधील चाळविलें त्याची भीति होतीच. त्याणें जवळचा व दूरचा लहान मोठ्या हिंदु राजांकडे वकील पाठविले, आणि महम्मदी लोकांची बढती झाली असतां सर्वांचें वाटोळें होण्याची वेळ आहे, याकरितां आपला धर्म व आपली स्वतंत्रता यांचा समूळ नाश न

महमूदचीच्च थीस्वारी इ० स० १००८ हि०स०३९९

होऊं देणें असेल, तर सर्वांनीं एकदम मिळून अवश्य कष्ट केला पाहिजे, असें त्यांस सांगून पाठविलें. त्या राजांचेहि विचार बहुधा असेच असावे, कारण त्यांणीं त्याचें बोलणें मान्य केलें, आणि उज्जनी, ग्वालेर, कालिंजर, कनोज, दिल्ली, व अजमीर, एथील राजांनीं एकदिल केलें, आणि आपल्या फौजा जमवून पंजाबांत गेले. एवढें मोठें लश्कर यापूर्वी कधीं बहुधा रणभूमीवर आलें नसेल, एवढी ही सेना मोठी होती. असें मोठें सैन्य अकस्मात् जमलेलें पाहून महमूद दचकला आणि याचा स्वाभाविक हुशारीनें असें एकादें अरिष्ट आलें असतां त्यांतून हा पार पडे त्याप्रमाणें न करितां याणें शत्रूंचा समोर छावणी दिली, आणि पेशावराजवळ ठाणें धरून दुसऱ्याचा वाटेस नजातां आपल्या बंदोबस्तानें राहिला.

निकराची लढाई.

महमूद स्वस्थ बसला असतां, इकडे शत्रूंची फौज दिवसेंदिवस वाढत चालली. हिंदुलोकांचा स्त्रियांनीं आपलीं जवाहिरें विकलीं, आपले सोन्याचे दागिने आटविले, आणि दूरदूरचा देशांतून या धर्मयुद्धास सहाय व्हावें ह्मणून सामग्री पाठवूं लागल्या; तसेंच शकर व दुसरे लढाऊ लोक त्यांस येऊन मिळाले. नंतर त्यांणीं मुसलमानांचा लश्करासभोंवता वेढा दिला; तेव्हां मुसलमानांस छावणीचा वाटोळा खंदक खणणें प्राप्त झालें. त्या प्रसंगीं महमूद कांहींसा गांगरला; परंतु याची हिंमत खचली होती असें नाहीं. आपली छावणीची जागा मजबूद आहे, याकरितां जर आपल्या खंदकाआंत शत्रू आपल्याबरोबर लढायास येतील, तर आपला फायदा होईल, या मसलतीनें त्यांस चिढविण्याकरितां याणें एक तिरंदाजांची मजबूद टोळी पाठविली; परंतु त्या

कृत्याचा परिणाम याचा इच्छेहून निराळाच झाला. तो असा, कीं त्या तिरंदाजांस गकरलोकांनीं एकदम हटविलें; आणि जरी त्यांबराबर महमूद होता, आणि याणें पुष्कळ पराक्रम केला, तथापि ते गकरलोक त्यांचा पाठलाग करून जवळ आले, आणि नानाप्रकारचीं विलक्षण हत्यारें धारणकरणारे असे ते बोडके व अनवाणी पहाडी लोक मुसलमानांचा घोडेस्वारांवर मोठ्या निकरानें तुटून पडले. मग घोडा मिळो स्वार मिळो, सांपडेल त्यास तलवारी व जंबे यांचा घायांखालीं तुडवित चालले. असें होतां होतां किंबहुना पांपणीला पांपणी लागे तंव या जंगली लोकांचा झपाट्याखालीं ३००० पासून ४००० पर्यंत मुसलमान मेले गेले.

कांहीं वेळानें हे हल्ले कमी कमी होत चालले. शेवटीं अनंगपाळ हा आपला हत्ती पुढें सरसावून गुलीमध्यें तलवार मारावी या हेतूनें येत होता. त्याचा हत्ती तीर पाहून भ्याला, आणि माघारा फिरून रणभूमीवरून पळाला; तेव्हां हिंदु भयाभीत झाले, आणि आपला सेनाधिपति आपणास टाकून पळाला, असें त्यांस वाटून प्रथम त्यांचा जोर खचला, आणि शेवटीं युद्ध टाकून ते पळूं लागले. याप्रमाणें त्यांचा गोंधळ झाला, हें महमूदानें पाहून १०,००० निवडक लोक त्यांचा पाठलाग करण्याकरितां पाठविले. त्यांणीं हिंदुलोक आपल्या आश्रयाचा ठिकाणीं पोंचत तंववर त्यांतून २०,००० पाडाव केले.

याप्रमाणें ईश्वरेच्छेनें महमूद या विघ्नांतून सुटल्यावर याणें हिंदुलोकांचा पुनः जमाव होऊं देण्याची त्यांस फुर्सूदच दिली नाहीं. हा त्यांचा पाठलाग करित पंजाबांत

ला, आणि शेवटीं हिंदुलोक अगदीं थोडींकडे पुनः न जमत असे आपआपल्या ठिकाणीं गेले, तेव्हां त्यास एक मोठी लूट करण्याची संधि सांपडली. अशा लुटींची महमूदास मोठी प्रीति असे. हिमालयाचा खालचा भागास लागून एक पर्वत आहे, त्यावर किल्ल्यासारिखें तटबंदी एक देवालय आहे त्यास **नगरकोट** असें ह्मणतात. त्यांमध्यें एका ठिकाणीं जमीनींतून स्वाभाविक ज्वाला निघतात. त्यामुळें त्या देवालयास लोक मोठें पवित्र मानितात. या कारणामुळें जे जे हिंदु राजे होत गेले, ते ते तेथील देवास अग्रहार करित गेले; तेणेंकरून पुष्कळ द्रव्य जमलें होतें. शिवाय आसपासचा लोकांची बहुतेक दौलत तेथेंच ठेवित असत, त्यामुळें त्या ठिकाणीं जितकें सोनें, रुपें, जवाहीर, व मोत्यें, या वस्तूंचें भांडार होतें तितकें पृथ्वीवर कोणत्याहि राजाचा जामदारख्यान्यांत नसेल, असें फिरिस्ता हा ग्रंथकार वर्णन करितो.

नगरकोट येथील ज्वालामुखी.

कोणी शत्रु आला असतां त्याचें कांहीं चालावयाचें नाहीं असें हें ठिकाण होतें; परंतु वरील लढाईमध्यें एथील सर्व लश्कर गेलें होतें, त्यामुळें महमूद तटाजवळ आला, तेव्हां तटावर अनाथ पुजारी लोकांची हार लागली होती. ते लोक महमूदास एकदम शरण आले, आणि आह्मास जीवदान द्यावें ह्मणून मोठ्यानें ओरडूं लागले. तें त्यांचें बोलणें मोठ्या आनंदानें कबूल करून महमूद आपल्या दरबारांतील व खासमहालांतील मुख्य मुख्य सरदारांसुद्धां देवळांत शिरला, आणि जें त्यांचें सर्व जमविलेलें द्रव्य होतें तें गोळा क-

रिता झाला. ७,००,००० सोन्याचें दिनार[५], ७०० मण[६] सोनें व रुपें यांचे दागिने, २०० मण शुध्ध सोन्याचा लगडी, २००० मण चांदी, आणि मोत्यें, हिरे, पोंवळीं, माणकें इत्यादि जवाहीर २० मण; याप्रमाणें द्वापारयुगामध्यें भीमराजापासून जी संपत्ति एके ठिकाणीं झाली होती, ती सर्व याच्या हातास चढली. ही मोठी लूट घेऊन महमूद गजनीस परत गेला, आणि आपला जय जाहला ह्मणून दुसरे वर्षी मोठा समारंभ करिता झाला. तो मोठ्या मैदानांत झाला, व तीन दिवस चालला होता. तो पाहावयास येणाऱ्या लोकांस याणें उत्तम मेजवान्या तयार केल्या, गरीब गुरीबांस पुष्कळ धर्म केला, आणि मोठ्या अब्रूचा व मोठ्या पदवीचा अशा लोकांस, व तसेच महान् साधूंसहि मोठमोठे नजराणे दिले. या समारंभामध्यें सोन्याचीं सिंव्हासनें व सोन्यारुप्यांचीं मेजें करून त्यांवर हिंदुस्थानांतील आणलेली लूट सर्व लोकांस दाखविण्याकरितां मोठ्या तयारीनें ठेविलेली होती.

इ.स०१०१० घोरदेश घेतला.

हिरातचा पूर्वेस डोंगरांत घोर ह्मणून एक कठीण प्रांत आहे; त्यावर हि० स० ४०१ मध्यें महमूदानें स्वारी केली. या प्रदेशांत सूर जातीचे अफगाणलोक राहत असत. एथील लोक फार दिवसांपूर्वीं मुसल्मानी धर्मांत आले होते, आणि हिजरी स०१११ त हा सर्व मुलुक खलीफांचा ताब्यांत गेला होता. एथें महम्मद सूर ह्मणून सरदार होता; तो जें ठाण धरून

(५) दिनार हें एक इराणी नाणें आहे. भा० क्र० (६) मण हे पुष्कळ तऱ्हेचे असतात. आरबी मण अति लहान तो २ रतलांचा असतो साधारण तब्रीझचा मण ११ रतलांचा असतो, आणि हिंदुस्थानी मण ८० रतलांचा असतो.

राहिला होता, तेथें त्यावर महमूदाचें कांहीं चालेना; तेव्हां महमूदानें आपण पळून जातों असें ढोंग केलें. त्यामुळें तो याचा पाठलाग करण्याकरितां आपली चांगली जागा सोडून निघाला; मग महमूदानें त्याचा अगदीं पराजय केला. शेवटीं तो सरदार वीष खाऊन मेला. याच सरदाराचा वंशजांनीं पुढें गजनवी वंशाची समाप्ति केली; यास्तव वरील विवरण ध्यानांत ठेवण्याजोगें आहे.

पळावयाचें सोंग दाखवून शत्रूला आपल्या मागून आणणें हें मोठें साहसाचें काम आहे; असें असून जेथें इतिहासकार वर्णन करितात, तेथें हमेशा पाहावें तर असें करण्यापासून कधीं अपाय होत नाहींच नाहीं.

पुढें एक वर्ष गेल्यानंतर घोर प्रांतानजीक मुर्घाबनदीचा वरील फांट्यांवर जुरिस्तान ऊर्फ गिर्गिस्तान ह्मणून डोंगरी मुलुक होता, तो महमूदाचा सरदारांनीं काबीज केला.

महमूदाचें सार्वकाल लक्ष हिंदुस्थानावर असे, असें दिसतें; कारण ( इ० स० १०१० ह्म० हि० स० ४०१ ) त्याच वर्षी तो हिंदुस्थानांत पुनः आला, आणि मुल्तान घेऊन फते लोदी यास कैद करून गजनीस घेऊन गेला. त्याच वर्षी आपल्या राज्यावर घोर प्रांतांतून कांहीं चढाव झाल्यामुळें त्या प्रांतांतहि महमूद गेला होता.

महमूदाची हिंदुस्थानांत पांचवी स्वारी

दुसऱ्या वर्षी यमुनेचा किनाऱ्याजवळच स्थानेश्वर ह्मणून मोठें पवित्र देवस्थान आहे. तेथें मोठ्या पल्ल्याची स्वारी करून महमूदानें तें देवालय व सर्व शहर लुटून फस्त केलें; आणि हिंदु रजवाडे जमून यास आड येत तों असंख्य

सहावी स्वारी

स्थानेश्वर लुटला.

बंदीवान् घेऊन गजनीस माघारा गेला.

सातवी व आठवी स्वारी

पुढील तीन वर्षांत महमूदानें काश्मीरदेश लुटण्याकरितां दोन स्वाऱ्या केल्या. त्यांतील शेवटचा स्वारींत त्याचा फौजेचा कोणी रस्ता चुकविला, आणि त्या वेळीं हिंवाळा फार होता यामुळें पुष्कळ लोक मेले गेले; तथापि काश्मिरासारखा प्रवेश होण्यास कठीण देश असून त्यावर दोन स्वाऱ्या केल्या असतां इतकें थोडें नुकसान जहालें, ही गोष्ट मोठी आश्चर्याची आहे. या वरील स्वाऱ्यांशिवाय वरील मुदतींत दुसरी कांहीं ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट घडून आली नाहीं. या सुमारास इलीक खान वारला. त्याचा मागें तोगान खान राजा झाला. त्याचें व खिते तातारलोक यांचें मोठें निकराचें युद्ध बहुधा इमौसपर्वताचा पूर्वेस चाललें होतें.[७] तेव्हां मावरुलुनहर् प्रांतांत सद्यः कोणी नाहीं, हें महमूदाचा लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं; आणि एवढा मोठा देश मिळवण्याची संधि जाऊं देण्याजोगा इतका तो हिंदुस्थानांतील लढायांतहि त्या वेळीं गुंतला नव्हता. यामुळें याणें त्या मुलकावर चाल करून समर्कंद व बुखारा हे प्रांत घेतले. तेथें यास कोणी आड आला नाहीं. पुढें ख्वारीजमप्रांतांत थोडासा यास अडथळा झाला; तथापि थोडक्याच दिवसांत तो प्रांतहि याणें सर केला. हें कृत्य महमूदानें आपल्या कारकीर्दींत जीं मोठीं कृत्यें केलीं त्यांतीलच होय. कारण याचा योगानें महमूदाचें राज्य क्यास्पीयन् समुद्रापर्यंत वाढलें.

मावरुलुनहर प्रांत घेतला.

इ० स० १०१६ हि० स० ४०७

७ इ० स० १०१२ पासून १०२५ पर्यंत.

वरील मोठीं मोठीं कामें केल्यानें महमूदाची हिंदुस्थानाकडेसहि नजर वाढली असें दिसतें. कारण यापूर्वी तो पंजाबापर्यंत स्वाऱ्या करित असे. तो प्रांत सोडून आपला व आपल्या वंशजांचा हिंदुस्थानांत पाय शिरकावा ह्मणून पुढील स्वारीस याणें गंगानदीपर्यंत आण्याचा निश्चय केला. एवढा मोठा बेत तडीस जाण्यास याणें तयारीहि मोठीच केली; सर्व राज्यामधून लढाऊ लोक जमविले; त्यांत मुख्यत्वेंकरून नवीन घेतलेल्या प्रांतांतून पुष्कळ आणिले; तेणेंकरून जर हे लोक मागें ठेविले असते, तर ते बंडें वगैरे करिते अशी जी भीति होती ती राहिली नाहीं; आणि त्यांस हिंदुस्थानांतील लुटीचा वांटा मिळाल्यामुळें तेहि पुढें महमूदाची चाकरी निष्ठेनें करूं लागले. याप्रमाणें १,००,००० घोडा, व २०,००० पायदळ, एवढें लश्कर घेऊन महमूद निघाला, असें फिरिस्ता वर्णन करितो. यास तीन महिनेपर्यंत अपरिचित मुलुकांत कूच करावें लागलें, व सात मोठ्या नद्या उतराव्या लागल्या; परंतु याणें आपल्या नेहमींचा तजविजीनें चांगली माहितगारी ठेऊन ही स्वारी पार पाडिली. हा पेशावराहून निघाला, आणि काश्मिराजवळून जाऊन नद्या सुलभ रीतीनें उतरतां याव्या ह्मणून डोंगराचा लगत्यानेंच चालला. पुढें यमुना उतरल्यावर दक्षिणेकडे वळला; आणि एकदम कनोजशहरास आला. तेथील राजाची कांहीं तयारी नव्हती, त्यामुळें आपला अगदीं बचाव होणार नाहीं असें समजून तो आपल्या कुटुंबासुद्धां बाहेर आला आणि महमूदास शरण गेला. अशा अशुभ समयीं या दोघांची मैत्री जमली, ती शेवटपर्यंत राहून निष्कपट होती, असें दिसतें. सुलतान

हिंदुस्थानावर नववी स्वारी.

महमूद हा कांहीं उपद्रव नकरितां तीन दिवसांनीं तेथून नि-घोन गेला. पुढें कांहीं वर्षांनीं महमूदाशीं या राजानें स-ख्य केल्यामुळें इतर राजे याचें शासन करण्याकरितां ए-कत्र झाले, तेव्हां त्यास सहाय करण्याचा हेतूनें महमूद पुनः आला होता.

कनौज. कनोजशहर हें कोणचा कारणानें एवढें श्रीमान् व सुशोभित जहालें होतें हें समजत नाहीं. एथील राजांचा देश जवळचा राजांचाहून मोठा नव्हता; तशाच त्या राजांचा लढाया व तह यांचा हकीकतींवरूनहि कनोजचा राजांचें विशेष सामर्थ्य होतें, असें दिसत नाहीं. असें असून त्यांचा दरबारची शोभा आणि राजधानीचा भरभराट यांची हिंदु व मुसलमान ग्रंथकार हे एकापेक्षां एक जास्त स्तुति करितात. महमूदाचा फौजेनें जेव्हां ही भव्य नगरी पाहिली, तेव्हां जें तीस काय वाटलें त्याविषयीं फिरिस्ता या ग्रंथकारानें विशेषेंकरून वर्णन केलें आहे.

कनोजेहून मथुरा ह्मणून हिंदु धर्माचें एक मख्यात स्थान आहे, तेथें महमूद गेला, आणि वीस दिवस राहिला. तितक्यांत याणें तें शहर लुटिलें, देवालयें बाटविलीं, आणि मूर्ति फोडिल्या. याचा लश्करचा लोकांनीं शहरामध्यें जो

(८) एका हिंदु ग्रंथकारानें पुष्कळ अतिशयोक्ति लिहिली आहे. त्यांत या शहराचा तटाचा परिघ १५ कोश होता. अशी एक गप्प ओंकली आहे. एक मुसलमान ग्रंथकार सांगतो, कीं या शहरांत ३०,००० तांबोळ्यांचीं दुकानें होतीं. दुसरे मुसलमान ग्रंथकार चालीप्रमाणें एथील राजांवर हिंदुस्थानांचें सार्वभौमत्व आरोपितात. महमूदापूर्वीं १०० वर्षांपर इबन हाकल् हा ग्रंथकार जहाला. हा कनोज ही सर्व हिंदुस्थानाची राजधानी होती असें लिहितो.

अनिवार कल्होळ मांडिला, तेणेंकरून शहरांत आग लागली, हीहि बाकीचा अरिष्टांत भरीस भर पडली.

मथुरेंतील देवळांचीं कामें पक्कीं यामुळें महमूदाचानें त्यांचा नाश करवला नाहीं, असें कांहीं सांगतात; परंतु यांहून कमी आग्रही मुसलमान असें वर्णन करितात, कीं त्यांचें सौंदर्य पाहून तीं देवालयें याणें तशींच ठेविलीं. मथुरेंतील इमारती पाहून महमूद अतिशय आश्चर्यचकित झाला, आणि हीं कामें पाहिल्यानंतर आपणहि अशा रीतीचीं कामें करावीं, असें याच्या प्रथम मनांत आलें, असें दिसतें.[१]

या स्वारीमध्यें कांहीं विशेष दुःखकारक गोष्टी घडून आल्या. मथुरेजवळील महावन एथील राजा महमुदास शरण आला, आणि त्यास महमूदानें कृपा करून आपला म्हटला. इतक्यांत उभय पक्षांचा लष्करांमध्यें उगाच कांहीं निमित्तानें तंटा उत्पन्न जहाला, त्यामध्यें मुसलमानांनीं हिंदूंची कतल करून त्यांस नदींत ढकलून दिलें. त्यावरून आपला विश्वासघात केला असें राजास वाटून, त्याणें प्रथम आपल्या बायकोस व मुलांस मारिलें; नंतर आपणहि मरून गेला. मुंजशहरामध्यें किल्लेदार राजपूतलोक जीवाची आशा सोडून लढले. शेवटीं तटास भोकें पडलीं असें पाहून कांहीं लष्करचे लोक त्यांतून बाहेर निघून शत्रूंवर घसर-

(१) महमूद याणें गजनीचा सुभेदारास पत्र लिहिलें, त्यांतील खालीं लिहिलेला उतारा अद्यापि राखिलेला आहे. त्यांत तो लिहितो कीं:--
" एथें हजार इमारती इमानी लोकांचा ( म्ह० मुसलमानांचा ) धर्माप्रमाणें मजबूद आहेत; त्या बहुतेक संगमरवरी दगडाच्या आहेत. शिवाय असंख्य देवालयें आहेत. लाखो दिनार खर्च झाल्याशिवाय हें शहर या दशेस आलें नाहीं, आणि असें दुसरें शहर बनाविण्यास २०० वर्षांहून कमी पुरणार नाहींत.

ले, कांहीं तटावरून उड्या टाकून मरून गेले, आणि कांहीं-नीं आपल्या बायकामुलांसुद्धां घरांत कोंडून घेऊन घरांस आग लावून प्राणत्याग केला; मिळून त्यांपैकीं एकहि मनुष्य जीवंत राहिला नाहीं. महमूदानें दुसरींहि बहुत शहरें घेतलीं, आणि पुष्कळ देश उद्ध्वस्त केला. याप्रमाणें करून ओझांवारी लूट आणि ५,३०० बंदीवान्, इतकें घेऊन तो गजनीस परत जाता झाला.

दहावी व अकरावी स्वारी.

इ०स० १०२२ हि०स०४१३

इ०स० १०२३ हि०स०४१४

याप्रमाणें महमूदास देशांत जाण्याचा मार्ग कळल्यावर, पुढें ब-याच वर्षांनीं याणें हिंदुस्थानांत दोन स्वाऱ्या केल्या. त्यांतून पहिली कनोजचा राजावर दुसरे राजे कट करून आले होते, ह्मणून त्यास सहाय करण्याकरितां केली; परंतु महमूद येण्यापूर्वींच बुंदेलखंडांमधील कलिंजरचा राजानें त्यास ठार मारिलें होतें; यास्तव महमूदानें कलिंजरचा राजावर दुसरी स्वारी केली. परंतु या स्वारीपासून अथवा या पुढेंहि दुसरी महमूदानें त्यावर स्वारी केली, तिजपासून कांहीं सांगावयासारिखा परिणाम झाला नाहीं.

पंजाबप्रांत कायम घेतला.

इकडे अनंगपाळामागून दुसरा जयपाळ लाहोरचा गादीवर बसला. तो राज्यावर आला, तेव्हां महमूदाचें व त्याचें कांहीं बरें नव्हतें, परंतु पुढें चांगलें जमलें. असें असून जेव्हां वर सांगितल्याप्रमाणें महमूद दहाव्या स्वारीस कनोज एथें जाऊं लागला, तेव्हां दुसरा जयपाळ हा दुर्दैवानें याचा आड आला. तेव्हां महमूदानें लाहोर शहर व प्रांत घेऊन, गजनीस मिळविला, आणि सिंधुनदाच्या पूर्वेस पहिल्यानें आपलें कायम ल-

श्कर ठेवून हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्याचा पाया घातला. याप्रमाणें वरील दहाव्या स्वारींत एक लहानशी गोष्ट घडून आली, तिचा परिणाम महमूदाचा दुसऱ्या पराक्रमांपेक्षां विशेष झाला.

यानंतर महमूदाचें लक्ष मावरुन्नहर्प्रांताकडे लागलें हा त्या देशांत जाऊन, तेथें एक बंड झालें होतें तें मोडून गजनीस माघारा आला.

पूर्वी कनोज शहरावर जी मोठी नववी स्वारी झाली, ती करून आल्यापासून लुटीकरितां स्वाऱ्या करण्याची महमूदास इच्छा नाहींशी झाली, असें दिसतें. दहावी व अकरावी या ज्या वर सांगितलेल्या दोन स्वाऱ्या झाल्या, त्या याणें खुशीनें केल्या नाहींत, परंतु यास राजकीय कारणामुळें करणें प्राप्त झाल्या.

यानंतर मूर्तिपूजेचा दुष्टतम घातकी, आणि महम्मदी धर्माचा बहुधा सर्वांत मोठा प्रसार करणारा अशी आपल्या मागें कीर्ति रहावी, या हेतूनें पुनः एकदां कमर बांधून याणें सोरटी सोमनाथावर शेवटची स्वारी केली. जेथें जेथें मुसलमान आहेत, तेथें तेथें धर्मवृद्धिकरितां स्वारी करावी, तर सोमनाथावरील स्वारीसारिखी करावी, अशी या स्वारीची ते कीर्ति गातात.

सोमनाथावर बारावी स्वारी.

गुजराथेचा पश्चिमेस एक द्वीपकल्प आहे, त्यास सोरट ह्मणजे सौराष्ट्र अथवा काठियावाड असें एतद्देशीय लोक ह्मणतात. त्याचा दक्षिणटोंकाजवळ सोमनाथाचें मोठें पवित्र देवालय. आहे.[10] त्या वेळीं हें सर्व हिंदुस्थानांत

(१०) त्यास हिंदुलोक सोरटी सोमनाथ ह्मणतात. भा० क०

मोठें श्रीमान् व कीर्तिमान् देवालय होतें, व एथें अतिशय यात्रा येत असे.[११] सांप्रत तें महमूदानें लुटलें, यावरूनच कायती त्याची विशेष प्रख्याति आहे.

सोमनाथास[१२] जाण्यास लांबीचा पल्ला करावयाचा होता. जा देशांतून यास जावयाचें होतें, त्यांतून कांहीं देश वसलेला होता, परंतु त्याशिवाय एक १७५ कोश ओसाड रेतीचें, व कठीण मुरबट जमीनीचें मैदान होतें; त्यांत बहुधा पाणी नाहीं, आणि घोड्यास चारा मिळण्याची मुसकील असें होतें. अशा जंगलांतून सांप्रतचा दिवशीं जरी आपल्या दोस्तांचा मुलुकांत जावयाचें असलें, तरी मोठें भारी काम आहे: तशांत प्रथमच त्यांतून जाणें, आणि पुढें शेवटास गेल्यावर तेथें बहुधा शत्रूचा फौजेशीं टकर द्यावी लागेल असें संधान असून फौजेसुद्धां निभाऊन पार पडणें हें

(११) ग्रहणाचा पर्वणीस २,००,००० पासून ३,००,००० पर्यंत यात्रा जमे. देवस्थानाचा खर्च चालण्यास राजेरजवाडे लोकांनीं या देवास २००० गांव दिले होते; देवास २००० पुजारी, ५०० कलावंतिणी, व २०० वाजंत्री, इतकी नेमणूक होती; देवाचा घंटेस २०० मण सोन्याचा सांकळदंड लाविलेला होता; आणि देवास रोज ५०० कोसांवरून आणलेल्या गंगोदकानें स्नान घालीत, अशी कथा सांगतात. यांतून स्नानाची गोष्ट संभवत्वे; कारण सांप्रतहि तसे पाठ आहेत. बाकी संख्यांविषयीं एशियाखंडस्थ ग्रंथकारांचा चालीवरून नियम सांगवत नाहीं. सांकळदंडाचें वजन बहुधा तबीझी मणानें केलेलें असेल. तसें असेल, तर तिची किम्मत १०,००,००० रुपयांवर (१००,००० पौंड) होईल, आणि आरबी मण धरिला तर २०,००० रुपयांत होईल.

(१२) हें एतद्देशीय लोकांचा बारा ज्योतिलिंगांतील एक मोठें पवित्रस्थान आहे. भा० क०

विलक्षण चातुर्याचें व साहसी कृत्य होय.

महमूदानें बारबरदारीचीं २०००० उंटें जमाविलीं; आणि लश्करांत ताकीद फिरविली, कीं चंदी, वैरण, पाणी व खाण्यापिण्याचें सामान यांची जांची त्यांणीं जितकी तजवीज ठेववेल तितकी आपआपली ठेवावी. महमूदाची फौज किती होती तें सांगितलेलें नाहीं; परंतु धर्मनिष्ठा, बहादरी मिळविण्याची प्रीति, आणि लुटीची आशा, या तिहीं कारणांनीं पुष्कळ लोक येऊन खुशीनें याचा सैन्यांत मिळाले होते; त्यांतून बहुतेक वक्षूनदीपलीकडील होते असें वर्णन आहे.[11]

इ० स० १०२४ हि० स० ४१२

याप्रमाणें महमूदाची सेना इ० स० १०२४ च्या सेपटेंबर महिन्यांत गजनीहून निघून, अकटोबरांत मुलूतानास आली. पुढें कूच करण्याची तयारी करून महमूद कांहीं अपाय न होतां ओसाड जंगल ओलांडून अजमीराजवळ वसाहतीच्या देशांत आला. ही वाट जमत आहे, असें बहुधा हिंदुलोकांस ठाऊक होतें; परंतु या ठिकाणीं (ओसाड मैदानाच्या वगैरे) आपणास आश्रय बराच आहे, याकरितां एथेंच ही आपणावर कोसळेल असें त्यांस वाटलें नव्हतें. यामुळें महमूद आला, तेव्हां कांहीं तयारी नाहीं सबब अजमीरचा राजास पळणें भाग आलें. महमूदानें त्याचा सर्व देशाचा विध्वंस केला. पुढें त्याचा राजधानीस आला, तों तेथील सर्व लोक शहर ओसाड टाकून पळून गेले होते. मग तें यांणें लुटविलें. पुढें शहरचा बंदोबस्ताकरितां जो जवळ पहाडी किल्ला होता त्यावर हल्ला केला; परंतु तो हातीं येईना; ते-

इ० स० १०२४ हि० स० ४१६

(११) असे लोक ३०००० होते, असें फिरिश्ता सांगतो.

व्हां त्यास वेढा द्यावा, तर त्या कारणास्तव आपण आलों नाहीं असें मनांत आणून हा पुढें चालता झाला. पुढील रस्ता सोपा होता. एका बाजूनें **आरावली**पर्वत व दुसऱ्या बाजूनें ओसाड मैदान यांचामध्यें जो सपाट देश आहे त्यांतून बहुधा तो रस्ता गेला असावा. महमूद नंतर गुजराथेंत आला, तों **अनलवाडा**नामक राजधानी ही बहुधा प्रथमच त्यास लागली. तेथील राजा हिंदुस्थानांमध्यें त्या वेळीं मोठा प्रख्यात होता, तथापि महमूद अगदीं अकस्मात् आल्यामुळें, त्यास आपली राजधानी सोडून लगबगीनें पळून जाणें प्राप्त झालें.

याप्रमाणें तें मातबर शहर मिळालें असतां, आपला मूळचा हेतु न सोडून महमूद पुढें चालता झाला, आणि शेवटीं सोमनाथास पोंचला. नंतर पाहतो तों तें देवालय एका ल्हानशा द्वीपकल्पांत आहे; त्या द्वीपकल्पास आणि इतर देशास जोडणारी जी संयोगी भूमि तिजवर तटबंदी किल्ला आहे; आणि त्या किल्ल्याशीं प्रत्येक बुर्जाचें संरक्षण करण्यास भरपूर फौज आहे; महमूद पोंचल्यानंतर किल्यांतून एक दूत आला; आणि तुझानें काय व्हावयाचें आहे? देव तुझा सत्यानास करील, असें बोलूं लागला. त्या भेवडावणीस न मानून महमूदानें आपल्या तिरंदाजांस पुढें केलें; मग त्यांणीं लवकरच तटावरील लोक साफ केले तेव्हां सर्व लोकांची देवालयामध्यें दाटी झाली, आणि त्यांणीं देवासमोर साष्टांग नमस्कार घालून आतां आह्मास सहाय हो, ह्मणून प्रार्थना केली. राजपूतलोक हे स्वभावानें असे आहेत, कीं त्यांची उमेद चढत्येहि लवकर, व उतरत्येहि लवकर, वर सांगितल्याप्रमाणें त्यांची अवस्था झाली,

तक्यांत मुसलमानलोक तटावर चढूं लागले, आणि "अल्लाहोअकूबर" अशा आरोळ्या देऊं लागले. तें ऐकतांच राजपूतलोक माघारे फिरले आणि मोठा भडमार करून मुसलमानांचा पाय ठरूं न देतां त्यांस लोटून देते झाले. त्यांत मुसलमानलोकांचा पुष्कळ नाश झाला.

दुसऱ्या दिवशीं मुसलमानलोकांचा याहून विशेष मोड झाला. महमूदानें एकदम हल्ला करण्याचा हुकूम दिला; परंतु जसजसे मुसलमानलोक तटावरून चढून जात, तसतसे आंतील लोक त्यांस ढकलून खालीं पाडीत. याप्रमाणें प्राण जाईपर्यंत शत्रूंचा हातीं आगा जाऊं द्यावयाची नाहीं, असा हिंदुलोकांचा त्या दिवशीं निश्चय दिसला. तिसऱ्या दिवशीं देवळाचा संरक्षणार्थ जे आसपासचे रजवाडे आले होते, ते महमूदासमोर लढाईस उभे राहिले; तेव्हां देवाळयावरील हल्ल्याचें काम सोडून या नव्या शत्रूंशीं लढाईस जाणें महमूदास जरुर पडलें.

ती लढाई मोठ्या झपाट्यानें चालली, आणि मुसलमानांस जय मिळतो कीं नाहीं याविषयीं संशय दिसूं लागला; इतक्यांत अनलवाड्याचा राजा हिंदुलोकांस मोठी कुमक घेऊन आला; तें पाहून मुसलमानलोकांची हिम्मत अगदीं खचली, आणि त्यांची चलबीचल होऊं लागली; तेव्हां महमूदानें साष्टांग नमस्कार घालून ईश्वराचा स्तव करून सहाय मागितलें. नंतर उठून तो उडी मारून घोड्यावर बसला, आणि मोठ्या आवेशानें आपल्या फौजेस उत्तेजन देऊं लागला. तेव्हां ज्याचा हाताखालीं आपण लढून इतके दिवस जीव आटविला, त्या सुलतानास या वेळीं कसा ए-

कटा टाकावा, अशी त्यांस लज्जा उत्पन्न होऊन ते सर्व एक दिल करून मोठ्यानें आरोळी फोडून एवढ्या झपाट्यानें पुढें घुसले, कीं हिंदूंचानें तो वेग सहन झाला नाहीं. या हल्ल्यांत ५,००० हिंदुलोक मारले गेले. याप्रमाणें आपल्या लश्कराचा अगदीं मोड झाला असें पाहून किल्ल्यांतील लश्करानें पुढें देवालयाचें संरक्षण करण्याची आशा सोडिली, आणि सुमारें ४,००० लोक बाहेर पडून जहाजांतून बसून जलमार्गानें पळून गेले; परंतु त्यांतून पुष्कळ लोक मारले गेले.

मग महमूद देवालयांत शिरला, आणि त्या मंदिराचें वैभव पाहून चकित झाला. तें देवालय मोठें उंच होतें; त्यास चित्रविचित्र मेहेराबांचे रत्नखचित ५६ खांब होते; त्यांत बाहेरील प्रकाश पडत नव्हता, परंतु मध्यभागास एक सोन्याचा सांकळीनें टांगलेला दिवा होता, त्याचा प्रकाश पडत असे; दरवाजांतून शिरतांच समोर सोमनाथाची मूर्ति नजरेस पडे. ती पावणे नऊ हात उंच होती; त्यांतून साडेतीन हात जमीनींत पुरलेली होती.[१७] आंत शिरतांच महमूदानें एकदम ती मूर्ति फोडण्याचा हुकूम दिला. तेव्हां देवालयांतील ब्राह्मणलोकांनीं याचा पायां पडून विनंति केली, कीं जर तुह्मी आमचा देव न फोडाल, तर आह्मी पुष्कळ द्रव्य देऊं. महमूद आशंकला; इतक्यांत यास प्रिय अशी जी द्रव्य घेण्याची मसलत, ती सांगण्यास कांहीं उमरावलोक पुढें सरसावले. महमूद क्षणभर विचार करित राहिला, आणि शेवटीं ह्मणाला, कीं मूर्ति विकण्याचा कीर्तीपेक्षां मूर्ति फो-

---

१७ इंग्रेजी एक यार्ड ह्मणजे व्यावहारिक पावणे दोन हात, असें एथें धरिलें आहे. भा० क०

डण्याविषयींचा मख्यातीची आठवण राहवी हें मला विशेष आवडतें. असें ह्मणून याणें मूर्तीवर आपला सोटा मारतांच दुसऱ्यांनींहि लागलेच हात टाकिले. ती मूर्ति पोकळ होती, यामुळें त्या तडाक्यांनीं फुटून तिचीं शकलें झालीं, आणि तींत पुष्कळ हिरे व दुसरें जवाहीर होतें, तें बाहेर कोसळलें; तेणेंकरून महमूदास जें मूर्ति विकून द्रव्य मिळणार होतें, त्याहून बहुगुणित जास्ती द्रव्य मिळालें. या मूर्तीचीं दोन शकलें याणें मक्का व मदीना एथें पाठविलीं, व दोन गजनी एथें पाठविलीं; त्या शेवटल्यांतून एक राजवाड्यामध्यें, व एक जमातीचा मशीदीमध्यें, अशीं फिरिस्ता याणें आपला इतिहास लिहिला तेथपर्यंत होतीं.[१६]

या स्वारींत महमूदास अतिशय लूट मिळाली अशी कधीं पूर्वीं मिळाली नव्हती, आणि किती मण सोनें व जवाहीर यास प्राप्त झालें, हें सांगतां सांगतां एशियाखंडस्थ इतिहासकर्तेहि थकून गेले आहेत.

हें वर्तमान होत आहे, तों अनलवाडचा राजा गुंदाबनामक किल्ल्याचा आश्रय धरून राहिला होता. तो किल्ला समुद्रांत असल्याचा योगानें निर्भय मानिलेला असे; परंतु कांहीं थोडें जोखीम पतकरल्यास ओहोटीचा वेळीं

---

१५ हीं शकलें राजवाड्याचा, व मशीदीचा पायरीस लाविलेलीं होतीं, असें हिंदुस्थानाचा संक्षिप्त इतिहासांत आहे; परंतु मूळ ग्रंथास असें आढळत नाहीं. भा० क०. १६ याप्रमाणें फिरिस्ता याणें वर्णन केलें आहे, आणि ही गोष्ट त्या देवालयांतील दुसऱ्या कसल्या मूर्तीची असेल, परंतु सोमनाथाची जी खरी मूर्ति ती शुद्ध दगडाची कणग्यासारखी पिंडी होती; कोणचीहि प्रतिमा नव्हती.

किल्यांत जातां येईल, असें महमूदास वर्तमान समजलें. तेव्हां याणें पाण्यांतून आपलें लश्कर घेऊन जाऊन हल्ला करून तो किल्ला सर केला, परंतु तो राजा याचा हातीं लागला नाहीं.

याप्रमाणें विजयी होऊन महमूद अनलवाड्यास परत आला, आणि सर्व पावसाळा तेथें काढिता झाला, असें दिसतें. तेथील हवा विशेष सर्द किंवा गरम नसून माफक, आणि सभोंवारचा प्रदेश सुंदर आणि सुपीक तेणेंकरून महमूद संतोष पावला, आणि कांहीं वर्षें तरी आपली राजधानी एथें आणावी, आणि पुढें दुसरे देश घेण्यास एथून आरंभ करावा, असें याचा मनांत आलें. आपली एवढी बढती झाली पाहून महमूद गर्वानें फुगला, आणि एक आरमार तयार करावें, आणि दुसरे नानाप्रकारचे मोठे उद्योग आरंभावे, हें याचा मनांत घोळूं लागलें, असें दिसतें. सिकंदर बादशाहाची दृष्टि सर्व सागरांमधील देशांचे वगैरे शोध लाऊन कीर्ति मिळवावी याकडे होती, परंतु महमूदाची नजर सिंहलद्वीपांतील रत्नें, व पेगुप्रांतांतील सोन्याचा खाणी, हीं साध्य करण्याकडे होती. याचा वजीरानीं यास सांगितल्यावरून व स्वतःहि दूरवर विचार करून ते बेत याणें सोडून दिले, आणि अद्यापिहि अनलवाड्याचा राजा दूर राहतो आणि शरण येत नाहीं, असें पाहून आपणास खंडणी देईल असा भरवशाचा पुरुष तो पाहूं लागला. त्यावेळीं त्या राजाचा कुटुंबांतील एक पुरुष संसार सोडून बैरागी झालेला होता; तो दुसऱ्या कोणापेक्षां आपल्या आज्ञेंत व आपल्या तंत्रानें चांगला चालेल, असें पाहून त्यास

महमुदानें गादीवर बसविलें.[१७]

याशिवाय त्याच वंशांतील दुसरा एक पुरुष गादीस खोटा वारसा सांगणारा होता, त्यास महमूद याणें धरून आणून आपल्या छावणींत ठेविलें होतें. जेव्हां महमूद गुजराथेंतून जाऊं लागला, तेव्हां नवीन राजानें याची फार विनवणी केली, कीं जर या दुसऱ्या वारसास माझा हवालीं करशील, तर माझें राज्य सुरक्षित चालेल. महमुदानें त्या बंदींतील गृहस्थास पूर्वीं आपल्या समोर आणिलें होतें, असें वाटतें, आणि त्यास त्याचा शत्रूचा स्वाधीन करण्याविषयीं हा फार नाखूश होता. शेवटीं याचा वजीरानें सांगितलें, कीं अशा पाखांडी मूर्तिपूजकांवर दया करणें हें अवश्य कर्तव्य आहे असें नाहीं; तेव्हां मोठ्या प्रयासानें महमूद कबूल झाला. पूर्वीं महमूद नाकबूल असल्याचें कारण बहुधा असें दिसतें, कीं त्या बंदीवानास नव्या राजाचा स्वाधीन केलें असतां, तो त्याचा खचित प्राण घेईल, असें याचा मनांत आलें असावें; परंतु तो नवीन बैरागी राजा फार धार्मिक होता ! तो मनुष्याचा रक्तस्राव कसा करील !! त्याणें आपल्या सिंहासनाखालीं एक अंधारकोठडी तयार करविली, आणि तींत आपल्या शत्रूस उरल्या अयुष्याचे

---

१७ इराणी लोक दृबिश्लिम असें ज्या हिंदु राजास ह्मणतात, त्याचा हा नवीन राजा वंशज होता. या दृबिश्लिम राजानें पंचोपाख्यान रचिलें. हा नवा राजा, व याशिवाय पुढील गोष्टींतील जो दुसरा गादीस खोटा वारसा सांगणारा राजा, या दोहोंचेंहि फिरिस्ता हा दृबिश्लिम या नावानें वर्णन करितो; परंतु हे बहुधा च्यावरेनामक वंशांतील होते. त्या वेळचा चालुक्य वंशांतील वर्तमान राजाचा बापाचा आईचा संबंधानें च्यावरे यांचें राज्य चालुक्य राजे यांस मिळालें होतें.

दिवस काढण्यास ठेविलें.!!! पुढें कर्मधर्मसंयोगानें राज्यांत अदलाबदल होऊन, त्या दोघांची व्युत्क्रम स्थिति झाली, आणि जो तुरुंग त्या बैराग्यानें तयार करविला होता, तोच त्यास स्वतांसच तपश्चर्येस मिळाला.

परत येत असतां ओसाड देशांत महमूदाचे हाल झाले.

इतका वृत्तान्त होई तों महमूदाचा एक वर्षावर गुजराथेंत मुक्काम झाला, तेव्हां स्वदेशास परत जाण्याचें याचा मनांत येऊं लागलें. जा रस्त्यानें येतांना हा आला, त्यांत अजमीरचा राजा व अनलवाडचा पळालेला राजा हे मोठी फौज घेऊन राहिलेले होते; लढाईमुळें व हवेमुळें महमूदाची फौज कमी झाली होती; आणि आपणास पुढें जावयाचें तो मार्ग जंगलांतून आहे, यामुळें जर शत्रूंचें अगदीं निर्दळण होईल तर मात्र पहिल्या वाटेनें आपला बचाव होईल, नाहीं तर आपल्या सर्व फौजेचा नाश होईल, असें यास वाटलें. मग याणें सिंधदेशाचा पूर्वेकडील मैदानांतून नवा रस्ता काढून जाण्याचा निश्चय केला. हा निघाला तेव्हां उन्हाळा बराच भरांत आला होता, त्यामुळें पाणी व वैरण यांची कमताई पडून, याचा लश्कराचे पहिल्यापासूनच अतिशय हाल झाले. पुढें जातांना वाटेस तीन दिवसपर्यंत वाटाड्यांनीं याचा रस्ता चुकविला; तेव्हां ते विश्रांतीशिवाय त्या जंगलाचा अतिशय खराब भागांतून भटकूं लागले; पायांखालीं आगीसारखी रेती, आणि वरून दाहक सूर्याचे किरण अशा रीतीनें कूच करित असतां सर्व तहानेनें पीडित झाले, आणि त्या आपत्तीचा वेग सहन न होऊन त्यांणीं क्रूर कर्में केलीं. त्यामुळें विशेषच विपत्ति वाढली. त्यांणीं त्या वाटाड्यांस नाना प्रकारचा यातना भोगविल्या,

तेव्हां आह्मी सोमनाथाचे पुजारी आहों; आणि देवाची अप्रतिष्ठा तुह्मी केली त्याचा सूड उगविण्याकरितां जीवावर उदार होऊन आह्मी या वेषानें आलों आहों, असें ते कबूल झाले, असें ह्मणतात; असें ते बोलतांच सर्वांची निराशेनें हिम्मत खचली, पुष्कळ दुर्दशा होऊन मरून गेले, कित्येक वायु होऊन बडबडूं लागले, आणि मेले. याप्रमाणें तीन दिवसपर्यंत महमूदाचा फौजेनें ज्या विपत्ति भोगिल्या, त्या पाहिल्या असतां त्यांचीं बाकीचीं दुःखें यांपुढें कांहींच नाहींत, असें होतें. शेवटीं ते प्रारब्धवशात् एका जलाशयाजवळ जाऊन पोहोंचले, तेव्हां हें केवळ ईश्वरानेंच स्वतः कौतुक केलें, असें त्यांस वाटूं लागलें. त्यानंतर ते मुलतानास जाऊन तेथून गजनीस जाते झाले.[१८]

याप्रमाणें कष्ट करून आल्यानंतरहि विसावा नघेतां

---

१८ पूर्वीं महम्मद कासीम याणें सिंधमध्यें स्वाऱ्या केल्या, त्यांचा हकीकतींवरून, व याचे शेजारी अफगाण यांचा द्वारानें, सिंधूचा कांठानें जाण्यास निर्भय व सोपा मार्ग होता, तो यास कळलेला असावा; असें असून एवढे हाल झाले, तरी हा जातांना अथवा येतांनाहि तिकडून गेला आला नाहीं, ही गोष्ट आश्चर्याची आहे. अशी उपेक्षा करण्याची कांहीं सबब दिसत नाहीं, यावरून त्या वेळीं कांहीं स्वाभाविक कारणांची वाटेंत हरकत असावी असें दिसतें, व तीं कारणें हल्लीं नाहींशीं झालीं असावीं. एक तर कच्छचें रण जें सांप्रत उन्हाळ्यांत कोरडें असून पावसाळ्यांत चिखलट खारटण होऊन जातें, तो पूर्वीं समुद्राचा एक फांटा होता. कच्छचा उत्तरेकडील बंदरचा लोकांत ज्या दंतकथा चालत आहेत त्यावरून, व रणांत बुडालेलीं जहाजें सांपडलीं आहेत त्यावरून वरील गोष्ट निःसंशय सिद्ध होत्ये; आणि हल्लीं आमचा डोळ्यादेखत जे तेथें त्वरेनें फेरफार झाले आहेत, त्यावरून सोमनाथ घेतल्यापासून, जीं ८०० वर्षें झालीं, त्यांत यांहूनहि मोठे फेरफार झाले असतील, असें मानण्यास कारण होतें.

जुंदपर्वतामधील ज्या लोकांनीं सोमनाथाहून परत येतांना आपल्या फौजेस उपद्रव दिला होता, त्यांचें पारिपत्य करण्याकरितां वर्ष अखेर होण्याचा पूर्वींच महमूद मुलतानास परत आला. हा येतांच ते लुटारू लोक सिंधुनदाचा फांट्यांमध्यें जीं बेटें होतीं त्यांत दडून राहिले; आणि त्यांचा पाठलाग करावा, तर ते एका बेटावरून दुसऱ्या बेटावर निघून जात. त्या सिंधुनदाचा लहान शाखांना पुष्कळ वेळ पायउतार होत नाहीं, यामुळें आणि हे लोक अशी युक्ति करतील हें याचा पूर्वींच लक्षांत आल्यामुळें, महमूदानें बरोबर नावा आणिल्या होत्या; तेणेंकरून यास त्या प्रवाहांतून आपले लोक उतरण्यास सुलभ पडलें, व त्या नावांचा सहायानें याणें शत्रूंचा बाहेरील व्यापार बंद केला, व त्यांचा नावा त्यांजपासून हिरावून घेऊन शेवटीं त्या बहुतेक लोकांस मारून त्यांचा बायकामुलांस बंदीवान् केलें.[१९] ही महमूदाची शेवटची स्वारी, यापुढें हा हिंदुस्थानांत आला नाहीं.

---

(१९) हें वरील वर्णन फिरिस्ताचा इतिहासावरून आहे; परंतु सिंधुनदाचा मोठेपणाचें मान, आणि जवळील देशांचा मर्यादा वगैरे यांचें वर्णन यास लागू होण्याजोगा मी त्यांत फेरफार केला आहे. फिरिस्तावरून पाहिलें असतां त्यांचीं मोठीं आरमारें होतीं, व त्या आरमारांचें मोठें युद्ध झालें, असें वाटतें. एकेका नावेंत पंचवीस तिरंदाज व बाण मारणारे, चमत्कारिक भाले घेतलेले लोक रहात, अशा महमूदानें या स्वारीकरितां १४०० नावा तयार करविल्या. तसेंच याचा शत्रूंचें ४००० व कोणी ह्मणतात ८००० नावांचें आरमार होतें, आणि त्यांचें मोठें निकराचें युद्ध झालें, असें फिरिस्ता वर्णन करितो. आतां विचार करून पाहिलें असतां, महमूदानें ज्या नावा तयार करविल्या, त्या त्याच वर्षीं परत आल्यावर करविल्या असाव्या; आणि त्याचा पहाडी शत्रूंजवळ एवढें मोठें आरमार असेल असें संभवनीय नाहीं. सगळ्या सिंधुनदावर व

यापुढें तरी महमूदास स्वस्थपणा सांपडला असा नाहीं. कांहीं प्रांतांत तुर्की लोकांपैकीं सल्जूकी जातीचा लोकांची वसाहत झाली होती; त्यांची दिवसेंदिवस बढती होत गेली. तथापि तिकडे याणें लक्ष द्यावें तें दिलें नाहीं. पुढें ते अतिउन्मत्त व बलाढ्य होऊन, याचा सुभेदारांस मानितनासे झाले, तेव्हां यास स्वतः त्यांजवर शस्त्र धरणें प्राप्त झालें. पुढें मोठी लढाई झाली तींत याणें त्यांचा पराजय केला, आणि त्यांजकडून आपली सत्ता कबूल करविली; परंतु त्याप्रमाणें थोडींच वर्षे ते लोक वागले.

सल्जूकीलोकांचें पहिलें बंड.

तें महमूदानें मोडिलें. इ०स.१०२७ हि०स०४१८

सल्जूकी लोकांस जिकल्यानंतर महमूदानें एक दुसरा पराक्रम केला तेणेंकरून त्याचा राज्याचा कळस झाला. पूर्वीं [20]बूया ऊर्फ दीलिमी वंशाची उत्पत्ति सांगितली आहे, पुढें त्या वंशाचे तीन वंश झाले, आणि पुष्कळ उलटापालट होऊन त्यांतून एका घराण्याकडे इराकनामक इराणी प्रांताचें आधिपत्य आलें. हा प्रांत मावरुल्नहर्प्रांतास लागून हमदानाचा पलीकडे कुर्दिस्तानाचा पर्वतांपर्यंत पश्चिमेस गेला आहे. महमूद गादीवर बसला त्या सुमारास या कुटुंबांतील मुख्य पुरुष मरण पावला,

महमूदानें इराण घेतला.

---

[१]याचा शास्त्रांवर वाहणाऱ्या अशा १००० नावा आतां तरी मिळतील किंवा नाहीं याचा मला संशयच आहे, ( हा इतिहास लिहिल्यापासून अलीकडे इंग्रेज सरकारचा अमलांत सिंधुनदावरील व्यापार वाढला आहे, त्यामुळें सांप्रत पुष्कळ नावा मिळूं शकतील; परंतु महमूदाचा वेळीं मिळा ल्याचा बराच अंदेशा आहे. ) भा ० क ०

[20] पृष्ठ ७४ पहा.

त्याचा कारभार त्याचा मागें त्याची विधवा चालवूं लागली. अशी संधि पाहून आपलें काम साधून घ्यावें, असा महमूदास प्रथम लोभ उत्पन्न झाला; परंतु त्या बाईनें महमूदास पत्र लिहिलें, कीं माझा शूर भ्रतार जीवंत होता, तेव्हां मी तुला भ्याल्यें असत्यें; परंतु आतां अनाथ बायकोवर हात टाकण्याविषयीं तुझें उदार मन पुढें होणार नाहीं, आणि जा कलहापासून तुझा कीर्तीची वृद्धि होणार नाहीं, अशा कलहांत गुंतून तूं आपलें नाव जोखमांत घालणार नाहींस, कारण तूं ज्ञाता आहेस; याकरितां मला आतां कांहीं धास्ती नाहीं, ह्मणून मी स्वस्थ आहें. हें पत्र येतांच महमूद हतवीर्य झाला.

याप्रमाणें महमूदानें त्या बाईची कीव जाणिली असली, तर कोण जाणे; परंतु तिचा मागें तिचा मुलाशीं तशा उदार बुद्धीनें हा वागला नाहीं. तो मुलगा गादीवर आल्यापासून राज्यामध्यें एकच गोंधळ झाला, त्यामुळें शेवटीं बंडें झाल्यावरून त्याणें महमूदास मदतीस बोलाविलें, असें कांहीं ग्रंथकार सांगतात; आणि बंडें झाल्यावरून कोणी न बोलावितां आपणच त्या राज्यांत घालमेल करून त्या राज्याचा धांदलीपासून आपलें हित करून घेण्याची याला संधि सांपडली, असें दुसरे वर्णन करितात. सारांश महमूदानें इराकप्रांतावर स्वारी केली, आणि तेथील राजपुत्र रै एथें आपल्या छावणींत भरवशानें आला असतां विश्वासघात करून मोठ्या कृपण बुद्धीनें त्यास धरून कैद केला; आणि नंतर त्याचा सर्व मुलुक घेतला. त्यांत इस्पहान व कज्वीन या शहरांतील लोकांनीं यास कांहीं अडथळा केला, त्यामुळें प्रत्येक शहरांतील हजारों लोकांची कतल करून

त्यांचें याणें शासन केलें.

या वरील कृत्यांनीं महमूदाचा नावास मोठा डाग लाविला. यानंतर महमूदाचा हातून दुसरें कांहीं झालें नाहीं. पुढें हा आपली राजधानी गजनी एथें परत आल्यावर लवकरच आजारी पडला, तो इ० स० १०३० चा एप्रिल् महिन्याचा २९ वे तारिखेस तेथेंच मरण पावला.

महमूद मरण पावला इ० स० १०३० हि० स० ४२१

मरावयाचा अगोदर याणें आपली अति मोलवान् संपत्ति आपल्या समोर आणून दाखविण्याचा हुकूम केला; आणि ती आणून पुष्कळ वेळ पाहिल्यावर या सर्वास आपण आतां लवकरच मुकणार असें यास वाटून रडूं आलें; परंतु याप्रमाणें आपल्या जामदारखान्याची मोठ्या प्रीतीनें भेट घेतल्यावर, जे याचा अवळचे लोक होते, व जांस सोडून जाण्याचाहि लवकरच समय आला होता, त्यांस त्यांतून कवडीहि याणें दिली नाहीं, अशी कथा आहे.

याचा स्वभाव.

याप्रमाणें महमूदाचा काळ झाला. हा त्या वेळचा राजांत मोठा होऊन गेला, आणि जे प्राचीन काळापासून अति प्रख्यात मोठे राजे झाले त्यांतच याची मुसलमानलो-

२१ कोणी एक गृहस्थ होता, त्यास सुल्तान महमूद हा मेल्यावर स्वप्नांत दिसला. तेव्हां याचा शरीरापैकीं हाडांचा सांगाडा मात्र राहिला होता; परंतु (एशियाखंडस्थ लोकांमध्यें लोभदर्शक इंद्रिय जे नेत्र) ते याचे अजूनहि सबंध राहिले होते, आणि हा त्यांणीं निरखून पाहत असे, यावरून जसा याचा लोभ अजिंक्य व अमर होता, तसें त्या नेत्रांचें स्वरूप सुचविलें आहे. ही गोष्ट शेख सादीनामक फारसी कवीनें गुलिस्तान या ग्रंथांत सांगितली आहे, ती बहुधा वरील इतिहासाचा आधारावरून त्या कवीनें रचिली असावी.

क गणना करितात. याचा कांहीं गुणांची व्हावी त्याहून जास्त स्तुति जाहली आहे; तथापि एकंदराखालीं याचा कीर्तीप्रमाणें याची योग्यता होती, असें दिसतें. व्यवहार-चातुर्य, चांचल्य, आणि साहस, हे महमूदांत उत्कृष्ट गुण होते. हा आपल्या मोठ्या राज्यांतून बाहेर जाई, तेव्हां राज्याचा चांगल्या रीतीनें बंदोबस्त राखित असे. यावरून राज्यकारभारांत हा हुशार होता, असें सिद्ध होतें. याणें मोठा मुलुक मिळविला, यावरून याचें सामर्थ्य विशेष होतें असें ह्मणवत नाहीं; कारण त्या वेळीं सभोंवारचे प्रदेश अशा अवस्थेंत होते, कीं जरी हा आपल्या लोभाची दोरी याहून सैल सोडिता, तरी यास जागा होती. याणें जें राज्य संपादन केलें, तें लवकरच लयास गेलें; यावरून यामध्यें दीर्घ दृष्टिहि विशेष होती असें ह्मणवत नाहीं. पाहूं गेलें असतां दुसऱ्या सर्व गोष्टी सोडून हिंदुस्थानांतील स्वाऱ्यांकडे याणें विशेष लक्ष दिलें होतें; परंतु त्या कामांत कांहीं बेत किंवा साधनें यांची यथास्थित योजनाहि याजकडून झाल्याचें दिसत नसून, याचीं सर्व कृत्यें उडवत उडवत आणि परिणामशून्य अशीं झालीं; त्यावरून यामध्यें व्यापक बुद्धि नव्हती, असा सिद्धांत होतो; अथवा अशी बुद्धि असल्यास, तिची गति याचा कृपण वृत्तींनीं कुंठित झाली होती असें दिसतें. याणें राज्याचा आंतील रचनेंत कांहीं फेरफार केलेला दिसत नाहीं. कांहीं कायदे, अथवा रीति, अथवा कारखाने सुरु केले, असेंहि कोठें वर्णन नाहीं.

हा मोठा शूर व तलवारबहादर असून, विद्या व कलाकौशल्यें यास उत्तेजन देण्याविषयीं मोठा उत्सुक असे. तसें त्या वेळीं औत्सुक्य असणें विरळा, आणि अद्यापिहि

महमूदावर या गुणाविषयीं चढ कोणी केला नाहीं, आणि महमूदाची कीर्ति याच कारणामुळें वास्तविक विशेष झाली आहे. तशांत महमूद हा स्वाभाविक चिकू होता, यामुळें हा विद्येस जो आश्रय देई, त्यांत याचा औदार्याचें महत्व विशेष समजलें पाहिजे. महमूदानें गजनी एथें एक मोठी शाळा स्थापिली, तींत नाना प्रकारच्या भाषेंतील चमत्कारिक पुस्तकांचा संग्रह केला, आणि एक सृष्टपदार्थसंग्रहालय केलें. या शाळेकडेस मोठी नेमणूक करून दिली, आणि शिवाय गुरूंस व विद्यार्थ्यांस वेतनें मिळण्याजोगें उत्पन्न व्हावें असें द्रव्य निराळें काढून ठेविलें; व चाकरी केल्यानंतर विद्वान् लोकांस निर्वेश ऊर्फ पेनूशनें देण्याकरितां सुमारें १००,००० रुपयांची नेमणूक केली. याप्रमाणें विद्वान् लोकांविषयीं याचा उदार स्वभाव पाहून याचा राजधानींत पुष्कळ व्युत्पन्न लोक जमा झाले; असे एशियाखंडांत दुसऱ्या कोणत्याहि राजाचा कारकीर्दींत एकत्र मिळालेले नाहींत. याचा दरबारांत जीं रत्नें होतीं, तीं बहुतकरून युरोपखंडांत माहित नाहींत. त्यांतून उन्सारी व फर्दूसी हे मोठे प्रख्यात आहेत. उन्सारी हा आपल्या केवळ कवनशक्तीवर मोठ्या पदवीस व मरातबास चढला. असा याचा पूर्वीं एशियाखंडांत कोणी वाढलेला दिसत नाहीं. फर्दूसी याणें फारसी भाषेंत पुष्कळ कवन केलें आहे. किंबहुना याचा कवितेमुळेंच इराणदेशाची कवनाविषयीं प्रसिद्धि विशेष झाली आहे; व महमूद हा कवितेचा भोक्ता होता अशी जी दिगन्त कीर्ति झाली आहे, ती याणें त्यास आश्रय दिल्यामुळें झाली आहे.

या कवीचा इतिहास मोठा चमत्कारिक आहे. त्यावरून महमूदाची विद्येविषयीं उत्कंठा स्पष्ट दिसत्ये, आणि या राजामध्यें जो एक विलक्षण अवगुण होता तोहि सहजच दिसून येतो; आणि त्यामुळें त्या गोष्टीचा रसहि वाढून तिची सत्यता आपल्या विशेष अनुभवास येत्ये.

आपल्या मागील राजांचा धर्माविषयीं हटाग्रहीपणामुळें इराणदेशाचा प्राचीन कीर्तीचा दिवा पालवणार, असें पाहून महमूदानें असें प्रसिद्ध केलें, कीं मुसलमान येण्यापूर्वीचा इराणदेशाचा राजांचीं व दुसऱ्या शूर लोकांचीं कृत्यें वर्णन करून जो एक इतिहासपर काव्यरचना करील, त्यास मी बक्षीस देईन. तेव्हां दाकिकीनामक कवि त्या वेळीं प्रख्यात होता, त्यास हें प्रथम काम सांगितलें. त्याणें सुमारें हजाराहून कांहीं जास्त बैत ( ह्मणजे दोन चरणांचे श्लोक ) केले, इतक्यांत एका चाकरानें त्यास दग्यानें मारून टाकिलें. नंतर महमूदाचा औदार्याची कीर्ति ऐकून, फर्दूसी हा याचा दरबारांत आला; आणि त्याणें तो मोठा ग्रंथ समाप्त केला. त्यास शाहनामा असें ह्मणतात, या ग्रंथांत इतके अपरिचित शब्द घातलेले आहेत, कीं तो पाहण्यास कोशाचें सहाय लागतें; असें असूनहि तद्देशीय लोक सर्व ग्रंथांत याचीं अद्यापि तारीफ करितात, आणि यांतील कित्तीएक लेखांतील मार्दव, व कित्येकांतील श्लेषार्थ व रसभरित कल्पना, आणि आरंभापासून शेवटपर्यंत कालिदासाचा ग्रंथांसारिखीं सुबोधता व प्रागल्भ्य, अशीं या ग्रंथांत पाहून दुसरे वाचणारेहि यास वाखाणितात[२२]. अशी

२२ मूळ ग्रंथांत युरोपियन वाचणारे कल्पून होमर या यूनानी कवीचा दृष्टांत दिलेला आहे. भा० क०

त्या वेळीं चाल होती, किंवा काय, तें समजत नाहीं; परंतु या काव्यामध्यें जुने फारसी शब्द घातलेले आहेत; आणि आरबी शब्द जाणून बुजून गाळून टाकिले आहेत. असें ह्मणतात, कीं ६०,००० बैतांमध्यें एकहि शुद्ध आरबी शब्द सांपडावयाचा नाहीं; परंतु हें ह्मणणें केवळ बरावर आहे असें ह्मणवत नाहीं. तो जसजसें हें काव्य रचित जाई, तसतसें महमूदास वाचून दाखवी; तें ऐकून महमूद खूश होऊन वारंवार त्यास बक्षिसें देत असे. पुढें तीस वर्षांनीं तो ग्रंथ समाप्त झाला, असें फर्दूसी वर्णन करितो. त्या वेळीं महमूद जें इनाम त्यास देऊं लागला, तें आपल्या कृत्याचा योग्यतेप्रमाणें अगदीं थोडें आहे असें त्यास वाटून, तें त्याणें टाकून दिलें; आणि रागानें तूसनामक आपल्या जन्मनगरीस जाऊन, तेथें महमूदावर एक तीक्ष्ण निंदापर काव्य केलें, आणि कदाचित् महमूद आपला सूड घेण्यास इच्छील, तर याचा राज्यांतून पळून जाण्याची तयारी केली. परंतु महमूद थोर बुद्धीनें तें निंदापर काव्य विसरला, आणि त्याचें पूर्वींचें महाकाव्य स्मरून फर्दूसीचा ध्यानींमनींहि नसेल एवढी देहेनगी पाठविता झाला. परंतु तें द्रव्य फर्दूसीचा हातास लागलें नाहीं; कारण ती संपत्ति त्याचा घरांत एका दरवाजानें शिरली, तों त्याचें प्रेत दुसऱ्या दरवाजानें बाहेर घेऊन जात होते. ही अकाळीं आलेली भेट त्याची कन्या प्रथम घेईना; परंतु महमूदानें तिची पुष्कळ समजाविशी केल्यानंतर तिणें ती स्वीकारिली, आणि आपल्या बापाचा जा स्थळीं जन्म झाला, व जावर त्याची सार्वकाळ विशेष प्रीति असे, अशा त्या तूसनामक शहरास पाण्याचा पुरवठा यावा, ह्मणून एक मोठें धरण बांधण्याकडे

तिणें त्या द्रव्याचा व्यय केला. असें झालें, तथापि तें निंदापर काव्य शिलक राहिलें तें राहिलेंच.[२३] त्यावरून महमूद हा रांडेचा पोटचा होता, असें आपणास समजतें; तसेंच याचा अतिशय लोभाची जी अद्यापि आठवण राहिली आहे, तीहि याच कवनामुळें, नाहीं तर तिचा कधींच विसर पडला असता.

महमूदास शिल्पशास्त्राची मूळची गोडी असून ती पुढें वाढली, अथवा मथुरा व कनोज एथील इमारती पाहून यास अभिरुचि उत्पन्न झाली, तें कसें असेल तें असो; परंतु कनोजचा स्वारीहून आल्यानंतर शिल्पकामाकडे याचें पूर्ण मन लागलें. याणें गजनी एथें 'उरूसु लस्समा' (ह्मणजे देवांगना[२४]) नामक मशीद बांधिली, ती त्या वेळीं पूर्वेकडील लोकांस एक अद्भुत वाटत असे. या मशिदीचें काम संगमरमरी व काळवत्री दगडाचें होतें; आणि तींत मोठ्या मोलवान् सत्रंजा मारिलेल्या होत्या, झुमरें टांगलेलीं होतीं, आणि तशीच दुसऱ्या सोनेरी व रुपेरी नकशीनें शो-

---

२३ याविषयीं अशी गोष्ट सांगतात, कीं महमूदानें प्रत्येक श्लोकास एक दिर्हम (एकाजातीचें इराणी नाणें) देण्याचें कबूल केलें होतें; ते सोन्याचे दिर्हम द्यावयाचे असतां, एवढी मोठी रकम जाईल असें पाहून लोभाविष्ट स्वभावामुळें सोन्याबदल रुप्याचे दिर्हम देऊं लागला. परंतु ही गोष्ट जुळत नाहीं; कारण कीं फर्दुसीचे बैत झाले, तसे होतील तितक्या बैतांस असें अपरिमित द्रव्य द्यावयाचें महमूदानें कबूल केलें असेल, असें याचा प्रपंचसुज्ञतेवरून वाटत नाहीं; आणि जितके जितके जास्त बैत होतील, तितकें तितकें जास्त इनाम हा देऊं करील, असेंहि वाटत नाहीं; कारण हा रसिक होता.

२४ हीं दोनीहि नावें इंग्रेजीवरून साधून आरबींत व संस्कृतांत लिहिलीं आहेत. भा० क०

भा आणिलेली होती. दुसरें असें दिसतें, कीं हिंदुस्थानांतील कारागीर लोक कुशल अशी त्यांची पूर्वींपासून कीर्ति आहे, त्यावरून तिकडील लोकांनीं येऊन चमत्कारिक व सुंदर घाटाचें काम केल्यामुळें ही विशेष तारीफ करण्याजोगी इमारत झाली असावी, नाहीं तर केवळ इतकी त्या मौल्यवान् सामानाचीच स्तुति झाली नसती. हा वरील वृत्तान्त फिरिस्ता याचा ग्रंथावरून उतरून घेतला आहे. तो ग्रंथकार असें वर्णन करितो, कीं जेव्हां गजनीचा उमराव लोकांनीं महमूदाचा शिल्पकामाकडे झोंक जातांना पाहिला, तेव्हां त्यांणींहि एकापेक्षां एक मोठे असे टोलेजंग खागी वाडे उठविले, आणि त्याचप्रमाणें मोठमोठ्या लोकोयोगी इमारती बांधून त्यांणीं तें शहर सुशोभित केलें. यामाणें थोडक्याच वेळांत गजनी एथें मशीदी, कारंजीं, ताव, प्यावयाचा पाण्याचे नळ,आणि हौद, यांचा त्या राधानींत थाट जमला; अशी शोभा पूर्वेकडील कोणत्याहि हरांत नव्हती.

खलीफांचा दरबारांत जसें गांभीर्य व डामडौल अ- त्याप्रमाणेंच महमूदाचा दरबाराची बडेजाव असे, असें ग्रंथकार सांगतात. याशिवाय याणें जा मोठ्या स्वा- केल्या व आपल्या फौजांचीहि जी तयारी ठेविली, वरून जरी हा खादाडाप्रमाणें द्रव्याची ओरप लावित , तथापि तिचा व्यय करण्यामध्यें याची योजना व औ- हीं अद्वितीय असत, असें जें इतिहासकारानें याचें व- केलें आहे, तें आपणास कबूल करणें भाग आहे.

महमूद हा अतिशय लोभी होता, असा एशियाखं- लोक यास दोष देतात; आणि हा धर्माविषयीं फार

हट्टाग्रही होता, हा युरोपीयन लोक याचा दुर्गुण काढितात. या दोहों तोहमतींतून तो कृपण होता ही पहिली तोहमत झालेल्या हकीकतीवरून सिद्ध होत्ये; परंतु दुसरी नासमंजसपणानें त्याजवर घातलेली आहे असें दिसतें. महमूद हा पाखंडी लोकांबरावर लढाया करित असे; कारण एक तर यास त्यांपासून द्रव्यलाभ होई आणि दुसरें त्यांत मोठी कीर्ति आहे असा त्या वेळीं लोकांचा समज असे, त्यामुळें त्या लढायांचा योगानें याची अतिशय प्रख्यातिहि होई. दुसऱ्या मुसलमानांप्रमाणें आपल्या धर्माचा प्रसर करावा अशी हा उत्कंठा दाखवी खरी, आणि कदाचित् याचा मनांतूनहि तसें असेल; परंतु त्या कारणामुळें याणें आपलें कधींहि तिळमात्र ऐहिक नुकसान करून घेतलें नाहीं, आणि जेथें तोटा न होतां धर्म वाढविण्याची संधि आली, तेथेंहि त्या कामांत याणें आपलें अगदीं अंग दाखविलें नाहीं. जर यास धर्माचा प्रसर करावयाचा होता, तर एक प्रांत घेऊन तेथें कायम ठाणें देऊन जर हा राहता, तर याचा सगळ्या स्वाऱ्यांहून विशेष कार्य झालें असतें. तसें न करितां याणें जे लुटारू हल्ले केले, त्यांमुळें मुसलमानी धर्माचें वाईट स्वरूप नजरेस पडून हिंदुलोकांचीं चित्तें फारच त्या धर्माचा विरुद्ध झालीं.

जो मुलुक याचा ताब्यांत होता त्यामध्येंहि याणें कांहीं धर्माविषयीं उत्सुकता दाखविली नाहीं. महम्मद कासिमासारिखा हा धर्माविषयीं लोकांवर जुलूम करित नसे. हा गुजराथेमध्यें पुष्कळ दिवस राहिला होता; तसाच लाहोर प्रांतहि याणें हस्तगत करून घेतला होता; त्या देशांत एकहि हिंदूचा याणें मुसलमान केला असें कोठें ऐकण्यांत

आलेलें नाहीं. कनोजचा राजा हा मात्र काय तो याचा दोस्त होता, आणि तो तर शेवटपर्यंत हिंदुधर्मातच होता. लाहोरचा राजाशीं जो याचा व्यवहार झाला, त्यांत केवळ राजकारणांवर याणें लक्ष दिलें होतें; धर्माचा कांहीं संबंध ठेविला नव्हता. तसाच जेव्हां गुजराथचा गादीवर याणें एक हिंदु बैरागीबावा बसविला, तेव्हां तर मुसलमानी धर्मप्रसरापासून याचें लक्ष बरेंच लांब गेलें असावें.

लढाईमध्यें किंवा किल्ले घेण्याचा गर्दीमध्यें पुष्कळ हिंदुलोक मेले गेले; परंतु शिवाय याणें कधीं एकाहि हिंदूस मारिलें, असें कोठेंहि झाल्याचें लिहिलेलें आढळत नाहीं. याणें मुसलमानलोकांची मात्र एक दोन ठिकाणीं इराणांत कतल केली, (हें पूर्वीं सांगितलें आहे [२६]); परंतु हा कांहीं महमूदाचा दोष ह्मणावयाचा नव्हे. कारण त्या वेळीं लोकांचा समजुतीच तशा होत्या. जेंगिझ खान हा मुसलमान नसून त्याणें जे पुढें असंख्य लोकांचे प्राण घेतले त्याशीं तुलना केली असतां महमूदानें कांहींच केलें नाहीं, असें ह्मणावयास कांहीं चिंता नाहीं. असें असतां, जेंगिझ खान हा तत्वविचारी, धर्माविषयीं निराग्रही, असा होता; याविषयीं दुसऱ्या राजांनीं त्याचा कित्ता घ्यावा, अशी आमचा एका उदारबुद्धीचा इतिहासकारानें त्याची स्तुति केली आहे.

प्रैस साहेबानें आपल्या इतिहासांत एका मुसलमान ग्रंथकाराचा ग्रंथांतून एक वेंचा घेतला आहे, त्यांत तो सहजवृत्त्या असें लिहितो, कीं त्या वेळीं हिंदुस्थानांतून धरून आणिलेले बंदीवान् इतके पुष्कळ जाहले होते, कीं दर हिंदु

२५ पृष्ठ ११३ पहा. भा० क०

(२६) पृष्ठ ११८ पहा. भा० क०

मनुष्यास अडीच रुपये देऊनहि कोणी खरीद करित नव्हते. महमूदाचा धर्मसंबंधी लढायांनीं जो अतिशय त्रासदायक परिणाम झाला, तो काय तो हा वर लिहिलेला झाला.

महमूदाची धर्मावर मनःपुरःसर निष्ठा नव्हती; हा पाखंडी होता; हा सर्व प्रमाणें टाकून देऊन मेल्यानंतर परलोकवास आहे किंवा नाहीं याविषयीं संशय बाळगित असे; अशी मुसलमान इतिहासकार याची निंदा करितात. शेवटीं धर्माचा बाबदींत आपला बभ्रा फार झाला असें यास वाटून याणें एके दिवशीं असें प्रसिद्ध केलें, कीं पैगंबरानें स्वप्नांत येऊन एका लहानशा वाक्यानें माझी संशयनिवृत्ति केली या शेवटचा गोष्टीवरून ही सर्व गोष्ट झाली असावी, असा अधिक संभव दिसतो. हा आपल्या धर्माचा बाहेरील आचाराविषयीं अतिशय जपत असे. मूळचा घराण्यांतील खलीफावर याची सर्वदा अतिशय भक्ति असे, आणि त्याचा प्रतिपक्षी मिश्रदेशांतील खलीफा याणें जितकीं याजवरावर बोलणीं लाविलीं तितकीं याणें नाकबूल केलीं. धर्मपिसे व हठयोगी लोक यांस तसें आचरण न करण्याविषयीं हा सांगत असे; परंतु वास्तविक तापसी पुरुषांचा हा मोठा मान ठेवित असे.

बहुधा प्रत्येक मोठ्या लढाईंत गुढगे टेंकून ईश्वराची प्रार्थना करून आपणास जय मिळावा असें याणें मागितलें नाहीं, असें वर्णन झालेंच नाहीं[२७].

याचा लढायांपासून पुष्कळ लोक मेले गेले, व दरिद्रीहि

(२७) निशापुरचा एका गृहस्थावर पाखंडीपणाची तोहमत ठेवून महमूदाजवळ आणिलें, तेव्हां तो बोलिला" हे महाराजा, मी श्रीमान् आहें परंतु पाखंडी नाहीं; तर माझी अपकीर्ति केल्याशिवाय मा-

झालें; तथापि महमूद हा स्वभावानें दुष्ट होता, असें दिसत नाहीं. दुसऱ्या जुलमी राजांचा कुटुंबांत व दरबारांत जसे खून वगैरे घोर कर्मे झाल्याचें आपण ऐकतों, तसें याचा एथें झाल्याचें कोठें ऐकण्यांत आलें नाहीं. याणें कोणास अतिशय निर्दय शिक्षा केल्याचा लेख नाहीं. पूर्वीं अपराध करून क्षमा केलेले आणि याचा भरवशांतले अशा लोकांनींहि बंडें केलीं असतां, त्यांस बंदींतमात्र ठेविलें, दुसरें कांहीं केलें नाहीं.

महमूद उंचीनें मध्यम होता. याचा बांधा मजबूद, व याचा अवयवांची रचना असावी तशी होती. याचा अंगावर कांहीं देवींचे वण राहिलेले होते; त्यांमुळें शरीर कुरूप दिसून यास तरुणपणीं सार्वकाल मोठें वाईट वाटे, आणि तेणेंकरूनच आपल्या पराक्रमाचा तेजाचें आपल्या कुरूपास झांकण घालावें याबुद्धीनें हा अधिकाधिक श्रम करण्यास प्रवृत्त झाला, असा संभव आहे. महमूद स्वभावानें हौशी होता, आणि आपल्याजवळील लोकांशीं सरळभावानें वागत असे.

लश्करी कानूमध्यें सक्त असणें हा सरदारलोकांमध्यें एक मुख्य गुण आहे. तो महमूदामध्यें किती होता, आणि लश्करी कायदा तोडिल्यास महमूद कसें पारिपत्य करित असे, हें पुढील प्रख्यात गोष्टीवरून दिसून येतें.

---

ी द्रव्य तुह्मानें घेववत नाहीं काय!'' हें त्याचें बोलणें ऐकून महमूद खु-
ा जहाला, आणि त्या गृहस्थापासून लाच घेऊन त्यास बादशाही मोरतब-
ाद तूं खरा मुसलमान आहेस असा दाखला देता झाला. ही गोष्ट फिरि-
ता व रौझा तुस्साफा या दोन ग्रंथांत सांगितली आहे. तिजवरून महमू-
ची श्रद्धा धर्मावर कितपत होती, त्याचें एक नवें उदाहरण मिळतें.

एके दिवशीं एक गांवढेकर येऊन याचा पाईं पडला, आणि फिर्याद करूं लागला, कीं लश्करांतील एका सरदाराचें मन माझा बायकोवर जाऊन तो जबरदस्तीनें माझा घरांत घुसला; मला धकाबुकी करून आणि माझी निर्भर्त्सना करून त्याणें मला बाहेर घालवून दिलें आणि मी पुष्कळ गोंगाट केला असतांहि त्याणें येऊन पुनः तें कर्म केलें. महमूदानें त्यास सांगितलें कीं तूं या बाबदींत कांहीं बोलूं नको, आणि जेव्हां तो सरदार पुनः तुझा घरीं येईल, तेव्हां तूं मजकडे ये. त्याप्रमाणें तो गांवढेकर तिसऱ्या दिवशीं आला, तेव्हां महमूद मुकाट्यानें आपली तलवार घेऊन व एक सईल झगा अंगाभोंवता लपेटून त्याचा घरीं गेला, आणि पाहतो तों तीं उभयतां दुष्टें निद्रिस्त आहेत. नंतर याणें तेथील दिवा मालविला, आणि एका घायानें त्या जाराचा शिरच्छेद केला. मग याणें उजेड आणविला; त्या मेलेल्या माणसाचें तोंड पाहून ईश्वराची प्रार्थना करून त्याचे आभार मानिले; आणि मग पाणी मागवून हा पोटभर प्याला. हें पाहून गांवढेकरास आश्चर्य वाटलें; तेव्हां याणें त्यास सांगितलें, कीं जेव्हां तूं मजजवळ फिर्याद केलीस, तेव्हां असा मोठा धीट अपराधी हा माझा पुतण्याशिवाय कोणी नसावा असा मला अंदेशा आला होता, आणि तो माझा नजरेस पडला असतां लोभ उत्पन्न होऊन न्याय होणार नाहीं, ह्मणून मी प्रथम दिवा मालविला; परंतु आतां पाहिलें तों हा गुन्हेगार परकी आहे, त्यामुळें ईश्वराचे आभार मानिले. तुझें दुःख हरण केल्याशिवाय कांहीं खाणार पिणार नाहीं अशी मी शपथ वाहिली होती; त्यामुळें मी अगदीं तृषाक्रांत झालों होतों, ह्मणून पाणी प्यालों.

आपल्या रयतेचें कसें पालन करावें, याविषयीं याची शिस्त कशी होती तिचें एक उदाहरण दिलेलें आहे. तें असें, — इराकप्रांत घेतल्यावर थोड्याच दिवशीं त्या प्रदेशाचा पूर्वेकडील जंगलामध्यें एक लमाण मारलें गेलें, त्यांत पडलेल्या एका सावकाराची आई गजनीस गाऱ्हाणें सांगत आली. तेव्हां महमूदानें तिला सांगितलें, कीं एवढ्या दूरच्या प्रांतांत बंदोबस्त ठेवणें अशक्य आहे. तें ऐकून त्या बाईनें निर्भीडपणानें उत्तर केलें, कीं "जा देशांचा तुझानें कारभार होत नाहीं, आणि ज्यांचा प्रतिपालनाविषयीं तुला क्यामतीचा[२८] दिवशीं जबाब द्यावा लागेल, असे देश तूं घेतोस तरी कशाला?" हें बोलणें महमूदास लागलें. मग याणें त्या बाईस पुष्कळ बक्षीस देऊन खुशी केली, आणि पुढें लमाणलोकांस इजा न होई असा पक्का बंदोबस्त केला.

महमुदा एवढा श्रीमान् राजा कधींहि कोणी झाला नाहीं. पूर्वींचा एका राजाजवळ सात मापें रत्नें होतीं, असें कोणी महमूदास सांगितलें, तेव्हां हा बोलिला, ईश्वरानें दया करून मला शंभर मापें दिलीं आहेत, ह्मणून मी त्याचे आभार मानितों.

महमूदाचें दरबार व फौज यांतील लोकांविषयीं.

गजनवी वंशानंतर जे हिंदुस्थानांत राजे झाले त्यांतून कांहींचे वंश गजनीचा दरबारांतून वाढले, व कांहीं गजनी जवळील मुलुकांत पैदा झाले, यास्तव गजनी एथील व आसमंतात् भागचा प्रदेशांतील लोकांची त्या वेळची स्थिति आणि रीतिभाती यांविषयीं चांगली माहिती मिळती तर बरें होतें;

(२८) मुसलमानलोकांचा धर्मांप्रमाणें पापपुण्याचा ज्या शेवटचा दिवशीं निर्णय व्हावयाचा आहे, त्यास क्यामतीचा दिवस असें ह्मणतात. भा० क०

परंतु ती मिळत नाहीं, ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. ज्यावेळीं प्रथम आरबलोक या देशांत आले, त्या वेळीं जी स्थिति होती ती पुष्कळ बदलली होती; जुने लोक नाहींसे होऊन नवनवे येत चालले होते; अद्यापिहि लश्करामध्यें व फौजदारी कामांमध्यें पुष्कळ आरब चाकरीस होते; तथापि तेहि आरबी आईबापांपासून मात्र झालेले खरे, परंतु राहणारे आरबस्तानांतील नव्हत. तसेंच बहुतेक दरबार व फौज हीं तुर्की लोकांनीं भरलेलीं होतीं; आणि कांहीं कामगार लोक व बहुतेक रयत लोक हे इराणी होते. यास्तव आतां थोडा तुर्की व इराणी लोकांचा इतिहास सांगणें योग्य आहे.

तुर्की लोकांविषयीं.

तुर्की लोक हे गजनीमध्यें धनीपणाचा नात्यानें आलेले नव्हते. मुसलमानलोकांनीं मावरुन्नहर घेतल्यावर दक्षिणेंतील प्रांतांमध्यें ते पुष्कळ तुर्की गुलाम आणित असत. पुढें ते गुलामलोक शूर, चाकरीचा कामांत हमेशा हुकुमाप्रमाणें वागणारे, व स्वतां सामर्थ्य नाहीं ह्मणून त्यांची केवळ परतंत्र स्थिति आणि त्यांचा पाठीमागें कोणाचें लिगाड नाहीं; असें पाहून स्वेच्छाचारी राजेलोक त्यांजवर भरवसा ठेवून सर्व तऱ्हेचीं कामें त्यांजवर सोंपूं लागले. त्यांस ममलुक ( उर्फ गुलाम ) असें ह्मणत. कित्येक राजांनीं या गुलामांचा पलटणी ठेविल्या; कित्येकांनीं त्यांस भरवशाचीं कामें सांगितलीं; याप्रमाणें पूर्वीं जेवढें आरबी राज्य होतें तेवढ्या देशांत हे मोठे नामधारी झाले, आणि महमूद मेल्यानंतर एशियाखंडांचा बहुतेक भाग यांणीं पाडाव केला.

गजनवी वंशाचे राजे स्वतः तुर्की होते, तथापि त्या

वेळचा दुसऱ्या राजांचा दरबारांत जसें तुर्की लोकांचें वर्चस्व होतें, तसें यांजवळ नव्हतें. अलप्तगीन हा स्वतां गुलाम असून वाढतां वाढतां त्यास खुरासानचा सुभेदारीची पदवी प्राप्त झाली. त्याजवळ कांहीं ममूलुक् व कांहीं दुसरेहि तुर्की लोक चाकरीस असावे; परंतु बहुधा त्याची फौज व त्याची सर्व रयत हीं गजनीचा आसमंतात् भागांतील देशांमधलीं होतीं. महमूदाची आई इराणी होती, आणि महमूदाची भाषा व रीतभात हींहि इराणी लोकांप्रमाणें असत; परंतु पुढें जसजसें याचें राज्य वाढत गेलें, आणि याचा स्वाधीन मावरुल्नहर्प्रांत झाला, तसतसे याचा भोंवते तुर्की लोक जास्त मिळाले; आणि दुसऱ्या जवळचा देशांमध्यें त्यांचें वजन फार असे, त्यामुळें याचाहि राज्यांत त्या लोकांचें बरेंच चालूं लागलें.

तातारलोकांमध्यें जशीं पुष्कळ लोकांचीं स्थाईक घरेंदारें नसून ते इकडे तिकडे फिरत असतात, त्याप्रमाणें आरबलोकांमध्येंहि फिरते लोक आहेत. यावरून हे दोनहि लोक कांहींसे सारखे आहेत, असें आपल्या मनांत येईल; परंतु तें तसें नाहीं. वास्तविक पाहूं जातां त्या दोन लोकांची स्थिति उलटी आहे; ती कशी हें पुढील वर्णनावरून समजून येईल.

तातारलोक.

तातारलोकांविषयीं ख्रिस्ती शकापूर्वीं तेराव्या शतकांतले लेख आहेत; तेव्हांपासून या लोकांमध्यें मोठमोठीं राष्ट्रें वसलेलीं होतीं; आणि त्यांतील राज्यें स्वेच्छाचारी राजसत्ताक अशीं होतीं. ते राहात तेथील जमीन अगदीं नापीक होती असें नाहीं, परंतु ती

ओसाड असे. तिजवर मेंढे चारून हे आपला उदरनिर्वाह करीत; तेव्हां रेतीचा मैदानांतून उंटें राखणाऱ्या लोकांची जशी हाल व अपेष्टा होत्ये तशी यांची होत असे. त्यांणीं मोठीं शहरें वसविलीं नव्हतीं, आणि त्यांचा राजांचे मुलुक फार पसरलेले असत, यामुळें बाहेरील शत्रूंचा देश जवळ असल्यापासून जी काळजी उत्पन्न होत्ये, ती यांस नसे. यामुळें यांची बुद्धि प्रखर होण्यास, अथवा यांना स्वतंत्रतेची इच्छा उत्पन्न होण्यास कांहीं कारणें नव्हतीं. हे लोक आरबांसारिखे शूर व रांकट होते; परंतु आरबलोकांमध्यें कांहीं पिसें भरलें ह्मणजे जसे ते लोक लढायास उठतात, तसे हे तुर्की लोक उठत नसत; राजानें हुकूम केला, ह्मणजे हे लढाई करीत. आरबलोक धर्माभिमानानें अगर दुसऱ्याचा सूड उगविण्याकरितां क्रूर कर्में करीत; तुर्की लोक या बुद्धीनें करित नसत; परंतु दुःख ह्मणजे काय हें यांना जसें कांहीं समजतच नसे, यामुळें यांचा हातून घोर कर्में होत. आपसांमध्यें व्यवहारांत हे लोक मनमिळाऊ व चांगल्या स्वभावाचे असत, आणि यांमध्यें विशेष क्रूरपणा इत्यादि दुष्ट गुण नसत. आरबलोक जो जो देश घेत, तेथें तेथें ते येऊन गेल्याचा स्पष्ट निशाण्या मागें राहात; तेथील धर्म, कायदे, तत्वशास्त्र, आणि व्युत्पत्तिविद्या, या सर्वांचें हे आल्यानें रूप पालटे. त्यांची रयत व त्यांची शिष्यमंडळी हे त्यांचे चांगले व वाईट असे दोनहि गुण घेत असत. यामुळें हल्लींहि जरी कोणी मुसलमान आपल्या दृष्टीस पडला, तरी त्यामध्यें कांहीं गर्व, उतावीळपणा, आणि द्वेषबुद्धि, हे जे आरबांचे वाईट गुण, त्यांचा कांहीं अंश तरी आपल्या नजरेस पडेलच पडेल; तसेंच कांहीं आरबी आदरातिथ्य, व औ-

दार्य, हींहि आपल्या पाहण्यांत येतील. आतां **तातार**-लोकांमध्यें धर्म नाहीं, व व्युत्पत्तीचा संग्रह नाहीं. हे लोक जेथें जेथें जाऊन राहिले, तेथें तेथें यांचा पगडा नपडतां, जा लोकांत राहिले त्यांतच हे मिसळून गेले असें सर्वत्र झालें आहे. यामुळें हल्लीं एक इराणांतील **तातार** व एक **चि**-नांतील **तातार** असे जर आणून पाहिले, तर बाहेरून दिसण्यांत आणि रीतिभातींत त्यांचा कांहींच एकमेकांशीं मेळ मिळत नाहीं.

याप्रमाणें या लोकांची बाहेरील स्थिति बदलली, तथापि या सर्व लोकांमध्यें बुद्धीचा व स्वभावाचा कांहीं विलक्षण गुण आहे, तेणेंकरून हे सर्व एक जातीचे लोक असें समजतां येतें. जर दुसऱ्या सुधारलेल्या लोकांचा रीतिभाती यांत सुरू करून यांची सुधारणा केली, तर हे युरोपीयन लोकांसारिखे शूर व व्यवहारचतुर असे बरेच निपजतात. त्याप्रमाणें पूर्वेकडील दुसऱ्या कोणत्याहि लोकांमध्यें गुण आढळत नाहींत.

**महमूदाचा राज्यांत जे तुर्की लोक होते, ते इराणी लोकांत राहून त्यांसारिखे झालेले होते.**

इराणी लोकांविषयीं.

**इराणी** लोकांमध्यें **आरब** व **तातार** या लोकांसारिखा उत्साह असून **हिंदु**लोकांसारिखा पटूपणा व कपट हीं आहेत; शिवाय यांमध्यें बुद्धि व चातुर्य हीं विलक्षण आहेत; तसेच हे लोक उल्लासी व गडबड्ये आहेत; यामुळें यांचा देशांत जरी प्रथमपासून अतिशय जुलमी राजे झाले, तरी **इराणी** लोकांनीं सर्व जगाचा इतिहासांत आपलें डोकें बाहेर काढलें आहे; आणि यांची संख्या व यांचा देशाचा मगदूर पाहूं गेलें असतां, त्या-

मानानें यांची कीर्ति फारच वाढली आहे.

जेव्हां इराणदेश आरबलोकांनीं घेतला, तेव्हां प्रथमपासून सर्व महसुली व दिवाणी काम इराणीच लोकांचा ताब्यांत राहिलें; कारण तें आरबलोकांस समजत नसे. पुढें इराणी लोक मुसलमान झाल्यामुळें त्यांस भरवशाचीं, व मोठ्या अधिकाराचीं कामें लवकरच मिळूं लागलीं. अबीसैद वंशाचा खलीफांस अबू मोसूलेम् याणें गादीवर बसविलें. तो इस्पहान एथील इराणी गृहस्थ होता. तसेच बमेंकीनामक जे मख्यात पुरुष झाले, ते बल्क एथील इराणी लोक होते; याप्रमाणें थोडक्याच दिवसांत आपली स्वतंत्रता पुनः मिळवावी, इकडे इराणी लोकांची नजर लागली होती, असें दिसतें. ताहीरनामक जा सरदाराचा बंडाचें पूर्वी वर्णन झालें आहे, तो आरब होता; तथापि त्याचा कुमकेस इराणी लोक होते. सुफरी, बूया, आणि बहुधा समानी या वंशाचे राजे इराणी होते, आणि आपला जा वेळचा इतिहास सांप्रत चालला आहे, त्या वेळीं घक्षू व युफ्रेतीस या दोहों नद्यांमधील देशांत महमूदाखेरीज सर्व राजे इराणी जातीचे होते.

इराणी लोकांचा रीतिभाती मनमिळाऊ, आणि खाण्यापिण्याचा व अशाच दुसऱ्या बाबदींत यांचा व्यवहार सुधारलेला, यामुळें दूरदूरच्या देशांतहि यांचा कित्ता दुसरे लोक घेत असत. इराणी भाषेंत आरबी भाषा पुष्कळ मिसळून ती प्रौढ झाली होती; आणि महमूदाचा कांहींसे पूर्वीपासूनच जेथें जेथें मुसलमानलोक राहात होते, तेथें तेथें बहुतेक व्युत्पत्तीचे ग्रंथ व कांहीं शास्त्रविद्येचे ग्रंथ या भाषेमध्यें लिहूं लागले होते, व तोच क्रम सांप्रतहि चालू आहे.

हे वर सांगितलेले सर्व लोक सारिख्या रीतीनें महमूदाचा हुकुमांत नव्हते. निरनिराळ्या लोकांचें वेगळ्या वेगळ्या रीतींनीं याचा राज्यांत वजन पडत असे.

या सर्व लोकांचा महमूदाचा राज्याशीं संबंध.

शहरांतील व सपाट प्रदेशांतील लोक, ह्मणजे सर्व आरब, बहुतेक इराणी लोक, आणि कायम वस्ती करून एका ठिकाणीं फार दिवस राहिलेल्या अशा तुर्की लोकांचा लहान लहान टोळ्या, इतके सर्व लोक महमूदाचा भरपूर हुकुमांत असत. पहाडी लोकांचा कांहीं मेळ नव्हता. कित्येक अगदीं याचा आज्ञेंत वागत व कित्येक बहुधा स्वतंत्रासारिखे असत. सलूजूकांसारिख्या तुर्की लोकांचे जे जमाव त्यांचा टोळ्या असत; त्या फिरत्या असत. तेव्हां एकादी टोळी आज आमूरनदीवर, आणि त्याच कारकीर्दीत कांहीं दिवसांनीं वोल्गानदीवर, अशी सांपडे. त्यांचा टोळ्यांतील मुख्यांचा मर्जीमाफक सुलतानाशीं त्यांचा व्यवहार चाले. महमूदाचा कडक अमलाखालीं हे लोक बहुधा नमून होते.

महमूदाचा हिंदुस्थानांत थोडाच मुलुक होता, व तोहि याचा ताब्यांत शेवटीं शेवटीं आला होता; त्यावरून त्यामध्यें याची सत्ता किती होती, व ती कोणत्या रीतीनें चालत असे याचा नियम नसे, असें वाटतें. बहुधा सपाट प्रदेशांत याचा हुकूम चांगला चालला असावा, आणि पहाडी मुलुकांत याचा विशेष पगडा नसावा असें अनुमान होतें.

महमूदाचा राज्यांतील निरनिराळ्या जातीचा लोकांची कसकशी स्थिति होती, हें पाहिलें ह्मणजे त्या त्या जातीचा लोकांकडे याचा वेळीं कोणता राज्यकारभार होता ही सहज अटकळ करितां येत्ये.

याचा राज्यांतील धर्म आरबी ह्मणजे मुसलमानी होता, व तसेच कायदेहि आरबी असत; परंतु देशरिवाजामुळें ते कांहीं बदलत असत. याचा राज्यांतील धर्मोपदेशक व न्यायाधीश बहुतकरून आरबीच होते.

महमूद याचा कांहीं खासगी पलटणी असत; त्यांतील स्वारांस बसावयास हा स्वतांचे घोडे देत असे. हे लोक बहुधा ममलुक असावे. यांशिवाय वक्षूनदीपलीकडील तातार घोडेस्वारांचीं निराळीं पलटणें हीं याचा लश्करांत मख्यात होतीं; यांत संशय नाहीं. पांच हजार आरबी घोडेस्वार याचा लश्करांत एके वेळीं होते, असा एक लेख आहे; आणि अफगाण व खिलजी लोकांचा मोठमोठ्या टोळ्या याचा फौजेंत असत, असें पुष्कळ ठिकाणीं वर्णन आहे. परंतु याचा बहुतेक फौजेची भरती हा आपल्या राज्यांतील सर्व देशांतून एकेक मनुष्य आणवून किंवा लहान लहान टोळ्या ठेवून करित असे; आणि त्यांवर अम्मलदार स्वतः पसंत करून नेमित असे, शिवाय प्रांतांमधून जा कुमका येत असत, त्यांजवर तेथील सुभेदारच स्वतः असत. याखेरीज कायम लश्करांत रुजू झालेल्या पहाडी लोकांशिवाय दुसरे पुष्कळ पहाडी लोकांतील दाईमचे सरदार आपआपले आश्रित लोक घेऊन येत. ते उगाच बाजारबुणग्यासारिखा गोंगाट मात्र करीत; याप्रमाणें आपणास पुष्कळ गोष्टींवरून व पुष्कळ वर्तमानें ताडून पाहिल्यावरून अनुमान करितां येतें. सर्व मुख्य हुकमतीचे हुद्दे सुलतान महमूद याणें आपल्या खासगी सरदारांस दिले होते, हें खचित आहे; व या सरदारांचीं नावें पाहिलीं असतां, ते बहुतेक तुर्की होते, असें दिसतें.

महमूद मरावयाचा पूर्वी सहा वर्षांवर याचा फौजेची हजीरी झाली; त्या वेळीं याचा नेमणुकी फौजेंत चौपन्न हजार चांगले घोडेस्वार होते, असें ह्मणतात. पाहूं गेलें असतां, एवढ्या मोठ्या राज्यास ही फौज फार होती असें नाहीं; परंतु जरूर लागे तेव्हां महमूद हंगामी फौज ठेवून आपलें लश्कर वाढवित असेल, असें वाटतें.

महमूदाचा लश्करांत हिंदुलोक होते, असा कोठें लेख नाहीं; परंतु हा मेल्यापासून दोन महिन्यांआंत जे तंटे उत्पन्न झाले, त्यांमध्यें सेवंदरायनामक सरदार पुष्कळ हिंदु घोडेस्वारांची फौज घेऊन गेला होता, यावरून धर्माची हरकत मनांत न आणितां महमूद हा आपल्या हिंदु रयतेची मदद घेत असे, हें स्पष्ट होतें.

या वेळचा सर्व तुर्की लोकांचा समाज मूर्तिपूजक होता, परंतु जे महमूदाचा लश्करांत होते, ते सर्व अथवा त्यांतून बहुतेक तरी मुसलमान असावे असा संभव आहे. या लोकांतून जे गुलाम असत, त्यांस विकत घेतल्याबराबर त्यांचे धनी मुसलमान करीत; आणि जे तुर्की लोक स्वेच्छेनें महमूदाचा राज्यांत असत, तेहि तेथील सर्व लोकांचा धर्म पाहून त्याप्रमाणें आचरण करूंलागत; असें झालें असेल, असें संभवतें. तुर्की लोकांचा मूळ ठिकाणांतीलहि मोठमोठाले जमाव मुसलमान होऊं लागले होते; परंतु तुर्की लोक हे धर्म पालटल्यावर हिंदूसारिखीं आपलीं पूर्वीचीं नावें बदलित नसत, त्यामुळें यांचा नावांवरून यांचा धर्माचा निश्चय करणें कठीण आहे.

---

२९ सलजूकनामक तुर्की सरदार हा मुसलमान झाला होता असें ह्मणतात; आणि महमूदाचा वेळीं या सरदाराचे मुलगे मैकल, इसरायल,

दिवाणी, फौजदारी, महसुली वगैरे सर्व मुलूकी कारभार सगळा इराणी लोकांचा हातांत असावा. अबुल् अब्बास व अहमद मैमेंदी ह्मणून महमूदाचे दोन मख्यात वजीर होते. ते जातीचे इराणी होते; त्यामुळें जे मोठे तुर्की सरदार होते त्यांची व यांची सार्वकाल स्पर्धा चालली असे. अबुल् अब्बास हा विशेष विद्वान् नव्हता; परंतु कामकाजांत हुशार असे. त्याणें सर्व सरकारी कागद फारसींत लिहिण्याची वहिवाट सुरू केली; आणि त्या वेळीं युरोपखंडांत जे बहुधा लाटिन भाषेमध्यें लिहित असतील असे सनदा वगैरे चिरकाल राहाण्याचे कागद पूर्ववत् प्रमाणें आरबीमध्यें लिहावे, असा अहमदानें पाठ घातला.

हिंदुस्थान हा देश इराणी लोकांनीं येऊन प्रत्यक्ष घेतला नव्हता; तथापि वरील कारणांमुळें सरकारी कामकाजांत व इतर लिहिण्यापुसण्यांत फारसी भाषेचा लोक उपयोग करितात. जितकी फ्रेंच भाषा युरोपखंडांत बोलतात, त्याहून फारसी भाषा हिंदुस्थानांत विशेष बोलतात. सांप्रत जी हिंदुस्थानी भाषा बोलतात, तिचा पाया हिंदी आहे परंतु तींतील बहुतेक शब्दांचा भरणा फारसी आहे.

---

मूसा आणि कित्येक ग्रंथकार सांगतात यूनास असे होते. त्यांचीं नांवें ख्रिस्ती धर्म पुस्तकांतील आहेत, यावरून सल्जूकाविषयींची वरील गोष्ट सप्रमाण दिसत्ये. पुढें सल्जूक याचा प्रख्यात नातू झाला तो एकनिष्ठ मुसलमान होता, तरी त्याणें तोग्रल हें आपलें तातारी नाव राखिलें होतें. त्याचा मागून आल्प आर्सलाननामक तसाच विख्यात झाला त्याचेंहि नाव तुर्कीच होतें.

# प्रकरण चौथें.



## महमूदानंतरचे गजनवी राजे, व घोरी वंशाचे राजे यांचीं वर्तमानें.

### गजनवी वंशाचें वर्तमान.

सुल्तान महमूद यास दोन पुत्र होते. त्यांचीं नावें महम्मद, व मसाऊद. त्यांमध्यें मसाऊद हा दांडगा होता, आणि महम्मद हा नम्र असून बापाचें सांगितलेलें ऐकत असे; यामुळें यावर महमूदाचें मन बसून, आपल्या मागें याणें गादी-वर बसावें असें महमूदानें ठरविलें. त्याप्रमाणें जेव्हां महमूद वारला, तेव्हां महम्मद गादीवर बसला. याचा भाऊ मसाऊद हा हुकुमत चालविण्याजोगा प्रौढ स्वभावाचा, शत्रूवर एकदम चालून जाणारा असा धीट, शरीरानें बळकट, व त्याचा शिपायगिरीचा बाणा, यामुळें तो लोकांस फार आवडत असे; आणि पुढें राज्य चालविण्याचा समयहि कठीण येत चालला होता, त्यामुळें अशा प्रसंगीं राज्य करण्यास हा आपल्या भावाहून विशेष योग्य होता. यास्तव महम्मद गादीवर बसल्याबरोबर पुष्कळ फौज यास सोडून गेली. पुढें मसाऊद आपल्या इस्पहानचा सुभ्याव-

सुल्तान महम्मद इ० स० १०३० हि० स० ४२१

सुलूतान मसाऊद इ० स० १०३० हि० स० ४२१

रून आला, तेव्हां सर्व लश्कर महम्मदाचा हुकूम तोडण्यास तयारच होतें; तें लश्कर त्यास मिळतांच मसाऊदानें यास पकडून याचे डोळे काढून बंदीखान्यांत घातलें, आणि आपला बाप मेल्यापासून पांच महिन्यांत आपण सिंव्हासनारूढ झाला.

सलूजूकलोकांचा उदय.

मसाऊद हा मोठा हिम्मती होता, तथापि सलूजूक या नावाचा तातारलोकांचें इतकें प्राबल्य वाढलें होतें, कीं याचा राज्यास कांहीं तरी त्यांपासून अपाय होईल अशी त्या वेळीं संधि आली होती; तेव्हां मसाऊदास कमर बांधावयाचाच प्रसंग उभा राहिला. कालेंकरून त्या सलूजूकलोकांनीं याचा राज्याची दाणादाण केली.

सलूजूकलोक यांचा मूळ पुरुष कोण, हें बराबर समजत नाहीं. ग्रंथकार हे त्यांचा मूळचा इतिहास निरनिराळ्या रीतींनीं सांगतात; परंतु जा मूळपुरुषावरून यांचें नाव पडलें आहे,तो सलूजूकनामक सरदार हा एका मोठ्या तातार राजाचा चाकरीस होता, तेथें त्याचा अधिकार मोठा होता. पुढें त्या राजाची याजवर नाखुशी होऊन सलूजूक हा आपल्या आश्रितांसहित तो देश सोडून यक्षूनदीचा डाव्ये बाजूचा किनाऱ्यावर जौंद एथें येऊन राहिला. पुढें याचे मुलगे सुलूतान महमूद याचा हुकुमानें वागत असत. कांहीं काळानें महमूदाचा सूचनेवरून, किंवा हुकुमावरून या लोकांनीं तें ठिकाण सोडून वक्षूनदीचा दक्षिणेस जाऊन खुरासानांत वसाहत केली. असें एका ठिकाणीं वर्णन आहे, परंतु बहुधा हे लोक मावरुलूनहरूमांतांत राहिले होते, व

कांहीं सुलूतान महमूद याच्या हुकूम मानित असत. परंतु लढाया व दुसरे देश लुटण्याकरितां जा स्वाऱ्या करणें; त्या हे स्वतःच करित असत. ही गोष्ट विशेष संभवत्ये. पुढें सुलूतान महमूदाचा कारकीर्दीचा अखेरीस ते त्याचा राज्यावरच हल्ले करूं लागले. तेव्हां त्याणें पूर्वी सांगितल्याप्रमाणें स्वारी करून त्यांस पराजित केलें. यानंतर मसाऊदाचा कारकीर्दीपर्यंत लश्कर घेऊन असे ते लोक खुरासानांत आले नाहींत.

तुर्की लोकांपैकीं बगदादेस मम्लुक जातीची फौज चाकरीस होती, तिणेंच तें राज्य पुढें बळकाविलें; तशीच अलप्तगीन याणें समानी राजांचा चाकरीस असतां गजनी घेतली; याप्रमाणें जा जा सरकारांचा चाकरींत हे लोक होते, त्यांचीं त्यांचीं राज्यें यांणां घेतगेल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. परंतु अर्वाचीन काळीं वक्षू-नदीचा दक्षिणेस जा तातारलोकांचा मोठ्या जमावानें येऊन प्रथम राज्यस्थापन केलें, तें या सलूजूक नावाचा लोकांनींच केलें. पुढें जेंगीझ खान व तैमूरलंग या दोहों बादशाहांनीं याहून मोठाल्या स्वाऱ्या केल्या, तथापि सलूजूक लोकांचें राज्य हेंहि त्याप्रमाणेंच प्रसिद्ध झालें आहे. कारण सलूजूकांचा घराण्यांतील एका पुरुषाचा वंशजाकडे इस्तंबोलचें राज्य अद्यापि चालत आहे.

मसाऊद राज्य करूं लागल्यापासून सलूजूकलोक खुरासानांत स्वाऱ्या करून यास उपद्रव देऊं लागले. परंतु त्यांचा बंदोबस्त करण्यास प्रथम मसाऊद यास स्वतः जावें लागलें नाहीं, त्यामुळें यास फुरसूद मिळून याणें प्रकरानप्रांत सर केला. पुढील

त्यांचा मसाऊदाबराबर लढाया.

तीन वर्षांत एका अग्निपूजकांचा वंशाकडे माजिंदरान व गुर्गान हे प्रांत होते; तेहि याचा ताब्यांत आले. याप्रमाणें फारस हा परगणा खेरीज करून बाकी सर्व इरणदेश यास मिळाला; परंतु पुढें उत्तरोत्तर याची सत्ता कमी होत चालली.

सल्जूकलोक हे आपणास मसाऊदाचे गुलाम ह्मणवीत; परंतु याचा सरदारांचा पराजय करून याचा राज्यांत धुमाळी फार करीत. शेवटीं मसाऊदानें स्वतः त्या लोकांवर स्वारी केली. तेव्हां सल्जूकांचा तोग्रलबेगनामक प्रख्यात सरदार याजबरोबर मर्वशहराजवळ झेंदेकान उर्फ दंदुनाकें एथें याचें युद्ध झालें; त्या समयीं
इ०स०१०३९ हि०स०४३२ याचे कांहीं तुर्की लोक लढाईचा वेळीं यास सोडून गेल्यामुळें, पुनः डोकें काढावयास अगदीं जागा नाहीं असा याचा पराभव झाला, आणि यास मर्व एथें पळून जाणें आलें. तेथें जाऊन आपली बाकी राहिलेली फौज जमवून तो गजनीस परत गेला. पुढें सल्जूकी लोकांबराबर टकर देण्याजोगें लश्कर मिळविणें हें तर एकीकडेसच राहिलें; परंतु गजनीचा आसमंतात् जे बखेडे उत्पन्न होत चालले होते, तेहि मोडून टाकण्यास याजवळ फौज नाहींशी झाली; यास्तव यानें आपल्या राज्याची घडी बिघडली ती नीट करण्यास फुरसत मिळावी ह्मणून हिंदुस्थानांत येण्याचा निश्चय केला. परंतु या वेळीं याचा लोकांची कैद नाहींशी झाली होती, आणि राज्याधिकारास कोणीहि मान देत नव्हता. त्यामुळें सिंधुनद उतरून गेल्यावर याचाच फौजेनें याचा जामदारखाना लुटावयाची तजवीज केली; तेव्हां दंगा होऊन सर्व फौज फितली, आणि तिणें मसाऊदास पदच्युत करून याचा भाऊ महम्मद यास पुनः

गादीवर बसविलें. महम्मद हा आंधळा होता, त्यामुळें यास राज्य चालवितां येईना. यास्तव याणें मुख्य कारभार आपला मुलगा अहमद याचा स्वाधीन केला. त्या मुलानें पदच्युत केलेला राजा आपला चुलता मसाऊद हा मारून टाकिला; हा पहिल्यानें एक पराक्रम केला.

मसाऊदानें १० वर्षांवर राज्य केलें. त्यांत पुष्कळ बंडें झालीं, व राज्यास अपायहि पुष्कळ आले; तथापि त्यांतूनहि विद्यावृद्धीकडे लक्ष देण्यास यास वेळ सांपडत असे. याणें विद्वान् लोकांस पुष्कळ आश्रय दिला; व मोठमोठाल्या सरकारी इमारती बांधून सुल्तान महमूदाचा मागें त्याचा गादीस आपण योग्य आहों, असें करून दाखविलें.

मसाऊदाचा पराजय झाल्यापासून हिंदुस्थानामध्यें मोठे परिणाम झाले. कारण पूर्वी मूळराज्य गजनीस असून हिंदुस्थान हा एक हलकासा ताब्यांतील प्रांत असे. पुढें हा किमतीस चढला. यानंतर मुसलमानलोक हिंदुस्थानांत स्थाईक झाल्यामुळें हिंदुलोकांचें व त्यांचें संघट्टण पडूं लागलें; तेणेंकरून त्यांचा रीतिभाती व त्यांचे विचार हीं बदलूं लागलीं असावीं; नव्या मुसलमानी भाषेचा पाया पडला असावा; आणि हिंदुस्थानांतील मुसलमानलोकांचा जो सांप्रत स्वभाव आपल्या पाहण्यांत येतो, तसा या वेळापासून पुढें हळूहळू होत गेला असावा. यास्तव या वेळचा गजनवीलोकांचा इतिहास चांगला लिहिलेला असता, तर बरें होतें. परंतु त्या लोकांचा स्थितीविषयीं इतिहास लिहायास एशियाखंडांतील इति-

सुल्तान मोदूद इ० स० १०४० हि० स० ४३२ पासून, इ०स० १०४९ हि० स० ४४१ पर्यंत.

हासकर्ते यांचा ग्रंथांत कांहीं सहाय मिळत नाहीं.

मसाऊदाचा पराजय झाल्यानंतर जा गोष्टी घडून आल्या, त्यांचा हिंदुस्थानाचा इतिहासाशीं विशेष संबंध नाहीं; कारण जे या राजांचे फेरफार झाले, तसे एशियाखंडांतील एकसत्ताक राज्यांत होतच असतात. यामुळें त्या इतिहासापासून कांहीं लाभ न होतां त्रास मात्र येतो. यापुढें गजनवी राजांचा व सल्जूकलोकांचा जा लढाया झाल्या त्यांपासून गजनीचा पश्चिमेकडील प्रांतांत कांहीं घडामोड झाली. परंतु जा हिंदुलोकांबराबर लढाया झाल्या, त्यांपासून निरंतर राहण्याजोगा असा कांहींच परिणाम झाला नाहीं. याकरितां गजनवी राजांचा पुढील इतिहास लांबट सांगण्याचें कारण राहिलें नाहीं.

मसाऊद यास मारिलें, तेव्हां त्याचा मुलगा मोदूद हा बल्क एथें होता. तो मोठ्या घाईनें आपलें लश्कर घेऊन आला, आणि आपल्या दोन्ही प्रतिस्पर्ध्यांचा पराजय करून त्यांचा शिरछेद करिता झाला. पुढें त्याचा एका भावानें बंड केलें होतें, तें मोडून टाकून हा गादीवर बसला.

इ० स० १०४० हिं० स० ४३३.

त्या वेळीं सर्व गजनीचें राज्य सल्जूकी लोकांस घेण्यास कांहीं अशक्य नव्हतें; परंतु त्यांची दृष्टि अद्यापि पूर्वेकडील देशावर पडली नव्हती. त्यांणीं तोघ्रल् बेग यास आपल्या राज्याचा मुख्य करून चार लहान लहान राज्यें केलीं, त्यांत अबु अली यास हिरात, सिस्तान, व घोर हे प्रांत मिळाले, आणि गजनवी राजांशीं तंटा सांगण्याचें कामहि त्याकडेस लागलें. बाकी सल्जूकी लोकांची मुख्य फौज घेऊन, तोघ्रल खान यानें पश्चिमइराण घेतला, बगदाद सर केली,

आणि **रोमन** लोकांचा राज्यावर स्वारी केली. त्यामुळें **मोदूद** यास गजनीमध्यें आपली ठाकुरकी राखून **मावरुल्नहर्** प्रांत परत घ्यावयास सांपडला. पुढें याणें **तोघरूल् बेग** याचा नातीशीं लग्न केलें; त्यामुळें **सल्जूकी** लोकांची यास भीति नाहीं, असें दिसूं लागलें. याप्रमाणें हा पश्चिमेकडील मुलुख घेत चालला असतां, इकडे **दिल्लीचा** राजानें हा नाहींसा पाहून **पंजाब** लुटला. त्या राजानें हिंदुलोकांस त्यांचा धर्मभोळ्या स्वभावाप्रमाणें कांहीं युक्तीचा गोष्टी सांगून त्यांस हुशारी आणिली, आणि **नगरकोट** घेऊन **लाहोरास** वेढा दिला; परंतु तेथील लश्करचा **मुसलमान**लोकांनीं मोठ्या शौर्यानें लढून, जा पाखंडी लोकांस त्यांणीं पूर्वीं पुष्कळ वेळा जिंकिलें होतें, त्यांस हारीं न जातां **मोदूद** आपल्या मदतीस येत आहे अशी कंडी उठवून, आपला बचाव केला.

इ० स० १०४३ हि० स० ४३५.

त्या वेळीं **मोदूद** हा पश्चिमेकडे गुंतला होता, कारण जरी सल्जूकी लोकांबराबर याची सोयरीक झाली होती, तथापि त्यांबराबर जे नवीन तंटे व्हावयाचे ते कमी झाले नाहींत; यामुळें हा मरेपर्यंत यास हिंदुस्थानांत येण्यास फुरसूद मिळाली नाहीं.

**मोदूद** मरण पावल्यानंतर त्याचा भाऊ **अबुल् हसन** याणें त्याचा लहान मुलास मारून गादी बळकाविली; परंतु दोन वर्षांचा आंत याचा चुलता **अबुल् रसीद** याणें यास पदच्युत केलें.

सुल्तान अबूल् हसन इ०स. १०४९ हि०स० ४४१ पासून इ०स. १०५१ हि०स० ४४३ पर्यंत.

पूर्वींचा धांदलींत एक मुसलमान सरदार **पंजाब**प्रांत गुंडाळून बसला होता; त्यापासून याणें तो परत घेतला. नंतर सिस्तानप्रांतांतील

सुलुतान अबुल रसीद इ० स० १०५१ हि० स० ४४३ पासून इ० स० १०५२ हि० स० ४४४ पर्यंत.

तोग्रलनामक एका सरदारानें बंड करून येऊन याचा पराजय करून राज्य करूं लागला. या तोग्रलानें गजनवी वंशाचे जितके पुरुष हातीं सांपडले, तितके मारून टाकिले. पुढें चाळीस दिवसांनंतर हाहि मारला गेला, आणि सबक्तगीन याचा वंशांतील जे तीन शाहजादे याचा सपाट्यांतून बचावले होते, त्यांतून फरुख्जादनामक एकास गादी मिळाली.

सुलुतान फरुख्जाद इ० स० १०५२ हि०स०४४४ पासून इ०स० १०५८ हि० स०४५० पर्यंत.

फरुख्जाद याणें सलूजूकी लोकांबराबर लढाया करून जय मिळविला, आणि आपल्या वंशाचा राज्यांतील जो मुलुक गेला होता, तोहि मिळविण्याचा लाग आणिला होता. इतक्यांत तोग्रलबेग याचा मागून आल्प आर्सूलाननामक मोठा शूर सलूजूकी राजा झाला. त्यापुढें याचें कांहीं चालेना. शेवटीं हा मरण पावला.

सुलुतान इब्राहिम इ० स०१०५८ हि० ४५० पासून इ० स० १०८९ हि० स० ४८१ पर्यंत.

याचा मागून याचा भाऊ इब्राहिम हा सिंहासनारूढ झाला. हा मोठा देवभोळा बैरागी असे, याणें सलूजूकी लोक ज्या मुलुकाचा तंटा सांगत होते, त्या प्रांतावरील आपला हक्क सोडून त्यांशीं तह केला. याणें पुष्कळ वर्षें राज्य केलें. त्यांतून बहुतेक काळ कुराणाचा प्रती करण्यामध्यें व दुसऱ्या लिहिण्याचा कामामध्यें घालविला. हा मरण पावला त्या वेळीं यास चाळीस मुलगे व छत्तीस मुली होत्या.

त्यानंतर याचा मुलगा दुसरा **मसाऊद** हा गादीवर बसला. हा आपल्या बापाहून अधिक योग्य होता. याचा सरदारांनीं गंगानदीपलीकडील मुलुकावर तलवार चालविली. याणें सर्व कायदे पुनः तपासून त्यांची जुळणी करून एक ग्रंथ केला. याचा कारकीर्दींत कांहीं वर्षें **लाहोर** एथें दरबार होतें.

दुसरा सुलतान मसाऊद इ० स० १०९८ हि० स० ४९२ पासून इ० स० ११९४ हि० स० ५०८ पर्यंत.

दुसरा **मसाऊद** मेल्यानंतर त्याचा मुलगा **आर्सलान** याणें आपल्या भावांस कैदेंत टाकून तक्त बळकाविलें. हा वेळपर्यंत गजनवी राजांचा **सलूजूकी** लोकांशीं पुष्कळ सोइरगती झाल्या होत्या. त्यांत सलूजूकी लोकांचा हल्लींचा सुलतान **संजर** याची बहीण ही **आर्सलान** व याचे भाऊ, यांची आई होती. तिला आपल्या इतक्या मुलांची अपेष्टा झाली हें पाहून संताप आला, आणि तिणें आपला दुसरा मुलगा **बहिराम** जो दैवयोगानें आपल्या भावांसारिख्या कैदेंतून बचावला होता, त्यास मदत करण्याकरितां सुलतान **संजर** यास बलाविलें. **संजर** याणें **बहिराम** याचा पक्ष स्वीकारून त्यास आपल्या बाहुबळानें सिंहासनावर बसविलें.

सुलतानआर्सलान इ० स० १११४ हि० स० ५०८ पासून इ० स० १११८ हि० स० ५१२ पर्यंत.

**बहिराम** हा विद्वान् लोकांचा प्रख्यात आश्रयदाता होता. **निजामी**नामक जो विख्यात **फारसी** कवी तो याचा दरबारांत राहत असे. त्याणें पांच मोठीं काव्यें केलीं; त्यांतून एक **बहिराम** यास नजर केलें. **बहिराम** याणें पुष्कळ वर्षेंपर्यंत मोठ्या बढतीनें राज्य केलें; परंतु शेवटीं एक मोठें घोर कर्म करून आपल्या नावाला ब-

सुलतान बहिराम इ० स० १११८ हि० स० ५१२ पासून इ० स० ११५२ हि० स० ५४७ पर्यंत.

द्रा लाविला. तेणेंकरून त्याचा नाश होऊन,
क्षय झाला.

तो प्रकार असा;— पूर्वीं सुलतान मोह
श्वासघातानें घोर प्रांत हाताखालीं घातला हो
सून तो गजनीचा राजाचा आश्रयानें राहिला
वेळीं कुतबुद्दीन सूर ऊर्फ कुतबुद्दीन महम्म
त्या प्रांतांत राज्य करित होता. त्याचें सुल्तान
याचा मुलीशीं लग्न झालें होतें. असें असतां
ध्यें कांहीं वैमनस्य उत्पन्न झालें; तेव्हां बहिराम
पल्या जांवयास तजविजीनें आपल्या हातांत
प्रयोग केला; अथवा कोणी ह्मणतात, कीं उघ
ला. या दोहोंतून दुसरी गोष्ट विशेष संभवत्ये,
तबुद्दीन याचा भाऊ सैफुद्दीन सूरी ऊर्फ घो
पल्या भावाचा सूड उगविण्याकरितां लागलीच
र करून गजनीवर आला. तेव्हां बहिराम या
ळ डोंगरांत किर्मान एथें पळून जाणें प्राप्त झालें.

सैफुद्दीन याणें गजनी घेतल्यावर त्या
अम्मल तेथें बराबर बसला असें वा
आपला भाऊ अल्लाउद्दीन यावरा
बहुतेक लष्कर कोहो ह्मणून जी त्या
ची राहवयाची जागा तेथें परत पाठवि
गजनी एथील लोकांची आपणावर प्रीति बसा
पुष्कळ प्रयत्न केले; परंतु तेथील लोकांची जुन्या
भक्ति कमी होईना. पुढें कितीएक लोकांनीं पि
बहिराम यास परत येण्याविषयीं बोलाविणें पाठ
व्हां बर्फ पडून घोर प्रांतांत गजनी एथून जाण्य

घोरी लोकांनीं गजनी घेतली.

बंद झाल्यावर, आपल्या ताब्यांत राहिलेल्या मुलुकांतून फौज गोळा करून बहिराम गजनीवर आला. त्याजबराबर युद्ध करण्यास सांप्रत आपणास सामर्थ्य नाहीं, अशी सैफुद्दीनाची खातरी होऊन त्याणें गजनी सोडून जाण्याची तयारी केली; परंतु त्या शहरचा लोकांनीं कपटभावानें त्यास वचनें देऊन विनंती केली, कीं आपण लढाईस उभें रहावें. तें ऐकून तो लढाईस उभा राहिला असतां, सर्व शहरचे लोक त्यास सोडून गेले. त्यामुळें जी त्याची खासगत थोडीशी फौज होती तिचें कांहीं चालेनासें झालें, आणि तो घायाळ होऊन शत्रूचा हातीं सांपडला. त्याची बहिराम याणें सर्व प्रकारें अप्रतिष्ठा करून शहरांतून धिंड काढिली, आणि सर्व रांडापोरें त्याची हुर्यो हुर्यो करून निर्भर्त्सना करीत अशा ठिकाणीं कांहीं वेळ त्यास ठेवून पुढें हाल करून मारिलें. सैफुद्दीन याचा वजीर पैगंबराचा कुळांतील सय्यद होता, त्यासहि सुळीं दिलें. हें निर्दय कर्म मनुष्यास अनुचित होय. तशांत बहिराम याचा पूर्वींचा स्वभावाप्रमाणें पाहिलें असतां त्याशीं अगदींच विरुद्ध दिसतें.

गजनी बहिरामानें परत घेतली.

घोरचा राजास बहिरामानें क्रूरतेनें मारिलें.

ही बातमी अल्लाउद्दीन घोरी यास लागतांच, तो अतिशय क्रोधायमान् व संतप्त झाला; आणि या कामांत जे सर्व लोक होते त्यांचा मी सूड घेईन अशी त्याणें शपथ वाहिली.

मग तो उतावळीनें बरोबर थोडीशी फौज घेऊन निघाला. तेव्हां वाटेंत त्यास बहिराम याजकडून तऱ्हाचें बोलणें आलें. बहिराम याणें सांगून पाठविलें, कीं जा कु-

त्यास तूं हात घालितो आहेस, त्यांत तुझा खचित नाश होईल. त्यास अल्लाउद्दीनानें उत्तर केलें कीं "तुझा मणगटांत जोर नाहीं, व तुझा डुरडुरावण्यांतहि कांहीं जीव नाहीं. राजेलोकांनीं एकमेकांशीं लढाई करावी यांत कांहीं नवाई नाहीं. परंतु तुझासारिखें दुष्ट कर्म आजपर्यंत कोणत्याहि राजानें केलें नाहीं."

पुढें लढाई सुरू झाली, त्यांत गजनवी लोकांची संख्या फार यापुळें अल्लाउद्दीनाचें कांहीं चालेना असें एकदां दिसूं लागलें. परंतु आपल्या भावाचा सूड घेण्याविषयीं जो यास आलेला त्वेष, आणि याचा स्वदेशीय फौजेंतील लोकांचें जें शौर्य व क्रोध, यांहींकरून त्यांस इतकें स्फुरण येऊन ते लढले, कीं त्यांपुढें बहिराम याचें कांहीं चाललें नाहीं. शेवटीं बहिराम यास रणभूमीवरून बहुधा एकटें पळून जावें लागलें.

घोरी लोकांनीं गजनीचा नाश केला.

अल्लाउद्दीन याचा भावास गजनीचा राजानें व लोकांनीं जी पूर्वीं इजा दिली, व त्याची अप्रतिष्ठा करून छळ केला, त्याबद्दल जरी अल्लाउद्दीन गजनीचा अति सक्त सूड घेता, तरी योग्य होतें; परंतु एवढ्या मोठ्या शहराचा कांहीं विचार नकरितां सर्वत्र एकसारखा यानें विध्वंस केला, तेणेकरून या राजाविषयीं आपलें मन विटतें; आणि या दुष्ट कृत्याची जी अल्लाउद्दीनाचा नावास काळिमा लागली आहे, ती याचा नावाची आठवण आहे पर्यंत नाहींशी होणार नाहीं.

१) अल्लाउद्दीन यास हमेशा "जहां सोज" ह्मणजे सृष्टि जाळणारा असें ह्मणतात, आणि कित्येक ग्रंथकार जरी याची दुसऱ्या गोष्टींविषयीं स्तुति करितात, तथापि या कृत्याविषयीं त्यास अतिशय दोष देतात. यानंतर

ही भव्य नगरी त्या वेळीं सर्व एशियाखंडांचें नाक होती. तींत तीन दिवसपर्यंत आग लावून लोकांची कतल करून अल्लाउद्दीनानें फडशा केला. हें घोर कर्म सात दिवस चाललें होतें, असेंहि कित्येक ह्मणतात. हा पहिला क्रोधाचा सपाटा संपल्यावरहि पुष्कळ लोकांचे यानें प्राण घेतले, आणि पूर्वी सैफुद्दीनाचा वजीराचा वध केला होता, त्याचा प्रायश्चित्तार्थ जितके सय्यदलोक गजनीमध्यें सांपडले तितक्यांस सुळीं दिलें. महमुद, मसाऊद, व इब्राहिम हे खेरीज करून बाकी सर्व गजनवी राजांचा सुंदर बांधलेल्या कबरा फोडून टाकिल्या, आणि त्यांचा खाणाखुणाहि नाबूद केल्या. महमूद व मसाऊद हे मोठे शूर राजे होते ह्मणून त्यांचा कबरा राहूं दिल्या, आणि इब्राहिम हा मोठा देवभक्त असें समजून बहुधा त्याची ठेविली असावी, असें दिसतें. याप्रमाणें आपल्या देशाची हाल व अपेष्टा जी आपल्यामुळें झाली, ती त्या दुर्दैवी बहिरामाचा नशीबीं पाहणें आली; पुढें तो हिंदुस्थानाकडे पळून जात असतां श्रमेंकरून व वरील आपत्तींनीं क्षीण होऊन मरण पावला. यानें एकंदर पस्तीस वर्षें राज्य केलें.

बहिराम मेल्यावर त्याचा मुलगा खुशरू हा तसाच पुढें हिंदुस्थानाकडे जातां जातां लाहोरास पोंचला. तेथील लोकांनीं जयजयकार करून याचा स्वीकार केला, आणि आपल्या शहरांत सुल्तान खुशरू गजनवी हिंदुस्थानांत गेला.

जेंगीझखान व तैमूरलंग यांणीं पुष्कळ देशांत जागोजाग जाऊन कतली केल्या, त्याविषयींहि त्यांस ग्रंथकार याहून कमी ठपका ठेवितात. यावरून असें निष्पन्न होतें कीं जर पूर्वींचा वेळीं अशा दुष्ट कर्मांची लोकांस सवयी नव्हती तर त्या वेळीं लोकांचा रीति तैमूरलंग व जेंगीझखान यांचा वेळचा पेक्षां अधिक सुधारलेल्या होत्या.

सरकारची कायम गादी आली ह्मणून त्यांस आनंद झाला. हा सात वर्षें राज्य करून इ० स० ११६० त मरण पावला, तेव्हां याचा राज्याचें फुटकें खापर याचा मुलाचा डोकीवर पडलें.

मुलूतान खुशूरू मलिक.

खुशूरू मलिक् याणें इ० स० ११८६ पर्यंत सत्तावीस[१] वर्षें राज्य केलें. पुढें याचा शेवटचा राहिलेल्या प्रांताची बाकीचांप्रमाणें गति झाली, आणि तो घोरी लोकांनीं घेतला. तो प्रकार पुढें वर्णिला जाईल. खुशूरू मलिका बराबर सबक्तगीन याचा वंश समाप्त झाला.

---

# घोरी वंशाचे राजे.

## अल्लाउद्दीन घोरी.

घोरी वंशाचें मूळ.

घोरी वंशाचे राजे मूळचे कोण, याविषयीं बराच वाद आहे; परंतु ते राजे व त्यांची रयत हे सर्व मुळीं अफगाण होते असें सांप्रत बहुतांचें मत आहे, आणि तेंच बहुधा खरें असावें असें वाटतें. येझदिजर्द बादशाहा मरण पावल्यानंतर थोडक्याच वर्षांत मुसलमानलोकांनीं घोर प्रांतावर स्वारी केली, परंतु इबन हाकल् हा ग्रंथकर्ता असें वर्णन करितो, कीं घोर प्रांतापलीकडील देश हा सर्व हिंदुस्थानांतला ह्मटला तरी चिंता नाहीं; याजवरून या देशांत त्या वेळीं मूर्तिपूजक

---

[१] मूळ ग्रंथांत सत्तावीस वर्षें चांद्रमानानें असें लिहिलेलें आहे. भा० क०

लोक होते, असा अर्थ होतो. नवव्या शतकांत या देशांतील लोक थोडे थोडे मात्र मुसलमान झाले होते, आणि त्या वेळीं ते खुरासानी भाषा बोलत असत.

सुलतान महमूदाचा वेळीं घोर प्रांतांत एक राजा राज्य करित होता. त्याचें नाव महम्मद सूरी (ऊर्फ सूर) अफगाण होतें, असें फिरिस्ता हा ग्रंथकार सांगतो. त्यापासून पूर्वी सांगितल्या हकीकतीपर्यंत घोरी वंशाचा इतिहास सरळ लावितां येतो.

पुढें वर सांगितल्याप्रमाणें अल्लाउद्दीन घोरी याणें आपला क्रोध शमेपर्यंत अनर्थ केल्यावर, तो फिरूज कोहो एथें परत गेला, आणि आपल्या स्वभावाप्रमाणें ख्यालीखुशालींत निमग्न झाला.

याप्रमाणें होत असतां, नवीन संकटें येऊन यापुढें थाकलीं, आणि पुढील चार वर्षांत पुष्कळ घडामोडी झाल्या. सल्जूकी लोकांचा मुख्य सुल्तान संजर याणें घोर व गजनी या राज्यांवर स्वारी केली, आणि अल्लाउद्दीनास कैद केलें; परंतु पुढें लवकरच सोडून देऊन याचें राज्य यास परत दिलें.

सल्जूकी लोकांनीं गजनी घेतली. इ० स० ११५२ अथवा इ० स० ११५३ चा अवेलीस हि० स० ५४७.

पुढें कांहीं दिवसांनीं संजर याचा खारिजम एथील सुभेदार याणें बंड करून खारिजम एथें गादी स्थापिली. हें राज्य पुढें एशियाखंडाचा पूर्वेकडील व पश्चिमेकडील देशांत मोठें बलाढ्य झालें. पुढें त्या सुभेदारावर संजर याणें गर्दी केली, तेव्हां त्याणें चीनदेशाचा उत्तरेकडील खित्ते या नावाचा तातारलोकांस मदतीकरितां बलाविलें. या

सलूजूकी लोकांचा मोड झाला. खित्तेलोकांस स्वदेशांतून कोणी हांकून दिल्यामुळें, ते मावरुल्नहरूप्रांतांत येऊन राहिले होते. हे लोक आल्यामुळें तेथें यूझ नावाचे कांहीं तातारलोक राहत असत, त्यांस राहण्यास ठिकाण नाहींसें होऊन ते सलूजूकी लोकांवर चालून आले, आणि सुलूतान संजर याचा पराजय करून त्यास कैद करिते झाले. ते कांहीं वेळपर्यंत गजनी एथें ठाणें धरून राहिले होते. याप्रमाणें सुमारें एक वर्षाचा आंत घोरी व गजनी या दोन्ही वंशांचा मोड झाला.

इ० स० ११५३ हि० स० ५४८.

त्यापूर्वी बरेच दिवस या दोनहि वंशांतील राजांची हिंदुस्थानांतील राज्याविषयीं स्पर्धा चालली होती. पुढें हे यूझलोक पश्चिमेकडे गेले, तेव्हां त्यांणीं गजनी टाकून दिली. या घालमेली होताहेत तों अल्लाउद्दीन मरण पावला. याचा कारकीर्दींत पुष्कळ गोष्टी झाल्या, तरी याणें एकंदर चारच वर्षे राज्य केलें.

इ० स० ११५६ हि० स० ५५१.

यूझलोक हे जातीचे तुर्की होते. हे किपूचाक प्रांतांत फार दिवस राहत असत. यांपासूनच पुढें तुर्कमान लोक उत्पन्न झाले, असें डिगीनी हा ग्रंथकर्ता लिहितो. या लोकांस ऊझ, गूझ, गोझ, गोझी, आणि गाझी इतकीं नावें दिलेली आहेत; परंतु फरघाणप्रांतांत अद्यापि या लोकांचें राज्य चालत आहे, तेथें त्यांस अजूनहि यूझ असें ह्मणतात.

## २ सैफुद्दीन घोरी.

अल्लाउद्दीन याणें आपला लहान अजाणता मुलगा

यास राज्य मिळावें ह्मणून मरावयाचा पूर्वीं आपले दोन पुतण्ये ग्यासुद्दीन व शाहाबुद्दीन यांस बंदींत टाकिलें; परंतु तो मुलगा सैफुद्दीन हा गादीवर आल्यावर याणें त्या आपल्या दोघां चुलत भावांस बंदींतून मुक्त करून, परत आपआपल्या सुभ्यांवर पाठविलें. हा याणें पहिला पराक्रम केला. याप्रमाणें सैफुद्दीन याणें जो आपल्या चुलत भावांवर भरवसा ठेविला, तो योग्य होता; ह्मणून त्यापासून यास कधींहि पश्चात्ताप होण्याजोगें कारण घडून आलें नाहीं.

याचा उदार प्रकृतीप्रमाणें याचे दुसरे शारीर व मानसिक गुण होते; परंतु आपल्या कुळांतील इतर लोकांप्रमाणें हाहि मोठा दंशी असे; हा यांत मोठा दुर्गुण होता. नाहीं तर याचें राज्य सुरक्षित चाललें असतें. पूर्वीं सुलतान संजर याणें जेव्हां याचा बाप अल्लाउद्दीन यास जिंकलें, त्या वेळीं याचा बायकोचें जवाहीर लुटींत गेलें होतें. एके दिवशीं तें जवाहीर घालून आलेला असा याचा एक सरदार याचा दृष्टीस पडला. तेव्हां तें पाहून हा क्रोधानें इतका वेडा होऊन गेला, कीं लागलाच याणें त्या सरदाराचा स्वहस्तें शिरच्छेद केला. त्या सरदाराचा भाऊ अबुल् अब्बास याणें त्या वेळीं गम खाल्ला, परंतु पुढें थोडक्याच दिवसांत यूझ नावाचा तातारलोकांबराबर सैफुद्दीन याची लढाई चालली होती, ती भरांत आली असतां त्याणें सैफुद्दीन यास भाला मारिला, तो याचा शरीरांतून पार गेला. सैफुद्दीन याणें एक वर्षाहून कांहीं जास्त राज्य केलें होतें. नंतर याचा मागून याचा चुलत भावांपैकीं वडील ग्यासुद्दीन, हा सिंहासनारूढ झाला.

# ग्यासुद्दीन घोरी.

ग्यासुद्दीन गादीवर बसल्यावर याणें आपला भाऊ महम्मद शाहाबुद्दीन यास आपल्या बराबर राज्यकारभारांत मदत करावयास घेतलें; आणि शेवटपर्यंत सर्व लश्करी काम त्याजवर सोंपिलें होतें. पुढें ग्यासुद्दीन मरावयाचा पूर्वीं कांहीं वर्षें राज्यसंबंधीं इतर सर्व कारभारहि त्याजवरच पडला होता, असें दिसतें.

इ०स० ११५७
हि०स० ५५२.

यांचा कुटुंबांतील पूर्वींचा पुरुषांची जशी परस्परांवर प्रीति होती, त्याचप्रमाणें यांचीहि सर्व कुटुंबाविषयीं वृत्ति होती. ही गोष्ट हे दोघे भाऊ आमरणान्त मिळून राहिले होते, यावरून व पुढें त्यांणीं आपल्या एका चुलत्याशीं जी वर्तणूक केली त्यावरून स्पष्ट दिसून येत्ये. बल्कप्रांताचा पूर्वेपासून वरचा वक्षूनदीचा किनाऱ्यानें बाम्यान या प्रदेशाचें राज्य यांचा एक चुलता करित असे. तें राज्य यांचाच तंत्रानें चालत असे. पुढें सैफुद्दीन मरण पावला, तेव्हां या चुलत्यानें त्याची गादी बळकाविण्याचा प्रयत्न केला. त्या समयीं लढाईंत त्याचा पराजय होऊन त्या सभोंवता शत्रूंचा एवढा गराडा पडला, कीं हा आतां मरून जातो असें दिसून आलें. हें पाहतांच त्याचे पुतण्ये ग्यासुद्दीन व त्याचा भाऊ यांणीं घोड्यांवरून उड्या टाकिल्या, आणि धांऊन त्याचा घोड्याचा रिकिब्या धरून त्यास अतिशय सन्मान दिला. तेव्हां प्रथम त्यास असें वाटलें, कीं पडत्या काळांत हे माझा उपहास करित आहेत; परंतु शेवटीं यांणीं त्याचें सांत्वन करून त्यास पुनः संस्थान दिलें. तें त्याचाच

वंशजांकडे तीन पिढ्यांपर्यंत चालून शेवटीं घोरी लोकांचा बाकीचा राज्याबराबर ख्वारिजमचा राजाचा सपाट्यांत सांपडलें.

हा सर्व वृत्तान्त गजनी घेतल्यापासून पांच वर्षांचा आंत झाला. पुढें दुसरे देश जिंकण्याकडे यांचें लक्ष लागलें.

त्या वेळीं सलूजूकी लोकांचा मोड होत आला होता. ही संधि पाहून ग्यासुद्दीन याणें स्वतः खुरासानचा पूर्वकडील भाग काबीज केला, आणि गजनी ही आपल्या हातांतून गेली होती, ती पुनः घेतली. यानंतर पुढें ग्यासुद्दीन हा फिरूजकोहो, गजनी, व हिरात, या तीन शहरांत पाळीपाळीनें राहत असे. याणें हिरात एथील मोठी मशीद बांधिली. तिची विलक्षण शोभा अद्यापि वर्णन करितात.

हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्याचा पाया घातला.

इकडे शाहाबुद्दीनाचें सर्व लक्ष हिंदुस्थानाकडे लागलें होतें, आणि जें मुसलमानी राज्य इंग्रेजलोक येतपर्यंत चाललें होतें त्याचा पाया याणेंच घातला असें ह्मटलें असतां चालेल.

शाहाबुद्दीनाची पहिली स्वारी.

इ० स० ११७६ हि० स० ५७२.

प्रथम इ० स० ११७६ त शाहाबुद्दीन याणें स्वारी केली. तींत जेथें पंजाबांतील नद्यांचा सिंधुनदाशीं संगम होतो त्या ठिकाणीं ऊक ह्मणून शहर होतें तें घेतलें. पुढें दोन वर्षांनीं याणें गुजराथेंत स्वारी केली. तींत याचा पराजय झाला, आणि परत येतांना महमूदासारिखेंच याचे वाटेंत हाल झाले; परंतु त्यासारिखा यास जय मात्र मिळाला नाहीं.

नंतर याणें लाहोरावर दोन स्वाऱ्या करून गजनवी

इ० स० वंशाचा शेवटला सुलतान खुशूरू मलिक् यास
११७८ हि० स० बलहीन केलें, आणि शेवटीं त्याचा मुलास बळ-
५७४. जोरीनें ओलीस घेतलें.

यापुढची स्वारी सिंधमध्यें झाली, तींत शाहाबुद्दीन
याणें तो प्रांत समुद्रकिनाऱ्यापर्यंत लुटला. ति-
इ०स० ११७८ हि०स० ५७५ कडून परत आल्यावर याणें खुशूरू मलिक् या-
आणि इ०स० बरोबर पुनः लढाई चालविली. खुशूरू याणें
११७९ हि० निराशेनें जीवावर उदार होऊन, गकरलोकांशीं
स० ५७६. दोस्ती केली; आणि मोठा पराक्रम करून
शाहाबुद्दीन याचा एक अतिशय मजबूद किल्ला घेतला
तेव्हां आपला बेत समोर लढाईनें साधत नाहींसें पाहून
शाहाबुद्दीन याणें कपटानें शत्रूस पाडाव कर-
इ०स० ११७७ हि०स० ५८१. ण्याची युक्ति केली. ती अशी कीं पश्चिमेकडून
कोणी शत्रू आपणावर येत आहे अशी आवाई
उठवून खुरासानप्रांतांत स्वारी करण्याचा निमित्तानें याणें
आपली फौज जमा केली, आणि खुशूरू मलिक्
इ० स० ११८४ यावरोबर तह करण्याची आपली उत्सुकता
हि० स० ५८० आहेसें दाखविण्याकरितां, त्याचा मुलगा ओली-
स ठेविलेला होता त्यास सोडून दिलें. या कप-
टामुळें खुशूरू मलिक् हा बेसावध होऊन आपला ध्यानींमनीं
नसतां सुटलेला मुलगा येत आहे असें पाहून, त्यास भेटावया-
करितां लाहोराहून निघाला. तों शाहाबुद्दीन हा निवड-
क घोडेस्वारांची मजबूद फौज घेऊन, आड वाटेनें बातमी
गजनवी वं फुटूं नदेतां अति त्वरेनें निघून एकदम खुशूरू
शास पंजा- मलिक् व त्याची राजधानी यांचामध्यें पडला;
बांतून हां- आणि एक्या रात्रीस त्याचा छावणीस वेढा घा-
कून लाविलें. लून त्यास कैद करिता झाला. नंतर लाहोर

हें तलवार मारिल्याशिवायच याचा हातीं आलें. खुशूरूस व त्याचा कुटुंबास शाहाबुद्दीन याणें ग्यासुद्दीनाकडे पाठविलें. त्याणें त्यांस गिर्जिस्तानामध्यें एका किल्यावर अटकेंत ठेविलें; पुढें ख्वारिजमचा राजाबराबर लढाई चालली असतां, त्या धांदलींत ते सर्व लोक मारले गेले; तेव्हां गजनवी वंशाची समाप्ति झाली.

इ० स० ११८६
हि० स० ५८३.

यानंतर शाहाबुद्दीनास कोणी मुसलमान प्रतिस्पर्धी राहिला नाहीं, आणि हिंदुलोकांशीं लढाई करणें यांत कांहीं विशेष जीव नाहीं असें त्यास दिसूं लागलें. कारण शाहाबुद्दीनाचा लश्करचे लोक सिंधुनद व वक्षूनदी यांमधील लढाऊ मुलुकांतले असून, त्यांस सल्जूकी लोक व दुसरे तातारलोकांचे उत्तरेकडील जमाव यांजबरावर लढाया करावयाची सवय असे. असें असून हिंदुलोक हे स्वभावानें गरीब व निरुपद्रवी, तशांत त्यांचीं लहान लहान राज्यें होऊन फळ्या पडलेल्या; आणि त्यांस मुसलमानांबराबर लढाया करून कांहीं द्रव्य किंवा राज्य मिळवावयाची आशाहि नसून ते जुलमानें लढाईस उभे राहिलेले; अशा लोकांनीं शाहाबुद्दीनास विशेष अडथळा केला असेल, असें आपल्या मनांतहि यावयाचें नाहीं. असें असतां एकहि हिंदु संस्थान कठीण युद्धप्रसंग झाल्यावांचून याचा हातीं लागलें नाहीं, आणि कित्येक तर कधींच न जिंकिलीं जातां, मुसलमानलोकांचें राज्य भयाभंगास गेलें तरी, अद्यापि तशींचा तशींच उभीं आहेत.

हिंदुंबराबर लढाया.

शाहाबुद्दीनाची गति अशी एकाएकी कुंठित

राजपूतलोकांविषयीं.

होण्यास राजपूतलोक हे कारण झाले. हे लोक मूळ जातीचे क्षत्रिय होत; यामुळें इतर जातींपेक्षां यांची स्थिति निराळी होती. इतर जाती या धर्मसंबंधीं आचारानें मात्र निराळ्या राहिल्या असत; परंतु दुसऱ्या व्यवहारांत त्यांतील सर्व लोक आपसांत मिळत; तसेंच त्यांमध्यें कोणी जातीचे मुखरी असे नसत; जो कोणी देशाचा कारभार चालविणारा असे, त्याचा सर्व हुकूम मानीत. राजपूतलोकांचें तसें नव्हतें; हे जन्मापासूनच शिपाई; यांचात खिसे पाडलेले असत; प्रत्येक खिशाचा एक वंशपरंपरेचा सरदार असे; आणि प्रत्येक खिशाची जमातच निराळी असे; त्यांचे परस्परांचे व मुख्य सरदारांचे पुष्कळ रीतींनीं लागेबांधे असत. या लोकांमध्यें अद्यापि जातिभेद होताच, तेणेंकरून यांचा आपसांतील पूर्वोक्त संबंध विशेष दृढ होत असे. सर्व खिशांचे सरदार यांचा जसा सर्वांचा राजाशीं संबंध असे, तसाच प्रत्येक सरदाराचा हाताखालील लोकांचा त्याशीं संबंध असे. यामुळें राजा व त्याचे सरदारलोक आणि शिपाईलोक यांमध्यें सगाई आणि रणोत्साह यांचा दोऱ्यांचे घट्ट बंद पडून त्यांचा मजबूद जमाव जमे. राजपूतलोकांमध्यें सर्व देशाचे विभाग करून जहागिरीनें जमीन देण्याची वहिवाट होती. या वहिवाटीमुळें राजपूत राजे व त्यांची रयत यांमध्यें विशेष प्रीतिभाव असे, आणि त्यामुळें आह्मी मोठ्या कुळांत उत्पन्न झालों असा यांस गर्व होऊन हे मोठे शूर निपजत, आणि उदार स्वभावानें वागत. हे सर्व गुण त्या वेळचा क्षत्रियांमध्यें उत्तम रीतीनें होते. राजपूत राजांजवळ भाट, चारण, आदिकरून असत. ते जुनीं गीतें

गाऊन यांस स्फुरण आणीत. तसेंच कीर्ति मिळविण्याकरितां अथवा बायकांचा कारणानें यांचे वारंवार तंटे होऊन यांस अतिशय वीरश्री चढे. ते लोक आपल्या स्त्रियांस पुष्कळ मान देत; तसा त्या वेळीं देण्याची पूर्वेकडील दुसऱ्या लोकांची चाल नव्हती. त्याप्रमाणें जरी शत्रूशीं लढणें झालें, तरीहि बंध बांधलेले असत; ते जो तोडील त्याची अपकीर्ति होत असे.[3] हे त्या वेळीं आळशी होते किंवा नाहीं, हें इतिहासांत लिहिलेलें नाहीं, आणि असते तरी कोण लिहितो; परंतु जर वर लिहिलेल्या सद्गुणांस पुष्कळ आळस आणखी मिळविला, आणि मुसलमानांचा पुष्कळ दिवस जुलूम चालल्यामुळें जे दोष उत्पन्न झाले आहेत ते वरील सद्गुणांतून वजा करून टाकिले, तर बाकी राहिलेले गुण सांप्रतचा राजपूतलोकांमध्यें पाहूं गेलें असतां मिळत आहेत. पूर्वींचा राजपूतांहून जसे महाभारतांतील योद्धे श्रेष्ठ होते, तसे सांप्रतचा राजपूतांहून त्यांचे वरील पूर्वज हे विशेष पराक्रमी होते.[4]

या पूर्वींचा राजपूतलोकांचें दुसऱ्या लोकांशीं संघट्टण

---

३ या राजपूतलोकांमध्यें जरी जवांमर्दीचीं पुष्कळ लक्षणें होतीं, तथापि हे होमरी काव्यांतील सरदारांसारखे होते, स्पेनसर अथवा आरिओस्टा यांचा ग्रंथांतील सरदारांप्रमाणें नव्हते. ह्मणजे यांमध्यें मानप्रतिष्ठेविषयीं अति सूक्ष्म विचार आणि नटून आणिलेले हावभाव हे विशेष नसत. (हें मूळग्रंथांत असून, त्यांत अपरिचित ग्रंथांतील दृष्टांत आल्यावरून टिपेंत घातलें आहे.) भा० क०

४ राजपूतलोकांचा अर्वाचीन इतिहासांत त्यांचा राजप्रीतीविषयीं, आणि युद्धांतील सत्याविषयींचीं प्रसिद्ध उदाहरणें घडून आलीं आहेत. या लोकांमध्यें शेवटील लढाई उदेपुरचा राजकन्येशीं विवाहाचा निमित्तानें जयपुर, व जोदपुर एथील राजांमध्यें झाली होती.

नसे; यामुळें ते भोळसर असत. तेणेंकरून जरी त्यांचा मध्यें वरील उत्तम गुण असत तरी, त्यांचें व्यवहारचातुर्य कमी असे; आणि त्यांचाहून क्षुद्र बुद्धींनीं जे लोक लढाईस उद्युक्त होत, त्यांहून यांची युद्धाचीहि तयारी कमी पडे.

राजपूतलोक हे स्थाईक होते, फिरते नव्हते; परंतु यांचे खिसे पडलेले असत. त्यामुळें जर बाहेरील शत्रु येऊन यांस देशत्याग करावा लागला, तर ते **तातार**लोकांचा जमातीप्रमाणें सर्व कुळांतील सर्व लोक मुलांबाळांसुद्धां निघून जात, आणि जेथें दुसऱ्या देशांत राहात, तेथें पूर्वीचा मानाप्रमाणें जमीनी वांटून घेत. त्यामुळें यांची जागा मात्र बदले; दुसरा कांहीं यांचा स्थितींत फेरफार होत नसे.

शाहाबुद्दीन हिंदुस्थानांत आला त्यापूर्वीं सर्वांहून मोठीं चार राज्यें होतीं; १ **दिल्ली**, एथें **तुवार** वंशाचे राजे राज्य करित होते; २ **अजमीर**, एथें **चव्हाण**; ३ **कनोज**, एथें **राठोर**; आणि ४ गुजराथेंत चालुक्यांस घालवून **बागले** या नावाचे राजे राज्य करित होते.

पुढें दिल्लीचा तुवार राजा याणें आपल्या पोटीं पुत्रसंतान नाहीं ह्मणून आपला नातू अजमीरचा पृथु राजा यास मांडीवर घेतला. त्यामुळें तुवार व चव्हाण या दोनहि वंशांचा मुख्य एकच झाला. कनोजचा राजा हाहि त्या तुवार राजाचा दुसऱ्या मुलीकडून नातू लागत होता. त्याणें आपला माऊस भाऊ आजोबानें अधिक पसंत केला असें पाहून हाडवैर मांडिलें. या स्पर्धेमुळें जे द्वेष उत्पन्न होऊन आपसांत लढाया झाल्या, तेणेंकरून हिंदुस्थानामधील शाहाबुद्दीनाचा मसलती भल्या साधल्या.

शाहाबुद्दीनानें दिल्ली व अजमीरचा राजा याजवर

प्रथम स्वारी केली तींत कर्नाल व स्थानेश्वर यांमध्यें तिरौरी एथील मोठ्या मैदानावर दोनहि फौजांचा युद्धप्रसंग झाला. या ठिकाणीं हिंदुस्थानाचा राज्याविषयींचा लढायांचा बहुतकरून शेवट झाला आहे, आणि याची पाणिपत या नावानें इतिहासांत प्रसिद्धि आहे. वरील लढाईत मुसलमानलोक आपल्या नेहमींचा रीतीप्रमाणें घोडेस्वारांचा टोळ्या करून एकामागून एक हल्ले करीत; त्यांत घोडेस्वार बाण मारून परत फिरत, अथवा साधल्यास पुढें तुटून पडत. याप्रमाणें आपल्या लश्कराचा मध्यभागावर हल्ला करण्याचा कामांत शत्रु गुंतला आहे असें पाहून, हिंदूंनीं आपल्या चालीप्रमाणें दोहों बाजूंनीं येऊन यावर पडण्याचा यत्न केला. तो त्यांचा या वेळीं पूर्ण सिद्धीस गेला. इकडे शाहाबुद्दीन हा आपल्या लश्कराचा मध्यभागीं गुंतला आहे, तों आपल्या दोनहि बाजूंचा फौजेचा मोड झाला अशी यास बातमी लागली. इतक्यांत शत्रूंनीं येऊन यास वेढिलें. त्या समयीं याबराबर यासारिखे धीर धरून जे लश्करांतून पळून गेले नाहींत, तेवढे मात्र लोक होते. अशी वेळ येऊन गुजरली असतां शाहाबुद्दीन याणें जीवाची आशा सोडून युद्ध केलें. जेथें शत्रूंचें सैन्य अतिशय दाट उभें राहिलें होतें, तेथें आपला घोडा टाकिला आणि पृथु राजाचा भाऊ दिल्लीचा सुभेदार यावर चाल करून त्यास आपल्या भाल्यानें तोंडावर घायाळ केलें. इतक्यांत यास वार लागून रक्ताचा प्रवाह सुटला. त्यामुळें अवसान नाहींसें होऊन हा घोड्यावरून पडणार तंव याचा लश्करांतील एक शिपाई उडी मारून याचा मागें घोड्यावर बसला, आणि यास धरून युद्धांतून

इ०स०११९१
हि०स०५८७.

बचाव करून नेऊन निर्भय ठिकाणीं पोचविता झाला.

या युद्धांत शाहाबुद्दीनाचा अगदीं मोड झाला, आणि हिंदूंनीं मुसलमानांचा वीस कोशपर्यंत पाठलाग केला. शाहाबुद्दीन आपली राहिलीसाहिली फौज लाहोर एथें जमा करून सिंधुनदापार गेला, आणि प्रथम घोर ऊर्फ फिरूझ कोहो एथें आपल्या भावास भेटून नंतर गजनीस जाऊन राहिला; आणि तेथें ख्यालीखुशालींत निमग्न झाला. त्यावरून लोकांस असें वाटलें, कीं हा आपलीं दुःखें विसरला; परंतु तसें बाहेरून मात्र दिसत असे. याची जी अप्रतिष्ठा झाली ती यास अंतर्यामीं खात असे; याविषयीं याणें एका आपल्या वयस्क प्रधानास असें सांगितलें, कीं "मला कधींहि स्वस्थपणीं निद्रा लागत नाहीं; मी निजलों अथवा जागा झालों तरी दुःख व काळजी हीं मला पीडित असतात."

शाहाबुद्दीनाचा मोड झाला.

शेवटीं तुर्क, ताजक, व अफगाण या लोकांची फौज जमा करून याणें पुनः हिंदुस्थानावर स्वारी केली. या स्वारींत याचा लोकांतून पुष्कळांचे मुकुट रत्नखचित होते, आणि कित्येकांचा चिलखतींस सोन्यारुप्याचा मुलामा होता. त्याबरोबर लढावयाकरितां पृथु राजा मोठी सेना घेऊन आला, आणि त्याचा पूर्वीचा जयाची कीर्ति ऐकून पुष्कळ दोस्त राजेहि येऊन त्यास मिळाले होते. शाहाबुद्दीन याणें पुढें येण्यास दचकावें या हेतूनें पृथु राजानें

शाहाबुद्दीन परत हिंदुस्थानांत आला इ०स० ११९३ हिं०स० ५८९.

(५) हें वर्णन फिरिस्तामधून घेतलें आहे; त्यांत या लढाईंत एक लक्ष वीस हजार घोडेस्वार होते असें वर्णन आहे.

यास तोडून निरोप पाठविला. शाहाबुद्दीनानें त्यास सामदामाचें उत्तर पाठविलें कीं कसें करावें तो हुकूम घेण्याकरितां मी आपल्या भावास लिहिलें आहे. इकडे हिंदुलोक आपली संख्या मोठी आहे या गर्वानें अंध होऊन मुसलमानांचा फौजेनजीक तळ देऊन राहिले असतां, शाहाबुद्दीन हा सूर्योदयाचा सुमारास दोहों लश्करांमध्यें ओढा होता तो उतरून अकस्मात् त्यांवर तुटून पडला; त्या वेळीं हा लश्कर घेऊन येत आहे, अशी त्यांस पूर्वी अगा देखील नव्हती; या हल्ल्यामुळें प्रथम हिंदुलोकांचा छावणींत गोंधळ झाला. परंतु त्यांचा तळ फार मोठा होता, त्यामुळें कांहीं लोकांस सिद्ध व्हावयास संधि सांपडली. मग ते पुढें होतांच बाकीचे सर्व पिछाडीस झाले. याप्रमाणें सर्व सुयंत्र झाल्यावर ते लोक चार फळ्या करुन आपल्या शत्रूंवर चढून गेले. तेव्हां आपला मूळचा बेत फसला असें पाहून, शाहाबुद्दीनानें मागें परतण्याचा हुकूम केला; आणि लढाई करित करित मागें हटत चालला; परंतु याणें आपली फळी मात्र फुटूं दिली नाहीं. याप्रमाणें कांहीं वेळ माघारा गेल्यानंतर याणें पाहिलें तों हिंदुलोक आपणावर चालून येत आहेत, व त्यांचा फळ्या फुटून, ते अस्ताव्यस्त झाले आहेत. असें पाहून पोलादी चिलखती घातलेल्या निवडक बारा हजार स्वारांनिशीं याणें त्यांवर हल्ला केला. तेव्हां जशी एकादी अजस्त्र इमारत डळमळूं लागली असतां एक धक्का लागल्यानें कोसळत्ये, त्याप्रमाणें हिंदुलोकांचा अफाट सेनेची त्या झपाट्यानें वाताहत झाली. तिजमध्यें मग कशाचाच थांग नाहींसा झाला.

या लढाईत दिल्लीचा सुभेदार आणि दुसरे पुष्कळ

सरदार पडले; आणि पृथु राजा पळत असतां शत्रूंचा हातीं लागून ठार मारला गेला.

अजमीर घेतलें.

शाहाबुद्दीन हा सुलतान महमूदापेक्षां विशेष शूर असे. वरील लढाईनंतर याणें अजमीर शहर घेतलें; तेव्हां याचा आड येणाऱ्या अशा त्या शहरचा हजारों लोकांचा याणें शिरच्छेद केला, आणि बाकीचांस गुलाम केलें. याप्रमाणें घोर कर्म केल्यानंतर याणें जरब खंडणी घेण्याचा ठराव करून पृथु राजाचा एका दायादास राज्यावर बसविलें. तो पृथु राजाचा अनौरस पुत्र होता, असें कोणी ह्मणतात.

दिल्ली घेतली

इतकें करून शाहाबुद्दीन गजनीस माघारा गेला, आणि आपल्या मागें आपला जुना गुलाम कुतबुद्दीन ऐबाक यास ठेविता झाला. कुतबुद्दीन याणें मोठा पराक्रम करून दिल्ली घेतली, आणि गंगा व यमुना यांचा मधील कोयल शहर मिळविलें. त्या वेळीं कुतबुद्दीन हा नुकताच प्रख्यातीस येत होता; तो पुढें हिंदुस्थानांचें राज्यपद पावला.

इ० स० ११९४
हिं० स० ५९१.

कनोज घेतलें.

दुसऱ्या वर्षी शाहाबुद्दीन परत हिंदुस्थानांत आला, आणि इतावा याचा उत्तरेस यमुनानदीचा कांठीं कनोज एथील राठोर वंशाचा राजा जयचंद्र याचा पराजय करून, कनोज व काशी हीं शहरें घेता झाला. याप्रमाणें या लढाईमध्यें एक मोठें हिंदु राज्य लयास जाऊन मुसलमानांचें राज्य बहारपर्यंत पोहोंचलें, आणि पुढें त्यांस बंगाल्यावर चाल करण्यास सवड सांपडली. वरील लढाईपासून परिणाम मोठाच झाला; तथापि ती लढाई कशी झाली,

पुढें शहरें कशीं घेतलीं, तेथील मूर्ति कशा फोडल्या, आणि द्रव्य कसें गोळा केलें, याचें वर्णन करावें, तर त्यांत विशेष नवल नाहीं; कारण अशीं पूर्वीं लढायांचीं वर्णनें झालींच आहेत, त्या चालीप्रमाणेंच हें आहे. शिवाय या लढाईत एक पांढरा हत्ती मुसलमानांनीं मिळविला, हें एक विशेष आहे; आणि दुसरें त्या रणभूमीवर राजाचें प्रेत त्याचे दांत कृत्रिमी बसविलेले होते त्यांवरून ओळखिलें असें व्याख्यान केलें आहे. या दुसऱ्या गोष्टीवरून त्या वेळचा लोकांचा रीतींविषयीं आपणास कांहींसें ज्ञान होतें. याप्रमाणें मुसलमानलोकांस जय मिळाल्यावर राठोर कुळांतील बहुतकरून राजपूतलोक कनोज एथून निघून मारवाडप्रांतांत येऊन राहिले, आणि तेथें एक नवें राज्य स्थापितें झाले; त्याची व ब्रिटिश सरकाराची हल्लीं दोस्ती आहे.

शाहाबुद्दीन परत गजनीस गेल्यावर यानें बसविलेल्या अजमीरचा राजावर एक तोतया उत्पन्न झाला; तेव्हां कुतबुद्दीनास त्याचें सहाय करणें प्राप्त झालें. त्या राजाचा बचाव केल्यानंतर कुतबुद्दीन गुजराथेंत गेला, आणि तो संपत्तिमान् प्रांत लुटून फस्त करिता झाला. दुसऱ्या वर्षीं शाहाबुद्दीन पुनः हिंदुस्थानांत आला, आणि आग्र्याचा पश्चिमेस ब्याना शहर घेऊन बुंदेलखंडांतील ग्वालेरचा मोठ्या मजबूद किल्ल्यास वेढा देता झाला. पुढें खुरासानांतून आपल्या पूर्वींचा राज्यावर हल्ला आल्याची बातमी, किंवा येण्याची आवाई आल्यावरून यास परत जावें लागलें, असें संभवतें. कारण आपण गेल्यानंतर मागें ग्वालेरचा

इ० स० ११९५
हि० स० ५९२.

बेढ्याचें काम आपल्या सरदारांस सांगून आपण कांहीं सांगावयासारिखें कृत्य नकरितां हा गजनीस परत गेला.

ग्वालेरचा किल्ल्यानें पुष्कळ दिवस टिकाव धरिला, परंतु शेवटीं तो मुसलमानलोकांचा हातांत आला. नंतर कुतबुद्दीन यास अजमीरचा राजास मदत करण्याकरितां पुनः जावें लागलें. कारण पूर्वी त्या मुसलमानलोकांनीं बसविलेल्या राजावर त्याचा प्रतिस्पर्ध्यांनीं दुसऱ्यानें चाल केली होती, ती कुतबुद्दीनानें हटविली होती; परंतु सांप्रत गुजराथ व नागोर एथील राजे यांणीं अजमीरावर मोठी स्वारी केली, आणि अजमीराजवळचे मेड ह्मणून जातीचे पुष्कळ पहाडी लोक हे त्यांस सहाय होते. त्या राजांची व कुतबुद्दीनाची लढाई झाली. तींत कुतबुद्दीनाचा मोड झाला; त्यास पुष्कळ वार लागले, आणि तो मोठ्या पंचाईतीनें अजमीर शहरांत जाऊन कोंडलेला राहिला. पुढें लवकरच गजनीहून कुमक आली, तेव्हां शत्रूंचा वेढा उठला. इतक्यांत त्याची प्रकृतिहि सुमारवट बरी झाली, आणि शत्रूंचा सूड घेण्याजोगें सैन्यहि, त्याजवळ जमलें. नंतर तो प्रथम पाली, नांदोळ, शिरोही, या रस्त्यानें गुजराथेंत गेला. जातांना शिरोही परगण्यांत गुजराथेंतील दोन मोठे सरदार आबूपर्वतावर मजबूद तयारीनिशीं राहिले आहेत, असें त्याणें पाहिलें. एवढें मोठें लश्कर आपल्या मार्गे ठेवून पुढें जावें हें बराबर नाहीं, असें वाटून तो त्या पर्वतांत शिरला, आणि ते राहिले होते तेथें जाऊन त्यांची छावणी घेऊन, आणि त्यांचा फौजेची वाताहत करून अनलवाड्यास गेला. नंतर तें शहर घेऊन, त्याचा संरक्षणार्थ कांहीं

लोक ठेवून, व सर्व प्रांत लुटून दिल्लीस परत आता झाला. दुसऱ्या वर्षी त्याणें बुंदेलखंडांतील कालिंजर व काल्पी हे किल्ले घेतले, आणि सांप्रत जास रोहिलखंड ह्मणतात त्यांतील बदायून या शहरावर स्वारी केली.

त्याच वेळीं कुतबुद्दीन यास महम्मद बख्त्यार खिलूजी हा दुसरा सरदार भेटावयास आला होता. त्याणें पूर्वीच अयोध्या प्रांतांचा कांहीं भाग व उत्तरबहार असे घेतले होते. नंतर कुतबुद्दीनास भेटून परत आपल्या सुभ्यावर गेल्यावर त्याणें बाकी राहिलेला बहार प्रांत व बंगाला हे घेतले, आणि बंगालची राजधानी गौड ऊर्फ लक्नौती ही घेतली.

अयोध्या, बहार व बंगाला हे प्रांत घेतले.

याप्रमाणें हिंदुस्थानांत हकीकती होत असतां, शाहाबुद्दीन याचा ख्वारिजमचा राजाबरोबर लढाया चालल्या होत्या. त्या राजानें इराणदेशांतील सल्जूकी लोकांचें राज्य मोडून एशियाखंडांतील मध्यदेशामध्यें वरचढपणा करण्याकरितां पूर्वीचा सल्जूकी लोकांप्रमाणें कलह मांडिला होता, त्यामुळें घोरी लोकांस खुरासानामध्यें स्वाऱ्या कराव्या लागत असत. ग्यासुद्दीन हा मरावयाचा पूर्वी पुनः कारभार पाहूं लागला होता, असें दिसतें, आणि तो वरील खुरासानांतील लढायांत स्वतः जात असे; परंतु शेवटच्या स्वारीस मात्र गेला नव्हता. त्या स्वारीमध्यें शाहाबुद्दीन हा खुरासानप्रांतांत तूस व सिराकस या दोन शहरांचा मध्यें असतां, याचा भाऊ ग्यासुद्दीन मेल्याचें वर्तमान यास समजलें; तेव्हां सिंहासनावर बसण्याकरितां हा गजनीस परत आला.

इ०स०१२०२
हि०स०५९९.

# ४ शाहाबुद्दीन ऊर्फ महम्मद घोरी.

खारिजमचा राजावरस्वारी केली, ती फसली.

आपल्या राज्याची आंतील व्यवस्था नीट झाल्यावर खारिजम एथील राजाचें निर्दलन करण्याकरितां त्यावर शाहाबुद्दीनानें स्वारी केली, आणि लढाई करून त्या राजाचा पराजय केला. पुढें तो आपल्या राजधानीस गेला असतां याणें तीस वेढा दिला, आणि त्या राजाची पराकाष्ठेची तारंबळ केली; तेव्हां त्यास खित्ते या नावाचा तातारलोकांस आपल्या मदतीस बलावणें भाग आलें. ते येतांच मूळचें सर्व वारें बदललें, आणि शाहाबुद्दीनास आपलें बारबरदारीचें सामान टाकून परत फिरावें लागलें; तथापि हा माघारा येत असतां शत्रूंनीं याचा मागून फार लगट केला, तेव्हां यास त्यांसमोर उभें राहवें लागलें. त्या लढाईत याचा अगदीं पराजय झाला, आणि हा बल्क व हिरात यांचा मधोमध अंदखो या गांवीं मोठ्या मुस्कीलीनें आला. अंदखो एथें शाहाबुद्दीनानें मुक्काम केला, आणि अमुक द्रव्य दिलें असतां आपणास जाऊं द्यावें असें ठरवून, मग हा त्यांचा स्वाधीन झाला.

इ०स० १२०३
हि०स० ६००.

हिंदुस्थानांत बंडें झालीं.

याप्रमाणें शाहाबुद्दीन याचा लश्कराचा नाश झाला, ही बातमी पसरली, आणि हाहि मरण पावला अशी प्रथमतः कंडी पिकली; तेव्हां बहुतेक राज्यांत धामधूम झाली. गजनी एथें ताजुद्दीन एल्दोजनामक सुभेदार शाहाबुद्दीनाचा मोठा प्यारींतील गुलाम होता; तथापि तोहि गजनी बळकावून बसला. दुसरा

एक सरदार जा लढाईंत शाहाबुद्दीनाचा पराजय झाला, तेथील रणभूमीवरूनच परभारा मुल्तानास आला, आणि शाहाबुद्दीनाकडून आणलेली अशी खोटी सनद दाखवून, त्याचा नावानें आपण कारभार करूं लागला. गक्करनामक जंगली लोक हे पंजाबाचा उत्तरेकडून आपल्या पहाडांतून येऊन लाहोर घेते झाले, आणि त्या सर्व प्रांताचा विध्वंस करून टाकिते झाले. कुतबुद्दीन हा याचा हिंदुस्थानांतील सुभेदार होता. त्याणें आपलें इमान सोडिलें नाहीं. त्याप्रमाणें हिरात व दुसऱ्या पश्चिमेकडील प्रांतांमध्यें शाहाबुद्दीन याचे तिघे पुतण्ये सुभेदार होते, यामुळें तिकडेहि कांहीं गलबल झाली नाहीं. शाहाबुद्दीनानें आपल्या पक्षाचे कांहीं लोक जमवून प्रथम मुल्तान घेतलें. नंतर गजनी एथील सुभेदार एल्दोज हा त्यास शरण आला. त्याचे अपराध शाहाबुद्दीनानें क्षमा केले. नंतर कुतबुद्दीनास मदतीस घेऊन पंजाबप्रांतावर स्वारी करून तो मुलुक परत घेतला, आणि गक्करलोकांकडून मुसलमानी धर्माचा स्वीकार करविला. त्या पहाडी लोकांस दुसऱ्या धर्माविषयींचें मूळींच ज्ञान होतें असें नाहीं. त्यामुळें त्यांस मुसलमान करण्यास विशेष प्रयास पडला नाहीं. याच सुमारास गजनीचा पूर्वेकडील पहाडांत जे पाखंडी लोक राहत होते, त्यांसहि याणें मुसलमानी धर्मात आणिलें, असें फिरिस्ता वर्णन करितो.

मग शाहाबुद्दीन याणें ख्वारिजमप्रांतावर दुसरी स्वारी

---

६. आजी व तूरी हे लोक हल्लीं जा अवघड डोंगरी मुलुकांत राहतात, तेथील लोक इतक्या अर्वाचीन काळापर्यंत मुसलमान झाल्याशिवाय राहिले असतील असें संभवतें.

करण्याकरितां आपल्या पश्चिमेकडील प्रांतांत मोठी फौज
त्यांचा बंदोबस्त झाला. जमा करविली, आणि हिंदुस्थानांतील बंदोबस्त करून स्वस्थता झाल्यावर हा तिकडे परत जावयास निघाला. वाटेनें सिंधूनदावर एके दिवशीं तळ देऊन राहिला असतां, नदावरील शीतळ वाऱ्याची झुळूक आपणास लागावी ह्मणून याणें आपला तंबू अगदीं नदाचा किनाऱ्यावर ठोकविला. इकडे कांहीं गकरलोकांचे मागचा लढाईत सगे मेले होते, त्यांचा सूड उगविण्याची संधि ते पाहतच होते; त्यांणीं याप्रमाणें हा बेसावध स्थितींत आहे हें टेहळून ठेविलें होतें.

मग मध्यरात्रीस छावणींत सर्व सामसूम झालें असें पाहून, जेथें सुलतानाचा डेरा दिलेला होता, तेथें ते नद पोहून गेले; तेथें कोणींच त्यांस आडवा येण्यास नव्हता, त्यामुळें त्यांणीं एकदम आंत जाऊन पुष्कळ घाय करून शाहाबुद्दीन याचा प्राण घेतला. हें वर्तमान इ० स० १२०६ तारीख १४ मार्च ह्मणजे हिं० स० ६०२ माहे साबान चंद्र २ रा या रोजीं झालें.

इ० स० १२०६ हिं० स० ६०२.

याचा प्रेताबरोबर याचा वजीर व याचा दरबारांतील सगळे मुख्य मुख्य उमराव होते, आणि तें मोठ्या दुःखकारक समारंभानें गजनीस घेऊन गेले. तेथें एल्दोज हा सामोरा आला, आणि आपली चिल्लत सोडून, डोकींत धूळ घालून, आपला त्राता मरण पावला ह्मणून, पुष्कळ शोक करिता झाला.

शाहाबुद्दीनानें पुष्कळ संपत्ति मिळवून ठेविली होती. याचा मागून याचा पुतण्या महमूद गादीवर बसला.

शाहाबुद्दीनानें सुलतान महमूदापेक्षां हिंदुस्थानांत

पुष्कळ देश मिळविले, आणि तसाच काळ अनुकूल असता, तर इराणांतहि असाच यानें चढ केला असता. शाहाबुद्दीन हा मोठा धीराचा शिपाई होता; परंतु महमूदासारिखें शहाणपण, अथवा पंचरस बुद्धि, हीं यामध्यें नव्हतीं. महमूद हा मोठा बहादुर असून, शोधकहि तसाच होता; त्यामुळें जसें त्याचें लढाईकडे लक्ष असे, तसें विद्येकडेसहि असे. याच कारणामुळें एशियाखंडांतील जे मख्यात राजेलोक होऊन गेले, त्यांतीलच महमूद हा एक होता, अशी त्याचा नावाची अद्यापि कीर्ती गाजत आहे; आणि शाहाबुद्दीन याचें तर नावहि बहुधा याचा ताब्यांत जो मुलुक होता, त्याबाहेर माहित नाहीं.

शाहाबुद्दीनाचा मरणकाळीं, माळवा व जवळचे कांहीं प्रांत खेरीज करून, सर्व उत्तरहिंदुस्थान याचा ताब्यांत होतें, त्यांतून कांहीं प्रदेश अगदीं याचा हुकुमांत होता व कांहीं सरासरी होता. सिंध व बंगाल हे प्रांत बहुतेक पुरे अम्मलाखालीं आले होते, आणि त्यांचे बाकी राहिलेले भागहि याचे सरदार जलद घेत होते. गुजराथची राजधानी मात्र याचा हातीं होती; याशिवाय त्या प्रांतांत याची कांहीं सत्ता नव्हती. उत्तरहिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांत याचे स्वतांचे अम्मलदार होते. बाकीचा प्रांतांतून जे राजेरजवाडे राहिले होते, ते याचा तंत्रानें चालत असत, अथवा यास खंडण्या तरी देत असत. जंगली प्रांत व कांहीं पहाडी प्रदेश यांकडे याचें विशेष लक्ष न पोचल्यामुळें ते स्वतंत्र राहिले होते.

शाहाबुद्दीनाचा हिंदुस्थानांतील राज्याचा विस्तार.

---

# ५ महमूद घोरी.

महमूद घोरी राज्यपदावर आल्यानंतर याचा काकाचा सर्व मुलुकांत याचा नावानें द्वाही फिरविली, आणि त्यांतील सर्व अम्मलदारांनींहि याचें वर्चस्व कबूल केलें. तथापि हा तक्तावर बसतांच राज्याचे एकदम विभाग पडून, त्यांतून निरनिराळीं राज्यें झालीं; त्यांचें सुखें आधिपत्यहि याजकडे राहिलें नाहीं.

इ०स० १२०६
हि०स० ६०२.

घोरी राज्याचा मोड झाला.

शाहाबुद्दीन यास मुलगा नव्हता, त्यामुळें तो तुर्की गुलामांचे मुलगे जवळ बाळगित असे. त्यांतून त्याच्या हाताखालीं तयार झालेले पुष्कळ मोठ्या नावास आले. पुढें तो मरण पावला, तेव्हां त्यांतून तीन गुलामांकडे मोठ्या सुभ्यांचीं कामें होतीं; कुतबुद्दीनाकडे हिंदुस्थानचा सुभा, एल्दोज याकडे गजनीचा, आणि नासरुद्दीन याजकडे मुल्तान व सिंध हा सुभा होता. शाहाबुद्दीन मरण पावल्यावर हे त्याचे तिघेहि चाकर स्वतंत्रच होऊन गेले. त्याचप्रमाणें बामियान् एथील राज्य त्याचाच वंशांतील दुसऱ्या घराण्याकडे चालत होतें. त्यामुळें वास्तविक पाहूं गेलें असतां, घोर, हिरात, सिस्तान व खुरासानचा पूर्वभाग हे मात्र मांत महमूदाचा ताब्यांत होते. महमूद याची राजधानी फिरूज कोहो एथें होती.

महमूद याणें गादीवर आल्यानंतर कुतबुद्दीनानें आपल्या अनुरोधानें वागावें या हेतूनें त्यास राजा असा किताब व वस्त्रें पाठवून दिलीं. हा एल्दोज याचाहि वाटेस

गेला असें दिसत नाहीं. परंतु बामियान् एथील राजाचा दोघां मुलांनीं, तो मुलुक आपला सबब, तलवार मारून गजनी एथून कांहीं वेळपर्यंत एलूदोज यास हाकून दिलें होतें. पुढें पांचसहा वर्षांत महमूद मरण पावला.[७] त्यानंतर याचा सिंधूनदाचा पश्चिमेकडील सर्व राज्यांत यादवी झाली. ती मोडून तो देश स्वस्थ होत आहे, इतक्यांत ख्वारिजमचा राजांनीं तो सगळाच तोंडांत टाकिला.

त्याच राजांनीं इ०स० १२१५ त गजनी घेतली; त्यापूर्वी त्यांणीं फिरूज कोहो घेतला होता; व त्या वेळींच महमूद घोरी हा मारला गेला, असें कितीएक ठिकाणीं वर्णन आहे. याप्रमाणें घोरी वंशाची समाप्ति झाली.

---

(७) महमूद घोरी हा (डिगीनीस) इ० स० १२०८ हि० स० ६०५; (डार्न) इ० स० १२१०, हि० स० ६०७; (डिहरबेलो) इ०स० १२१२ हि० स० ६०९ यांत मेला असें वर्णन करितात.

# भाग तिसरा.

## मोगली वंशापर्यंत दिल्लीचा राजांचीं वर्तमानें.

इ॰ स॰ १२०६ पासून १५२६ पर्यंत.

## प्रकरण पहिलें.

### गुलाम राजांचें वर्णन.

कुतबुद्दीन ऐबाक.

हिंदुस्थानांत स्वतंत्र मुसलमानी राज्याची स्थापना.

शाहाबुद्दीन मरण पावल्यावर हिंदुस्थानांतील मुसलमानी राज्य स्वतंत्र झालें, आणि शाहाबुद्दीनाचें राज्य मोडून नवीं राज्यें होण्याची घालमेल संपल्यानंतर सिंधुनदापलीकडील राज्याशीं याचा कांहीं संबंध राहिला नाहीं.

तुर्की गुलामांचें माम्य.

एशियाखंडामध्यें मूळ तुर्की जातीचे गुलाम असून त्यांतून पुष्कळ राज्यपदास चढले, आणि हिंदुस्थानामध्येंहि पुष्कळ राजांचे वंश एकामागून एक याच प्रकारचा गुलामांपासून उत्पन्न झाले आहेत. हे लोक कसे नशीबास चढले याचा दाखला कुतबुद्दीन याचा चरित्रावरून मिळतो. कुतबुद्दीन हा वर सांगितलेल्या हिंदुस्थानांतील नव्या मुसलमानी राज्याचा स्थापक झाला.

हा ल्हान असतां निशापुर एथें यास कोणी आणिलें.

तेथें यास कोणी एका श्रीमान् गृहस्थानें खरेदी केलें. त्या गृहस्थानें यास फारसी व आरबी शिकविलें. तो मेल्यानंतर कुतबुद्दीन यास एका सावकारास विकलें. त्या सावकारानें यास सुलतान शाहाबुद्दीन यास नजर केलें. कुतबुद्दीन याणें आपला नवा धनी शाहाबुद्दीन याची कृपा लवकरच संपादन केली. पुढें ख्वारिजमी लोकांबराबर प्रांताचा सरहद्दीवर शाहाबुद्दीनाची लढाई चालली होती, तींत कुतबुद्दीन हा घोडेस्वारांचा एका टोळीचा मुख्य होता. ही लढाई चालत असतां एका समयीं याणें मोठी तलवार केली; परंतु त्या वेळीं यास शत्रूंनीं पकडलें. शाहाबुद्दीन याणें पुनः यास सोडवून आणिलें; त्या वेळापासून त्याची याजवर अधिकच मर्जी बहाल झाली. पुढें कुतबुद्दीन याची वर्तणूक चांगली पाहून यावर त्याचा फार भरवसा बसला; आणि शेवटीं अजमीरचा राजाचा पराजय केल्यानंतर सर्व नवीन घेतलेल्या प्रांताचें काम तो याजकडे सांगता झाला.

पुढें या प्रांताचा कारभार पाहत असतां शाहाबुद्दीन यावर एक प्रसंग गुजरला; त्यांतून तो याचा हुशारीमुळें व मदतीमुळें लवकर विजयी होऊन पार पडला. त्याविषयीं पूर्वीचा प्रकरणांत वर्णन केलेलें आहे. कालेंकरून हिंदुस्थानांतील कारभार याचा मुखत्यारीवर सोंपला गेला. जे लोक राजाचा कृपेनें वाढलेले असतात, त्यांस राज्यांतील दुसरे मोठमोठ्या योग्यतेचे लोक बहुधा विशेष मान देत नाहींत. परंतु तुर्की लोक हे स्वभावानेंच पराक्रमी, यामुळें हे जेथें जेथें वाढत गेले, तेथें तेथें यांचें वजन पडत गेलें. कुतबुद्दीनाची बढती झाल्यापासून कोणाचा मनांत वैरभाव उत्पन्न झाला नाहीं, आणि हा मोकळया मनाचा व उदार

स्वभावाचा असे, त्यामुळें बहुधा सर्व लोक यावर प्रीति करित असत, असें दिसतें.

कुतबुद्दीन याणें मोठमोठ्या लोकांजवळ, आणि आपल्या सारख्या वाढलेल्या लोकांजवळ शरीरसंबंधहि केले. गजनी एथील सुभेदार एल्दोज याचा मुलीशीं आपण लग्न केलें; तशीच आपली बहीण नासरुद्दीन कुबाचा यास दिली. पुढें कुतबुद्दीन याणें आपली मुलगी अल्तमश् यास दिली. तोहि गुलाम असून नुकताच नावारुपास येऊं लागला होता; व तो पुढें याचा मागून कांहीं दिवसांनीं सिंहासनावर बसला.

नासरुद्दीन हा पहिल्यापासून कुतबुद्दीनाचें वर्चस्व कबूल करित असे, आणि महमूद घोरी याचा कारकीर्दींत कुतबुद्दीनाचा तर्फेनें सिंधचा कारभार करित असे. परंतु एल्दोज याला सोईरगतीपेक्षां राज्याचा लोभ विशेष होता; तो हिंदुस्थानांतील राज्य हें अद्यापि गजनीचाच पोटचें आहे असा डौल घालून, आपला हक्क अम्मलांत आणण्याकरितां फौज घेऊन निघाला, आणि लाहोर शहर

इ०स०१२०५ हि०स०६०३. एकदम घेता झाला. तेथून त्यास कुतबुद्दीनानें लवकरच हाकून लाविलें; त्याचा पाठलाग करित जाऊन गजनी घेतली; आणि कांहीं वेळ तेथें मुक्काम केला. पुढें यास एल्दोज याणें काढून लाविलें. नंतर हा आपल्या राज्यांत येऊन मरेपर्यंत आपल्याच

कुतबुद्दीन मेला इ०स०१२१० हि०स०६०७. राज्यकारभारांत याणें आपला काळ घालविला. हा स्वतः असा चार वर्षें गादीवर होता; परंतु पूर्वीं शाहाबुद्दीनाचा तर्फेनें वीस वर्षें कारभार पाहत असे. हा नीतिमान् आणि सद्गुणी राजा होता अशी याचा मागें अक्षय्य कीर्ति राहिली आहे.

## २ आराम बादशाहा.

कुतबुद्दीनाचा मुलगा आराम हा त्याचा मागून सिंहासनारूढ झाला. याचा अंगीं राज्यकारभार करण्याची शक्ति नव्हती. पुढें याचा मेहुणा अल्तमश यार्णे एक वर्षाचा आंत यास पदच्युत केलें आणि आपण गादीवर बसला.

---

## ३ शम्सुद्दीन अल्तमश.

अल्तमश हा थोर कुळांतील होता. यास याचा भावांनीं द्वेषबुद्धीनें विकून टाकिलें. पुढें यास विकावयास आणिलें, तेव्हां सावकार पुष्कळ किम्मत मागूं लागला. तितकी द्यावयाचें सुल्तान शाहाबुद्दीन याचा मनांत येईना. तेव्हां पन्नास हजार रौप्यमुद्रा देऊन तुम्ही यास विकत घ्यावें, अशी कुतबुद्दीनास मेहेरबानीखातर त्याणें परवानगी दिली. याप्रमाणें अल्तमश याविषयीं कथा सांगतात. परंतु ती बहुधा ती मोठ्या अधिकारावर आल्यानंतर रचलेली आहे, असा संभव होतो. अल्तमश हा पूर्वीं पुष्कळ ठिकाणीं कामावर होता. शेवटीं बहार एथें सुभ्यावर असतां, तुम्ही राज्यावर यावें असें एका पक्षाचा लोकांनीं यास बलावणें पाठविलें. त्यावरून याणें बंड केलें; परंतु पुष्कळ तुर्की सरदार याचा विरुद्ध होते, त्यामुळें यास राज्य हातीं येण्यास लढाई करावी लागली.

इ० स० १२११, हि० स० ६०७.

एल्दोज हा गजनी एथें राज्य करित असे. तो

आपणाकडे मुख्यत्वाचें ओढून चंद्रबळ आणित असे. त्यास न विचारिलें असतां त्याणें अल्तमशास राजपदाचीं वस्त्रें पाठविलीं. पुढें ख्वारिजमचा राजानें एल्दोज यास गजनींतून हाकून दिलें, तेव्हां तो हिंदुस्थानांतील राज्य घेण्याकरितां आला, आणि स्थानेश्वरपर्यंत येऊन अ-

इ० स० १२१५ हि० स० ६१२.

ल्तमश् याचा दरबारांतील कांहीं लोक फितूर करिता झाला. पुढें अल्तमश् याणें त्याचा पराजय करून त्यास कैद केलें, आणि जन्मपर्यंत बंदीखान्यांत ठेविलें.

पुढें आपल्या बायकोचा आतेचा नवरा नासरुद्दीन कुबाचा हा आपणास सिंधदेशांत स्वतंत्र ह्मणवूं लागला; ह्मणून याणें त्यावर स्वारी केली. त्या स्वारींत

इ० स० १२१७ हि० स० ६१४.

याणें पुष्कळ हुशारी ठेविली, व स्वतःहि तलवारबहादुरी केली; परंतु आपला अधिकार स्थापण्याचा हेतूनें हा गेला होता, तो याचा हेतु सिद्धीस गेला नाहीं.

या वेळीं ख्वारिजमी लोक हिंदुस्थानांतील राज्य घेण्याकरितां येऊं लागतील असा सुमार दिसूं लागला. त्यांचें कांहीं लश्कर सिंधुनदाजवळ आलें होतें, त्याबराबर नासरुद्दीन हा युद्ध करित होता. परंतु इतक्यांत एक गोष्ट घडून आली, तेणेंकरून ही सर्व भीति एकीकडेसच राहिली.

तो प्रकार असाः—जेंगीझ खान हा पूर्वी मोगललोकांचा एक लहानसा सरदार होता. पुढें त्याणें

मोगललोकांचा सरदार जेंगीझखान.

तातारदेशांतील तीनहि लोकांस जिंकून त्यांची एकत्र केलेली फौज आपल्या फौजेंत मिळविली, आणि त्या प्रचंड सेनेसहित मुसलमानी राज्यांवर कोसळला. या लश्कराएवढें मोठें लश्कर त्याचा पूर्वींहि कोणाजवळ

नव्हतें, आणि नंतरहि अद्यापपर्यंत कोणाजवळ झालें नाहीं.

जलमलयापासून जे मनुष्यमात्रांस उत्पात प्राप्त झाले, त्यांची सीमा मोगललोकांचा या स्वारीनें झाली. हे कोणाला धर्मोपदेश करित नसत, कारण यांसच धर्म नव्हता; कोठें सुधारणेचें आरोपण करावें, तर यांजवळच मुळीं बीज नव्हतें; मुसलमानलोक हे त्यांचा धर्म स्वीकारिला असतां सोडीत; अथवा खंडणी दिली, तर सोडीत; तसा या लोकांजवळून सुटून जाण्यास कांहीं उपाय नव्हता; जेथें जावें तेथील लोकांची कतल करून सर्वस्वापहार करावा, यांतच यांस आनंद वाटत असे, आणि हे जेथें जेथें जात, त्या त्या मुलुकाचा सत्यानास करून टाकीत, एवढी मात्र यांचा भेटीची निशाणी मागें राही. प्रथम ख्वारिजमचा सुलूतानानें जेंगीझ खान याचे वकील मारून टाकिले, तेव्हां हें मोगली वादळ त्यावर कोसळलें. मग त्या सुलूतानाचा फौजा पराजित झाल्या; त्याचीं शहरें धुळीस मिळालीं; सर्व देश उद्ध्वस्त झाला; आणि त्याचा बहुतेक लोकांची कतल झाली, अथवा त्यांस गुलाम करून नेलें. शेवटीं तो सुलूतान क्यास्पीयन् समुद्रामध्यें एका बेटांत दडून राहिला होता, तेथें दुःखानें मरण पावला.

त्याचा मुलगा जल्लालुद्दीन हा त्याचा मागें कारभार पाहूं लागला; त्यास मोगललोकांनीं त्याचा राज्याचा पूर्वसीमेवरील प्रांतांत पळविलें. त्या राजपुत्रानें शेवटपर्यंत आपल्या मुलुकाचा बचाव व्हावा ह्मणून तलवार मारिली. त्याणें मोगललोकांबरोबर कंदाहाराजवळ लढाई मारून जय मिळविला; आणि दुसरा त्याहून पूर्वेकडील ठिकाणीं मिळविला. परंतु त्या योगानें त्याचा नाश व्हावयाचा

त्याची घडी चुकली नाहीं. शेवटीं त्याची मोगललोकांबराबर सिंधुनदाचा कांठीं लढाई झाली. त्या समयीं त्याणें पराक्रमाचा कळस केला; परंतु त्याचें सर्व लश्कर त्याचा डोळ्यांदेखत नाश पावलें, आणि शेवटीं वरून बाणांचा पाऊस पडत असतां बराबरचा सात लोकांसुद्धां तो नदी पोहून गेला. हें त्याचें शौर्य पाहून त्याचे शत्रु त्याजकडे टक टक पाहत राहिले.

इ०स० १२२१
हि०स० ६१८.

नंतर त्या रात्रीस व दुसऱ्या दिवशीं त्याचा फौजेपैकीं १२० लोक येऊन पुनः त्यास मिळाले, आणि थोडक्याच दिवसांत त्याणें चार हजार घोडा जमविला. पुढें आपल्या मागून मोगललोक सिंधुनद उतरून येतात असें पाहून, तो राजा दिल्लीकडे पळाला, आणि अल्तमश याणें आपलें सहाय करावें, अथवा राहण्यास आश्रय तरी द्यावा, अशी त्यास विनंती सांगून पाठविता झाला. अल्तमश याणें त्यास आदरपूर्वक उत्तर पाठविलें; परंतु मोगललोकांची धाड आपल्यावर पडेल या भीतीनें त्यास पाठ दिली नाहीं, हें शहाणपण केलें. तेव्हां आपल्या एकल्यावर बेतली असें पाहून, जल्लालुद्दीन याणें गकरलोकांबरोबर दोस्ती केली; लूट करून कांहीं फौज जमा केली; आणि नासरुद्दीन कुबाचा याजवर हल्ला करून त्यास मुल्तान एथें पळविलें. नंतर त्याणें कोणाचें ऐकिलें नाहीं; सिंधुनदाचा कांठचा देश लुटून साफ केला; आणि सिंधदेशावर स्वारी करून तो देश जिंकला. पुढें तो सिंधमध्यें राहिलाहि असता; परंतु इराणांत पुनः आपणास राज्य प्राप्त होईल अशी आशा लागून तो किरमानप्रांतांत

खारिजमचा राजाचा पाठलाग करित मोगललोक हिंदुस्थानांत येऊं लागले.

तो राजा परत इराणदेशास गेला.

गेला. कालेंकरून इराणदेशांतील मोगललोकां- इ०स० १२२३
चा फौजा नाहींशा झाल्या असें पाहून, त्याणें हि०स० ६२०.
आपली सत्ता त्या प्रांतांत पुनः चालू केली; आणि पुनः मोगललोकांनीं त्यावर हल्ला केला, तो मोठ्या पराक्रमानें फिरविला. शेवटीं सिंधुनद उतरून गेल्यापासून दहा वर्षांनीं जल्लालुद्दीन हा मेसोपोटेमियाप्रांतांत मरण पावला.

जल्लालुद्दीन हा सिंधदेशामध्यें राहत असतां, त्याच्या पाठलाग करित एक मोगललोकांची फौज आली होती. तिणें मुलूतानास वेढा दिला. तेथें नासरुद्दीन याणें तीस हात दाखविल्यावरून, ते लोक पुढें सिंधदेशांत चालते झाले. ते तेथें जात तों, जल्लालुद्दीन पूर्वींच निघून गेला होता. या स्वारीमध्यें ते चालीप्रमाणें क्रूर कर्मे करित असत. एके वेळीं सिंधदेशांतून जाण्याचा पूर्वी छावणीमध्यें शिधासामग्रीचा तोटा पडला. तेव्हां त्यांणीं १०,००० हिंदु कैदी ठार मारून टाकिले; तसें न करितां जर ते त्यांस सोडून देते, तरीहि त्यांचें चाललें असतें.

हे सर्व शत्रु येऊन गेल्यावर नासरुद्दीन यावर पुनः अल्तमश् याणें स्वारी केली. या स्वारींत अल्तमश् याचा पराजय झाला, आणि नासरुद्दीन यास बकरचा किल्ल्यांत पळून जावें लागलें. तेथून तो जाहाजांत बसून खालीं सिंधदेशांत जात असतां, वहावटळ होऊन सिंधुनदामध्यें कुटुंबासुद्धां बुडून मरण पावला. तेव्हां त्याचा सर्व मुलुक अल्तमश् यास मिळाला.

इ०स० १२२५
हि०स० ६२२.

नगर ठठ्ठा याचा दक्षिणेचा प्रदेश महम्मद कासीमापासून हा वेळपर्यंत स्वतंत्र होता, असें दिसतें. कदाचित्

मधील झालेल्या राजांतून कोणाचें वर्चस्व एथील राजांनीं कबूल केलें असेल; परंतु त्या मुलुकाचा आंतील कारभार त्या देशचाच राजांचा हातीं होता. ते राजे **सुमेर** वंशाचे राजपूत होते.

महम्मद बखत्यार **खिलजी** याणें बहार व बंगाल हे मांत जिंकिले होते; ते तो आपलेच असें ह्मणवी. तो कुतबुद्दीनाचा जांवई होता, आणि त्याचा हुकुमानें आपण वागतों असें बाहेरून दाखवित असे; परंतु पुढें त्याचा मागून गादीवर बसलेल्या अधिकाऱ्यांचें तंत्र त्याणें उघड सोडून दिलें, आणि तो आपणास स्वतंत्र ह्मणवूं लागला. त्यावरून जा वर्षी **अल्तमश्** याणें सिंधमधील स्वारी केली, त्याच वर्षी बखत्यार **खिलजी** यावर स्वारी करून त्यापासून बहार मांत घेऊन तेथील सुभ्याचें काम आपल्या मुलास सांगितलें; आणि **दिल्लीचा** बादशाहाचा आज्ञेनें मी बंगालचा कारभार करीन असें बखत्यार **खिलजी** याकडून कबूल करविलें. पुढें बखत्यार याणें आपला घेतलेला देश परत घेण्याचा यत्न केला; परंतु बहारचा सुभ्यावरील शाहाजाद्यानें त्याचा पराजय केला. त्या लढाईत बखत्यार हा मारला गेला.

नंतर **अल्तमश्** याणें उत्तरहिंदुस्थानांतील जो भाग स्वतंत्र राहिला होता, तो सर केला. या कृत्यास सहा वर्षांवर लागलीं. याणें मथम **रतनभोर** किल्ला घेतला. याजवळील दुसरा मदेश पूर्वींच हस्तगत झाला होता; परंतु हा पहाडामध्यें असल्यामुळें याचा वाटेस कोणी गेला नव्हता. नंतर **माळवा**मांतांतील **मांदू**नामक शहर याणें

इ०स०१२२६ हि०स०६२३ पासून इ०स०१२३२ हि०स०६३० पर्यंत.

घेतलें. हें मोठें विस्तृत असून याची मूळरचनाच स्वाभाविक मजबूद ठिकाणीं झालेली होती; पुढें ग्वालेर एथील लोकांनीं बंड केलें होतें. तें मोडून तें शहर पुनः हस्तगत करून घेतलें; नंतर भिलसा हें शहर साध्य केलें; शेवटीं उज्जनीनामक प्राचीन राजधानी ही घेऊन तेथील प्रसिद्ध देवालय मोडून टाकिलें; याप्रमाणें सर्व माळवाप्रांत याचा ताब्यांत आला.

या रीतीनें सांधीकोंधींतील कांहीं प्रांत खेरीज करून, सर्व उत्तरहिंदुस्थानाचें आधिपत्य दिल्लीचा सरकाराकडे आलें; परंतु सर्वच प्रदेशावर दिल्लीचा बादशाहांचा एकसारखा ताबा नव्हता; कांहीं प्रांत त्यांचा अगदीं हुकमतींत चालत होते, आणि कांहीं उगाच नावाला मात्र त्यांचा तंत्रानें होते. पुढें मोगलाई बादशाहीची अखेरी होईपर्यंत देशाची स्थिति याच प्रमाणें होती; तींत कोठें मध्यें कांहीं थोडे फेरफार होत; जेव्हां एका मागून एक असे कांहीं बलाढ्य बादशाहा गादीवर बसत, तेव्हां अगदीं हुकुमांतील असा मुलुक पुष्कळ असे, आणि अर्धवट असा थोडा असे. तसेच जे राजेरजवाडे यांचा तंत्रानें असून आपला आंतील राज्याचा कारभार स्वतः पाहत असत, ते सर्वसाधारण अशा राजकीय व्यवस्थेमध्यें अगदीं नमून असत. तेच केव्हां केव्हां दोन तीन दुर्बल बादशाहा तक्तावर बसले, म्हणजे सर्व घोटाळा होई; नवनवीन राजे उद्भवत, आणि जुने दांडगाई करूं लागत; त्यामुळें अशा बादशाहांमागून जो पुढें सामर्थ्यवान् राजा होई, त्यास पुनः श्रीपासून इतिपर्यंत सर्व देश घेण्याचा फाडा वाचावा लागे.

हिंदुस्थानाची स्थिति.

वर लिहिल्याप्रमाणें देश जिंकून अलूतमश् दिल्लीस माघारा गेला; आणि तेथून मुलूतानास जाण्याचा बेत करित आहे, इतक्यांत इ० स० १२३६ चा एप्रिल् महिन्यांत याचा काळ झाला.

अलूतमश् मरण पावला इ० स० १२३६ हि. स० ६३३, माहे साबान चंद्र २० वा.

अलूतमश् राज्य करित असतां बगदादचा खलीफाकडून यास राज्याचीं वस्त्रें आलीं. मुसलमानलोकांमध्यें नवीन राज्य स्थापिलें गेलें असतां, जर तें खलीफानें कबूल केलें, तर तें त्यांचा समजुतीनें अगदीं सशास्त्र होतें. यावरून दिल्लीचें राज्यहि तेव्हांपासून सर्वमान्य झालें, असें ह्मटलें असतांचिता नाहीं.

अलूतमश् याचा वजीर हा मोठा कीर्तिमान् पुरुष होता, आणि त्याणें पूर्वीं खलीफाचा हाताखालीं पुष्कळ वर्षेंपर्यंत मोठमोठ्या हुद्याचीं कामें केलीं होतीं. जामिउल्हिकायतनामक फार लोकप्रिय अशा इतिहासपर गोष्टींचें फारसी पुस्तक आहे, त्याचा कर्त्ता याचा दरबारांत असे.

दिल्ली जवळ कुतब ऊर्फ कुतबमीनारनामक एक मोठा सुंदर मनोरा आहे; तो अलूतमश् याचा राज्यांत पुरा झाला. त्याला वर फिरण्यास गच्चांसारिख्या जागा केलेल्या आहेत; त्याचा मध्यभाग चमत्कारिक रीतीनें कोरलेला आहे; आणि त्यावर नाना प्रकारचें सुंदर काम केलेलें आहे; तें कोणी पाहिलें असतां चकित होऊन जातो. पूर्वीं एक भूकंप झाला, त्यांत या मनोऱ्यास कांहीं धक्का पोंचला होता. तथापि हा अद्यापि २४२ फुटी उंच आहे. एवढा उंच स्तंभ या पृथ्वीवर दुसऱ्या कोठें नाहीं, असें मला वाटतें. या मनोऱ्याजवळ एक अपुर्ती मशीद आहे; तिजवर लेख आहे त्याजवरून ती शाहाबुद्दीन घोरी याचा वेळीं बांधली असा-

वी असें दिसतें. हिंदुस्थानांत जा मोठ्या डौलदार व सफाईच्या अशा उत्कृष्ट इमारती आहेत, त्यांमध्यें ही गणिली असतां चिंता नाहीं.

### ( ४ ) रुकुद्दीन बादशाहा.

अल्तमश् मेला, तेव्हां हिंदुलोकांबराबरील युद्ध संपलें; यानंतर फितुरें, बंडें, व राज्यांचा घालमेली यांचाच एकामागून एक परिवार चालला होता. त्यांपासून तूर्तातूर्त हित, अथवा चिरकाळ राहण्याजोगे असे परिणाम, यांतून कांहींच झालें नाहीं.

रुकुद्दीन हा, आपल्या बापामागून गादीवर बसला याणें कलावंतिणी, गवय्ये, व खुशमस्कऱ्ये, यांजवर द्रव्याचा पाऊस पाडिला, आणि आपला सर्व राज्यकारभार आईकडे सोंपला. ती जुलूम व क्रूर कर्में करूं लागली; तेणेंकरून सर्व लोकांनीं त्रासून बंड केलें, आणि सात महिन्यानंतर रुकुद्दीन यास पदच्युत करून, याची बहीण रजिया बेगम इला गादीवर बसविलें.

## ५ रजिया बेगम.

जे राजामध्यें गुण असावे, ते सर्व रजिया बेगम इजमध्यें होते; आणि जे पुरुष अति कठीण बुद्धीनें इचें आचरण शोधून पाहतील, त्यांसहि ती स्त्री होती, एवढा मात्र काय तो इजमध्यें दोष सांपडेल. याप्रमाणें फिरिस्ता हा इजविषयीं वर्णन करितो. ही मोठी व्युत्पन्न नव्हती; परंतु ही कुराण शुद्ध वाचित

इ० स० १२३६
हि० स० ६३४.
तिचे सद्गुण

असे. ही कामकाजामध्यें इतकी हुशार होती, कीं जेव्हां अल्तमश् हा दक्षिणेंतील प्रांतांत स्वाऱ्या करावयास जाई, तेव्हां तो आपल्या मुलांस राज्याचा कारभार न सांगतां इचा हवालीं करित असे. या इचा पूर्वींचा वर्तणुकेवरून पुढें ही राज्यपदावर आल्यावर चांगल्या रीतीनें कारभार चालवील अशी जी सर्वांची उमेद होती, ती व्यर्थ झाली नाहीं. तिचा भाऊ रुक्नुद्दीन यास पदच्युत करण्यास दोन पक्षांचे लोक एकत्र मिळाले होते, त्यांतून एका पक्षाचे इला गादीवर बसविण्यास प्रतिकूल होते. त्यांमध्यें पूर्वींचा दोन कारकीर्दींतील वजीर हा मुख्य होता. पुढें ते लोक जमाव करून दिल्लीवर चालून आले, आणि बेगमेचा सहायार्थ जी फौज येत होती, तिचा पराजय करिते झाले; परंतु रजिया बेगम इणें युत्धापेक्षां मसलतीनें आपलें काम या समयीं पार पाडिलें, आणि आपल्या शत्रूंमध्यें कळ पेटवून दिली, तेव्हां सहजच त्यांचा जमाव विरघळला. मग त्यांतील लोक पाहिजे तसे इचा हातास एकएकटे सांपडले. त्यांतून कित्येकांस इणें ठार मारिलें, व कित्येकांचा समजुती केल्या; याप्रमाणें थोडक्याच वेळांत सर्व स्वस्थ झालें.

रजिया बेगम ही जशी राजकीय कारस्तानामध्यें हुशार होती, त्याचप्रमाणें इतर राज्यसंबंधी व्यवस्थेंतहि जाणती होती. ही प्रत्यहीं सुल्तानाचा नेहमींचा पोषाक घालून आपल्या तक्तावर येऊन बसे; आणि जे कोणी लोक येत, त्यांचा मजकूर ऐकून घेऊन बंदोबस्त करी; पूर्वींचा राज्यांत जी अव्यवस्था झाली होती, ती इणें नीट केली; आणि कायदे पुनः तपासून नीट केले; जे मोठमोठे तंटे दरबारांत पडत, त्यांचा इनसाफ ती स्वतः करित असे; याप्रमाणें

नीतिमान् व बुद्धिमान् राजांचे सर्व गुण इजमध्यें होते. परंतु एका दुर्बलतेचा परिणामापुढें तिचा सर्व बुद्धीचें व सद्गुणांचें कांहीं चाललें नाहीं. तिचा घोडेस्वारांचा एक मुख्य होता. त्यावर ती विलक्षण मेहेरबानी करित असे. तो हबशी जातीचा गुलाम होता, यामुळें ही इची प्रीति इला विशेष लांछन देई. इची त्याशीं वर्तणूक सदोष होती, असें दिसत नाहीं. कारण एका दिवशीं त्या हबशानें इला उचलून घोड्यावर बसविलें, हेंच काय तें इचें अतिशय रीतिविरुद्ध आचरण झालें असें ह्मणतात. तथापि इणें जी या हबशावर प्रीति केली, ही अगदीं मोठी वेडी गोष्ट केली. पुढें इणें त्या हबशास **अमीर अल् उमरा**[1] हा हुद्दा दिल्यामुळें, सर्व दरबारी लोकांपेक्षां त्याची पायरी विशेष झाली. त्यामुळें इचे सर्व उमराव लोक त्रासून गेले, आणि इचा विरुद्ध गडबड करण्यास त्यांना दर्शनीं चांगलें कारण मिळालें.

बेगमेचा विरुद्ध बंड झालें.

अल्तूनियानामक तुर्की सरदारानें प्रथम बंड केलें. तेव्हां बेगम इणें त्याचा बतिंदानामक किल्ल्यावर एकदम स्वारी केली. परंतु तिची फौज फितूर झाली; गुलीमध्यें तिचा प्यारा सरदार मारला गेला; आणि इला कैद करून, अल्तूनियाजवळ ठेविलें असतां इजपासून अगदीं भीति राहणार नाहीं असें योजून, इला त्याचा हवालीं केलें, व इचा भाऊ बहिराम यास सिंहासनावर बसविलें.

याप्रमाणें आपलें बळ चालत नाहीं, असें पाहून इणें पुनः मसलत चालविली; आणि स्त्रीलोभानें अथवा राज्य-

(१) सरदारांचा सरदार, अथवा सेनापति.

लोभानें अल्तुनिया सरदार हा इणें वश करून घेतला. तेव्हां तो इजबराबर लग्न करण्यास व इचा तर्फेनें पूर्वींचा आपल्या पक्षाचा लोकांशीं लढण्यास कबूल झाला. मग इणें त्याचा सहायानें फौज जमवून दिल्लीवर चढाव केला, तेथें दोन लढाया झाल्या; त्यांत इला व इचा नवऱ्याला कैद करून ठार मारिलें. याप्रमाणें रजिया इची कारकीर्द साडेतीन वर्षें चालली.

त्यांत ती पराजित होऊन मारली गेली.

## ६ मौजुद्दीन बहिराम.

तिचा मागून तिचा भाऊ मौजुद्दीन बहिराम हा तक्ताधिपति झाला. याणें राज्यावर येतांच जा मानकऱ्यांनीं स्वकार्य साधण्याकरितां याला गादीवर बसविलें होतें, त्यांना विश्वासघातानें व मारेकरी घालून मारून टाकण्याचा यत्न चालविला. तो याचा हेतु सिद्धीस जाण्यापूर्वीं मोगललोकांचा एका फौजेनें याचा राज्यावर हल्ला करून लाहोरापर्यंत चाल केली. त्यामुळें याणें पुष्कळ फौज जमविली; तींत नवीन फितुरें व बंडें उत्पन्न होऊन शेवटीं यास फौजेनें कैद केल्यावर हा मेला गेला. या बादशाहानें २ वर्षें २ महिने राज्य केलें.

इ० स० १२३९ हि० स० ६३७.

मोगललोकांनीं पंजाबप्रांतावर हल्ला केला.

## ७ अल्लाउद्दीन मसाऊद.

मौजुद्दीन याचा मागून रुकुद्दीन याचा मुलगा अल्लाउद्दीन मसाऊद हा गादीवर बसला. याचा राज्यांतहि सदरहुप्रमाणेंच अव्यवस्था झाली. तशांत हा क्रूर आणि विषयी असे; त्यामुळें विशेषच बिघाड झाला. शेवटीं सुमारें दोन वर्षे राज्य केल्यानंतर हा पदच्युत होऊन मारला गेला.

याचा कारकीर्दींत मोगललोकांनीं दोन हल्ले केले. त्यांतून प्रथम तिबेटांतून येऊन बंगाल्यामध्यें स्वारी केली; त्या बाजूनें झालेली अशी दुसरी स्वारी वास्तविक इतिहासांत कोठें वर्णिलेली नाहीं. या स्वारीमध्यें याचा प्रांतांतील सरदारांनीं त्यांचा पराजय केला. दुसरी माणकू खाननामक सरदाराचा फौजेंतून एका टोळीनें वायव्येकडील प्रांतावर स्वारी केली. परंतु त्या स्वारींत ते मुल्तानचा दक्षिणेस पंजाबांतील संगम झालेल्या नद्यांवर ऊकनामक शहर आहे तेथपर्यंत येऊन माघारे गेले.

मोगललोकांचा स्वाऱ्या

इ० स० १२४४ हि० स० ६४२.

---

## ८ सुल्तान नासरुद्दीन महम्मद.

अल्लाउद्दीन मसाऊदानंतर सुल्तान नासरुद्दीन हा गादीवर बसला. याचा वीस वर्षांचा कारकीर्दींत पुष्कळ बंडें झालीं, व बाहेरील शत्रूंचे हल्लेहि आले; परंतु राज्यास धक्का बसला नाहीं. नासरुद्दीन हा अल्तमश याचा नातू होता; परंतु अल्तमश मरण पावल्यावर लागलेंच यास बंदीखान्यांत टाकिलें होतें. पुढें कांहीं दिवसांनीं यास मोकळा करून एका सुभ्याचें काम सांगितलें होतें; तथापि याची लहानपणाची एकांतीं बसण्याची व अभ्यास करण्याची सवय सुटली नाहीं. हा गादीवर आल्यानंतर याणें सर्व भरवसा ग्यासुद्दीन बुल्बननामक वजीरावर ठेवून त्यावर सर्व कारभार सोंपिला.

इ० स० १२४६ हि० स० ६४४.

बुल्बन हा अल्तमश याजवळ एक तुर्की गुलाम

ग्यासुद्दीन बुल्बन वजीर. होता. पुढें अल्तमश् याणें त्यास आपली एक मुलगी देऊन अब्रूस चढविलें; ती नासरुद्दीन महम्मद बादशाहाची आत होती.

त्या वेळीं सिंधुनदाचा पश्चिमेकडील सर्व प्रांत मोगललोकांचा स्वाधीन होते; त्यांपासून राज्यास अपाय होईल अशी सांप्रत भीति पडूं लागली. त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां बुल्बन याणें सर्व सरहद्दीचे प्रांत मिळून एक सुभा केला, आणि त्याचें काम शीरखान ह्मणून त्याचा सारिखा गुलाम असून त्याचा सगा होता त्यास सांगितलें. नंतर पंजाबप्रांतांत स्वतः स्वारी करून जाण्याविषयीं नासरुद्दीन यास त्याणें सल्ला दिली. पूर्वीं मोगललोक लूट करण्याचा स्वाऱ्या करीत, तेव्हां त्यांस गकरलोक हे सहाय करित असत, यास्तव पंजाबप्रांतांत असतां नासरुद्दीन याणें त्यांचें चांगलें पारिपत्य केलें; आणि जा जा जाहगीरदारांनीं आपल्या करारापमाणें पुष्कळ दिवसपर्यंत आपल्या तैनातीची फौज हुजूर ठेविली नव्हती, त्यांणीं त्यांणीं ती नियमापमाणें पाठवित जावी, असा बंदोबस्त केला.

याचा पूर्वीं जे दुर्बल बादशाहा झाले, त्यांचा कारकीर्दींत कितीएक हिंदु राजांनीं संधि पाहून बंडें केलीं होतीं. त्यांचा बंदोबस्त करण्याचें काम याणें हातांत धरिलें. पहिल्या स्वारींत दिल्लीचा पलीकडील यमुना कांठापासून बुंदेलखंडांत कलिंजरशहरापर्यंत यमुनेचा दोहीं तीरींचा प्रदेशांत आपली सत्ता बसविली. पुढें तीन वर्षांमध्यें दिल्लीचा जवळून चंबळानदीपर्यंत मेवात हा पहाडी मुलुक, तसाच रतनभोरनामक

इ० स० १२४७ हि० स० ६४६ पासून इ० स० १२५० हि० स० ६४९ पर्यंत.

जवळच्या प्रदेश आणि चितूरनामक दूरचा प्रांत, या सर्व ठिकाणीं आपला पुनः अम्मल बसविला. पुढें नर्वडनामक बुंदेलखंडांतील मोठा मजबूद किल्ला याणें घेतला; तसाच देरी किल्ला सर केला; आणि माळव्यांत आपली सत्ता चालू केली. या स्वाऱ्यांचा दरम्यान ऊक एथील सुभेदार याणें बंड केलें होतें, तें याणें मोडिलें; तसेंच याचा पंजाबच्या सुभेदार शीर खान याणें मोगललोकांस आपल्या राज्यांत न येऊं देतां, उलटी त्यांचा मुलुकावर स्वारीकरून गजनी शहर घेतलें.

बुल्बन यास अधिकारावरून दूर केलें.

वरील बहुतेक लढायांत बादशाहा हा फौजेबरोबर असे, आणि जी फत्ते होई तिचा टिक्याचा मात्र हा धनी असे; परंतु वास्तविक पाहिलें असतां सर्व अधिकार वजीराकडे असे. असें झाल्यामुळें आपण वजीरापुढें पारका होऊन गेलों, असें बादशाहाचा मनांत येऊं लागलें. त्या वेळीं इमादुद्दीननामक एक मसलती उमराव होता. तो बुल्बन वजीराचा कृपेनें वाढला होता; परंतु त्याणेंच चुगली करून सांप्रत बादशाहाचें मन वळविलें, आणि त्याकडून वजीर यास त्याचा कामावरून काढवून ती जागा आपणास देवविली.

इ० स० १२५३ हि० स० ६५१. त्यामुळें लोकांमध्यें नाखुशी व फितुरें होत चाललीं;

त्यानंतर बुल्बन याचा अगदीं लग्याचे जे लोक होते, त्यांस त्याणें लवकरच वाटेस लाविलें; पुढें राज्यकारभार नीट चालेनासा झाला, त्यामुळें पुष्कळ लोक बेदिल होऊन गेले; आणि त्या निमित्तानें बाहेरील प्रांतांचा दहा सुभेदारांनीं आपल्या फौजा एकत्र करून प्रथम बादशाहाजवळ तकरार केली, आणि नंतर नवीन वजीरास दूर करावा, ह्मणून बादशा-

तेव्हां बुऌबन यास पुनः कामावर आणिलें.

ह्याजवळ त्याचा मान राखून, परंतु निक्षून, मागणें केलें. त्या सुभेदार लोकांचा आणि ग्यासुद्दीन बुऌबनाचा बहुधा कट होता, असें दिसतें. त्या लोकांनीं आपल्या मागण्यामध्यें बुऌबन यास काढून टाकिलें याविषयींचा कांहींच उल्लेख आणिला नाहीं; परंतु त्या जमातीचा उद्देश उघडच दिसून आला; तेव्हां तीस आड येण्याचें आपणास सामर्थ्य नाहीं असें पाहून, बादशाहानें ग्यासुद्दीन यास पुनः आपल्या कामावर बोलाविलें; तेव्हांपासून ग्यासुद्दीन हाच राज्याचा खरा मालक झाला.

इ०स०१२५५ हि०स०६५३ पासून इ०स० १२५७ हि०स० ६५५ पर्यंत.

नंतर इमादुद्दीन याणें बंड केलें, त्यांत एक बादशाहाचा सगाहि त्यास सांपडला होता. पुढें थोडक्याच दिवसांत त्यास धरून ठार मारिलें, तथापि संतूरचा हिंदु राजा आणि नासरुद्दीन याचाच सिंधदेशांतील सुभेदार वगैरे मिळून तो एक जमाव झालेला होता, त्यामुळें हें बंड अगदीं मोडे तों दोन वर्षें लोटून गेलीं.

त्या मुदतींत मोगललोक यांणीं पुनः पंजाबप्रांतावर हल्ला केला तो याणें परतविला. नंतर करामाणिकपुर

इ०स०१२५३ हि०स०६५६.

एथील सुभेदारानें बंड केलें होतें, याकरितां त्यावर स्वारी केली; तसाच मेवातप्रांतांतील लोक यांणीं उचाला केला, त्यांचा बंदोबस्त करण्यास फार सायास पडले. त्यांवर बुऌबन हा स्वतः गेला, आणि मोठा प्रयास करून व कांहीं खामीस येऊन त्यांस लढाईमध्यें जिंकून शेवटीं त्यांचा मुलुक पाडाव करिता झाला. या लढाईंत दहा

इ०स०१२५९ हि०स०६५७.

हजार बंडवाले लोक मारले गेले, असें म्हणतात. मेवातप्रांताची सरहद्द दिल्लीपासून साडेबारा कोशांचा आंत आहे, तथापि एथील लोक तिखट व तंटेबाज पहाडी आहेत; त्यांच्या पुरा बंदोबस्त इंग्रेज सरकारच्या अम्मल चालू होईपर्यंत झाला नव्हता. यानंतर जेंगीझ खान याचा नातू होलाकु खान म्हणून जो मोठा बलाढ्य राजा, त्याजकडून एक वकील आला होता; त्याचें मोठ्या सन्मानानें आगतस्वागत झालें. त्या वेळीं जी दरबारची शोभा केलेली होती, ती जशी बादशाहीचा भरभराटीमध्यें होत असे, त्याप्रमाणें वर्णावयाजोगी होती. यापुढें सांगावयाजोगी दुसरी कांहीं गोष्ट घडून आली नाहीं. याप्रमाणें वीस वर्षे राज्य करून नासरुद्दीन हा इ० स० १२६६चा फेब्रुआरि महिन्यांत मरण पावला.

इ० स० १२६६. हि० स० ६६४.

नासरुद्दीन हा खासगी व्यवहारांत दरवेशासारिखा वागत असे. हा पुस्तकांचा प्रती करून आपला सर्व स्वतांच्या खर्च चालवी. याचें खाणें अतिशय साधें असे, व तें स्वतां राणी तयार करित असे. त्या कामास हा तिला मदतीस दासीहि देत नसे. हा एकपत्नी होता. याणें कोणी राखा ठेविल्या नव्हत्या. हा फारसी व्युत्पत्तीच्या प्रख्यात भोक्ता होता. इराण व हिंदुस्थान यांचा "तबकातिनासिरी" नामक जो इतिहास अद्यापि फार प्रसिद्ध आहे, तो याचा दरबारांत लिहिला, व त्याचें नावहि याचाच्या नावावरून पडलें आहे. नासरुद्दीन याचा भलेपणाविषयीं एक गोष्ट सांगतात; ती अशी कीं, एके दिवशीं बादशाह याणें आपण लिहिलेला एक ग्रंथ आपल्या दरबारांतील एका मानकऱ्यास दाखविला. त्यांत त्याणें पुष्कळ चुक्या काढून दाखविल्या,

त्या बादशाहानें तत्क्षणीं नीट केल्या. नंतर जेव्हां तो अमीर निघून गेला, तेव्हां याणें ते शोध खरवडून टाकून पुनः ग्रंथ जसा होता तसा केला. हें पाहून यास कोणी असें करण्याचें कारण विचारिलें. तेव्हां याणें सांगितलें, कीं ती मत पूर्वींचीच शुद्ध होती, असें मला माहित होतें; परंतु आपल्यामतें चांगली बुद्धि सांगणारा असा जो अमीर त्याचें मन दुखविण्यापेक्षां, ते शोध घालावे हें मला बरें वाटलें.

---

## ९ ग्यासुद्दीन बुलूबन[२].

इ॰स॰१२६६
हि॰स॰६६४.

नासरुद्दीनानंतर त्याचा वजीर बुलूबन हा गादीवर बसला. याकडे पूर्वींच सर्व बादशाहीचा अधिकार होता, यामुळें तें नाव धारण करण्यास यास जड गेलें नाहीं.

बुलूबन याणें गुलामलोकांचें प्राबल्य कमी केलें.

बुलूबन हा अलूतमश याचा दरबारांत लहानपणापासून वाढला होता; आणि त्यानंतर जा पुढें कारकीर्दी झाल्या, त्यांतील लपंडावांत व घालमेलींत हा मोठा कारभारीच होता. अलूतमश राज्य करित असतां त्या बादशाहाचा दुसऱ्या चाळीस गुलामांचा व याचा असा करार झाला होता, कीं सर्वांनीं एकमेकांस सहाय करावें. या गुलामांतून बहुतेक मोठ्या अधिकारास चढलेले होते. परंतु पुढें आपलें स्वतांचें कार्य साधलें, तेव्हां गुलामलोक ठेवण्याची रीति पुढें चालविली असतां, आपल्या वंशांत राज्य चालण्यास विघ्नें उत्पन्न होतील, असें मनांत आणून, याणें ती वहिवाट बंद

---

२ यास इंग्लिश ग्रंथकार फार करून बलीन असें ह्मणतात.

करण्याचा इरादा केला, आणि असा नियम ठरविला, कीं जे खानदानीचे गृहस्थ असतील, त्यांसच जागा द्यावयाचा. या नवीन शिस्तीचें याणें एवढें बंड माजविलें कीं, हलक्या कुळांतील लोकांशीं साधारण व्यवहार ठेवण्याचाहि आपल्यास त्रास आहे, असें हा पुढें मिरवूं लागला. दुसरें हिंदुलोकांस भरवशाचीं कामें मुळींच द्यावयाचीं नाहींत, असा याणें ठराव केला. याचप्रमाणें जीं याणें दुसरीं सर्व कृत्यें केलीं, तींहि अशाच क्षुद्र बुद्धीनें केलीं. आपल्या राजधानीचा वाटोळी शिकार राखण्याविषयीं याणें कायदे केले. हा तरुण असतां मोठा मद्यपी होता; परंतु पुढें याणें मद्य सोडल्यावर जरी दुसऱ्यानें त्याचें मितप्राशन केलें, तथापि हा त्यास भारी शासन करित असे. कोणी बंड केलें असतां पूर्वींचे राजे त्यांतील मुख्यांचें पारिपत्य करीत; हा त्यांचा बराबर त्यांचा सर्व पदरचा लोकांचाहि शिरच्छेद करित असे. याचा कठीण अन्यायाविषयीं गोष्टी सांगतात; त्या अशा कीं हा प्रांतांचा सुभेदारलोकांस चवाठ्यावर आणून फटके मारित असे, आणि कधीं कधीं आपल्या देखत प्राण जाईपर्यंत असा त्यांस मार देत असे.

या पादशाहाचा वेळीं मोगललोकांचा धास्तीमुळें जिकडे जिकडे ते लोक गेले, तिकडील तिकडील सर्व प्रख्यात लोक पळाले, आणि बुल्बन याचें मात्र मुसलमानी राज्य मोगलांचा तावडीस सांपडलें नव्हतें, त्यामुळें मोठमोठे कीर्तिमान् मुसलमानलोक देशत्याग करून याचा दरबारांत येऊन राहिले होते. कांहीं नाहीं तरी पंध्रा राजे माझा आश्रयास येऊन राहिले होते, असा हा गर्व वाहत असे. जा जा महल्यांत ते राहत असत, त्यांस त्यांचा त्यांचा राज्यांचीं

नावें याणें दिलीं होती. त्यामुळें **रूम**, **घोर**, **खारिजम**, **बगदाद**, व दुसरीं राज्यें यांचीं नावें या निमित्तानें **दिल्ली**मध्यें पुष्कळ दिवस चाललीं होतीं. याप्रमाणें सदीचा जोरानें हा कृपणबुद्धी व आपलपोटी **बादशाहा** लोकांस बाहेरून उदार व थोर बुद्धीचा असा दिसून आला होता.

अशा आलेल्या राजांपेक्षां, **मोगल**लोकांचा भयानें पळून येऊन याचा दरबारांत राहिलेल्या व्युत्पन्न लोकांची संख्या सहजच विशेष होती. बुलूबन याचा वडील मुलगा शाहाजादा **महम्मद** हा मोठा गुणसंपन्न होता. त्यामुळें याचा दरबारांत त्या वेळचे सर्व मख्यात ग्रंथकार येत असत; त्यांत पुष्कळ मोठमोठे विद्वान् होते. त्यांमध्यें **अमीर खुशरू**नामक कवि होता. पुढें **शेख सादी**[३] याणें आपल्या ग्रंथाची एक प्रत त्या शाहाजाद्यास पाठविली, आणि लिहिलें कीं अतिशय म्हातारा झाल्यामुळें आपल्या बलावण्याप्रमाणें माझानें **दिल्लीस** येववत नाहीं, ह्मणून मी मोठा नाखुश आहें; परंतु आपणास **अमीर खुशरू**सारिख्या रत्नाचा सहवास प्राप्त झाला आहे, हें आपलें महत् भाग्य आहे; बुलूबन यासहि डौल व दिमाख आवडत असे, त्यामुळें याचा दरबारामध्यें बाहेरून मोठी शोभा दिसे. त्या खटाटोपीनें बाहेरचे लोक याचें वास्तविक स्वरूप पहाण्याविषयीं अंध होऊन जात.

यानंतर लुटारू **हिंदु**लोकांचा टोळ्या जमून गंगा व

---

(३) याणें कांहीं अति सुरस नीतिपर फारसींत काव्यें केलीं आहेत. बहुधा एवढ्या योग्यतेचा दुसरा ग्रंथकार फारसींत झालेला नाहीं.

यमुना यांचा कांठचा प्रदेशांत, व तशाच जूद व मेवातचा पहाडांत उपद्रव देऊं लागल्या; तेव्हां याणें स्वारी करून मेवातप्रांतामध्यें १००,००० मनुष्यांचा संहार केला, आणि त्या प्रांतांत मोठें रान होतें, तें बरेंच तोडून टाकिलें; तेणेंकरून तेथें चोरांस राहवयास आश्रय मिळावयाचा तो नाहींसा होऊन, लोक शेती करून आपली उपजीविका करूं लागले. याप्रमाणें तेथील लोकांचें निर्दलन करून कितीएक ठिकाणीं बंदोबस्ताकरितां याणें चौक्या ठेविल्या, आणि शिवायहि दीर्घ दृष्टिनें दुसरे बंदोबस्त करून ठेविले; त्यामुळें त्या लुटारू लोकांचा पक्का बंदोबस्त झाला असें वाटतें. इ०स० १२६६ हि०स० ६६५.

याचा कारकीर्दीत मोठें बंड असें बंगालप्रांतांत झालें. त्याचा प्रकार;—बंगालचा सुभेदार तोग्रल खान याणें मेघनादीचा पलीकडचा कांठावरील जाजनगरावर फत्ते करून पुष्कळ लूट मिळविली; तींतील अंश जो दिल्लीस पाठवावयाचा तो पाठवीना; आणि पुढें लवकरच आपणास बादशाह ह्मणवूं लागला. बंगाल्यामध्यें बंड.

यावर बुल्बन याणें प्रथम जी फौज पाठविली तिचा त्याणें अगदीं पराजय केला; यास्तव त्या फौजेचा सरदारास बादशाहानें फांशीं दिलें. एवढी सक्ती केली, तथापि पुनः याणें जी फौज त्याजवर पाठविली, तीहि हरली; तेव्हां हा स्वतः तें बंड मोडण्याकरितां निघाला. इ०स० १२७९ हि०स० ६७८.

---

* सांप्रत त्यास तिपेरा ह्मणतात. कोणी कटकप्रांतांत जाजपुर ह्मणून गांव आहे, तेंच जाजनगर, असें ह्मणतात; परंतु जाजपुर ही कधींहि कोणत्या प्रांताचा ठाण्याची जागा नव्हती.

ही स्वारी याणें आपल्या नेहमींचा झपाट्यानें व हुशारीनें पार पाडिली. त्या वेळीं पावसाळा होता, परंतु तो पुरा होण्याची वाट न पाहतां हा लश्कर घेऊन निघाला, आणि त्या वेळीं बंगालचा पूर्वभागाची सुनारें (ऊर्फ सुंदर) गंज ही राजधानी होती, तेथें समोर जाऊन ठेपला; तेणेंकरून तोग्रल खान अतिशय भयाभीत झाला, आणि सर्व मैदान मुलुक सोडून देऊन बराबर मजबूद फौज घेऊन रानांत जाऊन राहिला. बुल्बन याचा एक सरदार फिरत असतां, त्यास अकस्मात् तोग्रल याची छावणी अढळली, तेव्हां तो एथें दडून राहिला आहे असें त्या सरदारास समजलें. त्या वेळीं त्या सरदाराजवळ केवळ चाळीस लोक मात्र होते; तथापि त्याणें जीवाची आशा सोडून त्या छावणीवर दिवसाढवळ्या जाण्याचा निश्चय केला. त्याचे ते थोडकेच स्वार तोग्रल याचा डेऱ्याशीं जातपर्यंत कोणाचा लक्षांत आले नाहींत. मग तेथें गेल्यावर ते मोठ्या आरोळ्या फोडून घसरले; त्या समयीं बादशाहाची सर्वच फौज आपणावर येऊन पडली असें त्यांस वाटून, तोग्रल व त्या जवळचे दुसरे लोक मागें पुढें न पाहतां पळाले; तीच भीति सर्व लश्करभर पसरली; तेव्हां सर्वत्र गोंधळ होऊन त्यांची वाताहत झाली. पुढें तोग्रल हा जाजनगर एथें पळून जात असतां, वाटेंत आपल्या घोड्यावर बसून एक नदी पोहून जाण्याचा बेत करित होता; इतक्यांत त्याच्या पाठलाग करून त्या लोकांनीं त्यास मारिलें.

तें बंड मोडलें.

बुल्बन हा फारच क्रूर होता; तथापि या बंडांतील

५ हें शहर पुढें गंगानदीचा प्रवाहानें धुपून गेलें आहे.

लोकांचें त्याहिपेक्षां विशेष क्रूरतेनें याणें पारिपत्य केलें. हा परत दिल्लीस आल्यावरहि लोकांस फांशीं देण्याचा कहर चाललाच होता; परंतु पुढें काजी, मुफ्ती, व दुसरे विद्वान् व सर्वमान्य असे लोक मध्यें पडून त्यांणीं तो संहार बंद करविला.

त्यानंतर इराणाचा बादशाहा अरघून खान याची एक मोगली फौज पंजाबावर स्वारी करून आली; त्या वेळीं त्या प्रांताचा सुभ्याचें काम शाहाजादा महम्मद याजकडे होतें. तो आपल्या बापास भेटण्याकरितां दिल्लीस गेला होता; तेथें हें वर्तमान समजतांच तो त्वरेनें परत गेला, आणि त्यांचा पराजय करून त्यांणीं जेवढा मुलुक घेतला होता तो सर्व परत घेता झाला. इतक्यांत तैमूर खाननामक प्रख्यात मोगली सरदार एक निवकड स्वारांची फौज घेऊन आला; तेव्हां मोठ्या निकराचें युद्ध झालें, त्यांत शाहाजादा याणें मोगललोकांचा अगदीं मोड करून टाकिला; परंतु हा पाठलाग करित असतां कांहीं मोगललोक जुटीनें राहिले होते, त्यांणीं त्यास मारिलें. या लढाईंत अमीर खुशूरुनामक प्रख्यात कवि, जो शाहाजादा महम्मद याबराबर सार्वकाल असे, त्यास मोगलांनीं धरून नेलें.

मोगललोकांचा हल्ला.

शाहाजादा महम्मद याणें हटविला, परंतु त्यांत तो मेला गेला.

याप्रमाणें या शाहाजाद्यास त्याचा पराक्रमाप्रमाणें योग्य मृत्यु आला. त्याचा मरणानें, बादशाहाचा वडील पुत्र मेला ह्मणून, आणि लोकांचा त्राता गेला ह्मणून, मोठा घात झाला. या प्रसंगीं सैन्यांतील अगदीं फाटक्या शिपायापासून सर्व लोकांचा डोळ्यांतून अश्रु आले, आणि

बुलूबनाचेंहि अंतःकरण द्रवलें. या सुमारास याचीं ऐंशीं वर्षांची उम्मर झाली होती; त्या वेळीं ही आकाशची कुऱ्हाड यावर पडल्यामुळें हा लवकरच क्षीण होत चालला; तेव्हां याणें आपला दुसरा मुलगा बकारा खान यास जींवंतभेटीस बोलाविलें. पुढें बकारा खान आला, आणि त्यास वाटलें होतें तितकी तूर्त धास्ती नाहीं असें पाहून परवानगी न घेतां आपल्या सुभ्यावर बंगाल्यास जाता झाला. तेणेंकरून बुलूबन फार संतापला, आणि याणें शाहाजादा महम्मद कैखुशरू यास बोलावून त्याणें आपल्या मागें गादीवर बसावें असा ठराव केला. पुढें लवकरच बादशाहा मरण पावला. नंतर आपसांत लढाई न लागावी या हेतूनें प्रधानलोकांनीं बकारा खान याचा मुलगा कैकोबाद याचा नावानें दौंडी पिटविली, आणि खुशरूस त्याचा बापाचें मुलतानचा सुभ्याचें काम दिलें. या बंदोबस्तानें बकारा खान व खुशरू या दोघांचेंहि हक्क बुडाले, तथापि ते खुशी दिसले. याप्रमाणें कोणी आड न येतां कैकोबाद सिंहासनारूढ झाला.

बादशाहा मरण पावला.

इ० स० १२८६ हि० स० ६८५.

---

## ९ कैकोबाद.

कैकोबाद गादीवर बसला, तेव्हां याचें वय १८ वर्षांचें होतें. त्या वेळीं मनुष्याचें मन सहजच ख्यालीखुशालीकडे जातें; परंतु हा तर अनावर विषयी झाला. याचा वजीर निजामुद्दीन हा, आपणास राज्यपद मिळविण्याचा लोभानें, याचा दुर्गुणांस अधिकाधिक उत्तेजन देत असे.

इ० स० १२८६ हि० स० ६८५.

वजीराचें कपट

बादशाहाचा चुलतभाऊ कैखुशरू हा आपणास आड येईल, या हेतूनें खुशरूनें कांहीं अविचारानें वर्तणूक केली अशी संधि पाहून, बादशाहाचा मनांत त्याविषयीं याणें वांकडें आणिलें. नंतर त्याचें कांहींहि केलें असतां आपणास भीति नाहीं याविषयीं निर्धास्त होऊन, त्याणें मारेकरी घालून खुशरू याचा प्राण घेतला. अशाच कपटांनीं जे प्रधान त्याचा अन्नाचे नव्हते त्यांतून कित्येकांचे त्याणें प्राण घेतले, व कित्येकांचा अप्रतिष्ठा करून त्यांस घालविलें. इकडे जसें दरबारांत त्याचें चालत असे, त्याप्रमाणेंच जनानखान्यांत त्याचा बायकोचा मोठा पगडा असे; त्यामुळें बादशाहा हा त्याचा हातून पाणी पिऊं लागला होता. त्याची सत्ता.

त्या वेळीं पुष्कळ मोगललोक दिल्लीस चाकरीस राहिले होते. ते बादशाहास उपयोगी पडतील, हें जाणून त्यांजवरील बादशाहाची भक्ति दूर करावी हा निजामउद्दीन याचा हेतु होता. यास्तव त्या लोकांचा त्यांचा स्वदेशीय लोकांबराबर पत्रव्यवहार होऊन मसलत चालली आहे, असें खोटें पिकवून, त्याणें बादशाहास भीति घातली; शेवटीं त्या मोगललोकांचा सरदारांस एके दिवशीं मेजवानीस बलावावें, आणि विश्वासघात करून मारून टाकावें, असें करण्यास त्याचा मसलतीनें बादशाहा उद्युक्त झाला. मोगलसरदारांची कतल.

निजामउद्दीन याचे बेत पक्के होत तों, बादशाहाचा बाप बकारा खान हा, हीं सर्व वर्तमानें ऐकून, आपल्या मुलाचा हिताचा बंदोबस्त करण्याकरितां फौज घेऊन आला. तेव्हां निजामुद्दीन याचा शिकवणीवरून बादशाहा लढाईचा तयारीनें बादशाहाची व त्याचा बापाची भेट.

त्या पुढें गेला. पुढें जेव्हां लश्करें जवळ जवळ आलीं, तेव्हां बकारा खान याणें आपल्या पुत्राची फार विनवणी केली; तेव्हां जरी निजामुद्दीन भेटीचा आड आला, तथापि त्याचें न ऐकून बादशाहानें भेटण्याचें कबूल केलें. या भेटीपासून चांगला परिणाम होऊंनये, ह्मणून बकारा खान यास वजीरानें सांगून पाठविलें, कीं तुह्मी अगदीं नीचाप्रमाणें बादशाहाचा सत्कार ठेविला पाहिजे. तें त्याचें सर्व बोलणें कबूलकरून बकारा खान दरबारांत गेला; आणि तेथें पुनःपुनः मुजरे करित असतां, बादशाहाचा मनास कांहीं द्रव नयेतां तो तक्तावर स्वस्थ बसला आहे, असें याचें दुष्ट आचरण पाहून बकारा खान यास अश्रुपात झाले. तें पाहतांच बादशाहाचे सर्व पूर्वींचे निश्चय गडबडले, आणि तक्तावरून उडी टाकून तो आपल्या बापाचा पायां पडण्याकरितां धांवला. याणें पायां पडूं नये ह्मणून बाप त्वरेनें पुढें सरसावला; इतक्यांत याणें येऊन त्याचा गळ्याला मिठी मारली, आणि ते कांहीं क्षणपर्यंत तसेच एकमेकांस आलिंगून रडत उभे राहिले. तें पाहून सर्व दरबारांतील लोकांचीहि बहुधा त्यांचा सारखीच अवस्था झाली. ते पहिले उद्गार जाऊन उभयतां स्वस्थ झाल्यावर, कैकोबाद याणें आपल्या बापास सिंहासनावर बसविलें, आणि त्याचें मोठ्या प्रीतीनें व सन्मानानें आदरातिथ्य केलें. असें होतांच, पूर्वींचे लढाईचे सर्व विचार एकीकडे राहिले. पुढें त्यांचा पुष्कळ भेटी झाल्यानंतर बकारा खान याणें पाहिलें तों, वजीराची दक्षता फार, आणि त्या मंदबुद्धी बादशाहाजवळ त्याचें वजन विशेष; तेव्हां त्या वजीराचा पगडा सलोख्याचा रीतीनें मोडत नाहीं, असें त्याचा अनुभवास

आले. मग तलवारीचा जोरानें आपला हेतु सिद्धीस नेण्याची त्याची इच्छा नव्हती, किंवा त्यास सामर्थ्य नव्हतें, हें समजत नाहीं; परंतु तो आपल्या मुलाचा नशीबीं असेल तसें होऊ, असा हवाला देऊन, परत बंगाल्यास जाता झाला.

पुढें कैकोबाद हा सर्व प्रकारचा दुर्व्यसनांत पुनः रत झाला; तो विषय अतिशय होऊन लहानपणींच याचें शरीर पिचलें; त्यामुळें यास पुढें पक्षघात झाला. नंतर यास विचार सुचूं लागले; तेव्हां स्वतांची भयप्रद स्थिति याचा नजरेस पडली; परंतु पाहूं जातां चांगल्या रस्त्यानें आपल्या वजीरापासून आपली सुटका यास करून घेतां येईना; तेव्हां त्या वजीरानेंच जी पूर्वी विद्या शिकविली होती, त्याच विद्येचा सहायानें विषप्रयोग करून थोडक्याच दिवसांत त्यास यार्णे अन्यलोकास पाठविलें.

वजीरास मारिलें.

वजीर मेल्यानंतर मुख्य कारभारकर्त्याचा दाब नाहींसा झाला; त्यामुळें पुष्कळ शत्रूंचें फावलें; आणि बादशाहास कारभार करण्याचें सामर्थ्य नाहीं, त्यामुळें ते शत्रु याचा अधिकार घेण्यास झोंबूं लागले.

पूर्वी दरबारांमध्यें गुलामलोकांचें प्राबल्य असे, तें बुल्बनाचा शिस्तीनें मोडून गेलें होतें; यामुळें त्या वेळीं जे मुख्य लश्करी सरदार होते, त्यांचें काय तें भांडण राहिलें होतें; अद्यापि एतद्देशीय हिंदुलोकांचें दरबारांत महत्व वाढून निराळा पक्ष उभारण्याजोगें त्यांचें सामर्थ्य नव्हतें; त्यामुळें एकीकडे तातारलोकांतील सरदार, आणि दुसरीकडे गजनी व घोर या जुन्या राज्यांतील सरदार, या दोघांचें काय तें भांडण

बादशाहास पदच्युत करून मारिलें.

इ०स०१२८८
हि०स०६८७.
चालले असे. या दुसऱ्या पक्षामध्ये खिल्जीलोक हे पुढे होते; ते त्यांचा मुख्य सरदाराचा हुशारीमुळे, किंवा कांहीं दुसऱ्या कारणानें होते, हें समजत नाहीं; परंतु त्यांणीं तातारलोकांचें चालूं न देतां, कैकोबाद यास मारेकरी घालून मारवून, आपला मुख्य जलालुद्दीन यास तक्तावर बसविलें.[६]

---

(६) खिल्जी लोकांबराबर जे लोक राज्याविषयीं भांडण करित होते ते मोगल होते, असें फिरिस्ता वर्णन करितो; परंतु त्या वेळीं तातार व तुर्की लोक नाहींसे झाले होते, आणि मोगललोक एवढ्या नावास आले होते, या दोनहि गोष्टींवर भरवसा ठेवबत नाहीं. तशांत तातारलोकांनीं कैकोबाद याचा मुलाचा पक्ष स्वीकारिला होता; तो शाहाजादा तुर्की वंशांतला असल्यामुळें, त्यांणीं सहजच पसंद केला; तसे जर ते मोगल असते तर ते पसंद करतेना. कारण त्याचा बापानें ह्मणजे कैकोबाद याणें त्यांचा सरदारांची विश्वासघातानें कतल केली होती. त्यामुळें त्यांणीं त्याचा तिरस्कार केला असता.

कुतबुद्दीनापासून जे दिल्लीचे राजे झाले. ते घोरी वंशांतीलच असा कांहीं ग्रंथकारांचा अभिप्राय आहे; परंतु हे राजे तसाच गजनीचा सुभेदार एलदोज, व तसेच दुसरे दोन तीन राजे या सर्वांची, बहुतेक पूर्वेकडील लोकांविषयींचे इतिहासकार, एकाच वंशांत गणना करितात. आणि त्यांस "घोर एथील सुलतानांचे गुलाम असें ह्मणतात."

# प्रकरण दुसरें.

# खिल्जी वंशाचें वर्तमान.

## जल्लालुद्दीन खिल्जी [1].

**जल्लालुद्दीन** गादीवर बसला, तेव्हां याचें वय ७० वर्षांचें होतें. इ०स० १२८८ हि०स० ६८७.

कोणी ग्यासुद्दीन बुलूबन याचें नाव काढिलें असतां हा त्यास फार मान देई, व त्याविषयीं आपली अतिशय प्रीति दर्शवी. आपणास एवढा मोठा अधिकार लोकांनीं जोरावारीनें दिला, याविषयीं हा बाहेरून खंती दाखवित असे. हा घोड्यावर बसून बादशाही महालांत येईना, आणि तक्तावर बसावयाचें सोडून दरबारांतील आपल्या नेहेमींचा जागीं उभा राही; इतकी याणें वाजवीपेक्षां फाजील गरीबी दाखविली; परंतु इकडे बुलूबन याचा लहान मुलगा कैदेंत ठेविला, आणि आपला अधिकार चांगला बसला असें पाहून, त्याला मारून टाकिलें.

जर या शेवटील घोरकर्माचा आरोप यावर खोट्या

[1] खिल्जी वंशाची मूळ पीठिका भाग दुसरा प्रकरण दुसरें याचा अखेरीस टीप लिहिली आहे तींत पाहावी. खिल्जी हे लोक मूळ तुर्की होते; परंतु पुढें पुष्कळ वर्षेपर्यंत अफगाणलोकांमध्यें वसाहत करून राहिल्यामुळें, हे बहुधा त्या लोकांप्रमाणेंच होऊन गेले; तथापि या लोकांचा दुसऱ्या लोकांशीं, अथवा निदान यांचा तुर्की भाईबंदांशीं तरी व्यवहार असे, असें संभवतें; त्यामुळें साधारण पहाडी अफगाणलोकांपेक्षां यांचा रीतिभाती कांहींशा सुधारलेल्या असाव्या, असें दिसतें.

जल्लालुद्दीनाचा दयालु स्वभाव.

कारणांवरून आला असेल, तर जी पूर्वीं सांगित्याप्रमाणें हा गरीबी दाखवित असे, तें कांहीं याचें ढोंग नव्हे; असें मानण्यास सबळ कारण आहे. कारण कीं पुढें याचा कारकीर्दींत जे उघड अथवा छपून याचें शत्रुत्व करीत, त्यांवर हा अतिशय दया करित असे; ती कधीं कधीं करूं नये इतकीहि करित असे. तसाच राजपदावर आल्यावरहि याची रीति पूर्वीं प्रमाणेंच सात्विक होती; आणि जसा एरव्हीं साधारण गृहस्थ असतां हा आपल्या जुन्या मित्रांशीं बराबरीचा नात्यानें वागत होता, त्याचप्रमाणें बादशाहा झाल्यावरहि वागत असे. पुष्कळ वेळा त्या मित्रांस मेजवानीस बलावित असे, आणि त्या वेळीं समयसूचकतेविषयीं व व्युत्पत्तिविद्येमध्यें हुशार अशाहि लोकांस बलावी; त्या प्रसंगीं कुराणाचा मर्यादेबाहेर मेजवानीचा प्रसंग होई, परंतु कधीं मद्य पिऊन बेसावध असा कोणी होत नसे. या सर्व गोष्टीवरून जो वरील आरोप जल्लालुद्दीनावर आला आहे, तो द्वेषबुद्धीनें असेल, असें नाहीं संभवतसें नाहीं.

जल्लालुद्दीनाचा दयालु स्वभावाची पारख होण्याच्या लवकरच प्रसंग आला. तो प्रकार असा;—ग्यासुद्दीन बुल्बन याचा पुतण्या मलिक् जाजू याणें करा एथें आपल्या सुभ्यावर असतां बंड केलें. त्यास बुल्बनाचा घराण्याचे सर्व आश्रित येऊन मिळाले, आणि त्यांची लवकरच बरीच फौज जमून ते दिल्लीवर चालून आले. परंतु बादशाहाच्या दुसरा मुलगा अरकल्लीखान याणें त्यांचा पराजय केला, आणि मलिक् जाजू व त्याचा पक्षाचे सर्व सरदार यांस कैद केले. त्यांस जल्लालुद्दीन याणें एकदम सोडून दिलें, आणि

मलिक् जाजू यास जन्मपर्यंत चांगली नेमणूक करून देऊन मुल्तानास पाठविलें.

पुढें थोडक्याच दिवसांनीं कांहीं खिल्जी सरदारांनीं मिळून यास मारण्याची मसलत केली; ती यास समजली; तथापि त्यांवरहि याचप्रमाणें याणें दया केली. याप्रमाणें बादशाहा स्वतांस दुःख दिल्याची जर क्षमा करिता, तर चिंता नव्हती; परंतु दुर्दैवेंकरून हा सर्वच प्रकारचा अपराध्यांस अगदीं मोकळे सोडून देऊं लागला, त्यामुळें सर्व राज्याची इमारत ढिली झाली; सुभेदारलोक खंडणी देतना, कैदेप्रमाणें वागतना, आणि आपल्या सत्तेचा बळानें जुलूम करूं लागले; रस्ते व राजमार्ग यांतून जाणाऱ्या लोकांस चोर लुटूं लागले; आणि बंडवाले व लुटारू लोकांचा उठाव झाल्यामुळें, राज्याचा निरनिराळ्या प्रांतांतील लोकांचा एकमेकाशीं व्यापार बंद पडला.

पुढें माळव्यामध्यें एक मोठें बंड झालें, तें मोडण्याकरितां याणें स्वतः स्वारी केली. तिजमध्यें याणें आपलें बहुतकरून मुख्य कार्य तडीस नेलें; परंतु हिंसा करण्याचा यास त्रास असे, आणि वयस्क झाल्यामुळें हा शक्तिक्षीणहि झाला होता; यास्तव बंडवाले लोकांचा मुख्य किल्ल्यांवर हल्ला करण्यास हा धजला नाहीं, आणि त्या बंडाचा बंदोबस्त अपुरा ठेवून माघारा दिल्लीस गेला. पुढें लवकरच मोगललोकांचा मोठ्या सैन्यानें येऊन पंजाबावर हल्ला केला; तेव्हां याणें त्याजबराबर स्वतः टकर मारून व मोठा पराक्रम करून त्याचा अगदीं मोड केला.

इ० स० १२९२, हि० स० ६९१.

नंतर त्यांचा पराजय झाला असून मोठ्या विलक्षण

औदार्यानें याणें त्यांशीं तह केला, आणि त्यांचा बाकी राहिलेल्या फौजेस इजा नदेतां माघारें जाऊं दिलें. त्या समयीं तीन हजार मोगललोक याचा चाकरीस येऊन राहिले, आणि ते पुढें लवकरच मुसलमान झाले. त्यांस राहण्याकरितां दिल्लीशहराचा वेशीजवळ एक जागा नेमून दिलेली होती, ती अद्यापि **मोगलपुरा** या नावानें प्रसिद्ध आहे.

इ० स० १२९३ हिं० स० ६९२. दुसऱ्या वर्षी याणें **माळव्यावर** पुनः स्वारी केली, परंतु पहिलीप्रमाणेंच इजपासून कांहीं सांगावयासारिखा परिणाम झाला नाहीं. पुढें **करा** एथील सुभेदार बादशाहाचा पुतण्या **अल्लाउद्दीन** हा पराक्रमी निघाला; तेणेंकरून बादशाहाचा दुर्बलतेमुळें जें न्यून पडूं लागलें होतें, तें सुधरत चाललें. **अल्लाउद्दीन** हा मोठा हुशार व खपाळ्या होता. आपल्या काकासारिखा कोणचेंहि कृत्य करावयास तो कांकूं करित नसे; यामुळें जेथें जल्लालुद्दीनास हरकती येत त्यांची याला कांहीं अडचण पडत नसे. बुंदेलखंड व माळव्याचा पूर्वभाग यांत बंडें झालीं, तीं मोडण्याचीं याला परवानगी मिळाल्यावरून याणें जाऊन त्यांची गडबड बंद केली. तसेच ताब्यांतील रजवाडे यांजकडे पुष्कळ किल्ले ठेविले होते, ते घेतले, आणि मोठी लूट मिळवून त्या द्रव्यानें आपली फौज पुष्कळ वाढविली. याप्रमाणें अल्लाउद्दीन याचा जय झाला हें वर्तमान बादशाहास कळतांच यास फार आनंद झाला, आणि अल्लाउद्दीनाचा लोभापासून तुला अपाय होईल याविषयीं सावध अस, असें याचा भीतींतील राणीनें पुष्कळ सांगितलें; तथापि तें न ऐकून

पादशाहाचा पुतण्या अल्लाउद्दीन याचें सामर्थ्य.

पूर्वी जो मुलुक अल्लाउद्दीन याजकडे होता, त्याशिवाय याणें अयोध्याप्रांताचें काम त्यास सांगितलें, आणि बुल्बन वंशाचे पुष्कळ जुने आश्रित चाकरीस ठेवण्यास, आणि एक फौज जमा करण्यास त्यास परवानगी दिली.

याप्रमाणें आपल्या काकानें आपणावर जो भरवसा ठेविला त्याचें अल्लाउद्दीनानें आपल्या नवीन फौजेसहित केलेल्या पहिल्या स्वारींत सार्थक केलें; आणि तो हिंदुस्थानचा इतिहासांत जसा कांहीं एक नवीन शककर्त्ताच झाला.

तो प्रकार असा;—याचापूर्वी कोणी मुसलमानलोक दक्षिणेंत गेले नव्हते, असें असून त्याणें त्या देशावर हल्ला करण्याचा निश्चय केला; आणि करा एथून ८००० निवडक घोडेस्वारांनिशीं निघून तेथून वऱ्हाडप्रांतापर्यंत जीं मोठीं रानें अद्यापि लागून गेलीं आहेत त्यांतून तो वटावून गेला. मार्गांत जातांना त्याणें कंडी उठविली, कीं मी आपल्या चुलत्याला त्रासून वेगळा निघून राजमंद्रीचा राजाचा चाकरीस राहावयास जात आहें. या ढोंगेंकरून तो जा जा राज्यांजवळून जाई, तेथील राजांस बेसावध करून टाकी; याप्रमाणें इलीचपुरपर्यंत जाऊन तो पश्चिमेकडे परतला, आणि जलद कूच करून आपल्या स्वारीचा मूळ हेतु साधण्याकरितां देवगिरि ऊर्फ देवगडास आला. देवगड ज्यास सांप्रत दौलताबाद असें ह्मणतात; तेथें रामदेवरावनामक राजा त्यावेळीं राहत असे. त्याची सत्ता फार मोठी होती; त्यावरून त्यास मुसलमानलोक दक्षिणेचा राजा असें ह्मणत; परंतु वास्तविक पाहिलें असतां, मराठेलोकांचा जो देश महाराष्ट्र, त्याचा तो राजा होता.

अल्लाउद्दीनाची दक्षिणेंत स्वारी. इ० स० १२९४ हि० स० ६९३.

राजपूतलोक हे स्वभावानें आळशी असत. बहुधा या कारणामुळें, आणि शत्रूस पूर्वीं सूचना दिल्याशिवाय त्यावर हल्ला करावयाचा नाहीं, अशी त्यांची चाल असे; त्यामुळें जेव्हां जेव्हां मुसलमानलोक त्यांवर स्वाऱ्या करीत, त्या त्या वेळीं त्यांची बहुत करून अगदीं तयारी नसे. बहुधा दुसऱ्या हिंदु रजवाड्यांना राजपूतलोकांचीच चाल लागून गेली होती, असें दिसतें. कारण जा वेळीं अल्लाउद्दीन आला, त्या वेळीं राजा रामदेव हा अगदीं स्वस्थ होता. त्याजवळ कांहीं लश्कर नव्हतें, आणि त्याची स्त्री व मुलगा हीं बाहेर जवळच एक देवालय होतें, तेथें गेलीं होतीं. अल्लाउद्दीन आल्याची बातमी समजतांच जिकडे तिकडे हाहाकार झाला; तथापि रामदेव हा गडबडला नाहीं. त्याणें गांवचे लोक, व आपले घरचे चाकरलोक मिळून तीन चार हजार जमविले, आणि इतक्यांनिशीं तो शत्रूचा पुढें झाला; तेणेंकरून त्याचा लोकांस संरक्षणाची तयारी करण्यास कांहीं अवकाश मिळाला. पुढें लढाईत रामदेव यास हटून मागें फिरावें लागलें; त्या समयीं तो शहराजवळचा किल्ल्यांत परत येऊन राहिला. तो किल्ला मजबूद होता, व त्या धांदलीमध्यें त्यांत थोडीबहुत सामग्रीहि टाकलेली होती. रामदेव किल्ल्यांत गेल्यावर अल्लाउद्दीनास कोणीच अडथळा केला नाहीं. मग त्याणें शहर घेऊन लुटलें; सावकारलोक यांणीं आपलें द्रव्य कोठें आहे तें दाखवावें ह्मणून त्यांचे हाल केले; आणि चाळीस हत्ती व राजाचे कांहीं हजार घोडे नेले. या वेळापूर्वीं अशा रीतीनें द्रव्य मिळविण्याकरितां मुसलमानलोकांनीं कोणावर जुलूम केल्याचा इतिहासांत लेख नाहीं.

हें होत आहे, इतक्यांत अल्लाउद्दीनानें किल्ल्यास वेढा दिला, आणि अशी आवाई उठविली, कीं मी बादशाहाची जिलूबीची फौज घेऊन आलों आहें; तेव्हां सर्व फौज लवकरच आल्यावर मग तुमचें कांहीं चालणार नाहीं. हें वर्तमान ऐकून रामदेवराव तह करण्याविषयीं उताविळ झाला; आणि मुसलमानलोकांचा फायद्याचा असा तहनामाहि त्याणें कबूल केला. इतक्यांत त्याचा मुलगा किल्ल्यांत न सांपडतां मोकळा राहिला होता, तो अकस्मात् मोठी फौज जमावून परत आला. त्यास मुसलमानलोकांबराबर युद्ध करण्याविषयीं बापानें निषेध केला; तें न ऐकून, तो अल्लाउद्दीनावर घसरला. पुढें लढाईमध्यें मुसलमानलोक हरतात असें दिसून आलें; इतक्यांत किल्ल्यांतील लोकांवर नजर ठेविण्याकरितां कांहीं स्वार ठेविलेले होते, ते अकस्मात् येऊन हिंदुलोकांवर पडले; तेव्हां जी बादशाहाची मुख्य फौज येणार, तीच ही आली असें यांस वाटून मोठा गोंधळ झाला. तो पुनः सुधारेना. याप्रमाणें मुसलमानलोकांचा जय झाल्यावर अल्लाउद्दीनानें आपलें मागणें वाढविलें. इकडे राजाला दुसरी कांहीं मदत येण्याची आशा होती, यामुळें ती लढाई आणखी वाढून कदाचित् मुसलमानांचा नाश झाला असता; परंतु दैववशात् किल्ल्यांतील लश्करचा लोकांस अकस्मात् समजलें; कीं किल्ल्यांत सामग्री चढवित्या वेळीं दाण्याचे गोण न्यावयाचे, ते चुकून, मिठाचे गेले; त्यामुळें आपली बहुतेक अन्नसामग्री खपत आली, हें वर्तमान राजास समजतांच तो तह करण्यास अधिक खुशी झाला. नंतर त्याणें इलीचपूर, व त्याखालचा प्रांत, व शिवाय पुष्कळ पैसा व जवा-

देवगडचा राजा शरण आला.

हीर, इतकें अल्लाउद्दीनास देण्याचें कबूल केलें. त्यानंतर अल्लाउद्दीन खानदेशचा रस्त्यानें माळव्यांत परत गेला.

या स्वारींत अल्लाउद्दीनास देवगडापर्यंत सुमारें साडेतीनशें कोश यावें लागलें; त्यांतून बहुतेक रस्ता विंध्याचलपर्वतांतून व त्यांतील अरण्यांतून गेला होता. त्या मार्गांतील अरुंद व गोंधळलेल्या वाटा; रस्त्यामध्यें शिधासामग्री व दाणापाणी हें मिळण्याची पंचाईत; तसेंच पहाडीलोक तिरकमठे घेऊन तयारच असणारे, त्यांची भीति; या सर्व कारणांमुळें लहानशी फौज या मार्गानें घेऊन जाणें, हें मोठें कठीण काम, आणि मोठी फौज घेऊन जाणें, हें तर अशक्यच; तशांत दक्षिणेसारिख्या विस्तृत व वसाहतीचा देशांत आठ हजार लोकांनिशीं जाणें, हें हेकटपणाचें कृत्य, शूरत्वाचें असें दिसत नाहीं. तथापि अल्लाउद्दीन इतक्याहि संकटांतून निभावून गेला, आणि त्याच रस्त्यानें माघारें यावें, तर विशेष धास्ती; यामुळें नवा मार्ग शोधून त्याणें हा परत आला; यावरून अल्लाउद्दीन हा मोठा चतुर योद्धा होता, असें दिसून येतें. हा दक्षिणेंत जात असतां, आपण राजमंद्रीचा हिंदु राजाचा चाकरीस राहण्याकरितां जात आहों, असें तो मार्गांत निमित्त सांगे; या गोष्टीवरून मुसलमान हिंदुस्थानांत राहूं लागल्यापासून अशा कामांत धर्मभेदाचें मान किती कमी झालें होतें, हें आपणास दिसून येतें.

ही स्वारी अल्लाउद्दीनानें जल्लालुद्दीनाचा आज्ञेशिवाय केली होती, आणि अल्लाउद्दीन स्वारींत असतां तिकडील कांहीं वर्तमान समजत नसे, त्यामुळें आपल्या पुतण्याचें मनोगत काय आहे, व त्याचें काय झालें असेल

याविषयीं बादशाहास न समजून काळजी लागली होती; परंतु द्रव्याचीं व कीर्तीचीं ओझीं घेऊन तो परत येत आहे, अशी बातमी जेव्हां बादशाहास लागली, तेव्हां यास शुद्ध आनंद झाला. त्या वेळीं याचा प्रधानांतून जे मोठे दूरदर्शी होते, त्यांचा दृष्टीनें हें सर्व कृत्य निराळ्या रीतीचें असें दिसून आलें; आणि अल्लाउद्दीनाचें धाडस मोठें आहे, याविषयीं तूर्तच झालेलीं प्रत्यक्षप्रमाणें पाहून, व त्याजवळ लश्करहि पुष्कळ झालें हें पाहून, त्यांणीं बादशाहास अशी मसलत दिली, कीं आपला बेभरवसा उघड नकरितां, सांप्रतची अल्लाउद्दीनाची फौज आपापल्या लुटीची व्यवस्था करण्याकरितां घरोघर गेल्यानंतर, पुनः दुसरी फौज तो न जमवी अशी कांहीं तजवीज करावी. हा बादशाहा उदार स्वभावाचा, याणें तें कांहींच ऐकिलें नाहीं; त्यामुळें हा अल्लाउद्दीनाचा कपटविद्येचा पाशांत सांपडला.

तो प्रकार असा,—आपले शत्रु आपल्याविषयीं वाईट मसलती करित आहेत, आणि आपण हुकमाशिवाय स्वारी केली ह्मणून बादशाहाची आपणावर गैर मर्जी होईल या भीतीनें घाबरून गेलों आहें, असें अल्लाउद्दीनानें सोंग घेतलें. नंतर आपल्या सारिखाच कपटी व विलक्षण पाताळयंत्री असा आपला भाऊ अलफ्खान हा बादशाहाकडे पाठविला. त्याणें आपल्या चुलत्याचा राग शमवावा, आणि अल्लाउद्दीनास जोखमांत नपाडितां आपणास जोखमांत पाडून बादशाहानें अल्लाउद्दीनास भेट द्यावी, असें बादशाहास फुसलावून कबूल करण्याचें काम अलफ्खानावर सोपलें. पुढें त्याचा सांगीवरून बादशाहा आपली फौज घेऊन करेकडे निघाला; नंतर थोडक्याच स्वारांनिशीं पुढें जाऊन बहुधा

एकटाच गंगानदी उतरला. पुढें अल्लाउद्दीनाची व याची भेट झाली, तेव्हां अल्लाउद्दीन याचा पायीं पडला. त्या समयीं तो सात्विक, वृद्ध जल्लालुद्दीन प्रीतिभावानें त्याचा गालावरून हात फिरवित आहे, आणि मी तुला लहानपणापासून वाढवून आपल्या मुलांपेक्षां तुजवर विशेष प्रीति ठेविली, असें असून, तूं माझा विश्वास धरिला नाहींस, असा त्यास रागें भरत आहे, इतक्यांत पूर्वीं मारेकरी ठेविलेले होते त्यांस अल्लाउद्दीनानें खूण करितांच, त्यांणीं तत्क्षणीं पुढें घुसून बादशाहाचा ह्रदयस्फोट केला. याचें शिर भाल्यास टोंचून अल्लाउद्दीनानें लश्करांत व शहरांत सर्वत्र फिरविलें. जल्लालुद्दीनानें सात वर्षांवर राज्य केलें होतें, त्यावरून यास मारिलें तेव्हां याचें वय ७७ वर्षांवर असावें.

जल्लालुद्दीनास मारेकरी घालून मारिलें. इ०स० १२९५ जुलै तारीख १९, हि०स०६९५ रमजान चंद्र १७.

या घातकी कर्मामध्यें अल्लाउद्दीनास जे लोक सहाय होते, त्यांचा कशा दुर्दशा होऊन ते प्राणास मुकले, याविषयीं फिरिस्ता हा ग्रंथकार मोठ्या आनंदानें वर्णन करितो. असें दुष्कर्माचें शासन झालें, हें पाहून आनंद होणें, हा मनाचा सहज धर्म आहे; परंतु प्रत्यक्ष जाणें हें मूळ विश्वासघाताचें कर्म उद्भवून आपल्या काकाचा वध करविला, असा जो पितृव्यघातकी त्याचा मरेपर्यंत अखंड भरभराट होत गेला, हें पाहून इतरांचें पारिपत्य झाल्यानें विशेष समाधान वाटत नाहीं.

जल्लालुद्दीनाचा वेळीं विशेष वर्णन करावयाजोगें देवपिसें नव्हतें; तथापि याचा कारकीर्दींत एक चमत्कारिक गोष्ट घडून आली, तिजवरून या लोकांचा अगदीं भोळसरपणा दिसून येतो. तो असा,—इराण देशांतील राहणारा सिदी मौला

भोळसरपणा व अन्याय यांचें विलक्षण प्रतीक.

नावाचा एक दरवेशी दिल्लीमध्यें आला. तो पुष्कळ देश फिरलेला होता, आणि त्या काळचा बहुतेक प्रख्यात लोकांची व त्याची ओळख होती. त्याणें दिल्लीमध्यें एक विद्यालय स्थापिलें, आणि एक मोठें अन्नसत्र घातलें; तेथें फिरिस्ते लोक, फकीर लोक, व दुसरे सर्व तऱ्हेचे लोक, यांस त्याचा खर्चानें अन्न मिळत असे, तो स्वतः फकत तांदुळ खात असे. त्यास बायको नव्हती, व दास दासीहि नव्हत्या. असें असून त्याचा खर्च पाहिला असतां अतिशय संपत्तिमान् उमरावाचाहि सामर्थ्याबाहेर होता. तो अतिशय धर्म करित असे; तसाच बडे लोकांस आपल्या घरीं मोठ्या समारंभानें मेजवान्या करी; आणि कोणी मोठ्या थोर कुळांतील गृहस्थाची आपत्ति दूर करण्यास दोन तीन हजार सुवर्णमुद्रांचा अशा रकमा देण्यास मागें पुढें पाहत नसे. तो कधींहि मशीदींत जात नसे, आणि त्याचीं मतें कांहीं चमत्कारिक असत. तथापि त्याचा धर्मनिष्ठेविषयीं कोणीहि अंदेशा काढिला नाहीं. त्याचा वर्तणुकेवरून जरी त्याविषयीं लोकांचा मनांत पुष्कळ वहमे आले, तथापि त्याचा धर्मावर अविश्वास आहे असें त्याविषयीं कधीं कोणी बोलला नाहीं. त्याजवळ परीस आहे, अशी प्रथम लोकांनीं अटकळ केली होती; पुढें त्याचा बेत राज्य मिळविण्याचा आहे असें लोक कुणकुणूं लागले; आणि या भयानक संशयाचा बाऊ होतां होतां, शेवटीं त्याणें बादशाहास मारण्यास मारेकरी तयार केले आहेत, आणि त्या गडबडींत त्याचें कार्य साधण्यास त्याचे दहा हजार साथी तयार आहेत, असा त्याजवर रोकडा आरोप आला. हें झाकलेलें संकट पाहून बादशाहा भ्याला, आणि त्याची स्वाभाविक उदारबुद्धिहि

त्या योगानें पळून गेली, असें दिसतें. नंतर कोणी एक पुरुष त्यास सामिल आहे असें ठरवून, त्याणें तोहमत आणिल्यावरून बादशाहानें **सिद्दी मौला** व त्याचा मुख्य सहाकारी यांस कैद केलें; परंतु एका वहमेदार साक्षीचा जबानीवरून त्यांजवर याचानें शाबिदी होईना, तेव्हां **सिद्दी मौला** व त्याचा साथी यांचा सांगीवरून बादशाहानें शहरा समोरचा एका मैदानांत मोठी आग पेटविली, आणि तींत आपला निर्दोषीपणा स्थापण्याकरितां त्यांणीं दिव्य करावें, अशी त्यांस परवानगी दिली. जेव्हां तो वेळ आला, तेव्हां हें कृत्य महम्मदी शास्त्राप्रमाणें अयोग्य असून, स्वाभाविक बुद्धीचाहि विरुद्ध आहे,असें सर्व प्रधानांचें बोलणें पडलें; तेव्हां तें बादशाहानें कबूल करून, त्या वहमी लोकांस बंदींत ठेवावें असा हुकूम केला. त्याप्रमाणें त्या लोकांस तुरुंगांत घेऊन जात असतां कितीएक फकीर लोक **सिद्दी मौलावर** तुटून पडले, आणि त्यांणीं बादशाहाचा देखत त्यास मारिलें. त्या लोकांस बादशाहाचें कदाचित् सुचें नसो; परंतु त्यांस याचा आश्रय खरा. तो मरेपर्यंत मी निर्दोषी आहें असें ह्मणत होता; आणि बादशाहानें आपला छळ केला, म्हणून "तुझा नाश होईल" असा त्याणें यास शाप दिला. त्या वेळीं जलालुद्दीन फार घाबरा झाला: इतक्यांत झंझावात वारा सुटून दिशा धुंद झाल्या, तेणेंकरून सर्व लोकांस भीति पडली; पुढें लवकरच बादशाहाचा वडील मुलगा वारला; पाऊस गेला त्यामुळें पुढें दुष्काळ झाला; शेवटीं बादशाहास भयंकर मृत्यु प्राप्त झाला; आणि याचा प्रत्यक्ष कुटुंबांतील कोणासहि गादी मिळाली नाहीं; वर सांगितलेलें अधर्माचें व

अन्यायाचें आचरण केल्यामुळें ईश्वरी क्षोभानें या सर्व गोष्टी घडून आल्या, असें लोक ह्मणूं लागले.

## २ अल्लाउद्दीन खिलूजी.

जेव्हां जल्लालुद्दीन मेल्याची बातमी दिल्लीस पोंचली, तेव्हां त्याचा स्थानीं आपल्या लहान मुलास बसवावें ह्मणून त्याचा विधवेनें कांहींसे हातपाय हालविले; परंतु जेव्हां अल्लाउद्दीन दिल्लीजवळ आला, तेव्हां ती तेथून मुल्तानास पळून गेली. तेथें जल्लालुद्दीनाचा बाकी राहिलेला दुसरा मुलगा सुभेदार होता; त्या त्यांचा गुंफेंतून अल्लाउद्दीनानें त्यांस खोटें वचन देऊन फसवून आणिलें; आणि दोनहि शाहाजाद्यांचा प्राण घेऊन, राणीस अटकेंत टाकिलें.

इ० स० १२९५ हि० स० ६९५.

इतकीं पापें करून अल्लाउद्दीनानें अधिकार मिळविला; परंतु लोकांची प्रीति पुनः आपणावर बसावी ह्मणून इनसाफानें कारभार करण्याविषयीं हा यत्न करूं लागला. हा लोकांस पुष्कळ द्रव्य व किताबती देत असे; धर्माविषयीं याणें मोकळा हात राखिला होता; तसेंच नाच, तमाशे वगैरे मोठ्या बडेजावीचा सुकाळ सोडिला होता; परंतु याप्रमाणें हा लोकांचीं मनें शांत करित असतां केव्हां केव्हां लोकांचा उच्छेद करी, आणि याचा अनावर स्वभावास याणें कधींहि आवरिलें नाहीं, त्यामुळें जरी याणें यत्न केले, तरी यावर लोकांची चांगली प्रीति बसली नाहीं. याचें राज्य पुष्कळ दिवसपर्यंत भरघोंसानें चाललें, तथापि त्यामध्यें हमेशा फितुरें, बंडें, हीं होतच असत; आणि याचा स्वतांचा

कुटुंबांतील, व तसेच याचा पूर्ण भरवशाचे जे लोक, यांविषयींहि वहमे येऊन यास रात्रदिवस जाचित असत.

इ०स० १२९७
हि०स० ६९७.
गुजराथेवर स्वारी.

पूर्वीं शाहाबुद्दीन याणें गुजराथेंत जें लश्कर ठेविलें होतें, तें पुष्कळ दिवसांपूर्वीं परत गेलें होतें; आणि पुढें तेथील राजा पुनः स्वतंत्र झाला होता. त्यावर अल्लाउद्दीनानें स्वारी करून तो देश पुरा जिंकून टाकिला. त्या वेळीं याचा भाऊ अलिफ़खान आणि वजीर नुसरतखान हे याचा लश्कराचे सरदार होते. त्यांणीं लागलाच तो प्रांत आपल्या ताब्यांत घेतला; त्या वेळीं तेथील राजा जवळच दक्षिणेमध्यें बागलाणप्रांतांत पळून गेला.

हें लश्कर दिल्लीस परत येत असतां, त्यांतील लोकांनीं मिळविलेली लूट सरकारास द्यावी अशी बादशाहानें सक्ती केली; त्यामुळें मोठें फितूर झालें. त्या प्रसंगीं वजीराचा भाऊ व बादशाहाचा पुतण्या हे मारले गेले. शेवटीं तें बंड मोडून, त्यांतील कांहीं लोक प्राणास मुकले; बाकीचे रतनभोरचा राजाचा आश्रयास जाऊन राहिले. त्यांचा बायकामुलांसुद्धां कुटुंबांची बादशाहानें कतल करविली. त्या काळीं असल्या दंग्यांमध्यें हमेशा मोगललोक हे प्रमुख असत; तसेच याहि बंडांत कांहीं मुसलमान झालेले मोगल होते; ते पळून जाऊन रतनभोर एथें राहिले होते; पुढें जेव्हां तो किल्ला घेतला तेव्हां त्यांस मारून टाकिलें.[२]

(२) बाबर बादशाहा हा जात्या तुर्की होता; परंतु याची आई मोगली कुळांतील होती, असें असून त्याचा चाकरीस मोगल होते त्यांविषयीं तो लिहितो, कीं "या मोगललोकांचा कळपांनीं सर्व प्रकारचे अपाय व विध्वंस केले आहेत; हा वेळपर्यंत पांच वेळा हे माझावर उठले आहेत."

पूर्वींचा वर्षी मोगललोकांनीं पंजाबावर स्वारी केली होती, तींत त्यांचें नुकसान होऊन त्यांस हटून जावें लागलें होतें. या सुमारास त्यांणीं आणखी एक हल्ला केला, त्यांतहि ते तसेच फसले. त्यानंतर देश घेण्याचा, व लुटीचाहि उद्देशानें त्यांणीं एक प्रचंड स्वारी केली; तींत मावरुल्नहर्प्रांताचा बादशाहा दाऊद खान याचा मुलगा कुत्लुघ खान हा सरदार होता, असें फिरिस्ता वर्णन करितो. कुत्लुघ खान हा समोर दिल्लीवर चालून आला; त्यास आड येण्याकरितां जी हिंदुस्थानी फौज गेली होती, ती, तो कुत्लुघ खान जसजसा पुढें येई, तसतशी मागें हटत जाई; आणि त्या वेळीं आसपासचा मुलुकांतीलहि सर्व लोक पळून दिल्लीस गेले होते, त्यामुळें तेथें लोकांची इतकी गर्दी झाली, कीं रस्त्यांतून कोणाचा शिरकाव होईना; त्यामुळें वाटा बंद पडल्या; अन्नसामग्री बहुधा लवकरच आटोपून गेली; आणि थोडक्याच दिवसांत त्या लोकांचीं दैन्यें व संकटें, यांचा भरीस दुष्काळाची भर येऊन पडली.

मोगललोकांचे हल्ले.

त्यांची मोठी स्वारी.

पूर्वीं अल्लाउद्दीनाचा इरादा या लोकांबराबर युद्ध करण्याचा नव्हता; परंतु आपल्या लोकांची अशी दशा पाहून यास लढाईस उभें राहणें भाग आलें. मग याणें जेवढी फौज जमा करवली तेवढी केली. या अतिमोठ्या लढाईंत केवळ झफरखाननामक सरदाराचाच पराक्रमानें अल्लाउद्दीनास जय मिळाला. हा सरदार पूर्वींपासून प्रख्यात होता; परंतु त्याणें मोठें शौर्य करून जीं जीं कामें

त्यांचा दिल्लीएथें मोड झाला.

बजाविलीं, तेणेंकरून अल्लाउद्दीन, व याचा भाऊ अलिफखान या दोघांचाहि मनांत याविषयीं पूर्वींच द्वेषभाव आला होता. यास्तव तो मोगललोकांचा पाठलाग करित असतां, त्यांणीं समजून उमजून त्याचा मागून कुमक केली नाहीं; यामुळें इकडे त्याचे लोक कमी झाले, असें पाहून ते त्यावर परतले. पुढें तो त्यांजबराबर आपल्या कीर्त्तीप्रमाणें लढला; परंतु शेवटीं मोगललोकांनीं त्याचे व त्याचा टोळीचे तुकडेतुकडे करून टाकिले. या लढाईमध्यें उभयपक्षींची अपार सेना जमली होती; इतकी माझा वेळापर्यंत कधींहि एका राशीस आली नव्हती, असें फिरिस्ता याणें वर्णन केलें आहे.

इ० स० १२९९ हि० स० ६९९.

याप्रमाणें या संकटांतून सुटल्यावर सुमारें एका वर्षानंतर अल्लाउद्दीन याणें रतनभोरचा किल्ला घेण्याकरितां, आपला भाऊ व वजीर यांस बरोबर देऊन, फौज पाठविली.[3] तिणें रतनभोरा जवळच झाई ह्मणून एक ठिकाण आहे तें घेतलें; आणि पुढें त्या किल्ल्यास वेढा देण्याचें काम चालविलें; त्या कामाची सुरुवात होत असतां, किल्ल्यावरून कोणी यंत्रानें दगड मारिला, तो वजीरास लागून तो मरण पावला. नंतर किल्ल्यावरील लोकांनीं एकदम हल्लाकरून वेढा देणारांस हटविलें; तेव्हां ते झाई एथें मागें पडून, दिल्लीहून कुमक येण्याची वाट पाहत राहिले. हें वर्तमान अल्लाउद्दीनास

---

(३) हा किल्ला दिल्लीचा बादशाहांचा हातांतून केव्हां गेला होता, तें समजत नाहीं; कारण पूर्वीं इ० स० १२५९ त बंडवाले लोकांनीं त्यास वेढा दिला असतां, त्याचा संरक्षणार्थ दिल्लीहून बादशाही फौज आली होती, असें वर्णन अहे.

समजतांच याणें वेढ्याचें काम स्वतः चालविण्याचा निश्चय केला.

इतक्यांत यास एक अपाय घडून आला, त्यामुळें हा जीवासच मुकणार होता. तो प्रकारः—पूर्वी याणें ज्या रीतीनें आपल्या चुलत्यास मारून राज्य संपादन केलें होतें, त्याचप्रमाणें ही स्वारी तयार करून जात असतां, याचा पुतण्या शाहाजादा सुलेमान याचाहि मनांत तसें करण्याचें आलें. त्याची दरबारांत मोठी असामी होती; तेव्हां अल्लाउद्दीनाची पूर्वीची, व आपली सांप्रतची स्थिति एकसारखी आहे, यास्तव त्यासारिखें आपण केलें असतां आपणासहि राज्य मिळेल, असें त्यास वाटलें. पुढें एके दिवशीं अल्लाउद्दीन छावणी सोडून लांब शिकारीस गेला होता, तेव्हां पारधीचा कामामुळें याजवळ दोनतीन लोक मात्र राहिले होते. अशी चांगली संधि पाहून सुलेमान हा कांहीं नवीन मुसलमान झालेले मोगल बरोबर घेऊन यापुढें आला, आणि अल्लाउद्दीनास त्यांचा उद्देशाविषयीं संशय येण्यापूर्वीच त्या मोगललोकांनीं नेमके यावर बाण सोडिले; तेणेंकरून अल्लाउद्दीन बेसावध होऊन जमीनीवर पडला; तेव्हां आपलें कार्य साधलें असें सुलेमान यास वाटून, तो लागलाच घोडा फेंकून छावणींत गेला, आणि बादशाहा मेला, व आपण गादीवर बसलों, असें लोकांस कळवून चालीप्रमाणें आपल्या नावाची द्वाहीं फिरवावी असा हुकूम करिता झाला. याप्रमाणें सुलेमान हा तक्तावर बसून मोठमोठ्या सरदारांचे मुजरे घेत आहे, इतक्यांत अल्लाउद्दीन

याचा पुतण्याची मसलत.

त्याणें बादशाहास मारण्याचा यत्न केला.

हळूहळू सावध झाला; आणि याचा वारांस पळ्या दिल्या
झाई एथें जाऊन आपल्या भावास मिळावें असा निश्च
करिता झाला. परंतु याचा एका सरदारानें असें सांगित
कीं याप्रमाणें आपण आपल्या पुतण्यास त्याचा अधिक
पक्का स्थापण्यास फुरसूद देऊं नये; आपल्या फौजेचा बे
वसा करण्यास आपणास कांहीं कारण नाहीं; याक
आपण लश्करचा लोकांचा नजरेस पडावें. हें शहाणप
चें बोलणें अल्लाउद्दीनास मान्य झालें. मग याणें आप
पूर्वींचा बेत सोडिला, आणि घायाळ असतांहि घोड्या
बसून हा आपल्या छावणीकडे चालला. जातांना व
सामग्री मिळविण्याकरितां कांहीं लोक जात होते, ते य
भेटले; असें होतां होतां याचा परिवारास पांचशें घोडे ज
ले; इतके लोक घेऊन आपल्या भरछावणीचा समोर ए
टेंकडीवर जाऊन हा उभा राहिला; आणि त्या वेळीं जें
अ छत्र राजचिन्ह होतें, तें सर्व लोकांस तेथून दाखविता
ला. यास पाहतांच सगळी फौज धांवत येऊन मिळा
तेव्हां तो राज्य बळकावणारा बहुधा एकटाच आपण रा

तो फसून मारला गेला

लों असें पाहून, आपल्या घोड्यावर बस
आणि जीव बचावण्यासाठीं मागें पुढें न पा
पळून गेला. अल्लाउद्दीनाचा लोकांनीं त्याचा
ठलाग करून, त्याचें डोकें आणून बादशाहाजवळ हजर के
याणें सुलेमान याचा दुसऱ्या मददगारांचा शिरच्छेद के

नंतर बादशाहा आपल्या भावास जाऊन मिळाला

दुसरे बखेडे मोडून टाकिले.

याणें लवकरच रतनभोरास पुनः वेढा दि
आणि आपली बशर्त्त केली; परंतु तो कि
हातीं आला नाहीं. इतक्यांत याचे दुसरे

पुतण्ये यांणीं बदायून एथें दुसरें बंड केलें, असें यास वर्तमान समजलें. त्यांचा बंदोबस्तास स्वतः जाण्याचें कारण न दिसल्यामुळें याणें आपल्या कांहीं सरदारांबराबर फौज पाठविली; त्यांणीं तें बंड मोडून त्या पुतण्यांस धरून पाठविलें. अल्लाउद्दीनानें प्रथम त्यांचे डोळे काढवून मग शिरच्छेद करविला.

या बंडवाल्यांचें साधलें नाहीं, ह्मणून बंडांची कांहीं कमताई पडली नाहीं. पुढें बंड झालें तें यांहिपेक्षां चमत्कारिक झालें. त्याचा प्रकारः—दिल्ली एथें एका मुख्य उमरावाचा घरीं हाजीमौलानामक एक तरुण गुलाम होता. त्याणें शहरचा मुख्य कोतवालाशीं लोकांचा कांहीं बेबनाव आहे, अशी संधि पाहून कांहीं लोक जमा केले, आणि बादशाहाचा हुकूम आल्याचें ढोंग करून त्यास मारून टाकिलें. नंतर ते खून चढलेले लोक बराबर घेऊन, शहर बळकाविण्याचा, बंदीवान् सोडण्याचा, आपल्या पक्षाचा लोकांस बादशाही खजीना व शस्त्रें वांटून देण्याचा, व बादशाही कुळांतील एका शाहाजाद्यास गादीवर बसविण्याचा, या सर्व उद्योगांस तो लागला. त्या प्रसंगीं दिल्ली एथील एका सरदारानें मसलतीनें कांहीं लश्कर शहरांत आणिलें; हाजीमौला यास मारून त्याणें जमविलेल्या बाजार बुणग्यास हांकून लाविलें; आणि त्याणें बसविलेल्या नव्या बादशाहाचा शिरच्छेद केला. याप्रमाणें त्या सरदारानें तावडतोब बंदोबस्त केल्यामुळें या उत्पातापासून वाईट परिणाम झाला नाहीं. पुढें बादशाहानें त्या कारणामुळें पुष्कळ लोकांस मारून टाकिलें; त्यांत हाजीमौला याचा जो पूर्वींचा धनी तो व त्याचा कुटुंबांतील पुरुष, बायका, पोरें, या सर्वांकडे कांहीं

अपराध नसतां त्यांचे प्राण घेतले.

हें वर्तमान होत असतां रतनभोरचा वेढ्याचें काम पुढें चाललेंच होतें. शेवटीं एका वर्षानंतर तो किल्ला पाडाव झाला, तेव्हां अल्लाउद्दीनानें तेथील राजास, त्याचा कुटुंबांतील सर्व मनुष्यें व त्याची सर्व सेना, यांसहित ठार मारिलें.

इ० स० १३००, हि० स० ७००.

पुढें इसवी सन १३०३ मध्यें मेवाडांतिल चितूरनामक मख्यात किल्ल्यावर अल्लाउद्दीनानें स्वतः स्वारी केली. चितूर हें सेसाचे जातीचा राजपूतलोकांचे मुख्य स्थान होतें. तो किल्ला अल्लाउद्दीनानें घेऊन तेथील राजास कैद केलें, आणि आपल्या वडील मुलास तेथें सुभेदार करून ठेविलें. दुसऱ्या वर्षी राजानें पळून जाऊन मोठी फौज जमविली; तेव्हां अल्लाउद्दीनानें विचार पाहून तो किल्ला मालदेवनामक दुसऱ्या राजपूत राजाचा स्वाधीन केला. माल्देव हा अल्लाउद्दीनाचा कारकीर्दीचा अखेरीचा सुमारापर्यंत दिल्लीचा बादशाहास खंडणी देत असे. शेवटीं पूर्वीचा राजाचा हमीरनामक एका पुत्रानें त्यास तेथून हांकून लाविलें. [४]

इ० स० १३०३ हि० स० ७०३. चितूरचा किल्ला घेतला.

याप्रमाणें अल्लाउद्दीनानें मुलुक सर करण्याचें काम चालविलें असतां, मोगललोक पुनः स्वारी करून दिल्लीवर आले, असें यास वर्तमान लागलें तेव्हां हा परतून आला; परंतु वाटेनें पुष्कळ ठिकाणीं यास बंदोबस्ताकरितां लोक ठेवावे लागले;

मोगललोकांचा निर्फल स्वाऱ्या.

(४) सांप्रतचा उदेपुरचा राणा हा या वंशांतील आहे. तो राजपूत रजवाड्यांत मुख्य आहे.

तेणेंकरून याची फौज इतकी कमी झाली, कीं दिल्लीस आल्यावर शत्रूंसमोर लढाईस उभें राहण्याचें सामर्थ्य नाहींसें होऊन, यास आपल्या छावणीसभोंवार खंदक खणून तळ देऊन राहणें भाग आलें.

त्या वेळीं त्या मोगललोकांजवळ बहुधा फार दिवस लढाई चालविण्यापुरती सामग्री नव्हती, यामुळें ते युद्ध नकरितां माघारे गेले असावे. परंतु त्याविषयीं, त्या वेळचे भक्तिमान् लोक ह्मणूं लागले, कीं निजामुद्दीनौला ह्मणून जो त्या वेळीं प्रख्यात साधु होता, त्याणें ईश्वराची प्रार्थना केल्यावरून त्यांस भीति पडून ते पळून गेले. पुढील दोन वर्षांत मोगललोकांनीं तीन वेळा हल्ले केले, त्यांत एका स्वारींत पंजाबचा उत्तरप्रांतांतून येऊन ते रोहिलखंडांत गेले होते. हे त्यांचे शेवटचे हल्ले. यापुढें पुष्कळ वर्षेंपर्यंत मोगललोक आले नाहींत.

इ० स० १३०४-५ हि० स० ७०४-५.

मोगललोकांचे हल्ले बंद झाले.

वरील मोगललोकांचा लढायांत जे बंदीवान् सांपडत, त्यांस दिल्लीस पाठवून त्यांतील सरदारांस हत्तीचा पायीं बांधून मारून टाकीत, आणि इतर लोकांस मेंढरांसारिखे कापून काढीत.

अल्लाउद्दीन गादीवर आल्यापासून यास अगदीं सतत दुसरीं कामें असल्यामुळें, याचें दक्षिणेकडे कांहींसें लक्ष कमी झालें होतें; तथापि यास आपल्या तरुणपणचा पराक्रमांचें विस्मरण

दक्षिणेंत स्वारी.

(५) एके समयीं ९००० लोक याप्रमाणें मारले गेले, असें फिरिस्ता वर्णन करितो.

पडलें नव्हतें. जेव्हां (इ० स० १३०३ ह्म० हि० स० ७०३ त) अल्लाउद्दीन हा चितूर एथें स्वतः स्वारी करून गेला होता, तेव्हां गोदावरीचा दक्षिणेस वरंगूळनामक तैलंगणाची राजधानी होती, ती घेण्याकरितां याणें बंगाल्यांतून फौज पाठविली होती. अलीकडे देवगडचा राजानें आपली खंडणी बंद केली होती, ह्मणून त्याचें शासन करण्याकरितां याणें मोठी फौज तयार केली, आणि तिजवर मलिक काफूर नावाचा सरदार नेमिला. काफूर हा खवास होता. तो पूर्वी खंबायतेस एका सावकाराजवळ गुलाम होता. पुढें जेव्हां अल्लाउद्दीनानें गुजराथ घेतली, तेव्हां काफूर यास त्याचा धन्यापासून जुलुमानें आणिलें. मग तो बादशाहाचा तैनातीस लागला, आणि बादशाहाची त्यावर अतिशय मर्जी बसून त्यास मोठीं मोठीं कामें मिळत चाललीं. याप्रमाणें हा नीच जातीचा मनुष्य लवकर वाढल्यामुळें, उमराव लोकांस फार त्रास आला.

इ० स० १३०६ हि० स० ७०६.

वर सांगितल्याप्रमाणें काफूर याची नेमणूक होऊन, तो फौजेनिशीं माळव्यांतून व खानदेशांतील सुल्तानपुरावरून देवगडास आला, आणि वेढ्याचें काम सुरू करण्यापूर्वीं त्याणें सर्व महाराष्ट्रदेश लुटून फस्त केला. तें पाहून अशा सरदाराशीं आपण युद्ध करून निर्फळ आहे अशी रामदेव याची खातरी होऊन, तो किल्ल्यांतून काफूराजवळ आला, आणि त्याजबराबर दिल्लीस जाण्याचें कबूल करिता झाला. पुढें रामदेव दिल्लीस गेला; तेथें बादशाहाची त्यावर खुश मर्जी होऊन, त्याणें त्याचा अत्यंत सन्मान केला आणि मोठ्या प्रतिष्ठेनें त्यास स्वदेशीं जाऊं दिलें.

तव्हांपासून मुसलमानलोकांबराबर त्याणें कधींहि वैर केलें नाहीं.

देवलदेवीची गोष्ट.

या स्वारीमध्यें गुजराथच्या सुभेदार अलप् खान (बादशाहाचा भाऊ अलीफ खान तो निराळा) यास काफूर याचा कुमकेस देवगडास जावें असा हुकूम झाला होता. त्याचा जाण्याचा रस्ता बागलाणांतून होता; त्या प्रांतांत गुजराथच्या राजा पळून दडून राहिला होता; ती कथा पूर्वींच सांगितलेली आहे. तो राजा पळत असतां त्याची स्त्री कवला देवी ही मुसलमानांचा हातीं सांपडली. ती पुढें अल्लाउद्दीनाचा जनानखान्यांत गेल्यावर, तिच्चें सौंदर्य व बुद्धि पाहून बादशाहाची तिजवर फार प्रीति बसली. वर सांगितल्याप्रमाणें गुजराथेंतून बागलाणचा वाटेनें फौज जाणार असें ऐकून, तिणें बादशाहास विनंती केली, कीं माझी मुलगी देवल देवी अद्यापि राजाबराबर वनवासांत आहे, तिला तजवीज करून त्यापासून आणावी; त्यावरून अलप् खान यास त्याबाबद हुकूम झाला होता. यास्तव सामोपचारानें राजा आपली मुलगी हवालीं करील, तर त्याच्या कांहीं चांगला बंदोबस्त करून द्यावा असें मनांत आणून, त्याप्रमाणें राजास कबूल करण्याचा प्रयत्न चालवित होता; परंतु राजानें त्याचें बोलणें नाकबूल केलें; तेव्हां अलप् खानानें त्यावर चढाव केला. त्या पूर्वीं देवगडचा राजा रामदेव याचा मुलानें देवल देवी ही आपणास द्यावी, असें मागणें केलें होतें. परंतु कितीहि मोठा मराठा झाला, तथापि तो राजपूताचा कन्येस वर योग्य नाहीं, असें तिचा बापास वाटून, त्याणें त्याचीं सर्व बोलणीं नाकबूल केलीं

होतीं; परंतु सांप्रत आपणावर बेतली असें पाहून नाखुशीनें रुकार दिला, आणि कांहीं परिवारासह आपल्या कन्येस देवगडास रवाना केली. ती निघून गेल्यावर अलप् खान याणें लागलाच राजाचा फौजेचा पराजय करून तिची वाताहत केली, परंतु पाहतो तों राजकन्या आपल्या हातांतून निसटून गेली; यामुळें त्याचा जय झाल्यापासून त्यास कांहीं आनंद झाला नाहीं. त्याणें विचार केला कीं कवला देवीचें वजन फार आहे; बादशाहाचा स्वभाव उतावळा आहे; आणि त्या दोघांचेंहि लक्ष या कामाकडेस लागलें आहे; तेव्हां त्यांचें मनोगत सिद्धीस नेण्याविषयींचा उद्योग करणें हें इष्ट आहे. असें मनांत आणून, दुसरे सर्व उद्योग सोडून, ती राजकन्या कशी साध्य होत्ये या विचारास हा लागला. याणें पुष्कळ प्रयत्न केले, तथापि कांहीं झालें नाहीं; आणि देवगडापासून एका मजलेवर हा येई, तों यास तिची कांहीं बातमी लागली नाहीं. पुढें एका दिवशीं याचा छावणींतून वेरूळचीं लेणीं पाहण्याकरितां कांहीं लोक गेले होते, तेव्हां अकस्मात् त्यांची व त्या राजकन्येचा स्वारीची गांठ पडली, त्या वेळीं यांस आपलें संरक्षण करण्याकरितां तिचा परिवाराबरोबर लढणें आलें. त्या समयीं तिचा लोकांची यांणीं वाताहत करून त्या राजकन्येस पकडून नेलें. परंतु तिला धरण्याचें हें एवढें मोठें काम आहे, असें यांस माहित नव्हतें. एवढें रत्न मिळतांच अलप् खान मोठा आनंदित झाला, आणि तिला घेऊन लागलाच दिल्लीस गेला. तेथें बादशाहाचा वडील पुत्र खिजर खान हा तिचें सौंदर्य पाहून मोहित झाला, आणि त्याणें लवकरच तिशीं विवाह केला. अमीर खुशरू नावाचा कवीनें या दोघांचा क्रीडेविषयीं

फारसी भाषेंत एक सुरस काव्य केलें आहे.

त्या वेळीं मुसलमानलोकांचे हिंदुलोकांशीं शरीरसंबंध होऊं लागले होते, असें या गोष्टीवरून दिसून येतें; आणि वेरूळचा लेण्यांविषयीं इतिहासांत प्रथमच हा लेख आला आहे; या दोनहि कारणांवरून ही गोष्ट प्रसिद्ध असून ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. वेरूळचा लेण्यांची मिश्रदेशांतील पिरिमिडनामक मनोऱ्यांशीं तुलना करितात; परंतु पाहूं गेलें असतां, जरी दोहोंसहि पुष्कळ श्रम लागले आहेत, तथापि वेरूळचा लेण्यांत कारागिरी विशेष दिसून येत्ये.

या स्वारीस काफूर गेला असतां, बादशाहानें स्वतः स्वारी करून गुजराथचा उत्तरेस मारवाडदेशांतील झालोर, व सेवण, हीं दोन ठिकाणें घेतलीं.

काफूर परत आल्यावर, पूर्वीं वरंगूळ एथें स्वारी पाठविलेली होती तिजपासून कांहीं निष्पन्न झालें नाहीं, असें बादशाहास वर्तमान समजलें. आंवढ्या देशचा राजा याचें वरंगूळचा राजाशीं वैमनस्य पडल्यामुळें, त्याणें अल्लाउद्दीनाची काकळूत केल्यावरून ही स्वारी बंगाल्यांतून अनोळख्या रस्त्यानें पाठविलेली होती. ती कोणत्या कारणानें व्यर्थ गेली, आणि तिकडे इतके दिवस कोणत्या कारणानें लढाई लांबली, याविषयीं कांहीं लेख नाहीं. याप्रमाणें आपल्या फौजेनें माघार घेतली हा डाग उडविण्याकरितां बादशाहानें काफूरास पाठविलें. मग काफूर हा निघाला; तो देवगडावरून उत्तरतैलंगणप्रांतांत जाऊन तो त्याणें लुटून फस्त केला, आणि तेथील राजाशीं युद्धांत मोठा जय मिळवून, कांहीं महिनेपर्यंत वरंगूळचा

इ० स० १३०९ हि० स० ७०९. तैलंगणांतील स्वारी फसली.

किल्ल्यास वेढा देऊन, तो मजबूद किल्ला पाडाव केला. तेव्हां काफूरास पुष्कळ द्रव्य देऊन पुढें निरंतर खंडणी देण्याचें कबूल करणें तेथील राजाचा नशीबीं आलें.

इ० स० १३१० हि० स० ७१०. कर्नाटक घेतलें.

दुसऱ्या वर्षी अल्लाउद्दीनानें कर्नाटकचा बल्लाळ राजावर स्वारी करण्याकरितां काफूर यास पुनः दक्षिणेंत पाठविलें. त्या वेळीं काफूर हा देवगडाचा वाटेनें पैठणाजवळ गोदावरी उतरला, आणि मोठी लढाई करून, द्वारसमुद्रनामक राजधानीवर जाऊन, ती घेऊन, तेथील राजास अटकेस टाकून, बल्लाळ राजांचा वंशाची समाप्ति करिता झाला.

या स्वारींत काफूर याणें बल्लाळ राजांचा राज्याचा पश्चिमभागावर हल्ला केला नाहीं, परंतु मल्याळापासून दक्षिणेस सिंहलद्वीपासमोर सेतुबंधरामेश्वरापर्यंत त्यांचा पूर्वेकडील सर्व देश घेतला. काफूर याणें रामेश्वर एथें एक मशीद बांधिली ती फिरिस्ता याचा वेळापर्यंत होती.

या स्वारीनंतर काफूर अपार द्रव्य घेऊन दिल्लीस परत जाता झाला.

या सुमारास सर्व मोगली मुसलमानलोकांस

---

(६) भाग पहिला प्रकरण दुसरें पाहा.

(७) कर्नाटकाचा मध्यभागीं श्रीरंगपट्टणापासून वायव्येस सुमारें १०० कोशांवर द्वारसमुद्र हें नगर होतें; तेथें अद्यापि त्याचा निशाण्या सांपडतात.

(८) या वेळीं कर्नाटकामध्यें रुप्याचें नाणें नव्हतें असें फिरिस्ता लिहितो, आणि याचप्रमाणें कांहीं अंशीं अगदीं अलीकडेपर्यंत तिकडील स्थिति होती, असें कर्नल ब्रिग्स् साहेब वर्णन करितो. त्या वेळीं होन या नाण्याची चलन होती, आणि ४ आण्यांचे इतक्या हलक्या किम्मतीचे सोन्याचे पण असत.

अल्लाउद्दीनानें एकदम चाकरीवरून दूर केलें. हे लोक हमेशा दंगाई करित असत, तथापि अशा अविचारानें त्यांस एकदम हांकून लावण्याजोगा त्यांणीं कांहीं अपराध केला होता, असें दिसत नाहीं. त्यांचा चाकऱ्या निघाल्यामुळें ते निराश झाले, व त्यांतून कांहीं लोकांनीं बादशाहास मारण्याची मसलत केली; ती फुटून बादशाहास समजतांच याणें त्या सर्व लोकांची कतल करून, त्यांचा कुटुंबांतील मनुष्यांस गुलामगिरी करावयास विकून टाकविलें. या वेळीं १५००० मोगललोक मारले गेले, असें फिरिस्ता वर्णन करितो.

मोगललोकांची कतल.
इ०स० १३११
हि०स० ७११.

काफूर हा मागल्या स्वारीस गेला त्यावेळीं, किंवा कांहीं वेळ त्या पूर्वींच, रामदेवराव मरण पावला होता; त्यामागून त्याचा मुलगा गादीवर बसला. त्याचें मन आपणाविषयीं शुद्ध नाहीं, असा मुसलमानांस अंदेशा आलाच होता. पुढें त्याणें खंडणी द्यावयाचें लांबिवल्यामुळें, आणि कर्नाटकामध्यें हि कांहीं गवगवा झाल्यामुळें काफूर हा पुनः बंदोबस्ताकरितां निघाला. या स्वारींत त्याणें, देवगडच्या राजाचा वध केला, सर्व महाराष्ट्र व कर्नाटक हे देश फस्त केले, आणि त्यांत जे राजे राहिले होते त्यांपासून खंडणी घेतली; याप्रमाणें आपलीं सर्व कामें पार पाडून, तो माघारा दिल्लीस जाता झाला.

देवगड घेतला; महाराष्ट्र देश जिंकला.
इ०स० १३१२
हि०स० ७१२.

अल्लाउद्दीनाचें खाणेंपिणें अनियमित असे. अशी अव्यवस्था फार दिवसपर्यंत चालल्यामुळें या सुमारास याचें शरीर खचलें. पुढें हा जसजसा अधिक अशक्त होत चालला, तसतसा

काफूर याचा मसलती व त्याचें वजन.

अधिकाधिक अंदेशेखोर व चिडखोर होऊं लागला; जे लोक बहुधा सर्व मनुष्यांवर अविश्वास करितात, त्यांस कोणी तरी एक कपटी पुरुष डोळे बांधून फसवितो, अशी बहुधा जनाची चाल आहे. त्याप्रमाणें अल्लाउद्दीनास काफूर याणें फसविलें. हा काफूर जसा हुशार होता, तसाच दुष्टबुद्धीहि होता; त्याचें अल्लाउद्दीनाजवळ फार चालत असे, त्यामुळें त्यावर बादशाहाची मर्जी होती तिचा आड जे जे लोक येतील असें त्यास वाटलें, त्यांचा त्याणें नाश करून टाकिला. नंतर बादशाहाचा मनांत आपल्या मुलांविषयीं क्रोध उत्पन्न होई असें केलें; आणि कदाचित् त्यांची आई ही आपल्या मुलांचा व बादशाहाचा ऐक्यभाव करण्याचा यत्न करील असें वाटून, त्या राणीशींहि अल्लाउद्दीनाचें वांकडें पाडिलें. काफूर याणें प्रथम अल्लाउद्दीनाचा मनांत असें भरवून दिलें, कीं आपण आजारी असतां आपल्या पुत्रांनीं आपली अवगणना करून सांगोपन करण्याची हयगय केली; आणि आपला प्राण घ्यावा ह्मणून त्यांची मसलत चालली आहे. अल्लाउद्दीन हा स्वभावानें फार निर्दय होता, तथापि स्वतांचा मुलांवर याची कांहीं ममता होती असें दिसतें. त्यामुळें हा मरावयास टेंकेपर्यंत, याणें काफूर याचें कांहीं कबूल केलें नाहीं. शेवटीं अतिशय चाहाड्या सांगून दोन वडील शाहजादे व त्यांची आई (ह्मणजे बादशाहाचीच राणी,) यांस अल्लाउद्दीनाकडून अटकेस टाकविलें. त्याच वेळीं अलप्खान याचा सत्तेपासून भीति होती, आणि अल्लाउद्दीन मेल्यानंतर आपणास राज्य साधण्यास एवढाच मध्यें अडथळा आहे असें जाणून, त्यास मारून टाकण्याविषयीं

काफूर याणें बादशाहाचा हुकूम घेतला.

याप्रमाणें हा बादशाहा अंध होऊन काफूर याचें ऐकूं लागला, त्यामुळें याचा कारकीर्दींत विशेष जुलूम होऊन, सर्व प्रजा नाखुश झाल्या. दरबारांतील उमराव लोक त्रासले, गुजराथेमध्यें बंड झालें; राणा हमीर याणें या सुमारास चितूर परत घेतलें; आणि रामदेव याचा जांवई हरपाळ याणें दक्षिणेंत मोठा उठावा करून पुष्कळ मुसलमान किल्लेदार हाकून लाविले.

गुजराथेंत बंड झालें. राजपुतांनीं चितूर परत घेतलें.

हीं वर्तमानें एकामागून एक आल्यामुळें बादशाहास क्रोधाचा लहरी येऊन त्याचें दुखणें जडावलें, नंतर थोडक्यांतच अल्लाउद्दीनाचा काळ झाला. यास काफूर याणें कांहीं विषप्रयोग केल्यामुळें हा लवकर मेला असें ह्मणतात.

अल्लाउद्दीन मरण पावला. इ०स० १३१६ता० १९ डिसेंबर हि०स०७१६ चं०६सवाल.

एकसत्ताक राज्यांत सत्तेचा कडाका मोठा असतो, तशी अल्लाउद्दीनाची जरब होती; यामुळें जरी हा मूर्ख व छांदिष्ट, तसाच निर्दय, व जुलमी होता, तथापि याणें पुष्कळ देश जिंकिले; इतके दुसऱ्या कोणत्याहि मुसलमान राजास पूर्वी हिंदुस्थानांत साध्य झाले नव्हते. याचे कित्येक कायदे अकलेपासून दूर असत, व तेणेंकरून लोकांस इजा पोंचे; तथापि एकंदराखालीं याचा राज्यसंबंधीं आंतील कारभार सुरळीत चालला होता. सर्व प्रांतांमध्यें स्वस्थता होऊन भीति नाहींशी झाली; देशांतील लोकांची संपत्ति वाढली, त्यामुळें मोठमोठ्या सरकारी व खासगी हवेल्या जिकडे तिकडे उठल्या; तशींच दुसऱ्या रीतीचीं सौख्यें वाढलीं, व आणखीहि कांहीं प्रकारची सुधारणा झाली.

याचा स्वभाव.

अल्लाउद्दीन हा पूर्वी केवळ अक्षरशत्रु होता; हा सिंहासनावर बसल्यानंतर वाचायास शिकूं लागला. असें असतांहि, यास आपल्या जाणतेपणाविषयीं एवढा अभिमान असे, कीं याचे पुष्कळ वहिवाटलेले प्रधान हेहि यास भीडून काढण्यास भित असत; आणि याचा दरबारांत जे मोठे चतुर लोक असत, त्यांसहि आपली सर्व विद्या याचा बरोबरीला आणून ठेवावी लागे. हा याचा गर्विष्ठ स्वभाव तारुण्याबराबर न जातां, उत्तरोत्तर वाढत गेला; शेवटीं त्याची एथवर सीमा झाली, कीं बादशाहाचा तोंडांतून जो शब्द येई, तो रामबाण, असें झालें. याचा जेव्हां प्रथम भरभराट होऊं लागला, तेव्हां आपण पैगंबरपणा मिळवून नवा धर्म स्थापावा, असें याचा मनांत आलें होतें; पुढें तो छंद सुटला तेव्हां याणें आपणास "**दुसरा सिकंदर**" असें ह्मणविलें, आणि समुद्रवलयांकित पृथ्वी जिंकण्याचा आव घालून, त्याविषयीं हा उघड भवति न भवति करूं लागला.

याची अंतर्गत राजनीति.

याचा राजनीतीसंबंधीं व त्या वेळचा लोकांचा रीतींसंबंधीं कांहीं चमत्कारिक गोष्टींचे लेख आहेत. जेव्हां याचा राज्यांत पुष्कळ फितुरें होऊन यास भीति प्राप्त झाली, तेव्हां अशीं फितुरें वगैरे होण्याचीं कारणें काय, आणि तीं न होण्यास कोणते उपाय योजावे, याचा विचार करण्याकरितां याणें आपलें प्रधानमंडळ जमविलें. त्यांणीं सांगितलें, कीं आपणास तीन मुख्य कारणांपासून अपाय होतात, असें आमचा नजरेस येतें. तीं येणेंप्रमाणें, (१) ख्यालीखुशालीसाठीं लोक मेजवान्या करितात, तेथें एकमेकांचे गुप्त विचार एकमेकांस कळवितात,

सबब त्यांपासून भय आहे; (२) मोठ मोठे मानकरी लोकांचें सख्य, व त्यांत मुख्यत्वेंकरून त्यांचे शरीरसंबंध, यांपासून भीति आहे; (३) आणि कितीएक लोकांजवळ थोडी मालमत्ता असत्ये, व दुसऱ्यांजवळ भारी होत्ये, आणि प्रांतांतील सुभेदारलोक पुष्कळ द्रव्य संपादन करितात, या कारणांपासून तर सर्वांहून विशेष धास्ती आहे. हे अभिप्राय बादशाहास मानवले. नंतर याणें दारू पिणें मना केलें; कोणीहि गृहस्थाचा घरीं खासगी सभा करूं नये, तसेंच आपल्या दरबारचा लोकांनीं राजकीय प्रकरणीं वादविवाद करूं नये, असा हुकूम केला; त्यामुळें कोणास आपल्या मित्रांस मेजवानी करणें झाल्यास वजीराची लेखीं परवानगी लागूं लागली. बादशाहाचा परवान्याशिवाय उमराव लोकांमध्यें लग्नें होण्याचीं बंद झालीं. शेतकरी लोकांस अमुक जमीन असावी, व त्यांणीं अमुक गुरें राखावीं आणि अमुक चाकर ठेवावे; धनगर यांणीं अमुक मेंढे व अमुक गुरें बाळगावीं; असे याणें कायदे केले. सरकारी कामदारांचे पगार छाटून टाकिले, जमीनीचें देणें वाढविलें, व तें वसूल करण्याची सक्ती जास्त केली. शेवटीं अल्लाउद्दीनास इतका लोभ सुटला, कीं तो विनाकारण मुसलमान व हिंदु या दोन्ही धर्मांतील लोकांची खासगी मिळकत जप्त करून घेऊं लागला; तेणेंकरून सर्व राज्यांतील रयत बहुधा एकसारखीच कंगाल होऊन गेली.[१]

(१) पूर्वी फिरिस्ता अल्लाउद्दीनाचा राज्याचा भरभराटीविषयीं मोठा वर्णन करितो, असें असून ही त्यांतील रयतेची अनुपपत्ति वर्णिली आहे; तेव्हां हीं दोन्ही वर्णनें संगतवार लावणें कठीण आहेत; परंतु वर लिहिल्याप्रमाणें लोकांची दुर्दशा याचा कारकीर्दीचा अखेरीस मात्र झाली असावी, असें संभवतें.

अल्लाउद्दीनानें पुष्कळ बंदोबस्त केले. एका वेळीं लश्करी लोकांचा पगार कमी करावा, अशी यास इच्छा उत्पन्न झाली; परंतु जर खाण्यापिण्याचा खर्च कमी न होतां पगार मात्र तोडिला, तर अन्याय होईल, या हेतूनें याणें सर्व पदार्थांचे दर ठरावून देण्याचा निश्चय केला. नंतर धान्य, गुरें, घोडीं, इत्यादिकांचा, व दुसऱ्या पदार्थांचा प्रति ठरवून, त्यांचा किम्मती काईम ठरविल्यीं; फक्त मजुरीचा मात्र निरख ठरविला नव्हता. याणें सरकारी कोठारें बांधिलीं; देशांत दाणा आणण्याविषयीं लोकांस उत्तेजन, व कोणास जिन्नस आणण्याकरितां लागल्यास तसलमात द्रव्यहि हा देऊं लागला, परंतु प्रांतांतून बाहेर जिन्नस जाऊं नये असा याचा प्रतिबंध होता; तशीच घाऊक खरेदी करण्याविषयीं लोकांस अटक होती; बाजार उघडण्याचे व बंद करण्याचे तास याणें नेमून दिले होते; आणि बादशाहास सर्व ठिकाणचा सरकारी हकीकती कळाव्या असा बंदोबस्त केला होता, तेणेंकरून आणि कोणी कायदा तोडला असतां त्याचा शोध लागावा ह्मणून हेर ठेविले होते तेणेंकरून, सर्व काम जारी राहत असे.

याप्रमाणें कायदे केल्यानंतर लवकरच दुष्काळ पडला; तेणेंकरून धान्याविषयींचे कायदे अमलांत आणावयाचें माजी पडलें; बाकी सर्व कायदे दुसऱ्या कारकीर्दीपर्यंत रद्द झाले नाहींत, तथापि त्यांविषयीं बादशाहाचा मनांतील हव्यास कमी झाल्यावर, तेहि बहुधा मागें पडत चालले असें संभवतें.

"राजकीय सत्तेशीं धर्माचा संबंध नाहीं; मनुष्यानें आपल्या

(१०) फिरिस्ताचा ग्रंथामध्यें किम्मतींचा निरखांचे कोष्टक दिलेले आहेत, त्यांतील नाण्यांचा किम्मती जर बराबर समजत्या, तर त्यांचा विशेष उपयोग झाला असता.

खासगत आचरणांत इतर कामकाजाप्रमाणें धर्मसंबंधी कृत्यें करावीं, अथवा त्याच स्थितींत मनोरंजनार्थ करावीं", असें अल्लाउद्दीनाचें एक ह्मणणें असे; आणि "वारंवार बदलणाऱ्या लोकांचा अभिप्रायांपेक्षां एकट्या शहाण्या बादशाहाची इच्छा चांगली;" ह्मणजे तिला अनुसरून सर्व लोकांनीं वर्त्तावें हें चांगलें, अशी याची दुसरी ह्मण असे.

याप्रमाणें अल्लाउद्दीनानें २० वर्षांवर राज्य केलें.

---

# मुबारिक् खिल्जी.

अल्लाउद्दीन मरण पावल्यानंतर, त्याचा मागें त्याचा अगदीं लहान मुलगा याणें गादीवर बसावें, आणि त्याचा प्रतिपाळ काफूर याणें करावा, अशा प्रकारचें अल्लाउद्दीनानें केलेलें असें ह्मणून, एक बनावू मृत्युपत्र काफूर याणें बाहेर काढिलें; आणि या साधनानें राज्याधिकार हातीं आल्यावर अल्लाउद्दीनाचा दोघां वडील मुलांचे डोळे काढून टाकिले, व पुढें थोडक्याच दिवसांत मुबारिक् यास मारण्याकरितांहि मारेकरी पाठविले; परंतु त्या मारेकऱ्यांस समजाविल्यावरून त्यांणीं याचा जीवास धक्का लाविला नाहीं, आणि पुढें काफूर यास दुसरा उपाय करण्यास अवकाश मिळण्यापूर्वी, बादशाही पाहऱ्यावरील लोकांचा मुख्य सरदार, आणि त्याचा दुय्यम, यांणीं आपले लोक घेऊन काफूर यासच ठार मारिलें, आणि मुबारिक् यास लागलेंच सिंहासनावर बसविलें.

इ० स १३१७
ता० २२ मार्च
हि० स० ७१७
मोहरम, चं० ७.

याणें दोन महिनेपर्यंत बादशाह हा किताब धारण

केला नाहीं. त्यानंतर याणें आपल्या अगदीं लहान भावाचे डोळे काढून त्यास जन्मभर किल्ल्यावर अटकेंत ठेविलें; जा पाहऱ्यावरील सरदारांनीं यास गादीवर बसविलें होतें, त्यांचे प्राण घेतले; पाहऱ्याची नेमणूक अजीं तोडून टाकिली; आपल्या गुलामांतून पुष्कळांस मोठ्या पदव्या व हुद्दे दिले; आणि त्यांतून एका मुसलमान झालेल्या हिंदूस खुशूरूखान असा किताब देऊन, त्यास आपला वजीर केला; याप्रमाणें राज्यांत पुढें जी धुमाळी होणार, व रक्ताचे पूर वाहणार, त्याचीं हीं प्रथमच दुश्चिन्हें झालीं.

जशीं मुबारिकू याणें वरील वाईट कृत्यें केलीं, तशीं याणें कांहीं चांगलींहि केलीं. या वेळीं १७,०००हजार बंदीवान् अटकेंत होते, ते सर्व याणें सोडून दिले; पूर्वींचा द्राष्ट कारकीर्दींत कैद झालेले असे हे लोक याणें सोडिले, ह्मणून मात्र हें धाडसाचें काम पसंत होईल तर होईल. अल्लाउद्दीनानें जा जमिनी जप्त केल्या होत्या, त्या याणें सोडून दिल्या; जे सक्त कर त्याणें बसविले होते, ते दूर केले; आणि व्यापाराविषयीं, व मालमत्ता बाळगण्याविषयीं जा त्याचा वेळीं हरकती होत्या, त्या नाहींशा केल्या.

त्याप्रमाणेंच आपल्या कारकीर्दीचा आरंभीं याणें मोठी बहादुरी केली. याणें गुजराथप्रांत सर करण्याकरितां फौज पाठविली; आणि आपण स्वतः लश्कर घेऊन दक्षिणेंत स्वारी करून हरपाळ यास कैद केलें, परंतु मोठ्या निर्दयतेनें त्याचा अंगाचें कातडें जीवंतपणीं सोडवून काढविलें. नंतर प्रांतांतील पक्का बंदोबस्त करून हा दिल्लीस परत गेला, आणि तेथें अति नीच व त्रासदायक असें दुराचरण करूं लागला. कर्मणुकेकरितां

इ०स०१३१८
हि०स०७१८.

स्त्रीवेष धारण करून कलावंतिणींचा ताफ्याबराबर उमराव लोकांचा घरी नाचावयास हा जात असे. हा सर्वकाळ झिंगलेला असे, आणि आपले अतिवाईट दुर्गुण सर्व लोकांनीं पाहवे, यांत यास परम आनंद वाटे. अशा बादशाहाचा कारकीर्दींत पुष्कळ फितुरें,व बंडें,हीं एकामागून एक हमेशा होत असत; यांत कांहीं आश्चर्य मानावयाचें नाहीं. एक बंड झालें, ह्मणजे बादशाहानें लोकांचा छल करावा, आणि प्राण घ्यावे; तेणेंकरून एका बंडापासून नवनव्या लोकांविषयीं अंदेशे उत्पन्न व्हावे; त्यामुळें पुनः आणखी जुलूम व्हावा; असा क्रम चालला.

मुबारिक्‌ हा दक्षिणेंत स्वारी करून गेला होता, तेव्हां याणें आपला कंठमणी खुशूरू हा मलबारावर पाठविला. त्याणें तो प्रांत एक वर्षांत घेऊन, दिल्ली एथें पुष्कळ संपत्ति आणिली. त्यापुढें बादशाहानें राज्याचा सर्व कारभार त्याचा हवालीं केला; तेणेंकरून सर्वांचा आयुष्याची दोरी त्याचा हातीं आली. खुशूरू याणें कितीएक मानकरी लोकांस मारून टाकिलें; तेणेंकरून बाकीचा लोकांनीं भिऊन मोठ्या खुषीनें परवानगी मागून दरबार सोडून दिलें. मग बादशाहास पाहिजे तसा खेळविण्यास खुशूरूस संधि सांपडली. ती त्याणें फुकट न जाऊं देतां आपल्या अन्नाचे लोक बादशाहाजवळ आणून ठेविले, आणि आपल्या जातीचे हिंदु लश्करी लोक ठेवून दिल्ली भरून टाकिली. याप्रमाणें सर्व तयारी झाल्यावर त्याणें आपल्या विक्षिप्त धन्याचा प्राण घेऊन, त्याचें तक्त

मलबारप्रांत घेतला.

इ० स० १३१९हि० स०७१९. खुशूरूचें वजन. हिंदुलोकांचा दरबारांत पगडा वाढला.

इ० स० १३२१ ता०

२४ मार्च, हि०स०७२१ रबीअल् अवल. मुबारिकू याचा वध.त्याचा वंशछेद झाला.

बळकाविलें. नंतर अल्लाउद्दीनाचा वंशांतील जितके लोक जीवंत होते, तितके मारून टाकिले, व देवल देवी आपल्या जनानखान्यांत नेली. त्याणें बाकीचे बंदोबस्तहि याप्रमाणें केले. परंतु हा जरी याप्रमाणें दुष्ट स्वभावाचा होता, व याणें बहुत पापें केलीं होतीं, तथापि याचाहि पक्षास लोक मिळून तो सबळ झाला नाहींसा नाहीं. याणें आपले नीच आश्रित मोठे केले; तसेंच पूर्वीचा उमराव लोकांतून कितीकांस मोठमोठीं कामें देऊन तो वश करूं पाहत होता. त्या अमीरलोकांमध्यें पंजाबाचा सुभेदार गाजी खान तघलख याचा मुलगा यूना खान ह्मणून होता; तो प्रख्यात असून मोठा वजनदार असे; यामुळें त्याशीं सख्य करणें फारच अवश्य होतें; परंतु त्याजवळ खुशूरूचा कांहीं इलाज चालला नाहीं. तो दरबारांतून पळून गेला, आणि त्याचा बाप गाजी खान, हा तर समोर बंड करून, सरहद्दीवरील आपले वहिवाटलेले लोक बराबर घेऊन आला. मग त्याणें आपल्या समोर जें दुर्व्यसनेंकरून जर्जर झालेलें, आणि जास कोणी चांगला नायक नाहीं, अशा खुशूरूचा बुणग्याचा पराभव करून, व त्या आगंतुक बादशाहाचा जीव घेऊन, त्याचा राज्याची समाप्ति केली; तेणेंकरून आबालवृद्धांस आनंद झाला. नंतर दिल्लीमध्यें प्रवेश करून गाजी खान याणें दौंडी पिटली, कीं लोकांस जुलुमांतून मुक्त करावें एवढाच माझा उद्देश होता; याकरितां बादशाहाचा कुळांतील जर कोणी पुरुष असेल, तर त्यास गादीवर बसविण्याची माझी इच्छा आहे; परंतु

इ० स० १३२१ ता० २२ आगष्ट हि० स० ७२१ रज्जबचं ०३०.

तपास करून पाहतां खिलूजी वंशाचा कोणी जीवंत राहिला नाहीं. असें पाहून, तघलख् यासच ग्यासुद्दीन असा किताब देऊन सर्वांनीं गादीवर स्थापिलें.

---

# प्रकरण तिसरें.

## तघलख्, सैय्यद, व लोदी, या वंशांचीं वर्तमानें.

### (१) तघलख् वंश.

#### ग्यासुद्दीन तघलख्.

इ० स० १३२१ हि० स० ७२१.

ग्यासुद्दीन बुलूबन याजवळ एक तुर्की गुलाम होता. त्यापासून एका हिंदु स्त्रीचा पोटीं ग्यासुद्दीन तघलख् हा झाला.

यास कांहीं पापाचरण न करितां सिंहासन प्राप्त झालें; त्याप्रमाणें याणें पुढें तारीफ करण्यालायक शेवटपर्यंत राज्य चालविलें. प्रथम याणें आपल्या राज्याची आंतील स्थिति सुधारली, नंतर आपल्या राज्यास मोगललोकांपासून उपद्रव न होई अशा रीतींनें सरहद्दीवरील मुलुकाचा बंदोबस्त केला; आणि मग दक्षिणेंत अव्यवस्था झाल्यामुळें, तिकडील बंदोबस्ताकरितां आपला मुलगा यूना खान पाठविला. यूना खान याणें बाकी सर्व बंदोबस्त यथास्थित केला; परंतु पुढें वरंगूळ एथें गेल्यावर, त्या किल्यावर त्याचें कांहीं चाललें नाहीं. त्याणें त्या किल्यास वेढा दिला. तें काम उष्णकाळचा झळा सुरू होतपर्यंत आणि कदाचित् पहिली पावसाची सर पडे पर्यंतहि

इ०स०१३२२ हि०स०७२२.

तैलंगणांत पाठविलेली स्वारी फसली.

लांबणीवर चाललें; तेव्हां त्याचा फौजेंत एक वाईट रोगाची सांथ उठली. याप्रमाणें आपत्तींनीं त्याचे लोक बेदिल होऊन गेले असतां, बादशाहाचा काळ होऊन दिल्ली एथें राज्यामध्यें फेरफार झाला, अशा खोट्या बातम्या आल्यामुळें ते अगदीं गडबडून गेले. शेवटीं त्याचे कांहीं मुख्य सरदार आपआपले लोक घेऊन त्याजवळून निसटून गेले, आणि बाकी राहिलेल्या लोकांनिशीं यूना खान परत येत असतां, हिंदुलोकांनीं दौलताबादेपर्यंत मोठी लगट करून त्याचा पाठलाग केला, आणि त्याचे अतियश लोक मारून टाकिले. यामुळें त्याचा सर्व फौजेंतून तीन हजार स्वार मात्र त्याबराबर दिल्लीस परत आले. यूना खान हा आपल्या कारकीर्दींत अविचारी व मनस्वी रीतीनें वागत असे; त्यावरून वरील स्वारींत जो याचा मोड झाला तो याचेच कांहीं गुण पागळल्यामुळें झाला नसेल असें ह्मणवत नाहीं. दुसऱ्या स्वारींत यूना खान याणें बेदरनामक मोठें मजबूद व नाक्याचें शहर घेतलें; नंतर वरंगूळ ही राजधानी जिंकिली, आणि तेथील राजास कैद करून दिल्लीस नेलें.[१]

तैलंगणप्रांत सर केला, आणि वरंगूळ नामक राजधानी घेतली.

इ०स० १३२३
हि०स० ७२३.

त्यानंतर बादशाहा स्वतः बंगाल्यांत गेला; त्याचा बापाचा यजमानाचा मुलगा केकोबादनामक जो माजी बादशाहा, त्याचा बाप बकाराखान पहिल्यापासून हा वेळपर्यंत चाळीस वर्षें पावेतों आपल्या सुभ्याचा कामावर होता. त्यास त्याचा

इ० स० १३२४-२५.
हि०स० ७२४-२५.

१ त्या राजास पुढें सोडून देऊन, त्याचें राज्य परत दिलें.

कामावर कायम करून, राजचिन्हें धरण्यास बादशाहानें परवानगी दिली.

त्या स्वारींत बादशाहानें **सोनारगांव** ( ह्मणजे **धाका** ) या प्रांतामध्यें कांहीं बखेडे झाले होते, ते मिटविले. हा प्रांत बंगालचा सुभ्याचा ताब्यांत नव्हता, असें दिसतें. नंतर परत येत असतां, याणें **तिरहूत** प्रांत घेऊन तेथील राजास कैद केलें. **तिरहूत** यास पूर्वी **मिथिला** असें नाव होतें.

बादशाहा मरण पावला.

इ॰स॰ १३२५ फेब्रुआरी, हि॰ स॰ ७२५. रबीअल्अव्वल.

बादशाहा **दिल्लीजवळ** आला तेव्हां त्याचा वडील पुत्र **यूना खान** हा त्यास मोठ्या समारंभानें सामोरा आला. त्यावेळीं बादशाहाचा सत्कार करण्याकरितां एक लांकडी डेरा मुद्दाम देवविला होता. एका दिवशीं आगतस्वागत चाललें असतां तो अकस्मात् पडला; त्यामध्यें बादशाहा आणि दुसरे पांच असामी चुरडून गेले. हा अपघात कदाचित् केवळ दैववशात्‌हि झाला असेल; परंतु मुळींच चाल नसतां, **यूना खान** याणें असा डेरा तयार करविला, आणि तो पडण्याचा वेळेस तो तेथें नसून, व बादशाहाचा आवडता जो दुसरा मुलगा तो असून तोहि आपल्या बापाबरोबर मेला गेला याप्रमाणें याला जसजशा पाहिजे होत्या, तसतशा सर्व गोष्टी झाल्या, त्यावरून हें कृत्य याचेंच असावें असा मजबूद अंदेशा येतो.

**दिल्ली** एथें **तघलखाबाद**नामक भव्य गडी **ग्यासुद्दीन** याणें बांधिलेली अद्यापि प्रसिद्ध आहे.

---

# २ महम्मद तघलख्‌.

यूना खान याणें सुल्तान महम्मद असा किताब घेतला, आणि तो अलौकिक बडेजावीनें तक्तावर बसला. त्या वेळीं आपल्या दोस्तांस व विद्वान्‌ लोकांस याणें पुष्कळ देहेनग्या दिल्या, व निर्वेश ह्मणजे पेनशनें दिलीं; असें औदार्य पूर्वी कोणत्याहि बादशाहानें दाखविलें नव्हतें.

ई०स० १३२५ हि०स० ७२२. महम्मद तघलख्‌ याचा स्वभाव.

त्याचप्रमाणें याणें मोकळ्या हातानें दवाखानें घातले, व धर्मशाळा स्थापिल्या, आणि आपल्या सर्व कारकीर्दीमध्यें विद्वान्‌ लोकांस अतिशय आश्रय दिला; तेणेंकरून ते याची पराकाष्ठेची स्तुति करित असत, व ती योग्यहि होती.

त्या वेळीं या एवढा वक्ता व कुशल बादशाहा कोणी नव्हता, असें सर्वत्र कबूल करितात. याणें आरबी व फारसी या भाषांमध्यें जीं पत्रें लिहिलीं आहेत, त्यांचा सुंदर शैलीचें वर्णन हा मेल्यानंतरहि फार दिवसांनीं लोक करित असत. याची स्मृति विलक्षण असे; हा चांगला नैय्यायिक, व तसाच युनानी लोकांचा तत्वशास्त्रांत निपुण होता; शिवाय गणित, व सिद्धपदार्थविज्ञान, यांची यास फार प्रीति असे; कोणास कांहीं चमत्कारिक रोग झाला असतां, त्याचीं लक्षणें कशीं पालटतात, हें पाहण्याकरितां हा आजारी लोकांजवळ जाऊन स्वतः बसत असे; हा आपले निमाज नियमित वेळीं पढत असे, दारूस कधीं शिवत नसे; आणि आपलें आचरण आपल्या धर्मांतील नीतिवचनांप्रमाणें ठेवित असे; लढाईमध्यें शौर्य व चपलता यांविषयीं याची प्रख्याति असे; या सर्व गुणांवरून हा कोणी अद्भुत पुरुष आहे, असें त्या वेळचे सर्व राजे मानीत; तें त्यांचें मानणें वरील वर्णनावरून योग्य आहे.

याचा अंगीं एवढी बुद्धि, व इतके गुण असूनहि ते व्यर्थ होते; स्वेच्छाचार करण्याची शक्ति असल्यामुळें मनुष्यास जो मद चढतो, तो यामध्यें होता; तोहि असो, परंतु त्याशिवाय याचे विचार इतके आड मार्गानें जात असत, कीं यावर कांहीं वेडाची छाया होती, किंवा नाहीं, याविषयीं संशय उत्पन्न होतो. वृथा मनोरथांचा पाठीस लागून, याणें आपलें सर्व आयुष्य घालविलें; आणि ते सिद्ध करण्याकरितां जे उपाय योजिले तेहि अकलेपासून दूर असे योजिले तसेंच त्या उपायांपासून आपल्या रयतेस किती अपाय होत, तिकडे याणें मुळींच लक्ष दिलें नाहीं. त्यामुळें याचा राज्यांत जशी रयतेची दैना झाली, अशी दुसऱ्या कोणत्याहि बादशाहाचा कारकीर्दींत झाली नाहीं.

तैमूरशीन खान नामें प्रख्यात सरदार याणें मोगललोकांची मोठी फौज घेऊन पंजाबावर स्वारी केली; त्यास पुष्कळ द्रव्य घेऊन बादशाहानें परत लाविलें. पाहिलें असतां असा हा दुर्बळ शत्रु पाहून पुढें लागलेच आणखी मोगललोकांचे हल्ले यावे; परंतु या प्रसंगीं असें घडून आलें नाहीं. आतां महम्मद तघलख् याचा सद्गुणांवरून,अथवा दुर्गुणांवरून तरी, वर सांगितलेली गोष्ट ही हा करील असें आपल्या मनांत येणार नाहीं.

यानंतर याणें दक्षिणदेश पुरा काबीज केला, आणि राजधानीजवळचा प्रांताप्रमाणें दूरचा प्रांतांचा बंदोबस्त केला. हें काम वास्तविक विचार करून योग्य केलें; हेंहि पाहूं गेलें असतां, याचा स्वभावास उलटच होय.

महम्मद तघलख् याचे विलक्षण बेत.

यापुढें बादशाहानें आपल्या स्वाभाविक बुद्धीप्रमाणें अवतार आरंभिला.

प्रथम याणें इराणदेश जिंकण्याचा आव

घालून प्रचंड सेना[2] जमविली. तिणें त्याचा सर्व खजीना खलास करून, पुढें पगार न मिळे, तेव्हां देशभर पसरून सगळ्या मुलुकाचें वाटोळें केलें. इराणदेश जिंकण्याचा बेत.

यानंतर चीनदेश जिंकून व तेथील श्रीमान् राज्य लुटून, आपलें रितें कोठार भरावें, असा याणें बेत केला; आणि त्या कामास एक लक्ष लोकांची फौज हिमालयाचा पहाडांतून पाठविली. परंतु ते लोक त्या पर्वतांतून पार पडतांच सरहद्दीवर त्यांस चिनी लोकांची मोठी फौज आड आली. त्या वेळीं यांचे लोकहि कमी झाले होते, आणि हे श्रमामुळें थकून गेले होते. त्यामुळें त्यांसमोर यांचानें उभें राहववलें नाहीं. तशांत यांची अन्नसामग्री संपली, आणि पावसाळा जवळ आला; त्यामुळें क्षणभर विलंब न करितां हे मागें परतले; वाटेनें येत असतां मार्गांत पहाडी लोक उपद्रव करूं लागले; चिनी लोकांनीं पाठलाग करून पुष्कळांचे प्राण घेतले आणि दुष्काळ पडल्यामुळें यांची त्रेधा झाली. पुढें पावसाची संतद्धार लागली. त्यामुळें मात्र यांस उपद्रव देण्यास चिनी लोकांची पुढें गति बंद झाली; आणि ती फौज वेळींच पहाडांतून सुरक्षित उतरली. खालीं येतात तों सर्व सपाट देश जलमय झाला, आणि जा डोंगरी मुलुकांतून जावयाचें होतें, तेथें पाय न शिरके असें जंगल उभें ठाकलें; याप्रमाणें परत येत असतां त्यांचे अतिशय हाल होऊन पंधरा दिवसांत सर्व मरण पावले. त्यांचें वर्तमान सांगावयास एकहि मागें उरला नाहीं. ही फौज पुढें जात असतां ठिकठिकाणीं बंदोबस्ताकरितां त्यांणीं आपल्यांतून कांहीं लोक ठेविलेले होते; पुढें चीनदेश जिंकण्याचा प्रयत्न.

२ ३७०,००० घोडेस्वार होते, असें फिरिस्ता ह्मणतो.

जेव्हां ही अपेशी स्वारी फसली, तेव्हां जशी कांहीं ती यांचा पायगुणानेंच बुडाली, अशाच बहुधा कांहीं कारणावरून, बादशाहानें त्या सर्वांस मारून टाकविलें.

कागदाचा पैका सुरूकेला. आपली तंगी दूर करण्याचा हा उपाय फुकट गेला असें पाहून, याणें आपलें पोतें भरण्याकरितां दुसरा तशाच आडाणीपणानें उपाय योजिला. तो असा, चीनदेशामध्यें कागदाचा पैका चालतो असें ऐकून, याणें आपल्या राज्यांत ती शिस्त सुरू करावी असें मनांत आणिलें, आणि कागदाबदल तांब्याचे तुकडे चालू केले. बादशाहाचा खजीना रिकामा पडल्यामुळें आणि त्याचें राज्यहि डळमळित असल्यामुळें आरंभापासूनच या नव्या पैक्याचा भाव नाहींसा झाला; परदेशी व्यापारी हा पैका घेतना, आणि स्वदेशामधीलहि लोकांवर जुलूम केला असतां, ते चुकवाचुकव करीत. यामुळें व्यापार बंद पडला; आणि सर्व लोकांची धांदल होऊन विपत्ति झाली. बादशाहाचें कर्ज वारलें, एवढा यास दर्शनीं लाभ झाला खरा; परंतु त्याच मानानें याची पैदास्त कमी झाली; याची रयत भिकारी झाल्यामुळें जमाबंदीचा मूळासच आंचका बसला; आणि लोकांची एवढी दुर्दशा होऊन, बादशाहाची तर पूर्वीपेक्षांहि अतिशय तंगी झाली; एवढा मात्र या कृत्याचा परिणाम झाला.

बादशाहाची जुलूमजबरदस्ती. हा बादशाहा पूर्वीपासूनच लोकांचें द्रव्य जबरदस्तीनें हरण करित असे; पुढें यास जसजशी अधिक तंगी पडत चालली, तसतसा हा अधिक जुलूम करूं लागला; त्यामुळें लोकांस त्रास सहन होईनासा झाला; शेतकरी आपलीं शेतें सोडून देऊन वनवासास

गेले, आणि पुष्कळ ठिकाणीं लूट करून आपली उपजीविका करूं लागले. तशींच पुष्कळ शहरें ओस पडलीं. याप्रमाणें आपण केलेल्या कृत्यांपासून बखेडे झाले, असें पाहून हा रागानें वेडा झाला, आणि लोकांचा सूड घेण्याकरितां याणें जो उपाय योजिला, तेणेंकरून याचीं पूर्वींचीं सर्व दुष्ट कृत्यें मार्गे पडलीं. याणें मोठ्या शिकारीचा बेत घालून आपली फौज बाहेर काढिली आणि हिंदुस्थानामध्यें मोठी शिकार करित्येवेळेस जसें माणसांचें कडें करितात, त्याप्रमाणें पुष्कळ प्रदेशास गराडा दिला. नंतर हुकूम केला, कीं सर्व लोकांनीं येऊन मध्यास मिळावें, आणि रस्त्यांत जे लोक सांपडतील, त्यांना जनावरांप्रमाणें कापून काढावें. या घोर कर्मानें पुष्कळ लोक माणास मुकले; त्यांत बहुतेक बिचारे गरीब कुणबी लोक होते. याप्रमाणें याणें पुष्कळ वेळा माणसांची पारध केली. पुढें दुसऱ्या एका समयीं याणें कनोज या मोठ्या शहरांतल्याहि लोकांची मोठी कतल करविली. या भयंकर कृत्यांपासून सहजच पुढें दुष्काळ पडला; त्यामुळें देशांतील लोकांची जी दुर्दशा झाली, ती अनिर्वाच्य आहे.

एवढा जुलूम झाला त्यापासून सुटून जाण्याविषयीं कोणी यत्न केले नाहींत असें नाहीं. खुद्द महम्मद तघलख़ याचा पुतण्या याणें प्रथम माळव्यांत बंड केलें. त्याच्या बादशाहानें दक्षिणेमध्यें पाठलाग करून, त्यास पकडून त्याचा अंगाचें कातडें जीवंतपणीं सोडवून काढिलें. नंतर बादशाहाचा बापाच्या दोस्त, जाचा मदतीनें महम्मदाचा बापास गादी मिळाली, त्या मलिक बहिरामानें

त्यामुळें बंडें झालीं.

इ० स० १३३८, हि० स० ७३९.

इ० स० १३३९

हिं० स० ७४०. पंजाबांत बंड केलें; त्याचा पराजय कर त्यासहि मारून टाकिलें.

पुढें एका मुसलमान सरदारानें बंगाल्यांत बंड केलें,

बंगाल्यांत बंड होऊन तेथें स्वतंत्र राज्य झालें. इ० स० १३४० हिं० स० ७४१.

कधींच मोडलें गेलें नाहीं. चोलमंडल, म्हणजे पूर्वसमुद्राचा कांठचा देश, यांत त्यामागून लागलें च बंड झालें, त्याचाहि तसाच परिणाम झाला. हें बंड मोडण्याकरितां बादशाहा स्वतः गेला होता, परंतु वरंगूळ एथें याचा फौजेंत पटकी आली, तेणेंकरून याचें अतिशय नुकसान झाल्यामुळें यास देवगडास परत यावें लागलें. त्या वेळीं मार्गांत येत असतां आपला एक दांत पाडविण्याचा यास प्रसंग आला; तेव्हां तो दांत मोठ्या समारंभानें पुरून त्याजवर एक भव्य कबर याणें बांधविली.

चोलमंडलामध्यें बंड झालें.

हें वर्तमान होत असतां, अफगाणांनीं सिंधुनद उतरून पंजाब लुटून फस्त केला. पुढें जेव्हां ते स्वदेशास गेले, तेव्हां त्यांचा मागून गकर आले; त्यांणीं लाहोर घेऊन सर्व देशाचें पुरें वाटोळें केलें.

इकडे कर्नाटक व तैलंगण या देशांचा राजांनीं आपलें स्वातंत्र्य मिळविण्याकरितां कट केला. त्यांतून कर्नाटकचा राजानें विजयनगर एथें आपली गादी स्थापिली. बल्लाळ वंशामागून जो नवा वंश झाला, त्याचा हा मूळपुरुष होता. सोळाव्या शतकाचा अखेरी जवळ जवळ पर्यंत या राजांनीं मुसलमानलोकांशीं बहुधा बराबरीनें टकर मारिली; तैलंगणचा राजानें वरंगूळ परत

कर्नाटक व तैलंगण, या देशांत हिंदुराजांची पुनः स्थापना, इ० स० १३४४, हिं० स० ७४४.

घेतलें, आणि सर्व राज्यांतून महम्मद बादशाहाचा किल्लेदारांस हाकून दिलें.

त्या वेळीं उत्तरहिंदुस्थानांत दुष्काळाचा भर होता, यास्तव संबल एथील सुभेदाराचानें जमाबंदी वसूल होईना; त्यामुळें बादशाहाचा आपणावर राग होईल, या भीतीनें त्याणें बंड केलें; तसेंच दक्षिणेंत बेदर एथें एकानें उठावा केला; परंतु हीं दोन्ही बंडें बादशाहानें लवकरच चुरडून टाकिलीं. त्यानंतर लागलेंच मुसलमान—झालेल्या मोगल सरदारांतून एकानें दक्षिणेंत बंड केलें. त्याचा मोड झाला; परंतु जे दुसरे मोगल सरदार होते, ते, कांहीं बखेडा झाला असतां आपलें कार्य साधण्यास, पूर्वीप्रमाणेंच तयार होते. या सरदार लोकांस अमीर जदीद, ह्मणजे नवे मानकरी असें ह्मणत असत.

दुसरीं बंडें इ० स० १३४५, हि० स० ७४५.

इ० स० १३४६, हि० स० ७४६.

पुढें ऐन उल्‌ मुल्क याची अयोध्येचा सुभ्यावरून दक्षिणचा सुभ्यावर बदली झाली, तेव्हां त्यास बादशाहाचा मतलबाचा अंदेशा येऊन तो हुकूम मानीनासा झाला. नंतर लवकरच त्यास जिंकून सर्व लोकांचा अटकळी बाहेर बादशाहानें त्यास क्षमा करून आपल्या कामावर परत पाठविलें.

दक्षिणेमध्यें दिवसेंदिवस अडचणी वाढत गेल्या असून, अद्यापपर्यंत तेथील सुभेदारानें बराच बंदोबस्त ठेविला होता; त्यास कामावरून दूर करून बादशाहानें तो सुभा आपला जांवई इमाद उल्‌ मुल्क यास दिला, आणि तेथील जमाबंदी पुष्कळ वाढविली.

त्याचप्रमाणें माळव्यांत एक हलक्या जातीचा नवा

सुभेदार नेमिला. त्याणें आपली हुशारी दाखविण्याकरित विश्वासघातानें सत्तर मोगल अमीरांची कतल केली; त्या मुळें गुजराथेंतील मोगल सरदारांनीं तेथील बाकीचा लश्क रास आपल्या मिलाफास घेऊन उठावा केला या बंडाचा बंदोबस्त बादशाहानें स्वतःजाऊन केल या स्वारींत खंबायत व सुरत हीं दोन मातबर शहरें याणें लुटून टाकिलीं, आणि जसा एकाद्या शत्रूचा मुलूकाचा नाश करितात, त्याप्रमाणें गुजराथ हा याचाच सुभा असून त्या प्रांतावर याणें नांगर फिरविला.

गुजराथेंतील मोगली फौजेंचें बंड. इ० स० १३४७, हि० स० ७४८.

गुजराथेंतील कांहीं बंडवाले लोक आपल्या बचावाकरितां दक्षिणेंत पळून गेले होते, त्यांस तिकडील मोगलाई अमीर लोकांनीं पाठीस घातलें. तेणेंकरून महम्मदास अतिशय क्रोध येऊन त्या लोकांस कैद करण्याविषयीं याणें हुकूम दिला; परंतु ते लवकरच अटकेंतून निसटून गेले, आणि मोठें बंड करून, इस्मायल्‌ खान नामे एका अफगाण सरदारास बादशाहा करून, त्याचा नावानें दौंडी पिटविते झाले. हें वर्तमान ऐकतांच महम्मद तघलख्‌ याणें ताबडतोब येऊन, व बंडवाल्यांस जिंकून, त्यांतील मुख्य सरदार व त्यांचा बादशाहा यांस देवगडाचा किल्ल्यांत पळविलें; तेथें जाऊन ते अटकून राहिले. या लढाईत बादशाहानें जेवढें शूरत्व व चपलता हीं प्रकट केलीं, तेवढीं जर हा दुसऱ्या सत्कार्यास लाविता, तर बरें झालें असतें. पुढें तो किल्ला याचा हातीं येऊन तें बंड पुरें मोडावें तों गुजराथेंत नवें बंड झाल्यामुळें यास तिकडे जाणें जरूर झालें. मग तें मोडण्यास

दक्षिणेंत मोठें बंड झालें.

बादशाहाचें तेज व चांचल्य.

हा जात असतां, दक्षिणेंतील लोकानीं याचा पिछाडीचा फौजेवर तुटुन पडून याचें ओझेंपाझें, व हत्ती, हें लुटून नेलें. पुढें गुजराथेंतील बखेडा मोडल्यासारिखा होऊन, तेथील बंडवाले सरदार सिंधमधील ठठ्ठा एथील राजपूत राजांचा आश्रयास जाऊन राहिले. इतक्यांत दक्षिणेमध्यें पूर्वीं कधीं बिघाड झाला नव्हता असा बिघाड झाल्याचें वर्तमान यास लागलें. तें असें:— तेथील बंडवाला बादशाहा याणें हसनकांगो ब्राह्मणी याचा वतीनें राजीनामा दिला. तो हसनकांगो याणें महम्मदाचा जांवयाचा पराजय करून त्यास मारून सर्व दक्षिण प्रांत परत घेतला; आणि आपल्या बरोबर माळव्याचा सुभेदाराकडून बंड करविलें. हसनकांगो याणें जी नवी बादशाही स्थापिली, त्या वंशास ब्राह्मणी असें ह्मणतात.

हा प्रकार झाल्यावर, महम्मद बादशाहास असें समजलें, कीं हरएक नवें बंड झालें, ह्मणजे तें मोडण्यास आपण जलदीनें जातों, आणि हातांतील बंडाचा बंदोबस्त टाकून देतों; असें मनांत आणून दक्षिणेमधील वाढलेला बखेडा मोडण्यास हात घालण्याचा पूर्वीं गुजराथेचा पक्का बंदोबस्त करावा, असा याणें निश्चय केला; आणि याचा शरीरीं आरोग्य नसतां, सिंधदेशांत पळून गेलेल्या सरदारांचा पाठलाग करण्याकरितां हा निघाला; त्यास सिंधुनदामध्यें बंडवाले लोक आडवे आले. परंतु त्यांस धूर देऊन, हा तो नद उतरला, आणि ठठ्ठा शहरास आला; तेथें यास आजार होऊन हा मरण पावला. जे अतिचतुर राजे होऊन गेले, त्यांप्रमाणेंच महम्मद बादशाहानें जन्मास येऊन मनुष्यदेहास शोभा आणिली; आणि

महम्मद तघलख़ू मरण पावला. इ० स० १३५१, ता० २० मार्च. हि० स० ७५२, मोहरम चंद्र १.

तसेंच जा राक्षसांसारिख्या अति दुष्ट राजांनीं आपल्या मनु-ष्यपणास डाग लाविला, तद्वतच याणेंहि कर्मे केलीं; अशी महम्मदाचा मागे त्याची सत्कीर्ति व दुष्कीर्ति राहिली आहे.

देवगड एथें राजधानी ने-ण्याचा व दुसरे महम्मद तघल खू याचे छांदिष्ट विचार.

**महम्मदानें** पुष्कळ बेत घातले, त्यांत आपली रा-जधानी **दिल्लीहून** उठवून **देवगडास** न्यावी हा एक मनांत आणिला. यापासून प्रजेस जितकें दुःख झालें, व पुढें बोभाट झाले; तसे दुसऱ्या कोणत्याहि बेतापासून झाले नाहींत. देवगडास राजधानी नेणें, हें कृत्य जर उताव-ळीनें न आरंभितां, हा स्वस्थपणानें काम चा-लविता, तर तें केवळ अविचाराचें होतें, असें नाहीं; परंतु महम्मदाचा मनांत लहर आली, तसा लागलाच याणें **दि-ल्लीचा** सर्व लोकांस **देवगडास** जाण्याविषयीं हुकूम दिला, आणि त्या शहरास **दौलताबाद** असें नाव दिलें. पुढें या बादशाहानें लोकांस दोन वेळा **दिल्लीस** येण्यास परवानगी दिली, आणि पुनः दोन वेळा हुकूम केला, कीं सर्व लोकां-नीं **दिल्ली** सोडून **दौलताबादेस** जावें; आणि सांगितलें कीं जे न जातील ते प्राणास मुकतील. त्यांतून एका वेळीं जेव्हां असा हुकूम केला, तेव्हां मुलुकांत दुष्काळ पडला होता,

(१) त्या वेळीं याणें जो **दौलताबादचा** किल्ला बांधिला, तो अद्यापि आहे. त्या किल्ल्याचा तटबंदीचा पहाड, १८० फूट उभा लंबा-क्रानें अगदीं गुळगुळीत असा कापून काढिलेला आहे, आणि त्या किल्ल्यांत जाण्यास त्या पहाडाचा मर्मांतून एक वांकडातिकडा फेऱ्याचा रस्ता केलेला आहे. या सर्व किल्ल्यासभोंवता रुंद व खोल खंदक आहे; तोहि असाच तो काळाेम पहाड कापून केलेला आहे. हे प्रचंड कृत्य पाहिलें, ह्मणजे या बा-दशाहाचीं कृत्यें कोणत्या मानानें मोठीं असत हें अद्यापि प्रत्यक्ष दिसतें.

त्यामुळें अपार लोक मरून गेले; आणि प्रत्येक वेळीं तरी हजारों लोक अपेष्टा होऊन, धुळीस मिळाले. शेवटीं तो महम्मदाचा बेत तडीस गेला नाहीं.

दुसरें याचा मनांत कांहीं वारें भरून मिश्रदेशांतील नामधारी खलिफाचा अधिकार याणें कबूल करून त्याजकडून वस्त्रें आणविलीं; आणि ज्या राजांस तशीं वस्त्रें मिळालीं नव्हतीं, त्यांचीं नावें राजावलींतून काढून टाकविलीं.

तीस तीस चौरस कोशांचा एक एक परगणा, असे सर्व देशाचे परगणे करून, देशाचे भाग पाडावे, आणि जमीनीचा लागवडीची तजवीज सरकारांतून खालसा ठेवावी; असा याणें बेत मांडिला होता, परंतु यापासून खर्च मात्र पुष्कळ झाला.

अफ्रिकाखंडामधील तांजर्स एथील इबन भतूता नामें एक विद्वान् गृहस्थ एशियाखंडांत फिरत होता. तो इ० स० १३४१ चा सुमारास महम्मदाचा दरबारांत आला होता. त्याणें याचा कारकीर्दीविषयीं पुष्कळ वर्णन केलें आहे; त्यांत राजाचा बुद्धीविषयीं, व दोषांविषयीं जसें एतद्देशीय ग्रंथकार फार वर्णन करितात, तसेंच तोहि लिहितो. त्यावरून याचा राज्यामध्यें प्रकाश, आणि अंधार, यांचें चमत्कारिक झालेलें मिश्रण दृष्टीस पडतें; आणि या बादशाहाचा स्वभावावरून असें त्या वेळीं घडून यावें हें सहजच दिसतें. यावेळीं रस्त्यांत इतकी दंगाई असे, कीं प्रवास करणें हें काम मोठें जोखमाचें असे; असें असून राजधानीपासून सरहद्दीचा प्रांतांपर्यंत उत्कृष्ट घोडस्वारांची व

याचा दरबाराचें व राज्याचें परदेशस्थ ग्रंथकारानीं केलेलें वर्णन.

पायानीं चालणाऱ्या कासीद लोकांची बादशाहाची डाक असे; दिल्ली हें मोठें भव्य शहर आहे, या शहराची तटबंदी, व एथील मशीदी, यां सारखीं कामें पृथ्वीवर कोठें नाहींत; याप्रमाणें तो वर्णन करितो. जा वेळचा त्याणें वृत्तान्त लिहिला आहे, त्या वेळीं बादशाहा पुनः दिल्ली वसवित होता; तथापि ती ओसाडासारखीच होती. त्याणें असें लिहिलें आहे, कीं "जगांतील या अति मोठ्या शहरांत अति थोडे राहणारे लोक आहेत." त्याणें आपला इतिहास स्वदेशास परत गेल्यानंतर लिहिला; यावरून त्याणें लोभानें कांहीं कमजाजती केलें असेल, असें ह्मणवत नाहीं.

जा वेळीं इबन भतूता हा दिल्लीस आला, त्या वेळीं बादशाहा तेथें नव्हता; यास्तव तो व त्याबराबर जे दुसरे परदेशस्थ विद्वान् लोक आले होते, त्यांस बादशाहाचा आईचा दरबारांत नेलें; तेथें त्यांचें मानप्रतिष्ठेनें आगतस्वागत होऊन पोषाग देऊन त्यांस रुकसत मिळाली. पुढें इबन भतूता यास राहवयास एक सरकारांतून घर, व पुष्कळ शिधासामान प्राप्त झालें, व इच्छेस येईल तो पदार्थ मिळूं लागला; आणि कपडेधुलाईबदल २००० दिनारांची[४] यास नेमणूक झाली.

कांहीं दिवसांनीं त्याची मुलगी वारली, तेव्हां ती बातमी बादशाहास डाकेंतून खासगी रीतीनें गेली. पुढें जेव्हां तिचें उत्तरकार्य झालें, तेव्हां बराबर वजीर येऊन, मोठमोठ्या मानकरी लोकांचा मरणानंतर जसे विधि करितात, तसें हें कार्य झालें; हें पाहून त्यास आश्चर्य वाटलें. पुढें बादशाहाचा

(४) या वेळीं दिनार ह्मणून एक लहान नाणें होतें, असें दिसतें; त्याची बराबर किम्मत मला समजत नाहीं.

आईनें याचा स्त्रीस समाचाराकरितां बलावून, तिला पोषाग व दागिने यांचा नजराणा केला.

याप्रमाणें बादशाहानें त्याचें परोक्ष आगतस्वागत केलें. पुढें जेव्हां बादशाहा परत आला, तेव्हांहि याणें भतूता याचा चांगला सत्कार केला. बादशाहा परत येत्यासमयीं इबन भतूता यास सामोरा गेला, तेव्हां बादशाहानें हात धरून आदरानें त्याचा स्वीकार केला; आणि मी तुझा सर्व प्रकारें सांभाळ करीन, असें वचन दिलें. नंतर बादशाहानें त्यास न्यायाधीश केलें; परंतु जेव्हां इबन भतूताजवळ न्यायाधिशीचा कामाविषयीं आरबीमध्यें हा बोलूं लागला, तेव्हां आपणास हिंदुस्थानची भाषा माहित नाहीं, ह्मणून इबन भतूता तें काम पतकरण्यास मागसावला. अशी त्याणें हरकत काढल्यामुळें बादाशाहा किंचित् क्रोधाविष्ट झाला; तथापि याणें स्वस्थपणें इबन भतूता याचा शंकांचें समाधान केलें, आणि शेवटीं त्यास पुष्कळ वेतन करून दिलें. पुढें इबन भतूता याणें एक आरबीं काव्य रचून, त्यांत आपलें कर्ज फेडावें असें बादशाहाजवळ मागणें मागितलें; त्यावरून बादशाहानें त्याचें पंचावन हजार दिनार कर्ज वारिलें. कांहीं काळानें दिल्लीजवळ एक दर्वेशी राहत असे; त्याविषयीं बादशाहास वहमा येऊन याणें लागलाच त्याचा शिरच्छेद करविला, आणि त्याचा गुहेमध्यें जे लोक जात असत, त्या सर्वांस पकडून आणिलें; त्यांपैकीं इबन भतूता व दुसरे फारच थोडे लोक जीवांनिशीं बचावले. हें पाहतांच आपल्या पायांखालची जमीन वरून चांगली दिसत्ये, परंतु ही ज्वालामुखी आहे, असें त्याचा अनुभवास आलें. नंतर त्याणें थोडक्याच

दिवसांत संधि पाहून आपल्या चाकरीचा राजीनामा दिला; परंतु बादशाहास त्याविषयीं वांकडें न वाटतां, त्या वेळीं याचा दरबारांत **चीन**चा बादशाहाकडून सन्मानार्थ मोठमोठे वकील लोक आले होते, त्याचाबदल याकडून तिकडे वकालत जावयाची होती, तिजबरोबर यास पाठविलें.

मुसलमानी राज्याचा महत्तम विस्तार.

या बादशाहाचा कारकीर्दीचा आरंभीं सिंधुनदाचा पूर्वेस जेवढा देश मुसलमानांकडे होता, एवढा कधींहि दुसऱ्या वेळेस नव्हता; परंतु या कारकीर्दींत जे प्रांत दिल्लीचा राजांचा ताब्यांतून गेले, ते औरंगजेबाचा कारकीर्दीपर्यंत पुनः हातीं आले नाहींत, आणि जे प्रांत बंड न करितां राहिले, त्यांमध्येंहि बादशाहाचा अधिकारास धक्का पोंचला; त्याची सांवरासांवर मोगल वंशाचा अंमल सुरू होईपर्यंत झाली नाहीं.

पूर्वेकडील देशांत वाईट राजा असला, तर त्याचा निकाल करून टाकण्याविषयीं बहुधा लोक विचार करित बसत नाहींत. असें असून या एका बादशाहाचा अव्यवस्थित कारभारामुळें एवढें नुकसान झालें असतां, त्यास लोकांकडून कांहीं इजा झाली नाहीं; परंतु असें घडणें हें बहुधा विरळाच होतें.

---

## ३ फिरूज तघलख्.

इ० स० १३५१ हि० स० ७५२.

महम्मद तघलख् मेल्यावर त्याचा लश्करांत बखेडे उत्पन्न झाले; त्यांत चालीप्रमाणें मोगललोक हे मुख्य कारणी होते. त्या वेळीं दिल्लीचा दरबारांतील जे या मुलुकचे सरदार होते, त्यांणीं ती

अव्यवस्था मोडून **महम्मदाच्या** पुतण्या **फिरुजुद्दीन** यास गादीवर बसविलें. याप्रमाणें एतद्देशीय सरदारांचें माहात्म्य चालूं लागल्याचें इतिहासांत प्रथम याच वेळीं वर्णन आहे. **फिरुजुद्दीन** याणें **सिंधप्रांताच्या** बंदोबस्त करण्याकरितां कांहीं फौज ठेविली; आणि आपण **ऊक** एथपर्यंत **सिंधुनदाचा** किनाऱ्यानें येऊन **दिल्लीस** गेला, आणि तेथें मागील बादशाहाचा एका मुलाचा नावानें जें बंड झालें होतें, तें मोडून टाकिता झाला. तो मुलगा बादशाहाचाच खरा होता, किंवा नाहीं, याच्या निश्चय सांगवत नाहीं.

तक्तावर बसल्यावर तीन वर्षांनीं याणें **बंगालप्रांत** परत घेण्याकरितां स्वारी केली, आणि तो सर्व लुटून टाकिला; परंतु शत्रूच्या पराजय झाला नाहीं. शेवटीं पावसाळा सुरू झाला तेव्हां यास परत यावें लागलें.

इ० स० १३५३ हि० स० ७५४.

यानंतर दोन तीन वर्षांनीं **बंगाल** व **दक्षिण** या दोन देशांचा बादशाहांकडून वकालती आल्या; त्यांचा याणें स्वीकार केला, त्यावरून याणें त्या दोन्ही बादशाहांचा स्वतंत्रपणा कबूल केला असें झालें; त्यामध्यें आपला नामधारी मोठेपणा मात्र कदाचित् याणें सोडला नसेल, असें वाटतें. बंगालचा बादशाहाबरोबर जो वर सांगितल्याप्रमाणें तह केला, तो खुद्द त्या पुरुषासच लागू होता, अथवा जेव्हां तो मेला तेव्हां लोभाविष्ट होऊन बादशाहानें तो तह मोडिला, हें कांहीं समजत नाहीं; तें कसेंहि असो, परंतु तो बादशाहा मेल्यानंतर त्याच्या मुलगा **सिकंदर** याजबरोबर लढाई सुरु करून **फिरूज** याणें स्वतः बंगालचा

इ० स० १३५६, हि० स० ७५७. बंगाल व दक्षिण यांतील राज्यांचीस्वतंत्रता कबूल झाली.

ईशान्यकोंकाकडील प्रांतावर स्वारी केली. पुढें सिकंदर याजबरोबर पुनः मागील तह सुरू केला; तेव्हां त्याचा स्वतंत्रतेविषयीं वांधा राहिला नाहीं. यानंतर पुष्कळ वर्षांनीं ठठ्ठा एथील जाम बाणी नावाचा राजपूत राजा याणें कांहीं अपराध केल्यावरून, त्याचें पारिपत्य करण्याकरितां बादशाहानें स्वतः सिंधप्रांतावर स्वारी केली, परंतु तींत याचा जय झाला नाहीं; तथापि त्यांत इतकेंच झालें, कीं तो जाम निमित्तास बादशाहास शरण आला, त्यामुळें याची मसलत फुकट गेल्यापासून यास विशेष वाईट वाटलें, असें नाहीं. सिंधमधून बादशाहा गुजराथेंत गेला, आणि तेथें नवा सुभेदार नेमून परत जाता झाला. थोडक्या वर्षांनीं तो सुभेदार मेला, आणि दुसऱ्याची नेमणूक झाली; त्या वेळीं थोडे दिवसपर्यंत एक बंड झालें होतें.

इ० स० १३७२, हि० स० ७७३.

याप्रमाणें लहान कारभार करित फिरूज बादशाहा इ० स० १३८५ पर्यंत गुंतलेला असे. पुढें याचें ८७ वर्षांचें वय झालें, आणि हा अशक्त झाला; त्यामुळें याची राज्यकारभार करण्याची शक्ति राहिली. तेव्हां हळूहळू तें सगळें सूत्र याचा वजीराचा हातांत आलें. त्यास अधिकाराची गोडी लागून, बादशाहाचा वडील मुलाचा नाश करून तो अधिकार आपणाकडे निरंतर चाले असें करावें, असा त्यास लोभ झाला. त्याप्रमाणें बादशाहाचा वडील मुलगा शाहाजादा नासरुद्दीन याविषयीं बादशाहाचा मनांत वांकडें आणून देऊन त्यास मारून टाकून गादी मिळवावी, असा त्याणें बेत केला. तो बहुतेक तडीस गेला होता, इतक्यांत नासरुद्दीन

इ० स० १३८५, हि० स० ७८७.

बादशाहाचें ह्मातारपण.

याचा दरबारांतील स्पर्धा.

हा धीर करून गुप्तपणीं जनानखान्यांत शिरला, आणि, आपल्या बापाचा मनांत भीति उत्पन्न करून, आपला बचाव करिता झाला. पुढें खातरी झाल्यामुळें, किंवा दुर्बलतेचा कारणामुळें बादशाहानें वजीराचा पक्ष सोडिला, आणि नंतर लवकरच्च सर्व राज्याचा अधिकार उघडपणें आपल्या मुलाचा हवालीं केला.

शाहाजादा नासरुद्दीन याणें आपला अधिकार हुशारीनें चालविला नाहीं, त्यामुळें त्याचा दोघां चुलत भावांनीं दिल्लींत फितूर केलें; आणि त्यांणीं पूर्वीचा बादशाहास आपल्या ताब्यांत आणिलें होतें म्हणून, त्याचा नावानें आपण ह सर्व करित आहों असें पिकवून नासरुद्दीन यास हुसकून लाविलें; तेव्हां यमुना व सतलज या दोहोंचा उगमांजवळ त्या दोहों नद्यांमध्यें सरमोरनामक पहाडांत नासरुद्दीन यास पळून जावें लागलें. त्यानंतर फिरूज याणें आपला नातू ग्यासुद्दीन याचा वतीनें गादीचा राजीनामा दिला, असें त्यांणीं प्रसिध्द केलें.

बादशाहा मरण पावला. इ० स० १३८८, अक्टोबर, ता० २३. हि.स०७९०. रमजान चं० ४.

ही धांदल झाल्यावर बहुधा लागलाच्च फिरूज मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय ९० वर्षांचें होतें.

त्याचे कायदे.

फिरूज याचा राज्यांत मोठमोठ्या लढाया झाल्या नाहींत; तथापि याणें आपले कायदे मोठ्या शहाणपणानें केले, आणि लोकोपयोगी कृत्यें पुष्कळ केलीं; त्याविषयीं याची प्रसिद्धि आहे. देहान्त शासन हें अगदीं थोडक्या जातींचा अपराधांबदल मात्र व्हावें

असा याणें नियम ठरविला; तसेंच लोकांचा शरीरास क्लेश देणें आणि हात पाय इत्यादि अवयव तोडून टाकणें, हें बंद केलें. मुसलमानी शास्त्रप्रमाणें अवयवच्छेद करणें, हें बराबर आहे; असें असून हें याणें बंद केलें, यावरून याची अधिक स्तुति करणें योग्य आहे. या बादशाहानें पुष्कळ त्रासदायक कर, व बाबी सोडून दिल्या; आणि जीं अनियमित देणीं होतीं तीं बंद करून, सरकारचें येणें अमुक अमुक आहे, असें रयतेस स्पष्टपणीं व प्रसिद्ध रीतीनें कळावें, आणि वसूल करणाऱ्या लोकांचा हातांत त्याविषयीं कांहीं सत्ता राहूं नये अशा रीतीनें सरकारचा महसूल ठरविला. कोणी नास्तिक झाला असतां हा त्यास देशपार करित असे; हें कृत्य त्या वेळचा लोकांचा समजुतीप्रमाणें हा करित असे, असें ह्मटलें पाहिजे. परंतु हा स्वभावतः सुज्ञ होता; यामुळें लोकांनीं कोणचा रीतीनें खाण्यापिण्याचा वगैरे खर्च ठेवावा याविषयीं कायदे न करितां, याणें आपला स्वतांचा पोषाग साधा केला; तेणेंकरून याचें पाहून दुसरे लोकहि साधे कपडे वापरूं लागले.

यार्चीं लोकोपयोगी कृत्यें.

या बादशाहानें शेतकीला पाणी मिळण्याकरितां ५० नद्यांस बांध घातले; ४० मशीदी बांधल्या; ३० विद्यालयें स्थापिलीं; १०० धर्मशाळा चालू केल्या; शेती लोकांस पाण्याकरितां ३० तलाव; १०० दवाखाने; १०० हमामखाने ह्मणजे स्नानाचा जागा; १५० पूल; आणखी यांशिवाय दुसरीं आनंदकारक किंवा शोभादायक अशीं पुष्कळ कामें केलीं. तीं कामें सदोदित चालावीं ह्मणून त्यांजकडे नेमणूकी जमीनी लावून दिल्या होत्या.

वर लिहिलेल्या माळिकेंतील कांहीं संख्या मोठ्या

आहेत, आणि सर्व पाहूं गेलें असतां सरळ घाऊक आंकडे घातलेले आहेत, त्यावरून ही याद अगदीं बराबर असेल, किंवा नसेल, याविषयीं संशय येतो; परंतु या बादशाहाचीं जीं कृत्यें अद्यापि राहिलीं आहेत, त्यांवरून याणें केवढीं कामें हातांत धरिलीं होतीं, तें समजतें. जेथें यमुना, पर्वत सोडून, सपाट देशांत बाहेर निघत्ये तेथून आरंभ करून कर्नाळ्यावरून हांशी व हिस्सार यांपर्यंत एक कालवा नेलेला आहे; हा गागरनदीपर्यंत गेला आहे, आणि माजी कारकीर्दीत पंजाबांतील याजवळची नदी सतलज तिशींहि हा मिळालेला होता. हा कालवा बहुधा शेतकीकरितां केलेला असावा, असें दिसतें. बहुधा फिरूज मेल्यापासून त्याची मरामत न झाल्यामुळें, तो पडित झाला होता; परंतु हिस्सारचा पुढेंपावेतों इंग्रेज सरकारानें हा कालवा अलीकडे नीट केला आहे; तो सुमारें शंभर कोश लांब आहे. पूर्वीं हिंदुस्थानांत पाणचक्यांचा उपयोग करित नसत; परंतु या कालव्याचा योगानें हल्लीं पाणचक्या, लांकडें वगैरे कापण्याचे करवत, तेलाचा व साखरेचा घाण्या, असे कारखाने चालतात; पर्वतांतून मोठमोठ्या लांकडाचा सांगडी करून या कालव्यांतून तरावून आणितात; एक तऱ्हेवार बांधणीचे मचवेहि यांत चालतात, तेणेंकरून जिनस इकडून तिकडे नेतां येतो; परंतु या कालव्याचा मुख्य उद्देश शेतकी असून, याचा योगानें पुष्कळ देश सुपीक होऊन, तेथील लोक जे पूर्वीं धनगर होते, ते सांप्रत आपली उपजीविका शेतकीनें करूं लागले आहेत. हा कालवा हल्लीं एवढा आहे; त्यावरून पूर्वीं केवढा असेल तो सुमार केला पाहिजे. हें फिरूज बादशाहाचें अति मोठें कृत्य असून, वरील यादींत सांगितलेलें नाहीं.

## ४ दुसरा ग्यासुद्दीन तघलख.

इ० स० १३८९, फेब्रुआरि, हि० स० ७९१, सफ्फर.

जा चुलत भावांनीं **ग्यासुद्दीन** यास गादी वर बसविलें, त्यांजबराबर याचें लवकरच वांक पडलें, आणि त्यांणीं यास पदच्युत करून मारू टाकिलें. याची कारकीर्द एकंदर पांच महि चालली.

---

## ५ अबूबकर तघलख.

त्यानंतर **फिरूज** याचा दुसऱ्या एका मुलाचा मुलग **अबूबकर** यास त्यांणीं बादशाहा केलें. याणें एक वर्ष राज्य केलें नाहीं, इतक्यांत **नासरुद्दीन** हा राज्यावरू गेल्यापासून पहाडांत जाऊन राहिला होता, ति कडून फौज घेऊन परत आला, आणि **दिल्ली** श हर हस्तगत करून घेता झाला. पुढें त्याचें, व **अ** बूबकर याचें पुष्कळ महिनेपर्यंत, भांडण लागलें, त्यांत **दिल्ली** कितीएक वेळा **नासरुद्दीन** याचा हातून गेली, व ती पुनः त्याणें मिळविली. शेवटीं **नासरुद्दीन** याचा का यम अम्मल बसून, त्याणें आपला प्रतिस्पर्धी **अ** बूबकर यास लवकरच कैद केलें. या तंट्यांत **राईसरवारनामक हिंदु** सरदार हा **नासरु** द्दीनाचा मुख्य सहाकारी होता; आणि **मेवातां** तील **हिंदुलोक**, हे त्याचा शत्रूकडील पुढारी हो ते; हीं गोष्ट लक्षांत ठेवण्याजोगी आहे. त्या वेळीं जी खास

इ० स० १३८९, नोवेंबर. हि० स० ७९२, झिल्हाज.

इ० स० १३९० आगस्ट हि० स० ७९३, रमझान.

हुजुरांतील फौज होती, ती सर्व परदेशी लोकांची होती. त्यांणीं नासरुद्दीन याशीं द्वेषभाव दाखविल्यावरून त्यांस याणें शहरपार करून टाकिलें. त्यांतून कांहीं लोक आपलें खरें स्वरूप छपावूं लागले; त्यावरून हिंदुस्थानांतील भाषांमध्यें कांहीं अक्षर असून, जें इतर भाषांमध्यें नाहीं, अशा अक्षराचा उच्चार करवावा, आणि तो जास करितां न येईल, तो परदेशस्थ असें समजावें, असा सर्व लोकांची परीक्षा पाहण्याकरितां नियम केलेला होता. घोर, व हिंदुस्थान एथील मुसलमानी राज्यें निराळीं पडल्यापासून, दिल्लीचा राज्यांत हिंदुलोक, व एतद्देशीय मुसलमानलोक, यांचें मान किती वाढत चाललें होतें, हें वरील गोष्टीवरून आपल्या ध्यानांत सहजच येईल.

---

## ६ नासरुद्दीन तघलख्.

नासरुद्दीन याचा दुसऱ्या कारकीर्दींत जिकडे तिकडे अव्यवस्था चालली होती; तथापि याचा वेळीं कांहीं मोठमोठ्या गोष्टी घडून आल्या.

गुजराथचा सुभेदार फरतुल्मुल्क याणें बंड केलें, त्याचा मुझफ्फर खान याणें पराजय केला. त्याचप्रमाणें यमुनेपलीकडील राठोर जातीचा राजपूतांनीं बंड केलें. पुढें बादशाही अम्मल ढिला झाला, हें जिकडे तिकडे अनुभवास येऊं लागलें.

या बादशाहाचा वजीर एक मुसलमान झालेला हिंदु होता. त्याजवर त्याचा हिंदुधर्मांतील असणाऱ्या पुतण्यानें कांहीं तोहमत आणिल्यावरून, त्यास बादशाहानें मारून टाकिलें.

नासरुद्दीन मेल्यावर, त्याचा मुलगा हुमायून हा त्याचा गादीवर बसला; परंतु तो ४५ दिवसांनीं वारल्यानंतर, त्याचा धाकटा भाऊ महमूद यास सिंहासनावर बसविलें.

---

## ७ महमूद तघलख.

इ० स० १३९४, हिं० स० ७९६.

महमूद हा राज्यावर आला, तेव्हां लहान होता; आणि त्या वेळीं जो बादशाही अधिकार कमी झाला होता, तो पूर्वस्थितीस आणण्याजोगें यामध्यें विशेष सामर्थ्य नव्हतें. त्यामुळें गुजराथच्या सुभेदार मुझफ्फर खान हा आपल्या प्रांतांत स्वतंत्रतेनें सत्ता करूं लागला. दक्षिणेंतील राज्य स्वतंत्र झाल्यावर, माळवा हा पुनः दिल्लीखालीं आला होता; परंतु तेथील सुभेदार हा हल्लीं दिल्लीची हुकुमत सोडून स्वतंत्र झाला; त्याचप्रमाणें खानदेशचा लहानसा प्रांत हाहि स्वतंत्र झाला. हीं नवीं राज्यें अकबर बादशाहाचा कारकीर्दीपर्यंत स्वतंत्र राहिलीं होतीं.

बादशाहीचा मोड झाला.

बादशाहाचा वजीर याणेंहि जवानपुर हा प्रांत बळकावून, तेथें एक राज्य स्थापिलें. इकडे दिल्लीमध्यें फळ्या पडून, त्यांचा हाणामाऱ्या चालल्या असत. बाकी राहिलेल्या प्रांतांतील लोक बहुधा इकडे दुर्लक्ष करून राहिले होते, व कांहींचे आपसांत तंटे माजले होते. या आपसांतील कज्जांमध्यें सर्वांचें लक्ष गुंतलें असतां तैमूरलंग याची धाड येऊन सर्वांवर कोसळली; तेणेंकरून सर्व लोकांचा एकदम नाश झाला.

जेंगीझ खानाप्रमाणें तैमूरलंग याणें सर्व तातारलोकांचे

जमाव एकत्र केले होते; आणि त्याचा प्रमाणें-च सर्व आजूबाजूचा देशांचा विध्वंस आरंभिला होता. याची फौज जेंगीझ खानाचा एवढी नव्हती. हा जात्त्या तुर्की असून मुसलमान होता; आणि पाहूं गेलें असतां बऱ्याच सुधारलेल्या देशांत हा उत्पन्न झाला होता. तथापि जेंगीझ खानाप्रमाणें-च बहुधा याची लढाईची रीति दुष्ट असे, आणि याची त्या मोगलासारिखीच राज्यरीतींत दूर दृष्टि नव्हती. जेंगीझ खानापेक्षांहि याचा राज्याचा थोडक्याच काळांत नाश झाला; कारण जे देश याणें लुटून टाकिले, त्यांतून बहुतेक देश आपल्याकडे राखण्याविषयीं यत्नहि याणें केला नाहीं. याणें जे देश जिंकिले त्यांतून कांहीं याचा वंशजांकडेस चालले, व त्यांची बढतीहि झाली; परंतु असें होण्याचें कारण हें होतें, कीं याचा वंशजांचा स्वभावास व याचा स्वभावास बहुधा रात्रदिवसाची तफावत होती, याणें इराण व मावरुलूनहर् हे प्रांत घेतले; तातार, जार्जिया, व मेसोपोटेमिया, हे सर्व देश, आणि रुशिया, व सिबीरिया, या प्रांतांचे कांहीं भाग हे लुटून टाकिले; आणि नंतर लढाई करण्यास कांहीं निमित्त

तैमूरलंग याची स्वारी.

(५) तैमूरलंग यास एशियाखंडांत अमीर तैमूर असें ह्मणतात. समर्कंद शहराजवळ केश ह्मणून ठिकाण आहे तेथें याचा जन्म झाला. तेथें याचे पूर्वज सुमारें दोनशें वर्षे राहिलेले होते, आणि तेथील भाषा तुर्की व फारसी या आहेत. जेंगीझ खान जा कुळांत उत्पन्न झाला, त्यांतच आपण झालों असा हा दूरचा संबंध लावित असे, परंतु याचा आजा भेरले नायाचा लोकांचा मुख्य सरदार होता, एवढी मात्र आतां खचित माहिती आहे.

नसतां हिंदुस्थानचा विस्कळित झालेल्या राज्यावर याणें हात टाकिला.

तैमूरलंग याचा नातू पीर महम्मद हा सुलेमानपर्वतांतील अफगाणांस जिंकण्याचा कामांत गुंतला होता; तो इ० स० १३९८ चा आरंभीं उक्त शहराचा सुमारास सिंधुनद उतरला, आणि लवकरच मुलतान शहरास वेढा देता झाला. त्या कामास त्यास सहा महिन्यांवर लागले.

इ० स० १३९८, हि० स० ८००.

इकडे तैमूरलंग हा, नेहेमींचा मार्गानें हिंदुकुश उतरून, काबूल शहरास आला, आणि आगस्ट महिन्यांत तेथून निघून हरयूब, व बनू यांवरून सिंधुनदावर दीनकोट(१)-नामक शहर आहे, तेथें आला. तो लांकडाचा सांगडींचा व बोटूंचा पूल करून, सिंधुनद उतरला, आणि जेहलम-नदीपर्यंत जाऊन तिचा किनाऱ्यानें मार्गांतील देश जिंकित जिंकित तुलंबशहरास गेला. तेथील लोकांजवळून याणें प्रथम खंडणी घेतली; नंतर याचा फौजेनें तें शहर लुटून तेथील लोकांची कतल केली; परंतु असें करण्याविषयीं, त्यांस याचा हुकूम नव्हता, असें ह्मणतात.

इतक्यांत पीर महम्मद याणें मुलतान शहरास वेढा देऊन, तें पादाव केलें; परंतु पावसाळा सुरू झाल्यामुळें त्याचा घोड्यांचा नाश झाला, त्यामुळें त्यास त्या शहरामध्यें अडकून राहणें प्राप्त झालें. पुढें तैमूरलंग जवळ आला, तेव्हां त्याणें मुलतानाचा संरक्षणार्थ कांहीं फौज ठेविली, आणि आपण त्यास

इ० स० १३९८ ता०२५ अक्टोबर.

(१) दीनकोट हें शहर कोठें होतें हें बराबर माहित नाहीं; परंतु तें खाऱ्या पर्वताचा दक्षिणेस असावें.

मिळण्याकरितां निघाला, तो घारा अथवा **सतलज** या नदीवर त्यास जाऊन मिळाला.

तेथून थोडे लोक बरोबर घेऊन तैमूरलंग हा **अजुदिन** शहरास गेला; तेथील लोकांनीं त्यास कांहीं अडथळा केला नाहीं. त्या शहरांत एका मुसलमान पीराची प्रख्यात कबर होती, त्यामुळें "त्याचा नावाचा सन्मानार्थ जे थोडेबहुत लोक गांवांत शिलक राहिले होते, त्यांस याणें जीवदान दिलें." तेथून हा भटणेर एथें गेला, आणि त्या शहराचा तटाखालीं जे सर्व खेड्यांपाड्यांचे लोक आश्रयाकरितां येऊन राहिले होते, त्यांची कतल करिता झाला. पुढें तेथील लोक तह करून तैमूरलंग यास शरण आले; परंतु कांहीं चुकीनें तैमूरलंगानें तें शहर जाळून टाकून सर्व लोकांचा शिरच्छेद केला. तैमूरलंगाचा तहांमध्यें अशा पुष्कळ चुक्या होत असत. भटणेराहून तो **सामान**शहरास येऊन आपल्या मुख्य फौजेस मिळाला. मार्गांत येत असतां याचा वाटेनें जितके गांव लागले, तेथील लोकांस याणें मारून टाकिलें. जेव्हां हा **सामान**शहरापुढें गेला, तेव्हां पुढील सर्व शहरें याचा धास्तीनें ओस पडलीं. यामुळें पुढें अशीं सगळीं शहरांचीं शहरें कतल करून ओस पाडावयास यास सांपडलीं नाहींत. तथापि याणें वाटेनें पुष्कळ लोक पकडून कैद केले, आणि दिल्लीस गेल्यावर १५ वर्षांचा वरील सर्व लोकांस ठार मारिलें. त्या वेळीं एक लक्ष लोक मेले गेले असें मुसलमान इतिहासकार वर्णन करितात; परंतु ही त्यांची अतिशयोक्ति असेल.

ता० ९. नोवेंबर

ता० १२ डिसेंबर.

बादशाहाची फौज थोडी असून, तींत फळ्या पडून

गेल्या होत्या; त्यामुळें तैमूरलंगानें तिचा पराजय करून टाकिल्यावर ते लोक शहरांत पळून आले, आणि महमूद बादशाहा तर स्वतः गुजराथेंत निघून गेला. पुढें दिल्ली एथील लोकांस अभयवचन दिल्यावरून ते शरण आले, आणि तैमूरलंग हा प्रसिद्धपणें हिंदुस्थानाचा बादशाहा होऊन, त्याचा नावानें द्वाही फिरली.

बादशाहाचा फौजेचा पराजय.

ता० १७ डिसेंबर.

दिल्ली तैमूरलंगाचा ताब्यांत आल्यानंतर, त्याचे लोक लूट करूं लागले, व लोकांवर जुलूमहि करूं लागले; तेव्हां लोक त्यांस आडवे येऊं लागले. "तेणेंकरून पुढें तैमूरलंगाचा फौजेनें एकसारिखी लोकांची कतल चालविली. त्यामुळें कितीएक रस्त्यांत प्रेतांचा राशी पडून जावयास मार्ग नाहींसा झाला; पुढें दरवाजे फोडून सगळी मोगली फौज शहरांत शिरली; त्यानंतर पुढें जो आकांत झाला, तो वर्णन करण्यास लेखणी चालत नाहीं; तो वाचणारांचा सहज लक्षांत येईल." याप्रमाणें नाश झाला, हा तैमूरलंगानें अभयवचन दिलें असून झाला; तेव्हां हा बुद्धिपुरःसर चालीप्रमाणें याणें विश्वासघातानें केला, अथवा याचे लश्करी लोक स्वभावतःच निर्दय असून, त्यांजवर याचा अम्मलहि नीट चालत नसे, त्यामुळें झाला, हें बरोबर समजत नाहीं. अशा कतली तर, तैमूरलंगानें वचन दिल्यावरहि, नेहमीं होत असत; परंतु या कतलीचा आरंभ, फौजेचा दुष्ट व बेकैदी स्वभावामुळें झाला, असें त्या वेळचे जे विशेष भरवसा ठेवण्याजोगे ग्रंथकर्ते, ते सांगतात. पांच दिवसपर्यंत शहरांत लूट चालली होती, व आग लागली

दिल्लीशहर लुटून, जाळून, तेथील लोकांची कतल केली.

होती; हें तैमूरलंग स्वस्थपणें पाहत होता, व आपला जय झाला ह्मणून उत्साह करित होता. शेवटीं जेव्हां लोकांचे प्राण घेतां घेतां याचें लश्कर थकलें, आणि लुटावयास शहरांत कांहीं राहिलें नाहीं, तेव्हां त्याणें परत जाण्यास निघण्याचा हुकूम दिला, आणि जावयाचा दिवशीं यमुनातीरीं फिरूजशाह याणें बांधिलेल्या संगमरमरी दगडाचा मशीदींत मनःपुरःसर व नम्रतेनें प्रार्थना करून, ईश्वराचे आभार मानिले.

इ० स० १३९८ता० ३१ डिसेंबर.

तैमूरलंग याणें अतिशय लूट नेली, आणि शिवाय लहानथोर प्रतीचा सर्व लोकांपैकीं असंख्य पुरुष व बायका यांस दास दासी करून नेलें, असें वर्णन आहे. त्यांतून तैमूरलंग याणें समर्कंद एथें मशीद बांधण्याकरितां पाथरवट व एरव्हींचा व संगमरमरी दगडावर नकूशी काम करणारे असे जे लोक होते, ते आपल्या हिम्मतीस लावून घेतले.

तैमूरलंग हिंदुस्थानांतून परत गेला.

तैमूरलंग हा दिल्लीहून मीरत एथें गेला. तेथें लोकांची मोठी कतल झाली. तेथून पुढें तो गंगानदी उतरून, तिचा कांठानें जेथें हरिद्वाराजवळ हिमालयांतून ती बाहेर पडत्ये, तेथें गेला. पहाडांचा सरहद्दीवरून जात असतां, पुष्कळ हिंदुलोकांचा फौजांशीं त्याचे प्रसंग झाले; त्या वेळीं तो इतर शिपाई लोकांप्रमाणें स्वतः पुढें होऊन लढत असे, आणि श्रम सोशित असे. त्या वेळीं त्याचें वय ६३ वर्षांचें असून तो असें करी, हें विशेष आश्चर्यकारक आहे. पुढें तो पहाडांचा पायथ्यानें लाहोरचा उत्तरेकडे जमू ह्मणून प्रांत आहे तेथें गेला; तेथून दक्षिणेस फिरला, आणि प्रथम जा रस्त्यानें हिंदुस्थानांत आला

इ० स० १३९९, मार्च. हि० स० ८०१.

होता, त्या वाटेस मिळून हिंदुस्थानांतून परत जातां झाला. तैमूरलंग याणें अंदाधुंदी, दुष्काळ, आणि पटकी, यांस आपल्या मागें ठेविलें.

याचा स्वभाव.

जा ग्रंथकारांनीं तैमूरलंग याची स्तुति केली आहे, त्यांणीं याचा कृतींस जे हेतु लाविले आहेत, त्यांवरून तैमूरलंग याचा स्वभावाचें अनुमान करितां कामास नये; अथवा त्याचा मतें उत्तम राज्य कसें असावें, असे जे त्याचे स्वतांचे विचार, त्याप्रमाणें त्याचा सांगीवरून जीं नीतिवचनें लिहिलेलीं आहेत, त्यांवरूनहि हा अमुक रीतीचा मनुष्य होता असें अनुमान करितां कामास नये; तर याणें जें आचरण केलें त्या आचरणावरून याचा स्वभावाचें धोरण बांधिलें पाहिजे. याणें स्वतांची हकीकत आपणच मुल्फुझाततैमूरी या ग्रंथांत लिहिली आहे; तिजवरून याचें वास्तविक स्वरूप दृष्टीस पडतें. तीं सरळ व चमत्कारिक पद्धतीनें लिहिलेली आहे. तिजमध्यें आपलीं कपटें, व बेइमानीपणा, हीं हा निःशंकपणें सरळभावानें कबूल करितो; आणि आपण केलेल्या कृतींमध्यें आपला भलेपणा व निर्दोषीपणा सार्वकाळ अतिशय होता, अशी आपलीच आपण स्तुति करितो. तशी स्तुति मोठा धीट गोडबोल्या असला, तरी त्याचानें करवणार नाहीं, यावरून हा ग्रंथ तैमूरलंगाचाच सांगीवरून दुसऱ्या कोणी लिहिला आहे, असें दिसतें. तसेंच जें पोकळ भारुड, व ढोंग, आणि वास्तविक धर्मभोळेपणा व निष्ठा, हीं जीं त्या ग्रंथांत प्रकट केलीं

(७) ता० १० मार्च इ० स० १३९९, हि० स० ८०१ चा सुमारास गेला. तो ब्याजझेट्नामक बादशाहावर मोठी स्वारी करावयास जात होता.

आहेत, तीं स्वतांचा शिवाय दुसऱ्याचा हातून झालेलीं नाहींत. या वरील गुणांशिवाय याचें धैर्य, चातुर्य, हजरजबाबीपणा, लोकांचा स्वभावांचें पुरें ज्ञान, आणि ते जिकडून फसतील तो मार्ग धरून त्यांस पाडाव करण्याविषयीं याचें धाडस, या सर्व गुणांहीं युक्त असा हा एक मोठा विलक्षण पुरुष पृथ्वीवर अवतरला होता. रानट देशांतील सरदार लोक येऊन जे देश जिकितात, त्यांत जा राजांस ते ग्रासावयास येतात, त्यांचीं बोलणीं धरून सोडून कपटभावाचीं असतात, तशीं त्या जंगली सरदारांचीं नसून समूर शूरपणाचीं असतात. त्यावरून आपण ते जंगली लोक अनाडी व बेहिकमती योद्धे आहेत असें समजतों; परंतु तैमूरलंग हा तसा नव्हता. हा लबाड राजकारस्तानी होता; आणि जे दुसरे तातार सरदार झाले, तेहि यासारखे हुशार असल्यामुळें, लढाईचा कामांत त्यांची बरोबरी करण्याजोगे असे दुसरे पुष्कळ सरदार असून, त्यांहून हे वरचढ होत असत.

जेंगीझ खान व तैमूरलंग हे दोन्ही मनुष्यजातीचे शत्रु होत. त्यांचा इतिहासांमध्यें कांहींसें साधर्म्य दिसतें, परंतु जेंगीझ खान हा अतिशय व्रात्य होता, आणि तैमूरलंग हा अतिशय विश्वासघातकी होता.

तैमूरलंग दिल्लीहून गेल्यानंतर सुमारें दोन महिनेपर्यंत दिल्ली एथें कोणीहि राजा नव्हता, आणि बहुधा वस्तीहि नव्हती. नंतर दिल्ली ताब्यांत घेण्याविषयीं पुष्कळ तंटे चालले; त्यांत पूर्वीं महमूदाजवळ एक एक्बाल्नामक सरदार मोठ्या अधिकारावर होता, त्याचा जय झाला. त्याणें दिल्लीजवळचा परगण्यापलीकडे आपला अम्मल

दिल्ली एथें बेबंद राज्य.

इ० स० १४००, हि० स० ८०२.

चालविण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केले; परंतु ते व्यर्थ जाऊन, पुढें त्याणें मुलूतानाकडे लांबीचा पल्ल्यावर स्वारी केली होती, तींत तो मरण पावला.

त्यापूर्वीं महमूद हा गुजराथेंतून परत येऊन, निर्वेश घेऊन राहणाऱ्या ह्मणजे पेन्शनर चाकर लोकांप्रमाणें कांहीं दिवस दिल्लीस राहिला होता. नंतर जवानपुरचा राजाचा ताब्यांतील कनोज शहरामध्यें जाऊन राहिला. तें शहर घेण्यास एकूबालू याणें पुष्कळ प्रयत्न केले. पुढें तो सरदार मरण पावल्यावर, दिल्ली एथें बादशाहाची पुनः
इ०स० १४०५ स्थापना झाली. याप्रमाणें नावास वीस वर्षें
हि०स० ८०८. राज्य करून महमूद तघलख मरण पावला. त्या-
इ०स० १४१२ हि०स० ८१४. मागून दौलत खान लोदी हा गादीवर बसला.
इ०स० १४१४ त्यास पंजाबचा सुभेदार खिजर खान याणें
हि०स० ८१७. पंधरा महिन्यांनंतर हाकून लाविलें.

---

## सय्यद वंशाचें वर्तमान.

सय्यद खिजर खान. इ०स०१४१४ हि०स०८१७.

यानंतर छत्तीस वर्षेपर्यंत हिंदुस्थानामध्यें वास्तविक अथवा नामधारी तरी राज्य झालें नव्हतें. आपण तैमूरलंगास बादशाहा मानितों, असें खिजर खान हा दाखवित असे, आणि बादशाहपणाचा किताब अथवा चिन्हें यांचा उपयोग न करितां हा त्याचा नावानें कारभार चालवित असे. याची जन्मभूमि हिंदुस्थान; परंतु हा पैगंबराचा वंशांतला सय्यद होता. याचा मागून याचा गादीवर तीन पुरुष झाले. या वंशास सय्यद असें ह्मणतात. खिजर खानास

सय्यद मुबारिक. इ०स०१४२१ हि०स०८२४.

सय्यद महम्मद इ०स०१४३५ हि०स०८३९.

दिल्लीबरावर दुसरा कांहीं मुलुक मिळाला नाहीं, आणि थोडक्याच दिवसांत याचा मूळमांत पंजाब एथेंहि बंड झालें. खिजर खान याचा मागून सय्यद मुबारिक्, सय्यद महम्मद, व सय्यद अल्लाउद्दीन हे तिघे पुरुष झाले. त्या तिघांचाहि कारकीर्दींत त्यांस थोडासा तरी पंजाबमांत राखून ठेवण्यास प्रयास पडले. तथापि त्यांणीं आपलें राज्य वाढविण्याकरितां कांहीं शूरत्व करून माळव्यांत व राजस्थानाचा सरहद्दीवर हल्ले केले; परंतु या वंशाचा शेवटला पुरुष सय्यद अल्लाउद्दीन याचा कारकीर्दींत यांचा मुलुकाची सरहद्द एका ठिकाणीं दिल्लीचा तटाबाहेर अर्ध्या कोशाचा आंत होती, आणि सहा कोशांपलीकडे कोठेंच नव्हती; परंतु दिल्लीचा उत्तरेस सुमारें पन्नास कोशांवर बदाघूननामक शहर अल्लाउद्दीनाचा ताब्यांत होतें, तेथें त्याणें शेवटीं जाऊन आपली पूर्वींची राजधानी व महत्व हीं बहिलोल खान लोदी याचा स्वाधीन केलीं; त्याणें पुढें बादशाहा हा किताब धारण केला.

सय्यद अल्लाउद्दीन. इ०स०१४४४ हि०स०८४९.

इ० स० १४५० हि० स० ८५४.

---

# लोदी वंशाचें वर्तमान.

## बहिलोल खान लोदी.

बहिलोल याचे पूर्वज व्यापारावर सांवरलेले होते. पुढें फिरूज तघलख् हा बादशाहा अफगाणांचा पहिला मोठा आश्रय देणारा झाला. त्याचा कारकीर्दींत बहिलोल याचा आजा मुलूतानचा

लोदी वंशाचा प्रारंभ.

सुभेदार होता. सय्यद वंशाचा कारकीर्दींत बहिलोल याचा बाप व याचे पुष्कळ चुलते लश्करांत सरदार होते; त्यांतून इसलाम खान नामें मोठा प्रबल होता; त्याचा तैनातीस १२००० अफगाण असत. पुढें या कुटुंबाची सत्ता वाढली, असें पाहून आणि एका द्वेषी भाऊबंदानें चहाड्या केल्या; त्यावरून सय्यद महम्मद याचा मनांत वैरभाव उत्पन्न झाला, आणि त्याणें लोदी लोकांचा छल करून त्यांस पहाडांत पळविलें; तथापि ते सय्यद लोकांचा सत्तेस आड येत असत. शेवटीं बहिलोल याणें प्रथम सरहिंद घेतली व नंतर सर्व पंजाब हाताखालीं घातला.

पुढें बहिलोल यास सय्यद अल्लाउद्दीन याचा वजीर हमीद याणें दिल्लीस बलाविलें; परंतु त्या बलाढ्य वजीरापुढें आपलें कांहीं तेज पडत नाहीं असें पाहून, याणें युक्तीनें त्या वजीरास कैद केलें, आणि त्याचें सर्व वजन मोडून टाकून त्यास आपल्या घरीं जाऊन संसार करावयास परवानगी दिली.

पंजाबप्रांत पुनः दिल्लीचा ताब्यांत आला.

बहिलोल गादीवर बसल्यामुळें पंजाबप्रांत पुनः दिल्लीचा ताब्यांत आला. सय्यद वंशाचा वेळीं मुलतान स्वतंत्र झालें होतें. त्यावर बहिलोल याणें स्वारी केली; इतक्यांत जवानपुरचा बादशाहानें येऊन दिल्लीस वेढा दिला, हें वर्तमान यास लागतांच हा परत दिल्लीस आला; नंतर याची त्याची लढाई सुरू झाली, तीमध्यें केव्हां केव्हां पोकळ तह थोडा वेळपर्यंत झाले.

इ० स० १४५२ हि० स० ८५६.

याप्रमाणें सव्वीस वर्षेंपर्यंत लढाई चालून तींत बहिलोल याचा जय झाला, आणि त्याणें जवानपुर

प्रांत घेऊन दिल्लीस मिळविला. तो प्रांत पुढें दिल्लीचा बादशाहांचा ताब्यांत कायम राहिला. ही फार दिवसांची लढाई झाल्यानंतर, पुढें बादशाहानें दहा वर्षें राज्य केलें, आणि दुसरे लहान सहान देश घेतले. पुढें बहिलोल मरण पावला. याचा मरणकाळीं उत्तरेस यमुनेपासून हिमालयापर्यंत, व पूर्वेस काशीपर्यंत, व शिवाय यमुनेचा पश्चिमेस बुंदेलखंडापर्यंत प्रांत, इतका देश याचा ताब्यांत होता.

जवानपुर परत घेतलें इ० स० १४७८ हि० स० ८८३.

इ० स० १४८८, हि० स० ८९४.

---

## सिकंदर खान लोदी.

या बादशाहाचा मागून याचा मुलगा सिकंदर हा गादीवर बसला. सिकंदर याचा लहान पुतण्याचा वतीनें कांहीं सरदार याजबराबर भांडले; नंतर याचा दोघां भावांनीं याजबराबर लढाई केली; त्यांतून एकानें तर हट्टानें कलह चालविला. या सर्व प्रसंगांत सिकंदरास जय मिळाला. तथापि याणें आपल्या भावांचंदांवर पूर्ववत् प्रमाणें प्रीति ठेवून, इतर हलक्या बंडवाल्यांस क्षमा केली, याणें बंगालचा सरहद्दीपर्यंत बहारप्रांत परत घेतला, आणि बुंदेलखंडाचा बाजूनें आपलें राज्य वाढविलें. हा आपल्या कारभारांत न्यायी व दक्ष असे, आणि धर्माची बाबद खेरीज करून, इतर गोष्टींमध्यें हा शांत व उत्तम बादशाहा होता; परंतु हिंदुस्थानामध्यें जे कांहीं मोठे कडवे धर्माभिमानी होऊन गेले त्यांतील हा एक होय. याणें हिंदूंपासून जीं शहरें व किल्ले घेतले, त्यांतील देवालयें मोडून

राज्यकारभारांत याची दक्षता, व न्यायीपणा.

याचा धर्मसंबंधीं दुराग्रह.

टाकिलीं; आपल्या राज्यामध्यें त्या लोकांचा यात्रा मना केल्या; आणि कांहीं पर्वणीचा दिवशीं हिंदुलोक पवित्र नद्यांमध्यें स्नानें वगैरे जें कर्म करितात, तें बंद केलें. "सर्व धर्म मनापासून आचरिले असतां, ईश्वरास एक सारिखेच मान्य आहेत" असें मत एक ब्राह्मण तत्परतेनें उपदेशित असतो, असें याणें एका समयीं ऐकिलें; त्यावरून आपल्या समक्ष बारा काजींबराबर आपल्या मताचा वाद करून स्थापण्याकरितां या बादशाहानें त्यास बलाविलें. पुढें वाद झाला त्या वेळीं तो ब्राह्मण आपलें निराग्रही मत सोडीना असें पाहून बादशाहानें त्याचा शिरच्छेद केला. हें याणें मोठें निर्दय व अन्यायाचें कृत्य केलें.(८)

एका वेळीं बादशाहा याणें हिंदुलोकांचा यात्रा बंद केल्या, ह्मणून एका धार्मिक मुसलमानानें याचा निषेध केला. तेव्हां सिकंदर हा त्यास ह्मणाला "रे मर्कटा! तूं मूर्तिपूजा प्रतिपादितोस?" असें ह्मणून याणें त्यावर तलवार उपसली; त्या वेळीं त्या साधूनें यास उत्तर दिलें कीं, "नाहीं, परंतु बादशाहांनीं आपल्या रयतेचा छल करूं नये, असें प्रतिपादितों." तें ऐकून बादशाहा शांत झाला.

एका वेळीं बादशाहा आपल्या एका भावावर स्वारी करून जात होता, तेव्हां तुझा जय होऊ अशी प्रार्थना करून एका दर्वेशानें यास आशीर्वाद दिला. तेव्हां सिकंदर ह्मणाला "जो आपल्या रयतेचें उत्तम प्रकारें कल्याण करितो, त्यास जय मिळो, अशी प्रार्थना कर"

---

(८) हा ब्राह्मण बहुधा कबीरपंथी असावा. कबीर हा एक हिंदु तत्ववेत्ता होता; तो या शतकाचा आरंभीं अशाच मताचा उपदेश करित असे.

सिकंदर हा कवि होता, आणि विद्वानांचा मोठा आश्रयदाता होता. हा अठ्ठावीस वर्षे राज्य करून आग्रा एथें मृत्यु पावला.

---

# इब्राहिम लोदी.

सिकंदर याचा मागून त्याचा मुलगा इब्राहिम गादीवर बसला. याचा अंगीं याचा बापाचे कांहींच सद्गुण नव्हते. हा फार गर्विष्ठ असे; त्यामुळें याचा जातीचे लोक यास त्रासले, आणि याचा संशयी व जुलमी स्वभावामुळें याचा सरदारांस भीति पडली. त्यामुळें याचा राज्यांत वारंवार दंगे होऊन कधींहि स्वस्थता झाली नाहीं. याचा राज्याचा आरंभींच याचा एका भावास जवानपुर एथें लोकांनीं बादशाहा केलें. त्याचा याणें एका वर्षांत पराजय करून, त्यास गुप्त रीतीनें मारून टाकिलें. शिवाय आपल्या दुसऱ्या भावांस इब्राहिम याणें जन्मभर बंदीस ठेविलें. त्यानंतर इसलाम खान नावाचा सरदारानें बंड केलें; त्याला युद्धांत मारून टाकिलें. या वरील कामांमध्यें कांहीं मानकरी लोक, व प्रांतांचे सुभेदार यांचें अंग आहे, असें समजून याणें त्यांचे प्राण घेतले; कितीएकांस संशयावरून मारिलें; कितीएकांस कैद करून बंदीखान्यांत टाकिलें असतां तेथें गुप्तपणें मारून टाकिलें; एका सुभेदारास त्याचा सुभ्याचा ठिकाणीं मारेकरी घालून मारिलें; या कृत्यांमुळें जिकडे तिकडे अविश्वास, व त्रास, यांचा फैलावा झाला. पुष्कळ सरदारांनीं बंडें केलीं; इब्राहिम याचा सर्व पूर्वकालीन

राज्यांत अव्यवस्था व बंडें.

प्रांतांत बंडें होऊन, **दर्या खान लोहाणी** याणें तेथें स्वतंत्र राज्य स्थापिलें; पुढें त्याचा मुलानें राजा ही पदवी धारण केली. त्या वेळीं पंजाबच्चा सुभेदार **दौलत खान लोदी** म्हणून होता. त्याणेंहि इतर सरदारांप्रमाणें आपली गति होईल, या भीतीनें बंड केलें, आणि **काबूल** एथें **बाबर** हा राज्य करित होता, त्याची मदत मागितली. बाबर याचें काबूल एथें कांहीं वर्षें राज्य चाललें होतें; आणि तैमूरलंग याचा संबंधानें आपला वारसा सांगून, पूर्वीं त्याणें पंजाबावर स्वारी केली होती. हल्लीं हें बोलावणें आल्यावरून तो आनंदानें आला; परंतु दुसऱ्या कांहीं **अफगाण** सरदारांची इब्राहिम याजवर भक्ति असल्यामुळें अथवा परदेशी राजांचा त्यांस त्रास असल्यामुळें, त्यांणीं **दौलत खान** यास पंजाबांतून हाकून लाविलें; आणि बाबर यासहि ते आडवे आले. त्यांचा बाबरानें लाहोराजवळ अगदीं मोड करून, पुढें लाहोर शहराची राख केली. लाहोराहून बाबर हा दिबलपुर एथें गेला; तेथें **दौलत खान** हा येऊन त्यास मिळाला. बाबर याणें दिबलपुर हें शहर गर्दी करून घेतलें, आणि सर्व किल्लेकरी लोक ठार मारिले. पुढें दौलत खान याचा मसलतीचा बाबर यास कांहीं कारणावरून अंदेशा आला; त्यावरून त्यास व त्याचा मुलांस याणें कैदेंत टाकिलें पुढें यास दया येऊन याणें त्यांस सोडून देऊन, त्यांची मानप्रतिष्ठा चांगली ठेविली, आणि त्यांस जहागीर करून दिली. तथापि याचाविषयीं त्यांचा मनांत जो बेभरवसा उत्पन्न झाला होता, तो याचानें दूर करवला नाहीं. पुढें हा दिल्लीस जाण्याकरितां **सरहिंद**पर्यंत जाऊन पोंचला;

बाबराची स्वारी.

इ० स० १५२४ हि० स० ९३०.

इतक्यांत दौलत खान व त्याचा एक मुलगा हे बंड करून पहाडांत पळून गेले.[१] असे शत्रु आपल्या मागें ठेवून पुढें जाणें हें बरोबर नाहीं असें यास वाटून, याणें परत काबूलास जाण्याचा निश्चय केला. हा परत गेला; तथापि याणें जो देश घेतला होता, तो आपल्या हातांत ठेवण्याकरितां मुख्य मुख्य ठिकाणीं याणें आपल्या भरवशाचे कामगार ठेविले होते. अल्लाउद्दीननामक इब्राहिम बादशाहाचा चुलता हा, कैदेंत सांपडला नसून, बाबर यास मिळाला होता; त्यास बाबर याणें दिबलपुर एथें सुभ्याचा कामावर ठेविलें. पुढें दौलत खान हा पहाडांतून परत आला, आणि बहुतेक पंजाबमांत घेता झाला; तेव्हां अल्लाउद्दीन हा काबूल एथें पळाला; शेवटीं बाबर याचा एका सरदारानें दौलत खान याचा अगदीं मोड करून टाकिला. इकडे उझबेगलोकांनीं बल्क शहरावर हल्ला केला होता, त्यांजबरोबर बाबर लढाई करित होता. म्हणून याणें अल्लाउद्दीनास हिंदुस्थानांत पाठविलें, आणि त्यास मदत करण्याविषयीं आपल्या दुसऱ्या सरदारांस आज्ञा केली. याप्रमाणें आश्रय मिळाल्यावर, अल्लाउद्दीन याणें दिल्लीवर चढाई केली, आणि हिंदुस्थानांतील लोक पुष्कळ त्रासले होते, यामुळें मार्गांत जातांना पुष्कळ लोक येऊन यास मिळाले; तेणेंकरून याजवळ लवकरच चाळीस हजार लश्कर जमलें.

बाबरहासरहिंदेहून परत गेला.

---

१ दौलत खान याचा दुसरा मुलगा दिलावर हा बाबर याजवळच राहिला; त्यावर बाबर याचा फार भरवसा असे. दिल्लीचा दरबारांत खानखानाननामक जी दुसरी पदवी ती यास होती; आणि बाबर व हुमायून यांचा कारकीर्दींत ती चालत होती.

इतक्या लोकांनिशीं अल्लाउद्दीनानें इब्राहिमाबरावर दिल्लीजवळ युत्ध केलें; त्यांत त्याचा अगदीं मोड झाला. इतक्यांत बाबर याणें बल्क एथील बंदोबस्त करून हिंदुस्थानावर स्वारी केली. तो लाहोरापर्यंत आला, आणि लाहोराहून दौलत खान याचा पाठलाग करित पहाडांत गेला. शेवटीं दौलत खान याणें शरण येऊन आपला किल्ला बाबर याचा स्वाधीन केला. त्यानंतर पहाडांतूनच सतलजनदीचा किनाऱ्यावर लुधिआनाचा वरचा बाजूस रोपुरनामक शहर आहे, तेथें बाबर आला, आणि तेथून बहुधा समोरचा रस्त्यानें दिल्लीस गेला. वाटेंत जातांना इब्राहिम बादशाहा हा फौज घेऊन पाणिपताजवळ आलेला त्याणें पाहिला. त्याजवळ एक लाख लोक, व एक हजार हत्ती एवढें लश्कर आहे, असें बाबर यास वर्तमान लागलें. बाबर याची बाजारबुणग्यासुत्धां सगळी बारा हजार फौज होती. जेव्हां इब्राहिमाचें लश्कर येत आहे असें याणें पाहिलें, तेव्हां याणें एका ठिकाणीं ठाणें धरिलें, व तेथें हा उभा राहिला. याणें आपल्या तोफांस कातड्याचा दोऱ्या लावून एकमेकांशीं खिळवून टाकिल्या; नंतर त्यांमागें पायदळांची रांग उभी केली, आणि त्यासहि आधाराकरितां बुरूज केले; तसेंच आपल्या लश्कराचा मजबुदीकरितां दोहीं बाजूंस मातीचे व लांकडाचे असे बुरूज केले. जेव्हां इब्राहिम जवळ

बाबर परत आला. माहे डिसेंबर.

(१०) त्याचा मुलगा गाजी खान हा पळाला. त्याचा किताबखाना बाबरास सांपडला; त्यांत पुष्कळ उत्तम ग्रंथ याचा हातीं लागले. कोणास वाटेल, कीं त्या वेळचा अफगाण सरदाराजवळ एक कुराण असलें ह्मणजे त्याचा पुस्तकसंग्रहाची सीमा झाली; परंतु हें असें नव्हतें.

आला, तेव्हां त्याणेंहि आपल्या फौजेचा उभें राहण्याचा ठिकाणाचा बंदोबस्त केला; परंतु शत्रु येऊन आपणावर हल्ला करी, तोंपर्यंत तसेंच उभें राहण्याचा त्यास धीर आला नाहीं, आणि त्याणें थोडक्या दिवसांनीं बाबराचा छावणीवर हल्ला केला. इब्राहिम हा आपल्या तोंडचा लश्कराबराबर युद्ध करण्यांत गुंतला आहे असें पाहून, बाबर याणें आपल्या डाव्या व उजव्या बाजूंचा लोकांस इब्राहिम याचा लश्कराचा दोहीं बाजूंवर व पिछाडीवर हल्ला करण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें याचे लोक पुढें सरसावले, आणि शत्रूंवर बाणांची वृष्टि करिते झाले. त्यांस हटविण्याकरितां इब्राहिम याचा लोकांनीं कांहीं वेळ हल्ले केले; परंतु पुढें ते अस्ताव्यस्त झाले; इकडे बाबर हा त्यांस तोफांनीं जर्जर करित होता; त्याणें वरील स्थिति पाहतांच आपल्या मध्यभागचा फौजेस पुढें सरसावण्याचा हुकूम दिला, आणि शत्रूचा पुरा मोड करून टाकिला. या लढाईत बाबर याचा फौजेनें शत्रूंस बहुधा गराडा घातला होता, त्यामुळें त्यांचे पुष्कळ लोक मेले गेले; आणि इब्राहिम हाहि मरण पावला. त्या रणभूमीवर शत्रूंचे पंधरा किंवा सोळा हजार लोक पडले, त्यांतून इब्राहिमाचा सभोंवती एका ठिकाणींच पांच किंवा सहा हजार याचा पाहण्यांत आले. त्या लढाईत व नंतरचा पाठलागांत निदान चाळीस हजार लोक पडले, असें हिंदुस्थानी लोक सांगतात.

इब्राहिम पराजित होऊन मेला.

इ० स० १५२६. एप्रिल तारीख २१.

या लढाईतील कोणत्याहि पक्षाचे लोक युद्धाचा कामांत फार हुशार होते, असें या युद्धावरून दिसून येत नाहीं; कारण ही लढाई सूर्योदयापासून दोन प्रहरपर्यंत चालली

होती, तितक्यांत आपल्या तोफा पुष्कळ वेळा सुटल्या, आणि, त्यांणीं चांगलें काम केलें, असें बाबर मोठ्या संतोषानें वर्णन करितो. त्या वेळीं युरोपखंडांतहि तोफांची लढाई याहून चांगली झाली असती, असें ह्मणवत नाहीं; तथापि बाबर याणें शत्रूचा दोहीं बाजूंवर व पिछाडीवर बाण लागू करून त्याचा मोड केला, यामुळें परिणाम शुद्ध झाल्यावरून याचें हें करणें नीट दिसो; परंतु तोहि हल्ला याणें मोठ्या चतुराईनें अथवा मोठ्या हिम्मतीनें केला असें दिसत नाहीं, आणि जर याचा शत्रु चपळ असता, तर त्या कामांत याचे हात भाजले असते.

दिल्ली व आग्रा हीं शहरें हस्तगत झालीं ता० १० मे.

या लढाईनंतर बाबर यास दिल्ली मिळाली. नंतर याणें आग्रा एथें जाऊन, तें शहर घेतलें; तेथें नुकतीच राजधानी गेली होती.

इब्राहिम याचा मानकऱ्यांची फिरिस्ता याणें याद दिली आहे; तिजवरून त्याचे सगळे मानकरी लोदी, अथवा लोहाणी या जातीचे अफगाण होते; अथवा फरमुली जातीचे होते. फरमुली हे लोक खिलजींसारिखेच अफगाणलोकांत मिसळलेले होते, अथवा ते बहुधा अफगाणलोकांतलेच मूळचे असावे, असें वाटतें.

इब्राहिम याणें ग्वालेरचा राजास पुनः जिंकून आपला अंकित केला होता; तो वरील लढाईत इब्राहिमाबरोबर येऊन मेला गेला.

बाबर याणें आपला इतिहास स्वतः लिहिला आहे, त्यांत आपण हें राज्य जिंकिलें हें मोठ्या संतोषानें वर्णन केलें आहे, आणि सुलतान महमूद (गजनवी) व शाहाबुद्दीन (घोरी) यांचा पराक्रमाशीं आपल्यांची तुलना केली आहे.

आतां इब्राहिम याचे थोडेसे अस्ताव्यस्त झालेले प्रांत बाबर याणें घेतले, यावरून याणें सर्व हिंदुस्थान घेतलें असें जरी ह्मणावयाचें नाहीं, तथापि याणें जो वरील पराक्रम केला, तो मोठा केला, आणि त्यापासून पुढें परिणामहि मोठेच झाले, ही गोष्ट निर्विवाद आहे. इकडे याचा मूळचा राज्यावर उझबेगलोक हे अद्यापि हल्ले करितच होते; त्यांचा समोर तैमूरलंगाचा सर्व वंशजांचा फौजेचानें टिकाव धरवला नाहीं; असें असून याणें मोठ्या अडचणीनें लहानशी फौज जमविली, ती जो मुलुक याणें घेतला त्याचा बंदोबस्तापुरतीहि नव्हती.

बाबर यास स्वभावतः तैमूरलंगाचा कित्ता होता; त्यामुळें जेथें जेथें लोक यास आड येत, तेथें तेथें तो तैमूरलंगासारखेंच त्यांचें वाटोळें करित असे. याची फौज लहान होती, यामुळें लोकांस दहशतीकरितां हा असें करित असे, असें कोणी ह्मणोत; परंतु त्याचा मुलुकांतील लोकांची चालच अशी होती, ही सबब त्याला सर्वांहून चांगली सांगण्यास आहे. याचा स्वभाव जात्या अतिशय दयालु होता; आणि वरील गोष्टींवरून, व याणें निर्दयपणानें दोन तीन लोकांचे शिरच्छेद केले, असें आपल्या चरित्रांत स्वतांच लिहिलें आहे, त्यावरून जरी आपलें मन विटतें, तरी तेवढ्यावरून याचा स्वभाव निर्दय होता असें कांहीं सिद्ध होत नाहीं.

बाबर याणें नव्या गादीची स्थापना केली. याचा वंशजांचा कारकीर्दींत हिंदुस्थानाचा भरभराटीचा कळस झाला, आणि जीं राज्यें अद्यापि चालत आहेत, तीं सर्व या राज्याचा मोड झाल्यानंतर, त्यांतून उत्पन्न झालीं आहेत.

# तैमूरलंग याचा (ह्मणजे मोगल) वंशाचें वर्तमान.



## भाग चौथा.

बाबर हा हिंदुस्थानांत राज्य करूं लागल्यापासून अकबर बादशाहा सिंहासनारूढ होईपर्यंत हकीकत.

## प्रकरण पहिलें.

### बाबर याची कारकीर्द.

बाबर याची मूळपीठिका व याचें बाळपणचें चरित्र

बाबर यास लहानपणीं पुष्कळ आश्चर्यकारक प्रसंग घडून आले, आणि याणेंहि विलक्षण कृत्यें केलीं. हा तैमूरलंगापासून सहावा पुरुष. याचा आजा **अबुसैद** नावाचा होता. तो मरण पावल्यानंतर त्याचा मुलांनीं त्याचा मोठ्या राज्याचे हिसे पाडून वांटून घेतले होते. **अहमद मिर्झा** यास **समर्कंद** व **बुखारा** हे प्रांत मिळाले; **बाक्त्रिया** ऊर्फ **बल्क** प्रांत हा **महम्मद मिर्झा** याचा वांट्यास आला; आणि **उलूग बेग** नावाचा तिसऱ्या मुलास **काबूल** प्राप्त झाला. चौथा मुलगा **उमर शेख मिर्झा**, ह्मणजे **बाबर** याचा बाप, याजकडे प्रथम **काबूल** प्रांताचें काम होतें; परंतु त्याचा बाप

असतांच यक्षूनदीचा वरील अंगास फर्गाण ह्मणून प्रांत आहे, तेथें याची बदली झाली. हा प्रांत लहान आहे, परंतु सुपीक, आणि सुंदर आहे; आणि याविषयीं बाबर मोठ्या प्रीतीनें आपल्या चरित्रांत वर्णन करितो. बाबर याची आई ही जातीची मोगल होती. तिचा भाऊ महमूद खान हा जंघतै खान याचा वंशज असून, आपल्या वंशाचा राजकूटामध्यें मुख्य होता. असा मोगललोकांशीं संबंध असतांहि, बाबर याचा मनांत त्यांविषयीं प्रीतिभाव उत्पन्न झाला नाहीं; आणि आपल्या चरित्रांत जेथें जेथें मोगललोकांविषयीं याणें वर्णन केलें आहे, तेथें तेथें त्यांस तुच्छवत् मानून व त्यांचा तिरस्कार करून याणें लिहिलें आहे.

याचा लहानपणाचा लढाया व दुसरे प्रसंग.

बाबर याचा बाप इ० स० १४९४ त मेला; त्यापूर्वी नुकताच आपला भाऊ समर्कंदचा राजा अहमद मिर्झा, व मेहुणा महमूद खान मोगल, यांशीं तो लढाई चालवित होता. तो मेल्यावर बाबर गादीवर बसला, तेव्हां याचें वय सारें बारा वर्षांचें होतें; याप्रमाणें याची उमर लहान यामुळें याचा बापाचा शत्रूंनीं याचा द्वेष कमी करावा; परंतु तसें कांहीं त्यांणीं केलें नाहीं. त्या दोघांनीं बाबर याचा राजधानीवर हल्ला केला, परंतु तो अगदीं फसला. पुढें लवकरच अहमद मिर्झा मरण पावला. त्याचा मागून त्याचा भाऊ बल्क एथील राजा हा त्याचा गादीवर बसला. तोहि लवकरच मरण पावल्यावर त्याचा मुलगा बैसांघर मिर्झा हा त्याचा तक्तावर बसला. पुढें पुष्कळ अव्यवस्था चालली; अशी संधि पाहून बाबर हा समर्कंद प्रांत मिळविण्याचा प्रयत्न करण्यास उद्युक्त झाला. याणें दोनतीन वेळा स्वाऱ्या केल्या, त्या फसल्या; परंतु

शेवटीं इ० स० १४९७ त याचा शूरत्वाचें व निग्रहाचें फळ यास प्राप्त झालें. या वेळीं बाबर कांहीं वर्षें आपला राज्य-कारभार पाहूं लागला होता, तथापि याची उमर केवळ १५ वर्षांची होती. यामुळें, आणि याजवळ बळकटीहि कमी असल्यामुळें, हा वरील कृत्यांत बऱ्याच वेळा फसला, यांत आश्चर्य नाहीं; परंतु शेवटीं याणें आपलेंसें केलें, हें पाहिलें पाहिजे. समर्कंद ही पूर्वीं तैमूरलंग याची राजधानी होती; ती मिळाल्यामुळें सर्व मावरुल्‌नहर्‌प्रांत मिळविण्यास साधेल असें दिसत होतें; परंतु समर्कंद हेंच राखण्याजोगी बाबर यास शक्ति नव्हती. समर्कंद प्रांतामध्यें पुष्कळ दिवस बखेडे चालून, तो अगदीं निस्तेज झाला होता; त्यामुळें याचा फौजेचा पगार देण्यासहि तेथें यास कांहीं मिळेना. तेणेंकरून याचे पुष्कळ लोक चाकरी सोडून जाऊं लागले. तो फर्गाणप्रांतांत परत गेल्यावर, तेथें जें लश्कर राहिलें होतें, त्यांतहि त्यांणीं अशीच बेदिली उत्पन्न केली. शेवटीं त्या लोकांनीं बाबर याचा मुख्य सरदारांपैकीं अहमद तंबोल नावाचा सरदारास प्रमुख करून, बाबर याचा धाकटा भाऊ जहांगीर मिर्झा याचा नावानें उघड बंड केलें. असें आपल्या घरींच बंड झालें हें पाहून, त्याचा लवकर बंदोबस्त करण्याचा हेतूनें बाबर समर्कंदाहून निघाला. याणें समर्कंद एथें १०० दिवसपर्यंत अम्मल चालविला होता. हा निघून गेल्यानंतर, तेथील लोकांनीं लागलेंच याचें तंत्र सोडून दिलें. दरम्यान बाबर हा दुर्दैवेंकरून आजारी पडला, तेणेंकरून याचें काम मागसावलें. पुढें हा मोठ्या पंचाइतीनें दुखण्यांतून वांचला; परंतु समर्कंद सोडून गेला तों याचें वडिलार्जित राज्यहि याचा हातांतून गेलें. त्या

प्रसंगीं याणें आपला मोगल मामा याजवळ मदत मागितली, आणि कांहीं वेळ त्याचा थोड्याशा सहायानें, परंतु बहुधा पुष्कळ वेळा स्वतांचाच पराक्रमानें समर्कंद व फर्गाण या दोन्ही प्रांतांवर हल्ले केले. शेवटीं इ० स० १४९९ मध्यें याचें मूळचें फर्गाणप्रांताचें राज्य याचा हातांत आलें; परंतु बंडवाले लोकांचा पुरा बंदोबस्त झाला नाहीं. इतक्यांत समर्कंद एथील लोकांचा बोलावण्यावरून यास जाण्याचा लोभ सुटून हा निघाला; परंतु तेथें जाऊन पोंचण्यापूर्वी उझबेग[1]नामक लोकांनीं समर्कंद व बुखारा हीं दोनहि घेतलीं, असें वर्तमान यास लागलें. उझबेगलोक हे मावरुलूनहरूप्रांतांत आपला अम्मल बसवूं लागले होते; त्या देशाचें राज्य अद्यापि त्यांजकडे चालत आहे.

इकडे तंबोल याणें बाबर याचा मागें फर्गाणप्रांत पुनः बळकाविला; त्यामुळें बाबरास त्या प्रांताचा दक्षिणेकडील कठीण पहाडांमध्यें आश्रयाकरितां पळून जाणें भाग आलें. तेथें असतां उझबेगलोकांचा सरदार शैबानी खान हा समर्कंद सोडून स्वारीस गेला आहे अशी यास बातमी लागली; तेव्हां ही संधि पाहून त्या शहरावर छापा घालावा असा विलक्षण साहसबुद्धीनें निश्चय करून, फकत दोन शें चाळीस लोकांनिशीं हा निघाला; रात्रीचा प्रहरीं समर्कंदचा तटास शिड्या लावून चढला; व जे किल्लेकरी

(१) या लोकांमधील एका राजावरून यांचें नाव उझबेग असें पडलें आहे. तुर्की, मोगल, आणि बहुधा फेनिकू या लोकांची मिसळ होऊन त्यांचा एक जमाव झाला होता, ते हे उझबेग लोक. यांत तुर्की लोकांचा जमाव मोठा असे. हे पूर्वी येकूनदीवर वसाहत करून होते; आणि सिबीरीयाप्रांतामधील पुष्कळ प्रदेश यांचा स्वाधीन होता.

होते त्यांचा मोड करून, आपल्या धीटाईनें, व चलाखीनें आपली फौज मोठी आहे असें त्यांचा मनांत भरून देता झाला. इतक्यांत शहरचे लोक याचा वर्तीनें उठले, आणि जेथें जेथें उझबेगलोक सांपडले, तेथें तेथें त्यांस मारून टाकिते झाले. हें वर्तमान लागतांच शैबानी खान त्वरेनें परत आला, आणि पाहतो तों शहरांत जाण्यास मार्ग मिळेना, तेव्हां शेवटीं तो बुखारा एथें गेला.

यानंतर सर्व सोगदियाना प्रांत बाबरास मिळाला. याणें सहा महिनेपर्यंत तेथें स्वस्थपणें राज्य केलें; त्या वेळीं जी फुरसूद मिळाली, तितक्यांत उझबेगलोकांचा सत्तेपासून आपणा सर्वांस अपाय आहे, असें आजूबाजूचा रजवाड्यांस समजावून, त्यांमध्यें कट करण्याविषयीं हा यत्न करित होता; परंतु ते श्रम निर्फळ गेले; आणि वेळ आली, तेव्हां शैबानी खानाचा सगळ्या फौजेचा तोंडीं यास एकट्यासच कमर बांधून उभें राहवें लागलें. तथापिहि याणें आशा सोडिली नाहीं. पुढें लढाई चालू झाली, तेव्हां याचा सहायार्थ कित्येक मोगललोक आले होते, ते लढाईतून यास सोडून याचेंच बारबरदारीचें सामान लुटण्याकरितां निघून गेले; या त्यांचा नीच कर्मामुळें बाबर याचा साफ मोड झाला; आणि जे थोडे लोक इमान राखून याचा पक्षास राहिले होते, त्यांसुद्धां यास समर्कंद शहराचा तटाआंत जाऊन राहणें प्राप्त झालें. तरीहि याणें शेवटपर्यंत त्या शहराचें रक्षण करण्याचा निश्चय केला; आणि उझबेगलोकांनीं जे पुष्कळ हल्ले केले, ते सर्व परतविले. नंतर शैबानी खान याणें त्या शहरास वेढा देऊन, आंतील लोकांस बाहेर जाण्याचें आणि बाहेरचांस आंत येण्याचें बंद करून

टाकिलें. त्यामुळें चार महिन्यांत दुष्काळ पडून, त्याचा शत्रूंची सर्व प्रकारें अपेक्षा झाली; शहरांतील शेंकडों लोक मेले; लश्करचे लोक तटाचा भिंतींवरून उतरून पळून जाऊं लागले; बाबर याणेंहि सर्व लोकांप्रमाणेंच आपले हाल करून घेतले, तथापि शेवटीं यास तें शहर सोडून जाणें प्राप्त झालें.

यानंतर दोन वर्षेपर्यंत याणें मोठ्या दरिद्रांत, आणि विपत्तींत काळ काढिला. हा कांहीं दिवस पहाडांत राहत असे, परंतु पुष्कळ वेळा आपल्या मामाचा छावणींत राही. त्या वेळीं याची इतकी गरीबी आली होती, कीं याजवळ कांहीं खावयास नाहीं ह्मणून याचे चाकरहि यास सोडून गेले. याप्रमाणें याचा मागें एकामागून एक आपत्ति लागल्या, तेणेंकरून हा बहुधा निराश होऊन गेला, असें दिसतें; आणि अशा स्थितींत असतां चीनदेशामध्यें जाऊन एकीकडे कोनपडींत आपला काळ घालवावा, असा याणें एका समयीं निश्चय केला. इकडे फर्गाणप्रांतामध्यें बोट शिरकण्याचीं कधीं कधीं संधानें येत, त्यामुळें यास आशा राहिली होती. शेवटीं आपल्या मामाचा मदतीनें याणें तेथील राजधानी घेतली, तेव्हां याचा भाऊ जहांगीर हाहि येऊन यास मिळाला. तो पूर्वीं बाबर याचा केवळ नामधारी प्रतिस्पर्धी मात्र होता; परंतु तंबोल हा मुख्य शत्रु होता. यामुळें जहांगीर हा बाबरास जाऊन मिळतांच आपणावर बेतली असें पाहून, त्याणें उझबेग लोकांस आपल्या मदतीस बोलाविलें, आणि त्यांचा मोठ्या सहायानें बाबर याचा मोड केला. शेवटीं रस्त्यांमध्येंहि निकराचें युद्ध होऊन बाबर यास पळून जावें लागलें. त्या समयीं शत्रूंनीं याचा

अतित्वरेनें पाठलाग केला, तेव्हां याचे सोबती एकेक गळून त्यांचा हातीं सांपडले, आणि याचाहि घोडा अगदीं थकून गेल्यामुळें, तंबोल याचा दोघां स्वारांनीं यास गांठलें. ते बाबर यास शरण येण्याविषयीं समजावूं लागले. त्यांजबराबर एकीकडे बोलणें चालू ठेवून हा पूर्ववत् प्रमाणें पहाडांमध्यें त्वरेनें जात होता. शेवटीं त्यांजबराबर बोलून, कांहीं त्यांची समजूत करून, आणि कांहीं विनवणी करून, ते आपले झाले असें यास वाटलें, आणि जी तुझी वाट होईल, ती आमची होऊ, तीस आह्मी कबूल आहों, याप्रमाणें त्यांणीं दिव्यें केलीं. आतां त्यांचा मनांत मूळचें कपट असो, अथवा पुढें आपली दशा कशी होईल याचा विचार होऊन त्यांची उमेद खचली असें असो, परंतु शेवटीं त्यांणीं, बाबर याचा विश्वासघात करून, यास शत्रूंचा हातीं दिलें. त्यांतून हा मोठ्या शर्तीनें सुटून, पुनः मोकळा झाला. तथापि सुटका झाल्यानंतर याची जी स्थिति होती, ती बंदीसारिखीच आशारहित ह्मणावयाजोगी होती. कारण याचा मामाचा मोगली फौजेचा शैबानी खान याणें पराजय करून, त्यास कैद केलें होतें; तेव्हां बल्क प्रांतास लागून होता तेवढा प्रदेश खेरीज करून, बाकी सर्व मावरुल्नहर्प्रांत उझबेगलोकांचा हातीं आला होता. याप्रमाणें बाबर याचा आशाभंग झाल्यावर तो आपल्या फर्गाणनामक स्वदेशास नमस्कार करून, हिंदुकुशपर्वतापलीकडील नवीन प्रदेशांत आपल्या नशीबाची पारख पाहवी ह्मणून निघाला.

बाबरास उझबेगलोकांनीं मावरुल्नहर्प्रांतांतून घालवून दिलें.

बाबर याणें जीं कृत्यें केलीं, आणि जा आपत्ति भोगिल्या, त्या एकाद्या पराक्रमी पुरुषाचा सगळ्या

जन्मासहि पुरल्या असत्या; असें असतां इतकें चरित्र होऊन बाबर याचें तर तेविसावें वर्ष उलटलें नव्हतें. यास पुष्कळ वेळा विघ्नें आड आलीं, तथापि जवानीचा उमेदीमध्यें याणें अशा निराशांची पीडा सहन केली. मी पुष्कळ वेळा रडत असें, तशींच पुष्कळ दुःखाचीं गाणीं रचित असें; परंतु माझी वृत्ति आनंदी असे, तेणेंकरून माझी हिम्मत न खचतां जें जें प्राप्त होई, तें तें आनंदानें भोगून, पुढें आपले दिवस चांगले येतील अशी आशा राखून मी असें; समर्कंद एथून निघून गेल्यावर थोडे दिवसपर्यंत मला पोटभर जेवायास मिळालें, रात्रीस स्वस्थ झोंप सांपडली, आणि श्रम व चिंता यांचा बंदीशाळेंतून मी सुटलों. याप्रमाणें जितका मी तेव्हां वास्तविक सुखानुभव घेतला, तितका जन्मांतहि कधीं मला प्राप्त झाला नाहीं; असें हा आपल्या चरित्रांत स्वतः वर्णन करितो. बाबर याला मंडळीची आवड, आणि साध्या सुखांची गोडी असे. त्यामुळें कित्येक वेळा वर लिहिलेल्या सारिखे आनंदाचे अनुभव यास प्राप्त होत. याणें एक मोठी जीवावरची स्वारी केली, तिजमध्यें एक तऱ्हेचें कलिंगड पाहून यास आश्चर्य वाटलें. पुढें त्या स्वारीचें वर्णन करित्ये समयीं, तें वर्णन कांहीं वेळ एकीकडे ठेवून, याणें त्या कलिंगडाचें वर्णन केलें आहे. केव्हांहि यास फुरसूद सांपडली असतां, हा झाडें लावण्याचा व बागाईत करण्याचा उद्योगांत निमग्न असे. लढाईचा वेळीं, अथवा स्वस्थता असतां केव्हांहि, जेव्हां हा प्रांतांतून फिरत असे, तेव्हां तरतऱ्हेचीं फुलें, नानाप्रकारचे वृक्ष, व मनोरंजक स्थलें, हीं जेथें जेथें यास आढळत, तेथें तेथें हा आपलें लक्ष पोंचवून त्यांचा उपयोग करित

असे. याणें जसें मन मोकळें करून आपलें चरित्र वर्णिलें आहे, तसे दुसऱ्या लोकांनीं आपले विचार उघड केले नाहींत, यामुळें असेल, किंवा कसें असेल तें असो; परंतु याची रसिकता, आणि याचा मनोवृत्ति, यांविषयीं आपणास जसें ज्ञान होतें, तसें एशियाखंडाचा इतिहासामधील कोणत्याहि पुरुषाविषयीं होत नाहीं.

खुशूरुशाह ह्मणून बाबर याचा मामाच्या प्यारा होता. तो बाबराचा चुलत भाऊ बैसांघर मिर्झा, जास याणें समर्कंदामधून घालवून दिलें, त्याजवळ वजीर होता. पुढें आपल्या धन्यास मारून व त्याचें जें राज्य शिलक राहिलें होतें तें बळकावून, तो बसला होता. त्याचा हातीं बल्क प्रांत हा प्रांत आला होता. त्याणें प्रांत बाबराशीं सलगी लाविली, आणि जेव्हां हा त्याचा राज्यांत आला, तेव्हां याचें बाहेरून आगतस्वागत केलें. असे ढेव करून दाखविण्याचें कारण, त्याला स्वतांचा अधिकाराविषयीं भीति होती, हें असावें असें दिसतें. पुढें थोडक्याच दिवसांत त्याचा तैनातींतील सर्व मोगललोकांनीं बाबराजवळ चाकरीस राहण्याचें बोलणें लाविलें आणि त्यांणीं आपला अभिप्राय प्रसिद्धपणीं कळविण्यापूर्वींच बाकी नामें खुद्द खुशूरूचा भाऊ बाबर याचा पक्षास येऊन मिळाला. त्याचा मागून सर्व फौज आली. पूर्वीं जेव्हां खुशूरूचा मुलुकाचा सरहद्दीजवळ बाबर आला, तेव्हां याजवळ दोहोंपासून तीनशेंपर्यंत अनुयायी होते, त्यांतून पुष्कळ सोटेबरदार होते. याजवळ फक्त दोन डेरे होते, त्यांतून जो चांगला होता, तो याचा आईचा दिम्मतीस होता. पुढें वर सांगितल्याप्रमाणें लोक येऊन यास मिळाल्यावर याणें चांगली ठेवणुकी

व तयार फौज घेऊन, काबूलावर स्वारी केली. तेथील राजा याचा काका उलूग बेग हा दोन वर्षांपूर्वी मयत झाला होता; त्याचा मागून त्याचा मुलगा गादीवर बसला होता; त्यास त्याचा प्रधानानें हुसकून लाविलें. पुढें अर्घून-नामक मोगल किंवा तुर्की वंशाचा लोकांनीं त्या प्रधानाचाहि हातांत नारळ दिला. त्या लोकांचा हातांत कंदाहार हें कांहीं दिवस आलें होतें. बाबर यास बहुधा कोणी आड न येतां काबूल शहर याचा स्वाधीन झालें, ( इ० स० १५०४ ) नंतर त्या देशाचा मूळमालक याचा पूर्ण उच्छेद झाला असें मनांत आणून, याणें आपल्या नावानें प्रांतांत द्वाही फिरविली. पुढें आपलें वतन मिळावें ह्मणून त्याचा चुलतभावानें प्रयत्न केला, परंतु त्यास बाबर हा आडवा आला. इकडे खुश्रुशाह याणें बल्क प्रांत पुनः घेतला; शेवटीं त्यापासूनहि तो उझबेगलोकांनीं जिंकिला; तेणेंकरून पहाडापलीकडील देशाशीं बाबर याचा संबंध अगदीं तुटून गेला. पुढें हा काबूलचा राजा झाला, आणि याचा वंशजांनीं सतराव्या शतकाचा अखेरीपर्यंत त्या राज्याचा उपभोग घेतला. बाबर याणें बेवीस वर्षें काबूलाचें राज्य केल्यानंतर पुढें हिंदुस्थानांतील राज्य मिळविलें. काबूल मिळाल्यावर बाबरास एक स्थाईक जागा झाली, तथापि यास स्वस्थपणा प्राप्त झाला नाहीं. यापुढें याणें जे श्रम केले, आणि जीं संकटें भोगिलीं, त्यांचें स्वरूप मात्र बदललें. उझबेगलोक हे अद्यापपर्यंत अनिवार असून, त्यांची यास बाहेरून भीति होती; तसेंच याचा राज्यांतील बहुतेक ठिकाणीं कित्येक जातींचा स्वतंत्र वंशांकडे मुलुक होता; त्या लोकांचें

याणें काबूलचें राज्य मिळविलें.

प्राबल्य पुष्कळ होतें; त्यामुळें तो याचा हातीं येईल, अशी यास आशा नव्हती; बाकी राहिलेल्या प्रांतांतून कांहीं याचे स्वतांचे शत्रु व प्रतिस्पर्धी यांचाहि हातांत होता. याचा काबूलचा राज्यावरील हक्कहि संशयग्रस्तच होता; याजवळ भरवसा ठेवण्याजोगा प्रधान नव्हता; याचा भाऊ जहांगीर जो पुष्कळ दिवसपर्यंत बंड करून राहिला होता, तो नुकताच येऊन यास मिळाला होता; याचा लश्करांतील लोक तरी पुष्कळ ठिकाणचे झोटिंग जमा झालेले होते; ते यास पारके असून, त्यांणीं आपल्या पूर्वींचा धन्यांशीं बेइमानीपणा केला होता; याप्रमाणें याची स्थिति होती.

याणें राज्याचा आरंभींच कंदाहार प्रांत घेतला, अफगाण व हजारे या लोकांचा पहाडी मुलुकांवर स्वाऱ्या केल्या, आणि हिरात एथील आपल्या भाईबंद राजास बरोबर मिळवून उभयतांहीं उझबेगलोकांपासून आपलें संरक्षण करावें अशी तजवीज करण्याकरितां याणें मोठा जीवावरचा प्रयास केला. या सर्व प्रसंगीं यास साहजिकच जोखमें सोसावीं लागलीं, आणि लढायांमध्यें जे हाल होतात, त्यांहूनहि याचे विशेष झाले. एके वेळीं हजारेलोकांचा पहाडांतून हिंवाळ्यांत जात असतां बर्फ पडून, हा मरतां मरतां वांचला.

वरील मुदतींत याचा भाऊ जहांगीर याणें बंड केलें; (इ० स० १५०६) परंतु त्याचा पराजय करून त्यास याणें क्षमा केली. पुढें हा हिरात एथें गेला होता, तेव्हां याचा मोगली फौजेनें याचा एका चुलतभावास राजा बनावून मोठा उठावा केला; परंतु त्याचाहि याणें मोडकरून त्यासहि क्षमा केली. (इ०स० १५०७) पुढें खुश्रूशाह यास

सोडून जे मोगललोक बाबर याचा चाकरीस इ० स० १५०७.
येऊन राहिले होते, त्यांणीं फितूर करून याचा कडेलोट करण्याची वेळ जवळ आणिली होती. तो प्रकार असा:— ते लोक दोनतीन हजार होते; त्यांमध्यें प्रथम कांहीं फसाद उत्पन्न होऊन, त्यांणीं बाबर यास पकडून कैद करण्याचा प्रयत्न केला; परंतु बाबर निसटून काबूलांतून पळाला; तेव्हां त्यांणीं उलूगबेग याच्या मुलगा अब्दुरिझाक् ज्यास बाबर याणें हुसकून लाविलें होतें, त्यास बोलावून आणिलें ( इ स० १५०८ ). अब्दुरिझाक् याचा हक्काचें विशेष वजन होतें, असें बहुधा दिसत नाहीं. कारण तैमूरलंग या सरदारानें जे देश मिळविले ती सर्वांची मत्ता, असें समजून तींतून ज्याचा मणगटास जसा जोर होईल, तसें त्याणें घ्यावें असें त्याचा वंशांतील सर्व राजे संमत असत, असें दिसतें; तथापि अब्दुरिझाक् याचा बापानें काबूलांत राज्य केलें होतें, त्यामुळें,त्या प्रांतांत त्याचे संबंधी पुष्कळ होते, एवढी त्याची मजबूदी होती. ते संबंधी एवढे बलाढ्य होते, कीं पांच शें लोक खेरीज करून, बाकीचें सर्व बाबर याचें लश्कर यास सोडून निघून गेलें. अशा प्रसंगीं जर बाबर एक क्षणभर बेदिल झाला असता, तर याच्या घात झाला असता; परंतु तसा न होतां, जरी याचें लश्कर लहान होतें, तरी ती उणीव याणें आपल्या धारिष्टाचा व चपलतेचा पराक्रमानें पुरी पाडली. याणें आपल्या शत्रूंवर वारंवार हल्ले केले; प्रत्येक प्रसंगांत जेथें लढाईचा भर असे, तेथें आपण समोर झाला; आणि बहुधा आपल्या स्वतांचाच शौर्यानें व पराक्रमानें आपली थावराथावर करिता झाला.

याचा मोठ्या लढाया याचे जुने शत्रु उझबेगलोक यांजबरोबर झाल्या. मावरुल्नहर्प्रांत घेतल्यावर शेबानी खान याणें खुरासानावर स्वारी केली, आणि हिरात घेऊन तेथील तैमूरलंगाचा मुख्य राज्य करणाऱ्या घराण्याची समाप्ति केली. नंतर कंदाहारावर चाल करून तें शहर त्याणें घेतलें. परंतु बालेकिल्ला त्याचा हातीं येण्यापूर्वी त्याचा राज्यांत कांहीं दूर बखेडे झाल्यामुळें, तो तिकडे गेला; तथापि त्या किल्ल्यावरील लोक फार जर्जर झाले होते, तेणेंकरून त्याचे जुने मालक अर्घूनलोक हे जवळच राहत असत, त्यांचा तो हातांत आला, व तो पुढें त्यांजकडेस बरींच वर्षें (इ० स० १५०७ पासून १५२२) पर्यंत, राहिला. पुढें शैबानी खान याची व इराणचा बादशाहा शाहा इस्मायल् सफावी याची लढाई झाली. तींत शाहा इस्मायल्

इ० स० १५१०. याणें शैबानी याचा साफ मोड करून त्यास मारून टाकिलें; त्यामुळें उझबेगलोकांची गति कुंठित झाली. असें न होतां, जर त्यांचा तसाच भरभराट होत जाता, तर बाबर याची गति काय झाली असती, तें सांगवत नाहीं. कदाचित् याचा वंशाचा दुसऱ्या राजांची जी अवस्था झाली, तीच याचीहि झाली असती.

शैबानी खान मेल्यावर बाबरास राज्य साधन करण्याचा नवीन मार्ग सांपडला; किंबहुना याचा पूर्वीचा पराक्रमांचा जेथें झेंडा लागला होता, तेथें यास पुनः जाणूं कांहीं असें बलावणेंच आलें. नंतर याणें लागलाच बल्कप्रांत सर केला; इस्मायल् शाहा याजबरोबर दोस्ती केली. एक इराणी लोकांची फौज मदतीस घेऊन बुखारा घेतला; आणि पुढें समर्कंद पुनः आपल्या ताब्यांत आणिलें;

(इ० स० १५११.)

असें झालें तथापि मावरुल्नहरूप्रांतांत याचें कधींहि फार दिवस चालावयाचें नाहीं, असा कांहीं ईश्वरी संकेतच दिसत होता. पुढें बारा महिने गेले नाहींत, इतक्यांत, उझबेगलोकांनीं यास समर्कंदांतून घालवून दिलें; त्यानंतर पुढें दोन वर्षेपर्यंत इराणी लोकांचा मदतीनें याणें त्यांजबरावर लढाई चालविली; शेवटीं याचा पुरा मोड होऊन बल्कप्रांत खेरीज करून बाकी याचें तिकडील मिळविलेलें राज्य सर्व गेलें. (इ० स० १५१४)

हिंदुस्थानाविषयीं याचे बेत.

याप्रमाणें उझबेगलोकांपासून पराजय पावल्यानंतर, हिंदुस्थानामध्यें राज्य संपादन करण्याकडे याणें भरपूर मन घातलें; आणि जे पराक्रम केले, त्यांचा परिणाम कसा झाला, तें तिसऱ्या भागाचा शेवटील प्रकरणांत पूर्वींच सांगितलेलें आहे.

इ० स० १५२६, हि० स० ९३३. इब्राहिमाचा मोड करून जय मिळविल्यावर बाबर याणें काय केलें तो प्रकार.

त्याप्रमाणें आग्रा घेतल्यावर, जी लूट मिळविलेली होती, ती सर्व याणें आपल्या आश्रितांस वांटून दिली. हें प्रथम कृत्य केलें. याणें आपला मुलगा हुमायून यास एक हिरा दिला; तो मोठा उत्कृष्ट होता. असे पृथ्वींतहि फार मिळावयाचे नाहींत. तसेंच काबूल प्रांतांतील प्रत्येक पुरुष, बायको, व मूल, तें गुलाम असो, किंवा स्वतंत्र असो, त्या प्रत्येकास याणें एक एक शाहरुखी[२] पाठवून दिली.

बाबर याचा हातांत राजधानी आली,

२ शाहरुखी ही सुमारें साडेसहा आण्यांपासून साडेसात आण्यांपर्यंत किम्मतीची आहे; परंतु याप्रमाणें खर्च केलेली सर्व रकम अतिशय

तथापि राज्यसंपादन हें दूरच राहिलें होतें. दिल्लीचा वायव्येकडील प्रांत, व यमुनाकांठचा आग्र्यापर्यंत अरुंद प्रदेश, इतका मात्र याचा हातांत होता. गंगानदीचा पूर्वेकडील सर्व प्रांत इब्राहिमाचा वेळीं स्वतंत्र होऊन दरया खान लोहाणी याचा ताब्यांत होता. पुढें त्याचा मुलगा महम्मद शाहा लोहाणी याणें राजा असा किताब घेतला. त्याकडेस गंगेचा दोहीं तडींचा बहारप्रांत होता असें दिसतें. यमुनेचा पश्चिमकांठीं पुष्कळ ठिकाणीं इब्राहिमाचा वेळींच बंडें झालीं होतीं, आणि त्या वेळीं जो बाकी प्रांत याचा ताब्यांत होता, त्यांतूनहि पुष्कळ ठिकाणीं त्याचा पक्षाचे अफगाण आणि फर्मुली या जातींचे सरदार हे बळकावून बसले होते. इतक्याच बाबर यास नडी आल्या असें नाहीं; याजबराबर जी काबूलाहून फौज आली होती, तिचें व हिंदुस्थानांतील लोकांचें फार वांकडें पडलें, आणि त्यापासून कलह झाले; याचा छावणीचा आसपासचे गांव ओसाड टाकून तेथील लोक निघून गेले, त्यामुळें याचा लश्करास अन्नसामग्री व दाणावैरण हीं मिळण्यास कठीण पडूं लागलें; त्यांत भरीस भर त्या वर्षी उन्हाळा नेहेमींहून अतिशय कडक पडला; आणि मुळींच थंड देशांतील

मोठी असावी. बाबर यास त्या सुमारास कलेंदर फकीर असें थट्टेनें ह्मणत असत; कारण कलेंदर हे एका पंथाचे लोक आहेत, ते उद्यांस कांहीं जवळ शिलक ठेवित नाहींत. बाबर याणें वर सांगितल्याप्रमाणें अविचारानें खर्च केल्यामुळें यास जें फकीर असें नाव प्राप्त झालें, तें योग्य होतें. हा सार्वकाल उदार असे; परंतु असाच हा उधळ्या असेल, असें वाटत नाहीं. कारण एकदां काबूल घेतल्यावर पुढें कधीं यास द्रव्याची तंगी पडली असें पाहण्यांत आलेलें नाहीं.

लोकांस इकडील उन्हाळा हमेशा बहुधा दुःसह होतो, तो त्या वर्षीं विशेष झाल्यानें, याचे सर्व लोक क्लेश पावून कुरकुरूं लागले, आणि आपणास परत काबूलास न्यावें असा त्यांणीं कल्होळ केला. कित्येकांनीं परवानगीशिवायच परत जाण्याची तयारीहि केली. हें पाहून बाबर याणें सरदार लोकांस जमविलें, आणि त्यांस सांगितलें, कीं पुष्कळ दिवसपर्यंत श्रम करून आपल्या हेतूप्रमाणें हिंदुस्थानांतील राज्य आपण साध्य करित होतों, तें प्राप्त झाल्यावर आतां टाकून देणें, हें दुर्बलतेचें व अपकीर्तीचें लक्षण आहे; याकरितां मी तर हिंदुस्थानांत राहण्याचा निश्चय केला आहे; तर ज्यांची परत जायाची इच्छा असेल, त्यांणीं एकदम सुखेंनैव जावें; परंतु यापुढें मी माझा ठरावाविरुद्ध तक्रार ऐकणार नाहीं. हें बोलणें ऐकतांच बहुतेकांचा असंतोष नाहींसा झाला; कांहींनीं परत जाण्याचा निश्चयच केला, त्यांत बाबर याचा उत्कृष्ट व अति विश्वासू सरदारांपैकीं ख्वाजा किलान ह्मणून एक सरदार होता; त्यास बाबर याणें सिंधुनदापलीकडे एक सुभा देऊन, त्यास आपल्या कामावर जाण्यास मोठ्या मानप्रतिष्ठेनें रुखूसत दिली.

याची फौज हवालदिल झाली.

याप्रमाणें आपला दृढ निश्चय बाबर याणें प्रकट केला हें पाहून याचे शत्रुहि वरमले. जसा तैमूरलंग परत स्वदेशीं गेला, तसाच हा जाईल, असें ज्या पुष्कळांचा मनांतून होतें, ते असा याचा निर्धार पाहून, यास शरण आले; दुसऱ्या कांहीं लोकांस जिंकण्याकरितां बाबर याणें लश्कर पाठविलें, आणि पुढील चार महिन्यांत याचा वडील मुलगा शाहजादा हुमायून याणें बराबर फौज घेऊन जो मुलुक

सुलतान इब्राहिम याचा ताब्यांत होता, तो व शिवाय जे मांत पूर्वीं लोदी वंशाकडेस असून जांत बंडें झालीं होतीं, ते, व शिवाय जवानपुरचें राज्य इतका देश घेतला. चंबळेवरील बियाना व धवलपुर हीं शहरें, व तसेंच त्या नदीपलीकडील ग्वालेर हें शहर, या तीन ठिकाणीं सर्वांहून अगदीं मागून याची सत्ता चालू झाली.

इ० स० १५२६, जुने तागाइंत अक्टोबर हि० स० ९३२.

याप्रमाणें सर्व मुसलमान राजांहीं याची सत्ता कबूल केल्यावर, यास हिंदूंबराबर लढणें आलें. हिंदुलोक हे बहुधा शत्रूंवर चालून जात नसत; परंतु ती रीति त्यांणीं या वेळीं सोडून, ते बाबरावर चालून आले. तो प्रकारः—

मेवाडचा राणा संग याजबराबर लढाई.

इ० स० १३१६ त अल्लाउद्दीन खिलजी याचा कारकीर्दीत हमीर सिंग नावाचा राजपूत राजानें चितूरच्या किल्ला परत घेतला, असें पूर्वीं वर्णन केलेलें आहे; त्या राजानें पुढें पुष्कळ वर्षें राज्य करून सर्व मेवाडमांतांत राजपूतांचा अम्मल बसविला. हमीर सिंगानंतर त्याचा मुलानें अजमीर मांत मिळविला. पुढें माळवा हा दिल्लीचा बादशाहांचा हातून सुटल्यानंतर, तेथील मुसलमान राजांचें मेवाडचा राजांशीं बहुधा युत्ध चालत असे; आणि बाबराचा कारकीर्दीचा नुकताच अगोदर मेवाडचा राणा संग याणें माळव्याचा राजा महमूद याचा पराजय करून, त्यास मारून टाकिलें होतें (इ० स० १५१९). संग हा हमीर सिंगापासून सहावा पुरुष. याकडेस मेवाडचा राजांचा सर्व वंशपरंपरेचा मुलुक चालत होता; शिवाय भिलसा व चंदेरी यांपर्यंत माळव्याचा पूर्वभाग हाहि

याचाच तंत्रानें होता. मारवाडचे व जयपुरचे व तसेच दुसरे सर्व राजपूत राजेरजवाडे हे राणा संग यास आपला पुढारी ह्मणवित असत.

त्या राजाचें दिल्लीचा बादशाहांशीं साहजिकच वैर होतें, त्यामुळें जेव्हां बाबर हा इब्राहिमावर चढाई करून यात होता, तेव्हां याजबराबर त्याणें दोस्तीचें बोलणें लाविलें होतें. पुढें इब्राहिमाचें राज्य बाबर यास मिळून याची स्थापना झाली, असें जेव्हां त्याणें पाहिलें, तेव्हांहि वरील कारणामुळेंच तो याजवर शत्रूंचा कट करूं लागला. त्या वेळीं हिंदु राजांशिवाय संग याचा पक्षास लोदी वंशाचा महमूदनामक एक शाहजादा होता. त्याणें राजा असा किताब घेतला होता, आणि जरी त्याकडे कांहीं मुलुक नव्हता, तरी त्याचा मागून त्याचे १०,००० आश्रित येत असत. असें होतांच जा लोदी सरदारांस हुमायून याणें घालवून दिलें होतें, तेहि आपल्या मूळचा ठिकाणीं परत आले, अथवा तें जांस साधलें नाहीं, त्यांणीं राणा संग यास मदत करण्याकरितां दुसऱ्या ठिकाणीं फौजा जमविल्या. त्या वेळीं मेवातप्रांतांत हसन खान नावाचा राजा राज्य करित होता. त्याचा नावावरून तो हिंदूचा मुसलमान झालेला असावा असें वाटतें. दिल्लीपासून १२½ कोशांपलीकडे मचेरी ऊर्फ अल्वार असें जा राज्यास हल्लीं ह्मणतात, त्यासुध्धां चंबळेपर्यंत जो पहाडी प्रदेश आहे, तो याकडेस होता. हा राजा आपल्या पक्षास मिळावा, ह्मणून उभय पक्षीं यत्न चालले होते. त्याचा मुलगा बाबर याकडेस ओलीस होता. ह्मणून त्या राजानें आपणास मनःपुरःसर सहाय व्हावें, या हेतूनें बाबर याणें उदार बुद्धीनें त्याचा मुलास परत पाठवून दिलें. या

औदार्यानें **हसन खान** याची जी वृत्ति फिरावी, ती न फिरतां, उलटी त्याचा मुलगा सुटल्यामुळें त्याविषयींची काळजी नाहींशी होऊन, तो उघडपणें जाऊन शत्रूस मिळाला. **राणा संग** हा लागलाच आपला दोस्त **हसन खान** याचा सहायार्थ पुढें सरसावला, आणि **आग्र्यापासून** पंचवीस कोशांचा अंत **बियान** ह्मणून शहर आहे तेथें लवकर जाऊन पोंचला; आणि तेथील किल्लेकऱ्यांचा कांहीं नाश करून, व त्यांस किल्ल्यामध्यें पळवून त्यांचा व राजधानीचा संबंध तोडिता झाला. हें वर्तमान लागतांच **बाबर** याणें शत्रूंची टेहेळणी करण्याकरितां एक टोळी पुढें पाठविली, आणि मागाहून लवकरच आपण आपली सर्व फौज घेऊन निघाला. हा **आग्र्यापासून** सुमारें दहा कोशांवर **सिक्री**[१] एथें पोंचला, तों हिंदूंचें सैन्य जवळ येऊन ठेपलें, असें याणें पाहिलें. यांचा आघाडीचा पाहरेकरी लोकांवर शत्रूंनीं लागलाच हल्ला केला; त्यांस **बाबर** याणें आपल्या मुख्य लश्करांतून कुमकहि पाठवून दिली, तथापि त्यांचा पराजय होऊन अतिशय नुकसान झालें. त्या वेळचा पहिल्या गुर्दीत जर **राजा संग** पुढें घसरता, तर त्यास सहज जय प्राप्त झाला असता; परंतु तसें नकरितां वरील जय झाल्यानंतर तो परत आपल्या छावणींत आला; तेणेंकरून **बाबर** यास आपल्या छावणीकरितां चांगलें स्थळ शोधून काढण्यास, आणि सभोंवार चरांची वगैरे मजबूदी करण्यास पुष्कळ फुरसूद सांपडली; त्यामुळें पुढें यावर शस्त्र टाकणें हें कठीण होऊन गेलें.

ता० १८।१९ फेब्रुआरि.

या लढाईची प्रथमपासूनच **बाबर** यास धास्ती होती;

(१) यास हल्लीं **फत्तेपुरसिक्री** असें ह्मणतात.

तशांत जे लोक युद्धांतून पळून येत त्यांचा बोलण्यावरून, व तसाच जो याचा डोळ्यांसमोर फौजेस अपाय झाला तेणें-करून, याचा मनांत पक्का आंचका बसला होता; इतक्यांत दुर्दैवेंकरून काबूलाहून एक प्रसिद्ध फलज्योतिषी आला, आणि बादशाहाची फौज मंगळाचा सन्मुख आहे, याक-रितां सांप्रतचा मंगळाचा स्वरूपावरून बाबर याचा खचित मोड होईल असें भाकित त्याणें प्रसिद्ध केलें. या कांहीं खऱ्या व कांहीं काल्पनिक भीतींनीं बाबराचा लश्करांत ए-वढा कल्होळ होऊन गेला, कीं याचे अति मोठे सरदारहि घाबरले, आणि त्यांचें सर्व शौर्य गळून, त्यांस सल्ला विचा-रावा, तर त्यांची बुद्धि स्थिर नाहींशी झाली, आणि आप-ल्या लोकांचा समोर बाहेरून तरी धीटपणाचें सोंग त्यांचा-नें आणवेनासें झालें. बाबर याची हिंदुस्थानी फौज या-स सोडून जाऊं लागली; त्यांतून कितीएक शत्रूसहि जाऊन मिळाले; बाकीचे लोक इमान राखून होते, परंतु त्यांची उ-मेद अगदीं खचून ते भयाभीत झाले होते. बाबर हा त्या फलज्योतिष्याचें भविष्य स्वतः तुच्छवत् मानित असे; तथा-पि त्या वेळची आपली स्थिति भयास्पद आहे, असें यास समजलें नव्हतें असें नाहीं. त्या वेळीं माझा पापांचा मला पश्चात्ताप झाला; मीं दारू पिणार नाहीं अशी शपथ वाहिली; आणि आपलीं सोन्यारुप्यांचीं पाणी प्यावयाचीं भांडीं गरीब लोकांस धर्म केलीं; असें हा आपल्या ग्रंथांत वर्णन करितो; जर ईश्वरकृपेनें आपला जय होईल, तर मी दाढी वाढवीन असा याणें त्या वेळीं नवस केला, आणि मुसलमानलोकां-वरील छापाचा कर सोडून देईन असें कबूल केलें. इतकेंहि झालें तथापि यास संकटांची सवयच पडून गेली होती,

त्यामुळें हा कचरला नाहीं. आपल्या लश्करास आपल्या-सारिखीच कांहीं तरी हुशारी यावी, ह्मणून याणें सर्व मती-चा सरदार लोकांस बलावून दरबार केलें; तेथें आपणावर सांप्रत कसा प्रसंग आला आहे, अथवा लूट किती मिळा-वयाची आहे, अथवा किती देश साध्य करावयाचा आहे, या नेहमींचा विषयांपैकीं कांहीं बोलणें काढिलें नाहीं; तसेंच धर्माविषयींहि कांहीं सांगावयासारिखें हा बोलला नाहीं; परंतु सांप्रत आपणावर जी वेळ गुजरली आहे, तींत सर्वांनीं आपलें सत्व राखावें, याविषयीं हा त्यांस बोलिला; आणि पराजय झाल्यास मृत्युच येईल, परंतु जय झाल्यास कीर्ति मिळेल, असें संधान आहे, हें त्यांस समजाविलें. त्या वेळीं जो विषय योजून हा बोलिला, तोच विषय योग्य होता; कारण सर्व मंडळीनें याचा बोलण्यास एकदम होकार दिला, आणि आह्मी मारूं किंवा मरूं, अशा लागल्याच कु-राणावर शपथा वाहिल्या. हें वर्तमान ऐकून लश्करांतील लोकांस धीर आला. पुढें प्रत्यहीं प्रांतांमध्यें कांहीं तरी नवीन बखेडा झाल्याचा बातम्या येऊं लागल्या, तेव्हां आतां लढाईची चुकवाचुकव नकरितां, काय सोक्ष मोक्ष होतो तो एकदां पाहवा, असा बाबर याणें निश्चय केला; आपल्या खंदकांचा समोर आपली फौज उभी केली; व आपल्या तोफांची व्यवस्था करून, आणि दुसरी तयारी करून, आपल्या लोकांमध्यें इकडून तिकडे व तिकडून इकडे घोड्यावरून फिरूं लागला. हा शिपाई लोकांस थोडथोडें बोलून उमेद देई, व लढाईमध्यें कसें वागावें याविषयीं सरदार लोकांस सांगत असे. बाब-राप्रमाणेंच हिंदुलोकहि शेवट काय होतो तो पाहण्यास

सिक्रीची लढाई, बाबर याचा जय झाला.

तयार होते. याप्रमाणें लढाई झाली; तींत बाबर याचा जय झाला; हसन खान, व दुसरे पुष्कळ सरदार मेले गेले, आणि राणा संग हा मोठ्या मुस्कीलीनें निसटून गेला. या लढाईचा महत्वाप्रमाणें तिचें वर्णन व्हावें, ह्मणून आपण कांहीं न लिहितां तिजविषयीं आपल्या चिटणीसानें जी मोठी हकीकत लिहिली आहे, ती सर्व याणें आपल्या इतिहासांत दाखल केली आहे. तींत मोठें अलंकाराचें भारूड आहे; त्यामधून वर लिहिलेला एवढा सारांश निघतो. पुढें बाबर असें वर्णन करितो, कीं माझा जय झाल्यानंतर, जेव्हां तो फलज्योतिषी मला आशिर्वाद देण्याकरितां आला, तेव्हां मी त्याजवर शिव्यांचा पूर सोडून आपल्या मनाची शांति केली, आणि तूं गैरसमजुतीचा, गर्विष्ट, आणि दुःसह अशुभ बोलणारा आहेस, अशी त्याची निर्भर्त्सना केली. तथापि तो याचा जुना चाकर होता यास्तव त्यास याणें पुष्कळ बक्षीस देऊन आपलें राज्य सोडून जाण्याविषयीं आज्ञा केली.

इ० स० १५२७, मार्च ता० १६. हि०स० ९३३, जमादि उसानी चं० १३.

याप्रमाणें जय झाल्यानंतर बाबर याणें मेवातप्रांतावर स्वारी केली, आणि तेथें पुष्कळ बंदोबस्त केला; असा पूर्वीचा कारकीर्दींत कधींहि झाला नव्हता. जास काबूलास जाण्यास रजा पाहिजे असेल, त्यास मिळेल, असें वरील मोठ्या लढाईपूर्वीं याणें वचन दिलें होतें; त्या परवानगीवरून जे लोक जाण्यास इच्छित होते त्यांची याणें एक टोळी केली, आणि हुमायून यास मुख्य नेमून त्यांस परत स्वदेशीं पाठविलें.

देशाचा बंदोबस्त.

पुढें राज्याची आंतील व्यवस्था करण्याकडे,

आणि संग राजाबराबर पूर्वी लढाई चालली असत त्या परीक्षेचा वेळीं जा मांतांत बखेडे झाले होते तेथील बंदोबस्त करण्याकडे, यानें सहा महिने घालविले; याप्रमाणें तें वर्ष पुरें होई तों गंगेपलीकडील अयोध्याप्रांत खेरीज करून, बाकी सर्व प्रदेशांत याची सत्ता पुनः चालू झाली. अयोध्येमध्यें कांहीं अफगाणलोक लढाईचा तयारीनें राहिले होते. त्यांचा मोड करण्याकरितां यानें पूर्वीच एक टोळी पाठविली होती.

दुसऱ्या वर्षाचा अवेलीचा सुमारास बुंदेलखंड, व माळवा यांचा सरहद्दीवर चंदेरी नावाचा किल्ला आहे, त्यावर बाबरानें स्वारी केली. तो किल्ला मेदिनीरायनामक एका राजपूत सरदाराचा हातांत होता. तो सरदार माळव्याचा राजा दुसरा महमूद याचा कारकीर्दीत मोठा अधिकार पावला होता, आणि नंतर त्यानेंच राज्य बळकाविलें होतें; परंतु महमूद यानें गुजराथचा राजाचा मदतीनें त्यास हाकून लाविल्यावर, त्यानें राजा संग याचा आश्रयानें चंदेरी एथें ठाणें धरिलें. बाबराचा वरील लढाईनंतर तो मेदिनीराय स्वस्थपणें परत आला होता. त्यावर वर सांगितल्याप्रमाणें बाबर यानें शस्त्र धरिलें; तेव्हां त्यानें जीवाची आशा सोडून बाबराशीं युद्ध केलें. या प्रसंगीं राजपूतलोकांनीं चालीप्रमाणें आपलें विशेष शौर्य प्रकट केलें; परंतु त्यांचें कौशल्य अथवा निग्रह हीं कांहीं नजरेस पडलीं नाहींत. बाबर यानें चंदेरीस वेढा दिला. नंतर दुसऱ्या दिवशीं आतां आपलें कांहीं चालत नाहीं अशी त्या राजपूतलोकांनीं आशा सोडली. त्या वेळीं बाबर याचे लोक

इ० स० १५२८, हि० स० ९३४, चंदेरीकिल्ल्यास वेढा दिला.

तटावर चढले होते; इतक्यांत त्या किल्लेकऱ्यांनीं आपल्या बायकांस मारून टाकून, आपण मरावयाचा हेतूनें नागवेच पुढें घसरले. त्यांणीं मुसल्मानांस मेंढरांसारखे हांकले, आणि तटावरून उड्या टाकून अगदीं भरपूर आवेशानें शत्रूंवर हल्ला केला. शेवटीं त्यांचें कांहीं चालेनासें होऊन ते मारले गेले. बाकी दोन तीन शें लोक मेदिनी-राय याचा घराचें रक्षण करण्याकरितां मागें राहिले होते, ते हा ह्मणे मी प्रथम मरेंन, तो ह्मणे मी प्रथम मरेंन, असे भांडत एकमेकांचा हातानें बहुतेक मारले गेले.

इ० स० १५२८, जान्युआरि ता० २०.

चंदेरीचा वेढ्याचें काम चालत असतां, अयोध्या प्रांतांतील बादशाही लश्करचा टोळीचा बाबन ऊर्फ बिबान नावाचा एका अफगाण सरदारानें पराजय केला, असें यास वर्तमान लागलें; तेव्हां हा लागलाच स्वतः तिकडे निघून गेला. वाटेंत गंगा उतरण्याचा ठिकाणीं ते अफगाणलोक ठाणें धरून राहिले होते, ह्मणून बाबर याणें आपल्या तोफा सुरू करून त्यांचा सहायानें त्या नदीवर पूल बांधिला; शत्रूंस हटवून गोग्रेपार घालविलें; आणि आपण त्यांचा मागून पाठलाग करित गेला. पुढें त्या लोकांस याचा धास्तीनें बंगालचा बादशाहाचा राज्यांत लपून राहवें लागलें. पूर्वीं हुमायून याणें बहारप्रांत कायम घेतला असावा; परंतु तसें झालें नसल्यास तो या प्रसंगीं बाबर याणें सर केला. परंतु या वेळची याची स्वतांची हकीकत लिहिलेली नाहीं, आणि त्याविषयीं दुसऱ्याहि इतिहासकारानें कांहीं लिहिलें नाहीं.

अफगाण-लोकांचें बंड.

यानंतर कांहीं महिनेपर्यंत **बाबर** आजारी होता, असें दिसतें; त्या वेळीं याणें पुष्कळ विश्रांति घेतली; अशी बहुधा यास वारंवार मिळाली नाहीं. यानंतरची याणें लिहिलेली हकीकत आहे, तींत **हिंदुलोकांचे** किल्ले आणि देवळें; याणें पाहिलेले झरे आणि पाण्याचे धोधे; याचे स्वतांचे बागबगीचे; याणें केलेल्या व दुसऱ्या सुधारणा; तसेंच जादूगर, मल्ल, आणि इतर देशांत नसून **हिंदुस्थानांत** मात्र आहेत असे मनोरंजक पदार्थ; या सर्व विषयांचें याणें यथास्थित वर्णन केलें आहे.

वरील मुदतींत **राणा संग** मरण पावला, व त्याचा वडील मुलगा गादीवर बसून त्याणें यास **रतनभोरचा** किल्ला दिला. हा मोठा लाभ झाला.

पूर्वीं जा लढाईंत **राजा संग** याचा पराजय झाला, तींत त्या राजाबरोबर **सुलतान महमूद** नावाचा **लोदी** वंशाचा शाहजादा होता. पुढें त्यास **बंगालचा** बादशाहाकडून बहुधा कांहीं मदत मिळून, आणि **बहार**, व दुसऱ्या जवळचा प्रांतांतील **अफगाणलोक** सामिल होऊन, त्याजवळ ह्मणायास एक लाख फौज लवकरच जमली; आणि त्याणें **बहारप्रांत** बळकाविला. हें वर्तमान लागतांच **बाबर** हा पुरा जागा होऊन निघाला, आणि **महमूदाचें** लश्कर **काशीपर्यंत** येऊन ठेपे तों, **गंगायमुनेचा** संगमाजवळ **प्रयाग** ऊर्फ **अलाहबादेस** पोंचला. **महमूद** याचा घाईघाईनें जमा केलेल्या फौजेंत पूर्वींच कलह होऊं लागले होते; इतक्यांत **बाबर** हा समीप येतांच, तें लश्कर विरघळून गेलें. त्यांणीं **चुनारगडनामक** पहाडी किल्ला गर्दी करून घेण्याचा यत्न केला; परंतु तेथील लोकांनीं

त्यांस हटविलें. साधारणरीत्या पाहूं गेलें असतां, हा पराजय झाला ही हलकी गोष्ट होती; परंतु पूर्वीच ते लोक हवालदिल झालेले होते, व त्यांतच हा पराजय झाला त्यामुळें त्या लश्कराची फुटाफुट झाली. जेवढे लोक महमूदाचानें एकत्र राखवले, तेवढे घेऊन तो शोणनदीचा पलीकडे ठाणें धरून राहिला. जे सरदार महमूदास सोडून गेले होते, त्यांतून पुष्कळ बाबरास शरण आले. नंतर बाबर याणें आपली चाल तशीच पुढें चालविली. तेव्हां यास आड येण्याचें आपणास सामर्थ्य नाहीं असें पाहून, आपला बचाव करण्याकरितां महमूद पळून गेला.

त्या वेळीं गंगेचा दक्षिणेकडील सर्व बहारप्रांत बाबराचा हातांत आला. उत्तरबहार हा अद्यापि बंगालचा राजाचा ताब्यांत असून, तेथें पुष्कळ लश्कर तयार होतें. दिल्लीचा मुलुकापैकीं उत्तरबहार एवढा प्रांत आपण ठेवून, बाकीचा विषयीं भांडूं नये, असा त्या राजाचा उद्देश होता; ह्मणून त्याणें तहाचा बोलण्याखालीं बाबराचा वेळ काढण्याकरितां याचा छावणींत एक वकील पाठविला होता. शेवटीं त्याचें बोलणें पुरें न झाल्यामुळें बाबर हा उताविळ झाला, आणि गंगा उतरून बंगाली फौजेवर चालिला. पुढें गोग्रेचा गंगेशीं संगम होतो त्या ठिकाणाजवळ हा गेला, तों तिचा पलीकडचा बाजूस शत्रूंचा तळ पडला होता, आणि यास तर ती नदी उतरावयाची होती; तथापि याबराबर नावांची चांगली तयारी होती, यामुळें याणें बंगाली लोकांचा नावांस हांकून लाविलें; नाहीं तर त्या याचा आड आल्या असत्या. नंतर याची फौज उतरतांना तिला प्रतिबंध करण्यास बंगाली फौज तयार होऊन आली, आणि

उभय पक्षीं तोफांचा भडमार झाला. बाबर याचा फौजेचा टोळ्या जसजशा एकामागून एक उतरत गेल्या, तसतशा त्या आपणावर आलेल्या शत्रूंचा लोकांस हटवित गेल्या, आणि शेवटीं शत्रूचा फौजेस रणभूमीवरून पळवून लावित्या झाल्या; यानंतर लवकरच्च बंगालचा राजानें तहाचें बोलणें कबूल केलें. पुढें बाबर हा आग्र्यास परत येण्याची तयारी करित होता; इतक्यांत त्यास वर्तमान लागलें, कीं पूर्वीं बंगालचा फौजेंतून निघून गेलेल्या एका अफगाणांचा टोळीनें बावन व बेझिद नावाचा दुसरा एक प्रमुख सरदार, यांनिशीं गोग्रानदी उतरून लखनौ शहर घेतलें. हें समजतांच्च हा लागलाच कूच करून तिकडे गेला, आणि अफगाणलोक माघारे निघून गेले तेव्हां त्यांचा पाठलाग करण्याकरितां एक टोळी पाठविता झाला. तिणें गंगा,व यमुना यांचा पलीकडेपर्यंत त्यांची पिछा पुरवून,बुंदेलखंडांत त्यांची पुरी वाताहत करून सोडिली. पुढें पावसाळा सुरू झाला, त्यामुळें सर्व लढाईचीं कामें बंद पडलीं.

बंगालचा राजाचा पराजयझाला.

यापूर्वीं सुमारें सवा वर्षपर्यंत बाबर याची शक्ति पुष्कळ क्षीण झाली होती. या वेळचीं याची दिनचर्याहि लिहिलेली नाहीं. यावरून त्या वेळीं याचें चांचल्य कमी झालें होतें, असें दिसतें. पुढें याचा लवकर काळ होणार, तों अगोदरच्च याची सत्ता कांहीं कमी होत चालली, असें कांहीं गोष्टींवरून दिसून येतें. हुमायून हा परवानगीशिवाय आपला बदकूशानचा सुभा सोडून आला. त्याचा जागीं बाबर याणें आपला मुख्य वजीर खलीफा याची नेमणूक केली, परंतु तो कांहीं

बाबर याचा दुबळाईतपणा.

निमित्त काढून दरबारांतच राहिला. हुमायून अकस्मात् आला, तथापि बाबर याणें त्याचा मोठ्या प्रीतीनें स्वीकार केला. पुढें त्याचा जीवावरचें एक दुखणें आलें तेंच बाबराचा मृत्यूस निमित्तकारण झालें.

तो प्रकार असाः—जेव्हां बाबरास समजलें, कीं आतां औषधाचें कांहीं चालावयाचें नाहीं असें ह्मणून वैद्यांनीं आपले सर्व प्रयत्न करावयाचे सोडून दिले, त्या वेळीं यास एक आशा राहिली होती, ती धरून हा बसला होता. ती अशीः—एकाचा मरणापासून दुसरा वांचूं शकतो असा पूर्वेकडील देशांत लोकांचा अद्यापि भोळा समज आहे. त्याप्रमाणें आपल्या पुत्राचा जीव वांचविण्याकरितां आपला प्राण अर्पण करण्याचा याणें निश्चय केला, अशी बदली केल्यानें कार्यसिद्धि होईल, अशी बाबर याची खातरी होती; त्याप्रमाणें याचा मित्रांसहि त्याविषयीं संशय नव्हता, त्यामुळें आपण मेल्यापासून पुष्कळांचें अहित होईल, याकरितां असें कर्म आपण आचरूं नये, अशी त्यांणीं याची विनवणी केली; परंतु याणें निर्धार केला होता, तो फिरला नाहीं. अशा प्रसंगीं जो विधि करतात, त्याप्रमाणें हा शाहजादा हुमायून याचा आंथरुणासभोंवता तीन वेळा फिरला; नंतर कांहीं क्षण पावेतों लय लावून याणें ईश्वराची प्रार्थना केली; ती संपतांच हुमायून याचा रोग आपणावर आला असा याचा मनांत निश्चय दृढ ठसला आणि "तो ( रोग ) मी नेला— तो ( रोग ) मी नेला," असें तो पुष्कळ वेळ बोलिला. त्या योगानें त्या पितापुत्रांचा मनावर असा कांहीं ग्रह उत्पन्न झाला, कीं तेव्हांपासून हुमायून दिवसेंदिवस बरा होत चालला, असें सर्व इतिहासकार वर्णन करितात; आणि

बाबर हा पूर्वींचाच आजारी होता, तो त्या काळजीनें व चित्तक्षोभानें शरीरास पुष्कळ क्लेश होऊन दिवसेंदिवस लोकांचा लक्षांत येण्याजोगा हा क्षीण होऊं लागला. पुढें याचा मरणकाल समीप आला, असें लवकरच स्पष्ट दिसून आलें; तेव्हां याणें आपले पुत्र व प्रधान यांस जवळ बलावून आपले मरणसमयींचे हेतु त्यांस कळविले, आणि सर्वांनीं एका विचारें वागावें, व आपल्या मुलांनीं एकमेकांवर प्रीति करावी, अशी आज्ञा केली; परंतु त्या वेळीं याचा वजीर खलीफा हा अनिवार असे, त्यापुढें कोणाचें चालत नसे. असें कशामुळें झालें होतें, तें समजत नाहीं. या खलीफानें बाबर याचा मनांतील मुख्य हेतु मोडून टाकण्याचा निश्चय केला होता. तो प्रकार असाः— खलीफा याचा जांवई मेहदी ख्वाजा ह्मणून होता; तो अविचारी, व लहरी स्वभावाचा असे. त्यास गादीवर बसविला असतां, तो आयासावांचून हमेशा आपल्या तंत्रानें चालेल, आणि आपल्या हातांत सर्व सत्ता राहील, अशी योजना करून, त्याणें बाबराचा मुलांस सोडून देऊन, आपल्या जांवयास गादीवर बसविण्याचा ठराव केला४. त्यामुळें बाबर मेल्यानंतर त्यास गादी मिळणार अशी खुद्द मेहदी ख्वाजा याची, आणि

(४) खलीफा हा बाबराचा जुन्या सरदारांपैकीं होता; परंतु बाबरासारिखा हुशार राजा, आणि त्याचा मागून गादीवर बसणारा हुमायूनासारिखा अनुभविक वारिस असे असून, यास एवढी सत्ता कशी प्राप्त झाली, हें सहज अनुमान करितां येत नाहीं; आणि यानंतर पुढें फिरिस्ता अथवा अबुल् फसल या दोहोंतून कोणीहि खलीफा या त्याचा स्वताच्या नावानें अथवा निजामुद्दीन या त्याचा किताबतीनेंहि त्याचें वर्णन केलें नाहींन. असा तो एकदम कसा नाहींसा झाला, हेंहि तसेंच आश्चर्यकारक आहे.

दुसऱ्या लोकांची खातरी झाली. **खलीफा** याचे हे वृथा मनोरथ फुकट जातील असें त्यास **मेहदी खाजानें** सहजच कळविलें नाहीं. पुढें **बाबराचा** मरणकाळ समीप आला, तेव्हां **खलीफा** याणें **मेहदी खाजा** यास अकस्मात् पकडून बंदींत टाकिलें, आणि जवळचा लोकांशीं त्याचा बोलण्याचालण्याचा व्यवहार होऊं नये असा बंदोबस्त केला. अशी घालमेल होण्याचें कारण **अर्स्किन्** साहेब याणें आपल्या इतिहासांत **महम्मद मोकीम** याचा मुलाचा ग्रंथावरून सांगितलें आहे. त्या ग्रंथांत **मोकीम** याचा मुलानें आपल्या बापाचा ह्मणजे ( **मोकीम** याचा ) बोलण्यावरून लिहिला आहे, तो प्रकार,—एके दिवशीं **खलीफा** हा **मेहदी खाजा** यास भेटावयास गेला होता, त्या वेळीं **मोकीमा**खेरीज चवथा कोणी तेथें नव्हता, असें दिसतें; इतक्यांत **बाबर** याची गलबल झाल्यावरून अकस्मात् **खलीफा** यास बोलावणें आलें. **मेहदी खाजा** हा त्याजबराबर मोठ्या नम्रतेनें दरवाजापर्यंत गेला, आणि **खलीफा** बाहेर गेल्यावर हा त्याकडे पाहत तेथेंच उभा राहिला. त्यामुळें **खाजा** यास घसपटवून गेल्याशिवाय **मोकीमाचानें खलीफामागें** जाववेना. "**खलीफा** साफ दिसेनासा झाला, तेव्हां **खाजा** मनांतल्या मनांत फुटफुटूं लागला, कीं, 'अरे ह्मातारड्या, काय चिंता आहे? देवाची दया होईल तर मी लवकरच तुझें चामडें सोलून काढीन;' इतक्यांत मागें पाहतो तों माझा बाप (**मोकीम**) हा त्याचा दृष्टीस पडला. तेव्हां प्रथम **खाजा** अगदीं गांगरून गेला, परंतु मागून लागलाच माझा बापाचा कान धरून मोठ्या झपाट्यानें पिळवटून घाईघाईनें ह्मणाला,! 'हे **ताजिक** ही लाल जिव्हा आपल्या मनांतील

हिरवट विचारांचा पुष्कळ वेळ बभ्रा करित्ये." हें झालेलें वर्तमान मोकीम याणें ताबडतोब खलीफास कळविलें, त्यामुळें खलीफा याणें लागलेंच ख्वाजा याचें तंत्र सोडून हुमायून याची हुकुमत कबूल केली.

हीं कारस्तानें बहुधा बाबरास समजलीं नव्हतीं. त्यांची घाटाघाट लोक करित असतां बाबर आग्रा एथें मरण पावला. त्या वेळीं याचें वय ५० वर्षांचें होतें, आणि याणें अठतीस वर्षें राज्य केलें होतें. याचें प्रेत याणें सांगून ठेविल्याप्रमाणें काबूल एथें नेऊन पुरलें. तें दफन करण्याची जागाहि याणेंच नेमून ठेविली असावी, असें संभवतें. बाबरापेक्षां एशियाखंडांत दुसरे अधिक बलाढ्य राजे होऊन गेले, परंतु यासारिखा वाखाणण्याजोगा राजा कोणीहि होऊन गेला नाहीं.

बाबर मरण पावला. इ० स० १५३०, माहे डिसेंबर ता० २६. हि० स० ९३७.

बाबराचा स्वभाव याचा कृतीवरून उत्तम प्रकारें

५ सर अलेक्झांडर बर्नस् याणें आपल्या पर्यटनांविषयीं ग्रंथ केला आहे, त्यांत असें लिहिलें आहे, कीं "बाबराचा सर्व मोठ्या राज्यामध्यें काबूल ही याची आवडती जागा होती, तेथें आपलें शव पुरण्याविषयीं याणें आज्ञा केली होती." .... "याचा कबरस्तानामध्यें जीं फुलझाडें आहेत, त्यांत अद्यापि एका सुंदर झऱ्याचें स्वच्छ पाणी वाहत असतें याचा कबरेचा समोर एक लहान, परंतु निटस, अशी पांढऱ्या संगमरमरी दगडाची मशीद आहे. काबूलचे लोक सणावाराचा दिवशीं बहुत करून बाबराचा कबरेजवळ दर्शनास येत असतात" ...."बाबराचा गर्तेजवळ जी टेंकडी आहे, तेथून रमणीय प्रदेश दृष्टीस पडतो." इत्यादि वर्णन आहे.

कळून येतो. तथापि राज्यप्रकरणसंबंध सोडून याचा खासगत आचरणाविषयीं आणि याचा ग्रंथांविषयीं कांहीं सांगावयाचें आहे. याचा स्मरणवह्याच पाहूं गेलें असतां मोठ्या चमत्कारिक आहेत; आणि बाबर याचा स्थितीचा जर विचार केला, तर त्या अगदींच अलौकिक समजल्या पाहिजेत. त्यांमध्यें हा मोठा तातार राजा याणें आपलें चरित्र सूक्ष्म रीतीनें वर्णन केलें असून त्यांत याणें आपले अभिप्राय व आपल्या मनोवृत्ति यांचे जसे साहजिक उद्गार आले तसे लिहिले आहेत; कांहीं कपट अथवा संकोच राखिला नाहीं. व त्याप्रमाणेंच वाजवीपेक्षां फाजील मनाचा मोकळेपणा, आणि सरळपणा, हेहि ओढून आणिले नाहींत[६].

याचा स्वभाव.

बाबर याची वाणी साधी आणि गंभीर, तशीच उल्लासी व चित्रविचित्र आहे. हा बुद्धिमान् आणि लक्षपूर्वक अवलोकन करणारा होता; त्यामुळें याचा वेळची स्वदेशीय व परदेशीय लोकांची स्थिति, त्यांचे हावभाव, त्यांचा रीतिभाती, त्यांचे धंदे व व्यापार, आणि पराक्रम हे त्या ग्रंथांत

६ या मनाचा मोकळेपणाविषयीं तैमूरलंग याचा स्मरणवह्यांची स्थिति बाबराचा वह्यांहून व्युत्क्रम आहे. तैमूरलंगाचा स्मरणवह्यांची भाषा सरल आहे, परंतु ती जशी तमाशांतील सोंग हावभाव करून दाखवितें, त्याप्रमाणें लोकांचा मनांत कांहीं ग्रह उत्पन्न करून देण्याचा उद्देशानें लिहिली आहे, हें उघड दिसत आहे. त्यांत एका ठिकाणीं लिहिलें आहे कीं “ एके दिवशीं न समजतां माझा पाय मुंगीवर पडला, तेव्हां तो लुला झाला असें मला वाटूं लागलें.” आतां हा तर पर देश जिंकिणाऱ्या योध्यांमध्यें अतिशय दुष्ट होता; परंतु तसें नसून हा जरी अगदीं ब्राह्मण बैरागी असता तरी हा याचा हा उद्गार साहजिक आहे, असें कोण मनांत आणता ? कोणीहि नाहीं.

आरशासारिखे दिसत आहेत. या प्रकारचा एशियाखंडांत वास्तविक इतिहासपर असा एवढाच ग्रंथ आहे. कारण साधारण ग्रंथकार बडे लोकांचे पराक्रम व डामडौल यांचा वांवभर हकीकती लिहितात, परंतु त्यांचा खासगी वर्तणुकेविषयीं अथवा रीतिभातींविषयीं सांगावयाचें सोडून देतात. खालचा प्रतीचा लोकांस तर हे अगदींच सोडून देतात. बाबर याचा ग्रंथांत जा लोकांचें वर्णन आलें आहे, त्यांचा शरीरांचे बांधे, त्यांचे पोषाग, त्यांचा अभिरुचि, त्यांचा संवयी, यांविषयीं इतकें सूक्ष्म व यथातथ्य वर्णन केलें आहे, कीं आपण त्यांमध्येंच अद्यापि वास करित आहों, आणि जसे त्यांचे आपण स्वभाव ओळखितों तसें त्यांचें स्वरूपहि प्रत्यक्ष ओळखितों, असें आपणास वाटतें. जा देशांत हा फिरला होता तेथील चमत्कारिक जाग्यांचें, हवेचें, कृषिकर्मानें उत्पन्न होणाऱ्या पदार्थांचें, व उद्योग करून कलेचा सहायानें उत्पन्न केलेल्या वस्तूंचें; जें याणें वर्णन केलें आहे, तें भरपूर आणि बराबर आहे; असें वर्णन एवढ्याच मोठ्या ग्रंथांत, दुसऱ्या कोणत्याहि अर्वाचीन फिरणारानें याहून विशेष चांगलें केलेलें बहुधा आढळणार नाहीं, आणि जा स्थितीमध्यें बाबर याणें हे ग्रंथ रचिले तिचा जर विचार केला, तर हें वर्णन खचित मोठें आश्चर्यकारक होय.

बाबर हा पुष्कळ वर्षें वांचून आमरणान्त यावर जे प्रसंग आले, त्यांमध्यें याची एकसारिखी मायाळू व प्रेमळ बुद्धि राहिली होती, आणि आरंभापासून एकसारखा थंडा, मनमिळाऊ स्वभाव, शेवटपर्यंत होता. याला सत्ता व महत्व प्राप्त झाल्यामुळें याचा बुद्धीचें मार्दव जाऊन तिला काठिन्य आलें नव्हतें. तसेंच सृष्टींतील पदार्थांचा

अवलोकनापासून, आणि मननापासून यास जो आनंद होत असे, तो कमी झाला नव्हता. असा याचा स्वभाव राहिला ही त्या ग्रंथांतील खुबी मोठी वेधक होत्ये.

याचा हकीकतीचें भाषांतर करणारा अर्स्किन् साहेब वर्णन करितो, कीं एशियाखंडांतील इतिहासाचा नीरस जगडव्यालामध्यें बाबरासारिखा राजा दिवसांचे दिवस रडत बसला होता, आणि आपला लहानपणचा मित्र मरण पावला ह्मणून मी रडत होतों असें आपणच आपल्या इतिहासांत सांगतो, असा राजा पाहून मन विश्राम पावतें. आपली आई, वगैरे स्त्रीजातीय नातलगाविषयीं हा मोठ्या उत्साहानें वर्णन करितो; जसा कांहीं हा त्यांचा जवळून कधीं हाललाच नव्हता. जेथें याणें आपल्या स्वतांविषयीं वर्णन लिहिलें आहे, तेथें जितकें आपणाविषयीं लिहिलें आहे, तितकेंच बहुधा आपल्या मित्रांविषयीं लिहिलें आहे; त्यांत त्यांचा ह्मणी लिहिल्या आहेत; त्यांना अपाय किती झाले, व दुखणीं किती आलीं, हेंहि सांगितलें आहे; त्यांणीं कोणतीं साहसें केलीं, त्या कथा सांगितल्या आहेत; तशाच केव्हां केव्हां त्यांचा छांदिष्टपणाविषयीं थट्टाहि केल्या आहेत.

एका वेळीं ख्वाजा किलान नावाचा याचा अतिविश्वासू वजीर हा काबूल एथें होता. तेव्हां त्यास बाबरानें सरकारी कामाप्रकरणीं पत्र लिहिलें होतें; तें पुरें झाल्यानंतर, खालीं उभयतांचा दोस्तांविषयीं याणें त्यास गोड लागण्यासारखे कांहीं चुटके सांगितले, आणि शेवटीं लिहिलें, कीं "देवासाठीं या मूर्खत्वाचा लिहिण्याची मला क्षमा कर, आणि या गोष्टी मी लिहिल्या ह्मणून माझाविषयीं तुझा

मनांत वांकडें येऊं देऊं नको." नंतर जसें आपण द्राक्षासव पिणें सोडिलें होतें, तसें **ख्वाजा किलान** याणें सोडावें, ह्मणून पुढें त्यास उपदेश केला आहे; त्याविषयीं याणें असा सारांश लिहिला आहे, कीं "जुने मित्र व सोबती यांबराबर मद्यपान करणें हें मोठें संतोषकारक असे; परंतु आतां दारू पिण्यास **शिर अहमद** व **हैदर कूली** एवढेच तुला सोबती आहेत; याकरितां ती सोडावयास आतां मोठें जड पडणार नाहीं." पुढें त्याच पत्रामध्यें हा लिहितो कीं, हे माझ्या दोस्ता! तुला **काबूलांत** राहावयास मिळालें आहे, ह्मणून मी तुला नशीबवान् मानून तुझा हेवा करितों, आणि पुढें लिहितों कीं "थोडक्याच दिवसांवर एक (**काबूलाहून** आणिलेलें) तरबूद मला कोणी आणून दिलें; तें मी फोडित होतों, तेव्हां मी एथें एकटा पडलों आहें, आणि स्वदेश सोडून एथें प्रवासांत आहें अशा वृत्ति होऊन मला खेद झाला, आणि तें खात असतां मला अश्रुपात झाल्यावांचून राहत ना."

बाबर याणें जर मद्यपान लवकर सोडिलें असतें तर चांगलें झालें असतें; कारण तें विशेष झाल्यापासून याचा आयुष्याची हानि झाली असें समजण्यास मजबूद कारणें आहेत. याचा स्मरणवह्यांमध्यें जशीं लढायांचीं व तहांचीं उत्साहानें वर्णनें केलेलीं आहेत, त्याचप्रमाणें, याचे हे पुष्कळ मद्यपानाचे प्रसंग वर्णिलेले आहेत. हे याचा उच्च स्थितीस अयोग्य; परंतु याचा इतिहासामध्यें अगदीं कमी मनोरंजक असें ह्मणतां येत नाहीं. तशांत अशा ठिकाणीं हा केवळ सरळ भावानें, आणि बरोबरीनें वागत असे; तेणेंकरून यास बादशाहापणाचा विसर पडून, हा

बाबर आहे असें सर्वांस वाटे; तसेंच एकादें शीतळ वन, अथवा पुढें सुंदर प्रदेश दिसण्याजोगी टेंकडीची जागा, अथवा नदीमध्यें नावेंत बसून जात असतां रिकामपणाचा वेळ, अशा पाशांचा ठिकाणीं मन मोहित होऊन वरील प्रसंग घडून येत; तसेंच, अशा समयीं कांहीं शीघ्र कवनें त्या मंडळींत होत; कोणी तुर्की अथवा फारसी भाषेमध्यें बैत ह्मणत; कोणी एकाद्या वेळीं गाणें गात, अथवा कांहीं मस्कऱ्यांचा लढाया चालत; या प्रकारची त्या मद्यपानांचा वेळची स्थिति असे; तेणेंकरून अशा ढंगांचा प्रसंगांचा हलकटपणा नाहींसा होई.

याची कधींहि एका ठिकाणीं स्थिति नसे. पुढें हा ह्मातारा झाला, तेव्हां याणें एकदां ह्मटलें होतें, कीं मी अकरा वर्षांचा झाल्यापासून रमजानचीं उपोषणें कोठेंहि एका ठिकाणीं दोन वेळा केलीं नाहींत. लढाया, व देशाटन, हीं करून जो काळ शेष राही, त्यामध्यें हा शिकार व दुसरे खेळ करित असे; अथवा घोड्यावर बसून मुलकामध्यें लांब फेरफटके करून येई. पुढें याची शक्ति क्षीण होऊं लागल्यावर हा एके वेळीं फिरायास गेला होता, त्या वेळीं इतकी जलदी करण्याचें कांहीं विशेष कारण नसतां, हा दोन दिवसांत काल्पीहून आग्र्यास ( ८० कोश ) आला; आणि त्याच मुशाफरींत दोन वेळा भागीरथी आरपार पोंहून गेला. त्याचप्रमाणें जितक्या वाटेंत नद्या लागल्या त्याहि मी पोंहून गेलों असें याणें लिहिलें आहे. जसें याचें शरीर चपल होतें, तशी याची बुद्धिहि चंचल होती. हा आपल्या राज्याचा कारभार करून, शिवाय पाण्याचे नळ

आणणें; तलाव बांधणें; व अशाच दुसऱ्या सुधारणा करणें; तशींच दूर देशांतील नवीं नवीं फळें, आणि दुसरे पदार्थ आपल्या देशांत आणून उत्पन्न करणें; या कामांमध्यें सार्वकाळ चूर असे. इतकेंहि करून पुष्कळ सुंदर फारसी काव्यें करायास, आणि तुर्की भाषेमध्यें काव्यांची रचना करण्यास यास वेळ मिळत असे. याणें जीं तुर्कींत काव्यें केलीं आहेत त्यांवरून याचा स्वदेशीय कवींमध्यें याचा मोठा मान आहे, असें वर्णन केलेलें आहे.

# प्रकरण दुसरें.

## हुमायून याची पहिली कारकीर्द.

बाबर यास हुमायूनाखेरीज तीन मुलगे होते; त्यांचीं नावें. कामरान, हिंदाल, व मिर्झा अस्करी. त्यांतून कामरान हा काबूल व कंदाहार या प्रांतांचा सुभेदार होता; आणि दुसरे दोघे हिंदुस्थानांत बेकार असत. बाबर याणें आपल्या लहान मुलांस कांहीं हिस्से पाडून दिले नव्हते; त्यावरून त्याचा मनांत राज्याचे विभाग करावयाचे नव्हते, असें संभवतें; तथापि कामरान हा आपल्या वडील भावाचें ऐकेल, असें धोरण दिसलें नाहीं. तशांत मजबूद व लढाऊ अशा लोकांनीं भरलेला असा मुलुक त्याचा हातांत होता; आणि तेथील रयत त्याचा वंशाची पिढीजादी अंकित होती; यामुळें हुमायूनापेक्षां त्याची सोय बरी होती; कारण हुमायूनास आपल्या नवीन मिळविलेल्या व बखेडखोर अशा प्रांतांत बंदोबस्ताकरितां ठेविलेले लोक काढून नेल्याशिवाय, फौज जमविण्यास दुसरा इलाज नव्हता.

बादशाहाचा भाऊ कामरान याचा बंदोबस्त.

या प्रसंगीं ओढून औदार्य आणून आपलें थोडें राज्य सोडण्याचें कबूल करावें, ही हुमायूनास शहाणपणाची गोष्ट दिसून, याणें कामरान याचा पूर्वीचा प्रांतांशिवाय त्यास पंजाब व सिंधुनदावरील देश इतका दिला. तसेंच याणें त्या वेळीं संबळ प्रांताचा सुभ्याचें काम आपला भाऊ

काबूल व हिंदुस्थान हीं दोन्हीं राज्यें निराळीं झालीं.

हिंदाल यास दिलें, आणि मेवात एथील मिर्झा अस्करी यास दिलें. वर सांगितलेले प्रांत कामरान यास दिल्यामुळें, हुमायून याचा हातांत नवीन घेतलेला मुलुक तेवढा मात्र राहिला; परंतु जा मुलुकाचा बळावर तो मुलुक मिळविला, आणि जाचा सहायानें तो राखतांहि येता, तो मूळचा मुलुक याचा हातांतून गेला; तथापि बाबर याची शूर व अनुभवलेली फौज अद्यापि याजवळ होती, आणि त्याचा शक्तीविषयीं लोकांमध्यें जो ग्रह उत्पन्न झाला होता, तेणेंकरून याचें हित झालें, या दोन कारणांमुळें राज्यामध्यें फूट पडल्याचे परिणाम प्रथम दृष्टीस पडले नाहींत.

अफगाण-लोकांचीं बंडें.

पुढें हुमायून हा बुंदेलखंडांत कलिंजर शहरास वेढा घालून बसला होता, त्या वेळीं यास असें वर्तमान लागलें, कीं पूर्वीं बाबन व बेझीद या नावांचा जा अफगाण सरदारांचा बाबर याणें मोड केला होता, त्यांणीं जवानपुर एथें पुनः बंड केलें. तेव्हां हुमायून याणें जाऊन, त्यांचा पराजय करून, त्यांचा जमाव मोडून टाकिला. नंतर हुमायून याचा भावी प्रतिस्पर्धी शीर खान हा काशीजवळचा चुनारगड किल्ला बळकावून बसला होता, त्यावर याणें स्वारी केली; तींत तो किल्ला शीर खानाकडेसच ठेवण्याचें याणें कबूल केल्यावरून, तो यास शरण आला. त्यानंतर हुमायून आग्र्यास परत येता झाला.

इ० स० १५३२, हि० स० ९३९.

गुजराथचा राजा बहादुर शाहा याशीं तंटे.

यापूर्वीं कांहीं दिवसांवर हुमायून याचा एका मेहुण्यानें याचा प्राण व राज्य हरण करण्याकरितां फितुरें केलीं होतीं; तो पुढें गुजराथचा राजा बहादुर शाहा याचा आश्रयास जाऊन राहिला. त्यास

आपल्या स्वाधीन करावा, ह्मणून हुमायून याणें मागणें केलें; तें बहादुर शाहा कबूल करीना त्यामुळें हुमायून यास राग येऊन उभयतांमध्यें स्पर्धा उत्पन्न झाली. पूर्वी दिल्लीचें राज्य मोडून त्यांतून जीं राज्यें उत्पन्न झालीं त्यांत बहादुर याचें मोठें होतें; तेंहि त्याणें अलीकडे पुष्कळ वाढविलें होतें. खानदेश, वऱ्हाड, आणि अहमदनगर एथील राजे आपल्या पदवीस याच्या आश्रय मिळावा ह्मणून यास श्रेष्ठ मानावयास लागले होते; तसेंच बहादुर याणें माळव्याचें संपूर्ण राज्य जिंकून आपल्या राज्यांत मिळविलें होतें. इ० स० १५३२, हि० स० ९४०.

पूर्वी बाबर याचा कारकीर्दीत सुलतान इब्राहिम लोदी याचा चुलता अल्लाउद्दीन हा मोठ्या मसित्धीस आलेला होता. पुढें त्यास बाबर याणें बदक्शान एथें राहण्यास ठिकाण दिलें होतें. वर सांगितल्याप्रमाणें बहादुर व हुमायून यांचीं बोलणीं निकरावर आलीं असतां, तें ठिकाण सोडून तो येऊन गुजराथचा राजाचा आश्रयास राहिला. त्या वेळीं बहादुर याचा व हुमायून याचा तंटा मोठा माजला होता; तशांत बहादुर याचें कुटुंब लोदी वंशाचा कारकीर्दीत वाढलें होतें, आणि खुद्द यासहि एकदां सुलतान इब्राहिम याचा दरबारांत आश्रय सांपडला होता; त्यामुळें आपल्या पिढीजाद्या यजमानांवर उपकार करण्याचा बुद्धीनें, आणि हुमायून याचा सूड घेण्याकरितां आपल्या सत्तेचा व भरभराटीचा गर्वानें उद्युक्त होऊन, त्याणें, हुमायून याजबराबर लढाई उघडपणें सुरू न करितां, अल्लाउद्दीनास पुष्कळ पैसा दिला; तेणेंकरून त्याणें थोडक्याच वेळांत मोठी फौज जमवून, तिजवर आपला मुलगा तातार खान यास

नेमून, आग्र्यास पाठविली. हें जें काम बहादुर शाहा याणें केलें, हें वास्तविक राजरीतीस विरुद्ध असून अन्यायाचें कृत्य होय. पुढें त्या घाईघाईनें जमविलेल्या फौजेचा तसाच लवकर मोड झाला. बहुतेक लश्कर तातार खान यास सोडून गेलें आणि कांहीं लोक इमान धरून राहिले होते त्यांस घेऊन लढत असतां तातार खान हा मरण पावला.

इ० स० १५३४, हि० स० ९४१.

याप्रमाणें आपला जय झाल्यावरून अथवा कदाचित् पूर्वींचा बेतावरून हुमायून हा बहादुर शाहा याचा सूड घेण्याकरितां आग्र्याहून निघाला. बहादुर याची त्या वेळीं मेवाडचा राण्याबरोबर लढाई चालत असून, तो चितूरचा किल्ल्यास वेढा देण्याचा कामांत अगदीं गुंतून गेला होता; त्या वेळीं जर शत्रु त्यावर हल्ला करिता, तर चांगली संधि होती; परंतु पाखंडी लोकांबराबर मुसलमान राजा लढत असतां त्यास उपद्रव देणें, हें धर्मद्रोहाचें काम आहे, अशा बहादुर याचा तकरारीमुळें, अथवा याचा स्वतांचाच ढिलेपणामुळें, याणें आपला मुक्काम केला. पुढें बहादुर याणें तो किल्ला घेतला, आणि मंडलेश्वर एथें छावणीस खंदक देऊन हुमायून याशीं प्रसंग करण्याकरितां तो तयार झाला. त्या वेळीं बहादुर याचा तोफखान्यावर कन्स्तांतिनोपल् एथील एक तुर्की सरदार होता; तसेच कांहीं फिरंगी लोकहि त्याचा कैदेंत होते, ते गोलंदाजपणाचें काम करित असत; त्यामुळें आपला तोफखाना चांगला आहे या बुद्धीनें

हुमायून याणें गुजराथेवर स्वारी करून तो प्रांत घेतला. इ०स० १५३४, नोवेंबर. हि० स० ९४१, जमादिअल् अव्वल्.

इ०स० १५३५ मार्च. हि०स० ९४१ रमजान.

बहादुर तसा राहिला असावा. इतकेंहि त्यास अनुकूळ होतें, तथापि त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं; कारण त्याचा छावणींत अन्नसामग्री वगैरे येणें, तीं शत्रूंनीं बंद पाडिली, तेणेंकरून त्यास तेथें राहवेनासें झालें; पुढें दुष्काळ पडून आपणास लवकरच शरण जावें लागेल असें त्यास वाटून, त्याणें आपल्या तोफा फोडून टाकिल्या, आणि आपल्या लश्कराची वाट तें पाहिजे तशी करू ह्मणून त्यास सोडून, बहुधा एकटाच रात्रीचा मांदू एथें पळून गेला

त्याचा लश्कराची लागलीच वाताहत झाली, आणि बहादुर याचाहि मांदू एथें शत्रूंनीं फार लगट केल्यामुळें, तो चंपानेरास पळाला, आणि तेथून खंबायतेस निघून गेला. या वेळीं थोडक्या लोकांनिशीं हुमायून हा त्याचा पाठलाग करण्याकरितां स्वतः निघाला होता. हा जा दिवशीं संध्याकाळीं खंबायतेस पोंचला, त्याच दिवशीं बहादुर हा, काठेवाडचा अगदीं दक्षिणटोंकास दीव ह्मणून किल्ला आहे, तेथें जाण्याकरितां निघून गेला होता.

(१) हुमायून हा खंबायतेस छावणी देऊन असतां एका रात्रीस कोळी लोकांनीं याजवर हल्ला केला, आणि अगदीं गडबड न करितां मोठ्या हुशारीनें याचा छावणींत शिरून, खुद्द हुमायून याचा डेऱ्यावर छापा घातला, आणि याचें बारबरदारीचें सामान आणि पुस्तकें हीं लुटून नेलीं. त्या पुस्तकांत "तैमूरलंगाची तवारिख" या नावाचा ग्रंथाची एक चांगली प्रत होती ती गेली, व ती पुढें कोणचा रीतीनें हातीं लागली याविषयीं त्याचा वेळचा इतिहासकारांनीं वर्णन केलें आहे, एवढ्या योग्यतेचें हें पुस्तक होतें. हे जंगली लोक अद्यापि अशी लुटालुट करितात, याविषयीं यांची प्रसिद्धि आहे. या बेकायदा पहाडी लोकांनीं आपला अवमान केला, ह्मणून हुमायून याणें सूड घेण्याकरितां बिचाऱ्या निरपराधी खंबायत शहराची लूट करविली.

यांप्रमाणें बहादुर शाहा हातीं न सांपडला, तेव्हां मूळ हेतु सिद्धीस न गेल्यामुळें हुमायून काठेवाड सोडून वसाहत झालेला गुजराथ प्रांत घेण्याकरितां निघाला. तो सपाट प्रदेश लवकरच याचा ताब्यांत आला, परंतु चंपानेरचा पहाडी किल्ला हातीं येई तों पावसाळा जवळ आला; शेवटीं एका रात्रीस एका दरवाजावर बाकीं सर्व फौज हल्ला करित असतां ३०० निवडक लोक, एक अगदीं उभा सोट किल्ल्याचा तटाचा खडक होता त्यांत तिरव्याचे भाले मारून, त्या भाल्यांवरून एकामागून एक तट चढून गेले, आणि तो किल्ला घेते झाले[2]; त्या तीन शांत खुद्द हुमायून होता.

इ० स० १५३५, आगस्ट. हि० स० ९४२, सफर

चंपानेर घेतल्यावर शीर खान याणें बखेडा केल्याचें हुमायून यास लवकरच वर्तमान लागलें, त्यामुळें नवीन घेतलेल्या प्रांताचा बंदोबस्तास याणें आपला भाऊ मिर्झा अस्करी यास ठेविलें, आणि आपण आग्र्यास निघून गेला. याणें गुजराथ

मोगललोकांस गुजराथेंतून हाकून लाविलें.

२ तो किल्ला घेतल्यावर पाहूं लागले तों त्यांत बहादुर याचें जेथें द्रव्य लपवून ठेविलेलें होतें तें ठिकाण एका सरदारास मात्र ठाऊक होतें. ह्मणून त्याचे हाल करून त्यापासून तें गुह्य काढावें असें कोणी सुचविलें; तेव्हां हुमायून ह्मणाला, कीं त्यापेक्षां तुह्मी मद्याचा प्रयोग केला, तर चांगलें होईल; ह्मणून त्या सरदाराचें चांगलें आगतस्वागत करावें आणि आपल्या सरदारांतून एकानें त्यास मेजवानीस बोलवावें अशी याणें आज्ञा केली. याप्रमाणें त्याजवर ममता केल्यामुळें त्याचा अंतःकरणास द्रव येऊन मद्यपानानें आनंदांत निमग्न होऊन त्याणें त्या मेजवानी करणाऱ्या सरदारास कांहीं अनमान न करितां सांगितलें, कीं अमुक तलावांतील पाणी आटविलें असतां, त्यामध्यें खालीं भुयार आहे, त्यांत सर्व द्रव्य सांपडेल. पुढें त्याचा सांगीप्रमाणें हुमायून याणें केलें, तेव्हां त्याणें सांगितल्याप्रमाणें अतिशय सोनें व रुपें सांपडलें.

सोडिली नाहीं, इतक्यांत मागें ठेविलेल्या सरदारलोकांमध्यें तंटे उद्भवले; त्यांत कितीएक लोक बेदिल झाले, कितीएक फितूरें उत्पन्न झालीं, त्यांतून परिणामीं मिर्झा अस्करी यास गादीवर बसविण्याचा बेत ठरला. या बखेड्यांनीं बहादुर याचें काम साधलें, आणि त्या वेळीं मोगललोकांची गुजराथेंत इतकी नातवानी झाली होती, कीं कांहीं गडबड न करितां ते निमूटपणें गुजराथ सोडून गेले, आणि माळव्यावर कोणी शत्रु नसतां तोंहि सोडून गेले.

इ० स० १५३५।३६ हि० स० ९४२.

हुमायून हा आग्र्यास परत आल्यानंतर शीर खान यावर त्याणें स्वारी केली. त्या पुरुषानें बंड केलें तें तडीस गेलें, आणि पुढेंहि त्याणें मोठा पराक्रम केला, याकरितां कांहीं त्याचा पूर्वींचा इतिहास सांगतों. शीर खान हा अफगाणिस्थानांतील एक गृहस्थ इब्राहिम खान याचा नातू होता. इब्राहिम हा घोरचा राजवंशाचे अवलादींतील आपण आहों असें ह्मणत असे; परंतु हा बहुधा त्या जातीचा मात्र असेल, असें संभवतें. इब्राहिम आणि त्याचा मुलगा हसन या दोघांसहि त्यांचाच लोकांपैकीं मोठ्या कुळांतील मुली केलेल्या होत्या. हसन यास पांच शें घोडे ठेवण्याबद्दल बहार प्रांतांत सहसेराम एथें जहागीर होती. त्याचा अफगाणी स्त्रीपासून त्यास शीर खान, व निजाम खान असे दोन पुत्र झाले होते; परंतु पुढें आपल्या उपपत्नीचा नादीं लागून, त्याणें आपल्या स्त्रीस सोडून दिलें, आणि तिचा मुलांची वास्तपुस्त सोडिली. पुढें शीर खान स्वतांचा बुध्दीनें चालण्याजोगा मोठा झाला, तेव्हां

शीर खान सूर याचें लहानपणचें चरित्र व त्याची बढती.

हा आपल्या बापास सोडून जवानपुर एथें गेला, आणि तेथील सुभेदार याचा तैनातीस शिपायाची चाकरी धरून राहिला. मागाहून याचा बापानें यास शिकविण्याकरितां घरीं पाठवावें ह्मणून त्या सुभेदारास पत्र लिहिलें; परंतु सहसेराम यापेक्षां जवानपुर एथें विद्या शिकण्याचा चांगल्या सोई आहेत, अशी शीर खान याणें सबब सांगितली; आणि हा तेथें मनापासून संकल्प करून राहिला, व अभ्यासाकडे आपलें लक्ष लावून इतिहास व काव्यें अवगत करिता झाला. यास सादी याचीं सर्व काव्यें तोंडानें पाठ येत असत, आणि शिवाय दुसऱ्याहि प्रकारची पुष्कळ माहिती याणें करून घेतली होती. पुढें यावर बापाची पुनः कृपा होऊन याचा सावत्र भाऊ सुलेमान हा मोठा होईपर्यंत त्याचा जाहगीरीचा कारभार हाच पाहत असे. पुढें सुलेमान मोठा झाल्यावर याची स्थिति यास दुःसह होऊन हा आपला सख्खा भाऊ निजाम यासुद्धां निघून गेला, आणि दिल्लीचा पादशाह सुलतान सिकंदर[१] याचा चाकरीस राहिला; पुढें बाप मरेपर्यंत हा दिल्ली एथेंच होता; बापामागें सहसेराम एथील जाहगीर यास मिळाली. मग इ०स० १५२६ त सुल्तान इब्राहिम याचा पराजय झाल्यानंतर, महम्मद शाहा लोहाणी हा जवानपुर व बहार एथील राजा होऊन बसला होता, त्याचा चाकरीस राहून याणें पुष्कळ खवदव केली. कांहीं वेळपर्यंत महम्मद शाह लोहाणी याची याजवर मेहेरबानी होती, परंतु याचा सावत्र भाऊ सुलेमान याणें लबाडीनें याची वडिलार्जित जाहगीर पुनः बळकाविल्यामुळें, याणें त्रासून महम्मद शाहाचें दरबार सोडिलें,

(१) सिकंदर हा इ० स० १५१७ त मरण पावला.

आणि बाबर याचा पक्ष उचलून जवानपुरचा सुभेदार जुनीद यास जाऊन मिळाला ( इ० स० १५२७ ). जुनीद याचा मदतीनें बहारचा पहाडांत याणें कांहीं फटिंग लोक मिळविले, आणि आपली जाहगीर परत घेऊन, आपण बाबर याची रयत असें ह्मणवून महम्मद शाहा लोहाणी याचा मुलुकांत हल्ले करून लुटूं लागला. या सुमारास (इ०स०१५२८) हा बाबराचा भेटीस गेला, आणि त्याबराबर चंदेरीस जाता झाला. बाबर याणें याचा मुलुक याकडे काईम करून बहार प्रांतांतील लश्कराचें काम याजवर संपविलें.

दुसऱ्या वर्षीं ( इ० स० १५२९ ) महमूद लोदी याणें बहार प्रांत घेतला; तेव्हां कांहीं जरूरीचा कारणावरून, अथवा स्वदेशस्थ लोकांचा पक्षास मदत करावी या हेतूनें हा लोदीलोकांचा लश्करांत जाऊन मिळाला. पुढें महमूद याचा फौजेची वाताहत झाल्यावर, पुष्कळ सरदार लोक बाबरास शरण गेले, त्यांत शीर खान हाहि होता. ( एभिल् इ०स०१५२९). त्या वेळीं महम्मद शाहा लोहाणी हा मरण पावला होता; त्याचा लहान पुत्र जल्लाल हा आपल्या आईचा हुकुमतींत असे, तो त्या वेळीं बंगालचा फौजेचा बराबर होता, तोहि बाबरास शरण आल्यावरून, त्याणें त्यास आपल्या तर्फेनें पुष्कळ अधिकार दिला; तथापि त्याची आई दूदू इचाच तंत्रानें तो चालत असे; त्या दूदूवर शीर खान याचा अतिशय पगडा असे, त्यामुळें ती मरण पावल्यावर जल्लाल हा त्या लोभी शीर खानाचा संपूर्ण तंत्रांत राहिला, तेव्हां शीर खान याणें बहार आपल्या हस्तगत करून घेतला, आणि चुनारगडहि हाताखालीं घातला. याच वेळीं, किंवा पुढें

शीर खान याणें बहार प्रांत घेतला.

कांहीं दिवसांनंतर, त्याहिपेक्षां मोठा रोठसनामक किल्ला याणें मिळविला[४].

याप्रमाणें हुमायून याचा कारकीर्दीचा अवेलीसच शीर खान याचा भरभराट झाला होता. पुढें कामरान व हुमायून यांचा वाद मिटल्यावर, हुमायून यास प्रांतांतील काम पाहण्यास फुरसूद मिळून याणें चुनारगडावर स्वारी केली (इ०स० १५३२). तो प्रकार पूर्वींच लिहिण्यांत आला आहे. त्या स्वारींत शीर खान याणें बादशाहाचें वर्चस्व कबूल केलें, आणि आपल्या मुलाचा हाताखालीं कांहीं स्वार देऊन त्यास चाकरीस ठेवितों असेंहि कबूल केलें. पुढें जेव्हां हुमायून हा बहादुर शाहावर जावयास निघाला, तेव्हां त्या मुलानें संधि पाहून आपला पाय काढला. तेव्हांपासून पुढें हुमायून हा गुजराथचा कारभारांत अगदीं गुंतला होता; तो परत येई तों शीर खान याणें बहार देश पुरा मिळवून, बंगाल्यावर स्वारी करून तें श्रीमान् राज्य बहुतेक तोंडांत टाकिलें होतें.

आणि बंगालाहि घेतला.

शीर खानाचा हातांतून आपणास सोडवावें ह्मणून जल्लाल लोहाणी याणें बंगालचा राजास मदतीस बलाविलें,

(४) हा किल्ला एका हिंदु राजाकडे होता. (आपल्या बायका मुलांस राहण्यास आश्रय पाहिजे, ह्मणून पुढें त्यांस राहवयास जागा देतों असें शीर खान याणें त्याकडून कबूल करविलें.) मग बुरख्यांचा डोल्यांतून हत्यारबंद शिपाई बसवून, या बायका आहेत असें कपट करून, त्यांचा किल्ल्यांत प्रवेश करविला. मग सहजच तो किल्ला पाडाव झाला. ही युक्ति गप्पेसारखी दिसत्ये; परंतु ती चालविण्याजोगी नीट आहे असें समजून जेव्हां अर्वाचीनकाळीं दौलताबादचा सुभेदारानें विश्वास घात करून बुसीनामक फ्रेंच सरदारास त्या मजबूद किल्ल्यांत येण्यास मार्ग दिला, तेव्हां बुसीनें हीच युक्ति केली होती.

आणि त्याचा सहायानें आपला बेत बहुतेक सिद्धीस नेला होता; परंतु शीर खान याणें बंगालचा राजाशीं लढाई करून आपला गेलेला मुलुक लवकरच घेतला, आपल्यावर आलेला हल्ला परतविला, आणि गौडनामक जी बंगालचा राजाची राजधानी तीस वेढा दिला. त्या कामांत तो गुंतला असतां हुमायून गुजराथेंतून परत आला; तेव्हां शीर खान याची सत्ता वाढून दृढ झाली असतां आपल्या राज्यास अपाय आहे, आणि त्याची अशी धांदल झाली आहे तों त्याजवर हल्ला केला असतां आपलें कार्य साधेल, असें यास एकदम वाटून हा मोठी फौज घेऊन आग्र्याहून निघाला, तो काशीजवळ चुनारगडापर्यंत पोंचे तों वाटेंतील देशांत कांहीं बखेडा नसून तो स्वस्थ होता.

हुमायून याणें त्यावर स्वारी केली.

आपल्या स्थितीमध्यें आपणास किती धोका आहे हें शीर खान यास पुरें समजलें होतें, आणि त्याणें दीर्घ दृष्टीनें व तजविजीनें तो टाळण्याविषयीं पूर्वींच बेत केला होता; हिंदुस्थानाचा पूर्वींचा इतिहासांत कधींहि याप्रमाणें झालेला प्रकार आढळत नाहीं. आपणास नवीन शत्रु उपद्रव देण्यास येण्यापूर्वीं बंगालप्रांत पुरा आपल्या हातीं आणण्यास फुरसूद मिळावी, हा त्याचा पहिला उद्देश होता. यास्तव त्याणें चुनारगडावर मजबूद लश्कर ठेवून त्या लोकांनीं झटून युद्ध करून हुमायून याची पुढें गति कुंठित करावी अशीं त्यांस सर्व साधनें देऊन ठेविलीं होतीं.

बहार, व बंगाल, यांचें लश्करी दृष्ट्या स्वरूप.

चुनारगड हा काशीजवळ एका कड्यावर बांधलेला आहे; विंध्याद्रीचा कांहीं भाग जो मिर्झापुराजवळ

भागीरथीपर्यंत आला आहे त्याचा जसा कांहीं हा तुकडाच आहे. तेथून रोठस व शिरघतीचा किल्यांचा बाजूनें ते डोंगर पश्चिमेकडे मागें मागें जातात; ते पुढें पुनः भागलपुराजवळ गंगेजवळ येऊन तेथून पुनः गंगेस लांब सोडून तेथून त्या पर्वतांचा समोर दक्षिणेकडे विस्तार झाला आहे. यामुळें बहार व बंगाल या प्रांतांचा वायव्येकडील सर्व प्रदेश या पर्वतांहीं वेष्टित आहे; आणि यांतून जाण्यास गंगेचा दक्षिण-किनाऱ्यानें दोहों ठिकाणीं मार्ग आहे; एक चुनारगडाजवळ, आणि दुसरा भागलपुराचा पूर्वेस सिकरगल्ली एथें. हे पर्वत उंच नाहींत, परंतु नीच असून जंगलानें भरलेले आहेत.

चुनारगडास वेढा.

हुमायून हा स्वतः गंगेचा किनाऱ्यानें जात होता, आणि आपल्या तोफा व लढाईचें सामान हें त्या नदींतून नावांनीं नेत होता, त्यामुळें यास आरंभीं चुनारगडास वेढा देणें प्राप्त झालें. त्याप्रमाणें याणें वेढा देऊन जा तटाशीं जावयास जमीनीकडचा बाजूनें वाट होती त्या तटास सुरुंग लावण्याचे यत्न केले; त्याचप्रमाणें नदीकडील बाजूनें मारा घेण्याकरितां मुद्दाम तरते बुरूज करून तोफा आणिल्या होत्या. परंतु एवढी तयारी असूनहि याचा हल्ला फुकट गेला. पुढें किल्लेकऱ्यांनीं पुष्कळ महिनेपर्यंत टिकाव धरल्यावर, आपणास कोणी सोडविण्यास येण्याची आशा नाहीं असें त्यांस माहित असल्यामुळें, शेवटीं त्यांणीं तो किल्ला हुमायून याचा स्वाधीन केला. पूर्वीं गुजराथचा राजा बहादुर शाहा याचा तोफखाना जा रूमी खान नावाचा तुर्की सरदारानें इतक्या चांगल्या स्थितीस आणिला, तोच पुढें बाबर याचा चाकरीस राहिला होता; आणि त्याणेंच वरील वेढ्याचें

काम चालविलें होतें. त्या काळीं गोलंदाजीचा विद्येचें एवढें महत्व असे, कीं चुनारगडावरील गोलंदाजांनीं पुनः कांहीं उपद्रव करूनये ह्मणून, किंवा त्यांणीं आपलें नुकसान केलें ह्मणून सूड घेण्याकरितां, त्यांपैकीं तीन शें गोलंदाजांचे उजवे हात कलम केले.

चुनारगड घेतल्यावर हुमायून हा गंगेचा कांठानें पुढें चालला. पाटणा एथें पोंचण्याचा पूर्वीं बंगालचा राजा महमूद हा यास वाटेनें भेटला; त्यास शीर खान याणें नुकतेंच त्याचा राज्यांतून हाकून दिलें होतें, आणि शेवटचा लढाईत जो त्यास वार झाला, तो अद्यापि दुखतच होता.

हुमायून सिकरगल्लीचा खिंडीजवळ आला, तसा ती खिंड घेण्याकरितां तो एक मजबूद टोळी पुढें पाठविता झाला; परंतु ते लोक पोंचत तों तेथें शीर खान याचा मुलगा जल्लाल खान हा पूर्वींच ठाणें धरून होता, त्याणें यांजवर हल्ला करून यांचें पुष्कळ नुकसान करून यांस मागें हटविलें. हा आपला मागें पाय आला तो नीट करण्याकरितां आपली मोठी फौज घेऊन हुमायून जलदीनें पुढें गेला; परंतु पाहतो तों शत्रु ती खिंड सोडून गेले, आणि बंगालचा राजधानीचा मार्ग खुला आहे; असें पाहून यास सानंदाश्चर्य झालें.

याप्रमाणें हुमायून आपलें लश्कर घेऊन पुढें जात असतां यास अडथळा करावा, असा मूळींच शीर खान याचा बेत नव्हता. त्याचा बेत प्रथमपासून नैर्ऋतीकडील पहाडी मुलुकांत जाऊन स्वस्थपणीं राहण्याचा होता; त्या हेतूस्तव त्याणें आपलें कुटुंब व सर्व मोलवान् पदार्थ रोठस किल्ल्यांत नेऊन ठेविले

हुमायून याशीं लढण्याचे शीर खान याचे बेत.

होते. चुनारगड यास वेढा देण्यास हुमायून यास पुष्कळ दिवस लागले, तितक्यांत गौड शहर खालीं करून, बंगालचा राजा महमूद याशीं मोठें युद्ध करून त्याचा साफ मोड करून टाकण्यास, त्यास संधि सांपडली. त्या लढाईत मिळविलेलें जें लुटीचें द्रव्य व लढाऊ सामान, तें रोठस किल्ल्यामध्यें न्यावयास, व सपाट प्रदेशाचा आपल्या इच्छेप्रमाणें बंदोबस्त करावयास त्यास कांहीं आणखी फुरसूद पाहिजे होती; ह्मणून हुमायून यास दिसगत लागे असें करण्यास त्याणें आपला मुलगा जल्लाल खान यास वर सांगितल्या खिंडींत ठेविलें होतें; परंतु त्याणें हुमायूनाबराबर मोठी लढाई न करितां, शेवटीं पहाडांमध्यें जाऊन आपल्या बापास मिळावें अशी त्याला आज्ञा झाली होती. त्याप्रमाणें पुढें कांहीं हरकतीशिवाय हुमायून याणें गौड शहर घेतलें. इतक्या सुमारास पावसाळ्याचा भर झाला, आणि सर्व गंगानदीचें तळवट एक जळमय होऊन गेलें; जेथें गंगेचा पुराचें पाणी गेलें नव्हते, तेथेंहि लहान लहान ओहोळ व नद्या यांस पूर येऊन उतार नाहींसे झाले होते, त्यामुळें बंगाल्यांत लढाई करणें अशक्य होऊन, उत्तरहिंदुस्थानामधील जाण्यायेण्याचे मार्ग बंद झाल्यामुळें तिकडील राज्याचा बंदोबस्त ठेवण्यासहि तशीच मुस्कील पडली. त्यामुळें पुष्कळ महिनेपर्यंत हुमायून यास अगदीं रिकामें राहवें लागलें; त्या मुदतींत बंगालचा ओलसर व गरम हवेनें याचा लश्करी लोकांची हुशारी खचली; आणि पुढें पावसाचा टोंभ संपल्यावर रोगाचा सांथीचे दिवस येतांच याचें लश्कर विरघळत चाललें. जसे रस्ते वाहूं लागले, तसे पुष्कळ लोक

हुमायून याणें गौड शहर घेतलें; पर्जन्य काळामुळें याचा अडचणी.

फौजेतून पळून जाऊं लागले. शाहजादा हिंदाल हा उत्तरबहारप्रांतांत बंदोबस्ताकरितां ठेविलेला होता, तो तर पावसाळा संपण्यापूर्वींच निघून गेला.

हें वर्तमान तिकडे होत आहे, तों इकडे शीर खान याणें आपल्या दडालेल्या ठिकाणां-तून निघून बहार व काशी हीं घेतली, चुनार-गड पुनः हस्तगत करून घेतला, जवानपुर शहरास वेढा दि-ला, आणि गंगेचा मार्गानें कनोजपर्यंत आपलीं ठाणीं बस-विलीं. पुढें लढाई सुरू करण्याची मुसूम आली, तेव्हां हु-मायून पाहतो तों आग्र्यास बातमी पाठविण्याचा मार्ग शत्रू-नें पुनः बंद केला, तेव्हां यास नवीन घेतलेल्या प्रांतांत बं-दोबस्ताकरितां थोडीशी फौज ठेवून, बाकी राहिलेली आप-ली दुर्बल झालेली फौज बराबर घेऊन, लढाई मारून आ-ग्र्यास जाण्याचा यत्न करणें भाग आलें.

शीर खान याचा उद्योग.

याप्रमाणें सफाईची गोष्ट करावी किंवा नाहीं, यावि-षयीं कांहीं वेळ हा विवंचना करित राहिला; आणि पुढें परत येण्यास निघाला तों अर्धा उ-न्हाळा निघून गेला. कूच करण्यापूर्वीं बाबर याचा मुख्य सरदारांपैकीं खान खानान लोदी नावाचा स-रदाराबराबर पुष्कळ फौज देऊन याणें पुढें पाठविली; परंतु तें लश्कर मोंगीर एथें पोंचेपर्यंत शीर खान याणें त्याजवर कांहीं लोक पाठविले; व त्यांणीं अकस्मात् छापा घालून त्याचा पराजय केला. पूर्वीं शीर खान हा मागें पुढें धोरण पाहून वर्तत असे, तो आ-तां साहसास प्रवृत्त होऊं लागला, आणि आ-पण मांडलेल्या प्रसंगामध्यें आपला जय होईल

हुमायून परत आला.

शीर खान आपणास बादशाहा ह्मणवूं लागला.

अशी आपली खातरी आहे असें दाखविण्याकरितां, त्याणें इतक्यांतच बादशाहा असा किताब घेतला.

या स्थितींतून आपली सुटका करण्याविषयीं यत्न करण्याची हुमायून यास इच्छा उत्पन्न होण्यास पूर्वींच सबळ कारणें होतीं; त्यांतूनहि सांप्रत जीं वर्तमानें आग्र्यास होत चाललीं होतीं, त्यांची यास बातमी कळून याचा धीर नाहींसा झाला असावा; परंतु पुढें पाटणा व काशी यांचामध्यें बक्सार ह्मणून शहर आहे, तें सोडून हा पुढें चालिला, इतक्यांत जवानपुरचा वेढा उठवून, शीर शाहा हा जलदीनें कूच करून आपल्या परत जाण्याचा मार्गांत आडवा आला, असें याणें पाहिलें. त्या दिवशीं शीर शाहा याणें १७ $\frac{1}{2}$ कोशांचें कूच केलें होतें, याकरितां त्याचा फौजेचा थाक जिरला नाहीं, तों तिजवर हल्ला करावा, अशी हुमायून याचा लोकांनीं यास मसलत दिली; परंतु असें एकदम करणें हें फार जोखमाचें काम असें यास दिसलें; आणि मग दुसऱ्या दिवशीं पाहतो तों शीर शाहा याणें आपल्या छावणीसभोंवता खंदक खणवून मजबूदी केली; तेव्हां त्याजवर हल्ला करून, अथवा एरव्हींहि त्याचा लश्कराजवळून जाण्यांत आपला निभाव लागेल असें यास दिसलें नाहीं; यास्तव याणेंहि आपल्या छावणीस खंदक केला, आणि आपण गंगेचा पलीकडचा तर्डीनें निघून जावें ह्मणून नावा जमवून गंगेस पूल बांधण्याचा आरंभ केला. यास जितकी दिवसगत लागे, तितकी शीर शाहास इष्टच होती; ह्मणून तो सुमारें दोन महिने हुमायून याचा वाटेस गेला नाहीं. पुढें जेव्हां नावांचा पूल संपण्या जवळ जवळ

तो हुमायून यास मार्गांत आडवा आला.

आला, तेव्हां एका दिवशीं शीर शाहा याणें आपली छावणी उभी ठेवून, आपलें कृत्य शत्रूंस न समजावें ह्मणून तेथें तितक्यापुरते लोक ठेवून, आपण स्वतः आपल्या निवडक लोकांनिशीं हुमायून याचा ठाण्याचा पिछाडीस गुप्तपणें कूच करून गेला; आणि रात्रीस परत येऊन सूर्योदयाचा सुमारास तीन टोळ्यांनीं हुमायून याजवर हल्ला करून याचा छावणीवर अचंबित छापा घालता झाला. हुमायून यास घोड्यावर बसावयाची मात्र फुरसूद सांपडली, तथापि शत्रुबरोबर एकवार तरी लढाई मारावी अशी याची मर्जी होती; परंतु याचा परिवाराचा लोकांनीं, तुह्मी आपला स्वतांचा बचाव करावा, असा यास आग्रह केला; शेवटीं याचा एका मुख्य सरदारानें याची लगाम धरून, जसा कांहीं जबरीनें, यास गंगाकांठीं दवडिला. वर सांगितल्याप्रमाणें गंगेचा पूल पुरा झाला नव्हता, आणि त्या वेळीं विचार करायास फुरसूदच नव्हती; तेव्हां हुमायून याणें आपला घोडा एकदम नदींत दाबिला; परंतु समोरचा तडीस हा जाऊन पोंचेपर्यंत, याचा घोडा थकून बुडाला, आणि त्याचप्रमाणें याचीहि गति झाली असती; परंतु एक पखालची आपली पखाल फुगवून तिचा आधारानें नदी उतरून जात होता, त्याणें यास मदत करून आपल्या पखालीवर घेऊन तडीस लाविलें. याप्रमाणें बचाव झाल्यानंतर, हुमायून हा अगदीं थोड्या लोकांनिशीं काल्पीचा मार्गानें आग्र्यास पळाला; याचा मागें याचा फौजेंतील बहुतेक लोक शत्रूंचा तलवारींखालीं, अथवा नदीमध्यें बुडून मरण पावले. आपल्या राणीचें संरक्षण करण्याविषयीं हुमायून याणें

त्याणें याचा पराजय करून याचा फौजेची वाताहत केली.

शिकस्त केली होती, परंतु तिला शत्रूंनीं घेरून धरिलें; पुढें शीर शाहा याणें तिचा मोठ्या तजविजीनें सन्मान राखून, प्रथम संधि मिळतांच तिला निर्भय स्थानीं पाठविलें. हा मोठा अपाय इसवी सन १५३९ चा जून महिन्याचा अखेरीस झाला.

हि०स० ९४६, सफर चंद्र ६. इ०स० १५३९, जून ता० २६.

हुमायून याचा मोड झाला असतांहि हा आघ्यास आल्यामुळें मोठें काम झालें; कारण हा बंगाल्यांत अटकून राहिला होता, तेव्हां शाहजादा हिंदाल याणें आपले आश्रित आया एथें जमा करायाचा कारखाना चालविला होता; पुढें बंगाल्यांतून पळून आलेले हुमायून याचा फौजेंतील लोक त्यास मिळाल्यावर त्याणें प्रसिद्धपणें बंड केलें. इकडे हुमायून याचा कारभाऱ्यांनीं शाहजादा कामरान याजवळ मदत मागितल्यावरून बाहेरून हुमायून यास मदत करावयास, परंतु आंतून साधल्यास आपलें घोडें पुढें सरसावण्यास सांपडेल ह्मणून आपणहि जवळ असावें या हेतूनें, तो लागलाच काबूलाहून निघाला. नंतर हुमायून आल्यावर हे सर्व बेत ठिकाणचा ठिकाणीं राहिले. कामरान याणें रदबदली केल्यावरून हिंदाल यास हुमायून याणें क्षमा केली; मग ते तिघेहि भाऊ आपणा सर्वांचा शत्रु जो शीर शाह त्याचा मोड करण्याकरितां एकत्र झाले.

हुमायून हा आपलें झालेलें नुकसान नीट करून घेण्याचा खटपटींत होता, तेव्हां शीर शाह हा आपलें उत्तरहिंदुस्थानांतील राज्य राखून स्वस्थ होता; पुढें त्याणें बंगाल पुनः ताब्यांत घेऊन, आपल्या सर्व मूळचा देशाची

नीट व्यवस्था केली.

या कामास उभय पक्षीं सुमारें आठ नऊ महिने लागले. पुढें कामरान हा लाहोरास गेला. त्याणें हुमायून याचा कुमकेस आपले ३००० लोक ठेविले; त्यांसुद्धां आपली फौज घेऊन मुसलमानी सालचा अखेरीचा सुमारास, हुमायून हा पुनः आग्र्याहून निघाला; इतक्यांत शीर शाह कनोजचा समोर गंगेचा कांठीं येऊन ठेपला होता.

इ० स०, १५४०, एप्रिल, हि० स० ९४६, स्तिल्काद.

त्या वेळीं एकमेकांस लढाई करण्यास कांहीं सुलभ पडूं देऊं नये, असा उभय पक्षीं विचार दिसत होता. शेवटीं तेमूरलंगाचा वंशांतील सुल्तान मिर्झा नावाचा शाहजादा ज्याणें पूर्वी बंड केलें होतें, तो आपल्या लोकांसुद्धां हुमायून याची छावणी सोडून, शत्रूकडे फितूर झाला. त्याचें पाहून दुसरेहि लोक असेंच करितील असें धोरण दिसूं लागल्यावरून, हुमायून याणें कांहीं तरी निकाल करावा असा निश्चय केला आणि गंगेवर जो नावांचा पूल बांधिलेला होता त्यावरून उतरला. पुढें दोन्ही फौजांची लढाई झाली, तींत याचा लोकांचा अगदीं मोड होऊन, त्यांस शत्रूंनीं गंगेंत पळविलें; स्वतः हुमायून याजवर मोठा प्रसंगच गुजरला; याचा घोडा घायाळ झाला होता, त्यामुळें हा मारला जाता, अथवा शत्रूंचा हातीं सांपडता; परंतु दैववशात् यास एक हत्ती सांपडला, त्यावर हा बसला; परंतु त्याचा माहात कांहीं केल्या गंगानदी पोहून हत्तीस नेण्याचें कबूल करीना. तेव्हां बादशाहानें, त्याचा बसावयाचा जाग्यावरून त्यास मानेवर

दुसरी लढाई.

शेवटीं हुमायून याचा पराजय झाला. इ० स० १५४०, ता० १६, मे. हि० स० ९४७, मोहरम चं० १०.

हा पळाला. लोटून दिलें, आणि त्या हत्तीवर एक खवास होता त्यास त्याचा जागीं बसविलें. मग त्या खवासानें हत्तीस नदीपार नेलें; पलीकडील तडीस गेले, तों तो किनारा उंच तुटलेला होता, त्यामुळें हत्तीला वर चढतां येईना; तेणेंकरून हुमायून मरून गेला असता; परंतु दोन शिपाई लोक दैववशात् तेथें पोंचले होते, त्यांणीं आपलीं पागोटीं एका ठिकाणीं बांधून एक शेवट याकडेस टाकिला; तेणेंकरून हा पलीकडचा कांठास उतरला. थोड्याच वेळानें याचे भाऊ हिंदाल व अस्करी हे दोघे शाहजादे, आणि कांहीं लोक येऊन यास मिळाले; मग सर्व मिळून आग्र्यास निघून गेले. जातांना वाटेंत गांवढेकरी लोक यांस लुटून टाकते; परंतु हे थोडक्यांत बचावले.

पुढें शीर शाह याजबराबर टक्कर देण्याची यांस आशा राहिली नाहीं. नंतर सरासरी जलदी करून, आपल्या कुटुंबाचीं माणसें, आणि आग्रा व दिल्ली एथील जें द्रव्य नेण्यासारिखें होतें तें, इतकें घेऊन ते लाहोर एथें कामरान याजवळ पळून गेले.

हा लाहोरास पोंचला इ० स० १५४०, जुलै ता० ५. हि० स० ९४७, रबी-अलू-अव्वल. तेथेंहि हुमायून हा नकोसाच होता; कारण यास आपल्या एथें न्यावा, तर हा आपलेंच घर बळकावणार, अशी कामरान यास भीति होती; आणि शीर शाह याचें व हुमायून याचें भांडण चाललें होतें त्यांत आपणास पडावें लागेल हीहि भिती होती; ह्मणून कामरान याणें पंजाबप्रांत, शीर शाह याचा हवाली करून, त्याबरोबर तह केला, आणि हुमायून यास आपला पाहिजे तसा बचाव करण्यास मागें ठेवून, आपण काबुलास जाता झाला.

पुढें हुमायून यास सर्वांनीं टाकून दिल्यावर तो सिंधदेशाकडे निघाला. हा प्रांत कामरान याचा राज्याचा दक्षिणहद्दीवर होता. तेथें अर्घून याचा वंशांतील मुख्य हुसेननामक सरदार राज्य करित होता. या लोकांस बाबर याणें कंदाहार एथून घालवून दिलें होतें; परंतु सिंध हा देश एके वेळीं दिल्लीचा ताब्यांत होता, यामुळें हुसेन हा कांहीं तरी रीतीनें आपलें वर्चस्व कबूल करील, अशी हुमायून यास अद्यापि आशा होती.

इ० स० १५४०, अक्टोबर अखेर. हि० स० ९४७, जमादिअलू-अव्वलू.

सिंधेवर हात टाकण्याचा यत्न केला, तो व्यर्थ गेला.

परंतु असें वर्चस्व प्राप्त होण्याजोगें हुमायून याचामध्यें कांहीं पाणी नव्हतें. यामध्यें बुद्धि कमी होती असें नाहीं; परंतु साहस विशेष नव्हतें. दुर्गुण किंवा क्रोधादि दुसरे बलाढ्य विकार हे यास नव्हते; परंतु त्याचप्रमाणें याचा अंगीं कांहीं सत्व किंवा प्रीति, हींहि नव्हती. हा स्वभावतः महत्वाकांक्षी नव्हता; यास स्वस्थपणा आवडत असे; परंतु बाबर याचा तालमेखालीं हा होता, तेणेंकरून यास शारीर व मानसिक श्रम करण्याची सवय होती; त्यामुळें प्रसंग पडल्यास हा अगदींच फिक्का पडत नसे; व तसेंच आपल्या खानदानीप्रमाणें आणि योग्यतेनुसार जें आपलें हित करून घ्यावयाचें त्यासहि हा अगदीं चुकला असा नाहीं; परंतु त्यांपासून याणें जितकें आपलें हित करून घ्यावें तितकें घेतलें नाहीं.

हा ऊक शहरचा रस्त्यानें अर्घून याचा मुलुकांत गेला; आणि निष्फळ तहाचीं बोलणीं लावण्यांत, व तशाच वृथा लढाया करण्यांत दीड वर्ष घालविता झाला; तितक्या

वेळांत याणें बकर व सेवण हे किल्ले वेढा देऊन घेण्याचा यत्न केला, परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. शेवटीं याजवळ-चा पैका संपला; सभोंवारचा देशहि भिकारी झाला; आ-णि जे भुरटे लोक यास मिळाले होते, तेहि हुसेन अर्घून याजवर लढाई करण्यास हा येऊं लागला तेव्हां यास सो-डून गेले. अशा प्रसंगीं हा ऊक एथें पळाला, आणि मा-रवाडचा राजा मालदेव याचें मन आपणाविषयीं शुद्ध आ-हे असें यास वाटून, त्याचा आश्रयास जाऊन राहवें हा याणें शेवटचा उपाय योजिला. नंतर मधील सर्व ओसाड देश टाकून हा जोदपुराजवळ गेला, तेव्हां वाटे-नें तृषा व श्रम यांचा योगानें याचे पुष्कळ लोक मरण पावले. अखेरीस पाहतो तों आश्रय दे-ण्याचें एकीकडे ठेवून त्या राजाची मर्जी आपणास धरून शत्रूंचा हवालीं करावें अशी आहे, असें पाहून त्या राजा-चा आश्रयापेक्षां विशेष निर्धास्त अशा जा वा-ळवेचा रानांतून हा आला होता त्यांतच परत गेला. नंतर त्या रेतीचा मार्गानें, सिंधुनदापासू-न थोडक्याच पल्ल्याचावर रणनामक एक रेतीचें खारटण आहे त्याचा सरहद्दीवर उमरकोट असें शहर आहे, तेथें जाण्याचा याणें विचार केला; त्या मार्गांत यास पुष्कळ ओसाड प्रदेशांतून जावें लागलें, आणि भारी विपत्ति भोगाव्या लागल्या; अशा याणें पूर्वीं कधींहि अनुभविल्या नसतील. हा वसाहतीचा मुलुकांतून जात असे, तेव्हां याचे लोक गांवाजवळ आले ह्मणजे, त्या लोकांचें पाणी ह्मणजे जी मोठी दौलत ती घेण्यास हु मायून याचा लोकांचा त्यांणीं आड यावें, ( यामुळें तान

जोदपुर एथें पळून गेला.

यास आश्रय मिळाला नाहीं.

भागण्यापुरतें पाणी मिळावयासहि हुमायून याचा लोकांस हाणामार करावी लागे; परंतु पुढें जी अधिक आपत्ति होणार, त्यांचे हे हाल लहानसा मासला होते. याचा लहानशा स्वारींत यांचा कुटुंबाचीं बायकामाणसें होतीं, त्यामुळें यास प्रवासास लटंबरच झालें होतें. याप्रमाणें जात असतां, सर्व वस्तीचा प्रदेश सोडून ते ओसाड रानांत शिरले; तेथें त्यांस ताहानेनें फार इजा होऊं लागली. एके रात्रीस थकून दुसऱ्या दिवशीं सकाळीं कूच करित असतां त्यांचा मागून पुष्कळ घोडेस्वार येतांना त्यांणीं पाहिले. त्या लोकांचा सरदार मालदेव राजाचा पुत्र आहे, आणि हे हुकुमाशिवाय त्याचा मुलुकांत आले ह्मणून यांचें पारिपत्य करावयाकरितां तो आला आहे, असें यांस समजतांच आपणावर शेवटचें संकट येऊन पडलें, असें यांस वाटलें. त्या नवीन शत्रूंनीं लगट करून या थकलेल्या लोकांस मिळविलें, आणि जे त्यांस अडथळा करूं लागले त्यांचा शिरच्छेद करून, बाकीचांस आपल्या पुढें हाकित नेलें, आणि त्यांतून दुसऱ्या टोळीनें पुढें जाऊन विहिरीहि आपल्या ताब्यांत घेतल्या. त्या विहिरींवर कांहीं वेळ तरी प्राण वांचतील एवढी मात्र आशा राहिली होती; त्या शत्रूंचा हातांत गेल्या, तेव्हां आतां आपल्या सर्व विपत्तींचा काळ होतो, असें त्या पळून जाणाऱ्या लोकांस दिसून आलें.

ओसाड देशांतून जात असतां याचे हाल झाले.

असें झालें तथापि हुमायून व याचे लोक यांस मारून टाकावें असा त्या राजपूतलोकांचा मुळींच उद्देश नव्हता; आणि यांचा सर्व आशा सुटल्या असें दिसूं लागलें,

इतक्यांत मालदेवाचा पुत्र सफेत बावटा ( ह्मणजे मित्रत्वाची निशाणी ) घेऊन आला, आणि तुह्मी परवानगीशिवाय माझा बापाचा राज्यांत आलां, आणि हिंदूंचा मुलुकांत येऊन गोवध केला, ह्मणून त्याणें यांची निर्भर्त्सना केली; यांची त्या वेळीं तृषा भागे इतकें यांस पाणी दिलें; आणि दुसरा कांहीं उपद्रव न करितां यांस पुढें जाऊं दिलें. असें झालें, तथापि त्या जंगलांतील जीं स्वभाविक संकटें होतीं तीं अवशेष राहिलीं होतीं; तशांत यांस अद्यापि पुष्कळ मजला करावयाचा होत्या, तेणेंकरून यांचे पुष्कळ सोबती पुनः तृषाक्रांत होऊन फार हाल होऊन यांचा डोळ्यांदेखत मरण पावले. शेवटीं ७ स्वारांनिशीं हुमायून उमरकोटास पोंचला. याचा मंडळींतील राहलेसाहले लोक मागाहून तेथें जमले.

उमरकोटास याचा आदरानें स्वीकार झाला.

उमरकोट एथें हुमायून यास एक सहाकारी मिळाला. तेथील राजा राणा प्रसाद याणें हुमायून याचें सन्मानानें आदरातिथ्य केलें, आणि सिंधदेशामध्यें राज्य मिळविण्याकरितां पुनः मदत करावयाचें स्वीकारिलें. या दुःखाचा व पडत्या काळांत या बादशाहाची राणी अकबर नामें पुत्र प्रसवली,

अकबराचा जन्म झाला.

ज्या पुत्राचा हातून हिंदुस्थानाचा पादशाहीच्या कळस व्हावा असा ईश्वरी संकेत होता ( ता० १४ अक्टोबर इ० स० १५४२ ). या राणीशीं हुमायून याचें लग्न झालें, त्याविषयीं असें वर्णन आहे, कीं सिंधुनदापलीकडील मुलुकांत हा राहत असतां, याची सावत्र आई ( ह्मणजे शाहजादा हिंदाल याची आई ) इणें एके दिवशीं हुमायून यास बायकांचा महालांत मेजवानी केली;

तेथें एका तरुण स्त्रीचें सौंदर्य पाहून हा मोहित झाला. पुढें तपास करून पाहतां खुरासानांतील जामनगराचा एक सय्यद, जो पूर्वी हिंदाल याचा गुरु होता, त्याची ती मुलगी. तिचें नाव हमीदा, आणि तिची अद्यापि कोणी मागणी केली नव्हती, असें यास समजलें. तिजवर याचा इतका हेतु बसला, कीं याचा भावानें यास फार रागानें निषेध केला असतांहि, याणें तिशीं लागलेंच लग्न लाविलें. पुढें उमरकोटास जात असतां तिचे गर्भारपणाचे दिवस पुष्कळ लोटले होते; यामुळें त्या जंगलांतील विपत्तींतून तिला नेण्यास फार प्रयास पडले.

सिंधमध्यें दुसरी स्वारी.

अकबराचा जन्माचा पूर्वदिवशींच हुमायून हा सिंधचा स्वारीस निघून गेला होता. मुलगा झाला असतां त्या वेळीं आपल्या मित्रांस नजराणे द्यावे, अशी चाल आहे; जेव्हां अकबराचा जन्माचें वर्तमान हुमायून यास कळलें, तेव्हां एका कस्तूरीचा कुपीशिवाय याजवळ दुसरें कांहीं नव्हतें, ह्मणून ती कुपी याणें फोडून आपल्या आश्रितांस वांटली, आणि असें सांगितलें, कीं या कस्तूरीचा सुवासाप्रमाणें माझा पुत्राची कीर्ति जगांत पसरो.

त्या स्वारींत राणा प्रसाद हा पुष्कळ राजपूतलोकांनिशीं याजबराबर आला होता, आणि हुमायून याणेंहि आपले १०० मोगललोक पुनः जमविले होते. इतक्या फौजेनिशीं ते सिंधमध्यें जूं ह्मणून शहर आहे तेथें गेले, आणि तेथील अम्मलदाराबराबर लढाई करून तें शहर घेते झाले. तेथें अर्घून याचा लश्करानें यांजवर हल्ले करून उपद्रव केला, तथापि यास जवळचे हिंदु रजवाडे येऊन मिळाले होते,

त्यांसुद्धां एकंदर सुमारें १५,००० घोडेस्वार याजवळ होते, असा याचा राज्याची हकीकत लिहिणारानें अजमास केला आहे. इतकें झालें तथापि याचा दुर्दैवाचें किंवा अव्यवस्थेचें लिगाड याचा मागें लागलेंच होतें. राणा प्रसाद हा मोठ्या इमानानें याचा पक्ष धरून भांडत होता; त्याचा मन्ययहि याचा नजरेस आला. पुढें एका मोगलानें त्याचा अपमान केल्यावरून त्याणें हुमायून याजवळ फिर्याद केली; परंतु त्याचा कांहीं बराबर बंदोबस्त झाला नाहीं, ह्मणून तो संतापानें यास सोडून गेला; तेव्हां त्याचा मागून त्याचे सर्व हिंदु मित्र गेले.

हुमायून कंदाहारास जाण्यास कबूल झाला.

इकडे हुसेन अर्घून हा याजवर चालून येत होता, आणि वर सांगितल्याप्रमाणें हिंदु राजे निघून गेल्यामुळें अर्घून याजबराबर यास एकट्यासच युध्द करावें लागलें. तथापि याणें बुरूज देऊन यथाशक्ति आपलें संरक्षण केलें; शेवटीं कोणत्याहि प्रकारें ही पीडा जाऊ असें हुसेन अर्घून यास होऊन, जर तूं एकदम कंदाहारास जाण्यास निघशील, तर मीं तुला जाऊं देऊन मार्गामध्यें तुझें सहाय करीन, असें त्याणें कबूल केलें. त्याप्रमाणें ठराव होऊन हुमायून आपल्या जन्मभूमीकडे जावयास निघाला ( ता० ९ जुलै, इ० स० १५४३ ).

तेथें त्याची मयमद स्थिति.

याचा लहान भावांनीं आपल्या चळवळीनें यास पुष्कळ इजा देऊन ते पूर्वींच सोडून गेले होते, आणि त्या वेळीं कामरान याचा वतीनें कंदाहार एथें मिर्झा अस्करी हा कारभार करित असे. अस्करी यास आपल्या पक्षास आणावा, अथवा

दुसऱ्या कोणत्या तरी रीतीनें तो प्रांत आपल्या हाताखालीं घालावा असा हुमायून याचा बहुधा हेतु होता. तथापि बाहेरून आपल्या मुलास कंदाहार एथें ठेवून आपण मक्केचा यात्रेस जाणार, असें हा ह्मणत असे. पुढें कंदाहारापासून दक्षिणेस ६५ कोशांवर शाल ह्मणून एक गांव आहे, तेथें हा जाऊन पोंचला. तेथें याचा जुन्या आश्रितांतून एकानें पाठविलेला स्वार याचा डेऱ्यापर्यंत दौडत आला; घोड्यावरून उडी टाकून हातांतील लगाम न सोडितां तंबूंत घुसला; आणि सांगता झाला कीं तुह्मास कैद करण्याचा इराद्यानें मिर्झा अस्करी जवळ येऊन ठेपला आहे. असें वर्तमान येईल असा हुमायून यास अगदींच आवांका नव्हता; परंतु तसें होतांच हा आपल्या घोड्यावर राणीला घालून पळून गेला, आणि आपल्या मुलास नेण्यास कांहीं साधन नाहींसें होऊन त्याचा चुलत्यास दया येऊन तो काय करील तें करू, असें ह्मणून त्यास ठेवून गेला. हुमायून निघून गेल्यावर मागाहून लवकरच मिर्झा अस्करी येऊन पोंचला, आणि आपण मित्रत्वाचा उद्देशानें आलों, असें ढोंग सांगूं लागला. त्याणें आपल्या पुतण्याचा प्रीतीनें सांभाळ करून त्या सर्व लोकांस कंदाहारास नेलें ( ता० १५ डिसेंबर, १५४३ ). इकडे हुमायून हा ४२ लोकांनिशीं गरमसर एथें पळून गेला. तेथून इराणचा पादशाहाचा ताब्यांतील सिस्तान शहरास गेला. तेथील सुभेदारानें याचा सन्मान करून आगतस्वागत केलें, आणि पुढें बादशाहाचा हुकूम होईल त्याप्रमाणें करावें असें सांगून हिरात एथें यास रवाना करून दिलें. हिरात एथें याचा पक्षाचे पुष्कळ लोक कंदाहाराहून येऊन यास मिळाले.

याप्रमाणें प्रथम सिंधमध्यें आल्या दिवसापासून याचीं तीन वर्षें गेलीं; त्यांतून तहाचीं बोलणीं करण्यामध्यें, आणि त्या देशांत लढाई करण्यामध्यें १८ महिने गेले, सिंधुनदाचा पूर्वेकडील प्रवासांत सहा महिने गेले, आणि जूं एथें राहण्यांत आणि कंदाहारची सफर करण्यांत एक वर्ष गेलें. लढाईचा कामांत यास स्वतः शूरत्व कमी होतें असें नाहीं, परंतु याचामध्यें साहस अगदीं कमी होतें. पुढें यास जा विपत्ति प्राप्त झाल्या त्या याणें मोठ्या आनंदानें सोसल्या, एवढें याचें दिल उदार होतें.

याचा सहनशीलतेची परीक्षा होण्याचे पुष्कळ प्रसंग आले. कारण पुष्कळ आपत्ति प्राप्त झाल्या असतां, तेथें नाजूकपणा आणि कैद हीं चालूं शकत नाहींत. तसें याचा लोकांनीं पुष्कळ वेळा याजवर केलेला राग व अपमान यास सोसावा लागला. याचा बचावास बहुतकरून अगदीं जरूर घोडा बसावयास यास पाहिजे असें झालें असतांहि यास घोडा मिळाला नाहीं. एकदां सिंधुनदाचा पलीकडे पळून जात्ये वेळीं आपल्या कुटुंबांतील माणसांस पार उतरण्याकरितां याणें एक नाव तयार केली होती, ती याचा एका सरदारानें बळकाविली. तसाच हा कूच करून उमरकोटास जात असतां त्या भयंकर प्रसंगांत अकबराचा आईस बसावयास एका सरदारानें आपला घोडा दिला होता, परंतु त्याचा स्वतांचा थकून गेल्यामुळें त्याणें तिला त्यावरून उतरविलें; तेव्हां तिला आपला देऊन हुमायून यास पायीं चालावें लागलें. पुढें यास एक ओझाचा उंट भेटला त्यावर बसून हा आला. असें असतां कधीं कधीं हा आपल्या बराबरचा लोकांविषयीं अगदींच कीव करित नसे.

जेव्हां हा उमरकोटास पोंचून तेथील राजाचा आश्रयास राहिला होता, तेव्हां याणें एके वेळीं अकस्मात् आपल्या लोकांचीं ओझीं पकडलीं, आणि त्यांची मालमत्ता शोधून काढण्याकरितां त्यांचीं जीनेंहि कापून उघडलीं, आणि त्यांतून आपली गरज पुरी होण्याकरितां त्यांचा अर्धा माल घेतला. तसेंच जोदपुर एथें कूच करून जात असतां पहिल्यानें एका दिवशीं मजल झाल्यावर त्या मजलेंत याचे पुष्कळ लोक जंगलामध्यें गमावले; तेव्हां जे लोक जीवंत राहिले असून त्यांस पुढें येववत नव्हतें, त्यांना पाणी पाजण्याकरितां याणें आपल्या घोड्यांसुद्धां सर्व जनावरांवर पाणी भरलें. नंतर कांहीं वाटपर्यंत हा स्वतः त्या पाण्याबराबर मागें जात असतां एक मोगल सावकार अगदीं तृषाक्रांत होऊन मरणोन्मुख झाला होता. त्याचें हुमायून याणें पुष्कळ देणें होतें. तेव्हां याणें कठोर ह्रदय करून त्यास थट्टेनें सांगितलें, कीं तूं कायदेसूद साक्षींचा समोर माझें कर्ज रद्द करीसपर्यंत मी तुला पाण्याचा एक बिंदुहि देणार नाहीं. मग त्या गरीब मनुष्यानें जुलमानें तें कबूल केलें, परंतु हुमायून याणें त्या जुलमाचा कबूलातींतून त्यास पुढें कधीं सोडविला असें दिसत नाहीं.

# प्रकरण तिसरें.

## शीर शाहा व दुसरे सूर वंशाचे पादशाह यांचीं वर्तमानें.

इ० स० १५४० हि० स० ९४७.

मोगल वंशाचा अखेरीस जय झाला आणि त्यांतील पुरुष मोठ्या नावास आले, यामुळें शाहा यास बंडखोर असें ह्मणतात; परंतु य वंश हिंदुस्थानांतील होता, आणि याणें अन्य देशांतील राजवंशास, त्याची फकत दा वर्षें कारकीर्द झाल्यावर हाकून लाविलें; यास्तव दुस्थानांत जे दुसऱ्या वंशांची स्थापना करणारे झा त्यांपेक्षां याचा राज्य करण्याचा हक्क वास्तविक अधि नीतीस अनुसरून होता.

शीर शाहा याणें हुमायून याचा सर्व मुलूक ताब्यांत घेतला.

कामरान हा शीर शाहाबराबर मसलत करून क बूलास परत गेला असें दिसतें. कारण तो ज तांच शीर शाहा याणें सर्व पंजाब ताब्यांत तला; तेथील व्यवस्था केली; सतलजनदीव रोठसनामक प्रसिद्ध किल्ला बांधला, आ त्याचें बहारांतील रोठस किल्ल्याप्रमाणें ना ठेवून हा आग्र्यास परत जाता झाला. नंतर ल वकरच याचा बंगालचा सुभेदारानें बंड केलें, ह्मणून तिकं यास जावें लागलें. पुढें पुनः बखेडा न होई असे त्या प्रांता याणें विभाग करून टाकिले.

दुसऱ्या वर्षी याणें स्वारी करून माळवा घेतला

आणि **बहादुर शाहा** याचा कारकीर्दींत **सिल्हादी** नावाचा हिंदु सरदार मोठा अधिकारी होता, त्याचा मुलाकडे **रायसीन**नामक किल्ला होता, तो याणें तिसऱ्या वर्षीं, पाडाव केला. याणें करार केल्यावरून तेथील किल्लेकरी लोक शरण आले; परंतु ते किल्ल्यांतून बाहेर निघाले असतां, याणें कांहीं मुसलमान मुफ्तीलोकांचा कायद्याचा आधारानें अभिप्राय घेतला; त्यावरून तो पूर्वींचा करार फुकट असें ठरलें, आणि याचा विश्वासावर ते हिंदुलोक आले असतां, त्यांजवर हल्ला करून याणें त्यांची कतल केली. तथापि त्यांणीं बहादरी केल्याशिवाय आपला प्राण सोडिला नाहीं. असें विश्वासघाताचें क्रूर कर्म करण्याचा हेतु काय होता, तो समजत नाहीं. लोकांस धास्ती घालण्याचेंहि त्या वेळीं कारण नव्हतें; त्या लोकांवर सूडहि उगविण्याची कांहीं अवश्यकता नव्हती; मुसलमानी धर्माचा वावटळीचेहि दिवस पूर्वींच गेले होते; असें असून, अशी गोष्ट होण्याचें कारण काय, हें समजत नाहीं. तैमूरलंगाखेरीज हिंदुस्थानांतील कोणत्याहि मुसलमान राजाचा कारकीर्दींत असें दुष्ट कर्म घडून आलेलें इतिहासांत सांपडत नाहीं.

माळवा प्रांत घेतला इ० स० १५४२, हि० स० ९४९.

इ० स० १५४३, हि०स० ९५०

रायसीनचा किल्लेकरी लोकांची कतल.

दुसऱ्या वर्षीं शीर याणें ऐशीं हजार लोकांनिशीं **मारवाड**प्रांतावर स्वारी केली. तेथील राजा **मालदेव** याचा त्या वेळीं भरभराट होता, तशांत त्याचा देश ओसाड, आणि त्यांतून पुष्कळ ठिकाणीं पाण्याची कमताई होती, त्यामुळें त्यास विशेष मजबूदी आली होती. जरी त्याजवळ

इ० स० १५४४, हि० स० ९५१. याणें मारवाडावर स्वारी केली.

सगळे पन्नास हजार लोक होते, तरी प्रथम त्याणें शीर शाहा याचे पुष्कळ लोक असतांहि यास धास्ती पाडिली, असें दिसतें. याचा फौजेचा जवळच शीर हा एक महिनापर्यंत तळ देऊन राहिला; शेवटीं त्याणें चालीप्रमाणें समजूनउमजून लबाडीनें पत्रें लिहवून तीं राजाचे लोक पकडीत असें केलें. तेणेंकरून राजाचा मनांत स्वतांचाच सरदारांविषयीं संशय येऊन तो माघारा जाण्यास निघाला. त्या राजाचा एक सरदार हा आपणावर आळ घेतल्यामुळें संतप्त झाला आणि त्याणें राजपूतलोकांचा बाण्याप्रमाणें कांहीं झालें तरी हा डाग उडवून देण्याचा निश्चय केला, आणि आपल्या कुळांतील सगळे बारा हजार लोक जमवून फक्त तितक्यांनिशीं मोठ्या निकरानें शीर शाहा याजवर जाऊन पडला. एवढ्या झपाट्याचा हल्ला येईल, असा शीर शाहा यास आवांका नव्हता, तेणेंकरून याचा छावणीमध्यें त्याणें कल्होळ करून दिला; त्यास अगदीं जय मिळाल्यासारखा होता, परंतु शेवटीं शीर याणें त्याचा लोकांस हटविलें, आणि हा भिकारी देश जांत हलकीं धान्यें उत्पन्न होतात, असा घ्यावयास आलों असतां आपलें सर्व राज्य जाऊं पाहत होतें, ह्मणून जय झाल्यावर शेवटीं हा ह्मणाला, कीं मूठभर बाजरीचा लोभास्तव मी सगळ्या हिंदुस्थानाची पाच्छायी जवळजवळ घालविली होती.

त्यानंतर याणें मेवाडचा राण्यास पाडाव केलें, आणि कलिंजरचा किल्ल्यास वेढा दिला. तेथें रायसीन एथील विश्वासघाताबदल यास योग्य शासन झालें; कारण तह केला असतां त्याप्रमाणें पुढें वर्तणूक होईल अशी त्या राजाची खातरी होईना, ह्मणून तो मुळींच

चित्तूर घेतलें.

बोलणें ऐकेना. पुढें एके दिवशीं तोफांचा मोर्चाची देख-रेख करित असतां, याचा एका दारवेचा खजीन्यांत शत्रूचा गोळा पडून तो उडाला, तेणेंकरून याचें शरीर भाजून गेलें, आणि पहिल्यापासूनच वांचण्याची आशा नाहींशी दिसली; मग कांहीं तासपर्यंत हा जीवंत होता, परंतु सायंकाळचा सुमारास मरण पावला. यास त्या अपायापासून क्लेश होत असतांहि, त्या वेढ्याचें काम कसें चालवावें त्याविषयीं हा हुकूम देत होता. पुढें जेव्हां किल्ला घेतला असें यास वर्तमान आलें, तेव्हां हा बोलला कीं " सर्व शक्तिमान् ईश्वराचे उपकार स्मरा ! ; " त्या पुढें याचा तोंडांतून एकहि शब्द आला नाहीं.

इ० स० १५४५ मे. ता० २२ हि० स० ९५२ रबी-अलूअव्वल्.

शीर-शाहा हा मोठा शहाणा आणि बुध्दिमान् राजा होता असें दिसतें; तथापि याचा सत्वापेक्षां याचा लोभ भारी जोरावर होता. याणें रायसीनचा किल्लेकऱ्यांची कतल केली, तींत लोभाचीहि सबब यास सांगण्यास नव्हती; तथापि आपल्या रयतेविषयीं हा परोपकारी असे, आणि आपले बेत शहाणपणानें सिध्धीस नेत असे.

याचा स्वभाव.

याची कारकीर्द अगदीं थोडे दिवस चालली; तितक्या मुदतींतहि हा बहुधा नेहमीं लढायांत गुंतलेला असे. असें असून याणें आपल्या मुलुकाचा अति चांगला बंदोबस्त केला, आणि दिवाणी राजनीतीमध्यें याणें पुष्कळ गोष्टी सुधारल्या. अबुल् फझल् हा याचा कृत्यांची निर्भर्त्सना करितो, आणि अल्लाउद्दीनाचा वेळचा रीति याणें सुरू केल्या, असें वर्णन करितो; असें असतां याचा वंश राज्यभ्रष्ट झाल्यावरहि याणें केलेले बहुतेक बंदोबस्त कायम राहिले, आणि ते व तसेच

याचा राज्यांतील सुधारणुका.

१५९४-९५ ह्मणजे हि० स० १००४ या वर्षी, **मुन्तखिब् उल् तवारिख** नावाचा जाणें ग्रंथ केला, त्या ग्रंथकारानें असें वर्णन केलें आहे, कीं **शीर शाहा** याणें **बंगाल्यापासून सिंधुनदाजवळील** पश्चिमेकडील **रोठस** किल्ल्यापर्यंत चार महिन्यांची वाट चालण्याजोगा लांब, एवढा मोठा रस्ता बांधिला; त्यांत दर एक मुक्कामास धर्मशाळा, आणि दर पाउण कोशास विहीर; याप्रमाणें बांधिलीं. प्रत्येक मशीदींत एक इमाम[१] व एक मवज्ञीम[२] असे ठेविले; तसेंच प्रत्येक धर्मशाळेमध्यें हिंदु व मुसलमान या लोकांचा जातींजातींप्रमाणें चाकर लोक, व गरीब लोकांस शिधासामग्रीची तयारी, असा प्रत्येक धर्मशाळेंत बंदोबस्त ठेविला. त्या रस्त्याचा दुबाजूस छायेकरितां झाडांचा रांगा लाविलेल्या होत्या. हा रस्ता बांधून बावन वर्षें झाल्यानंतर त्या इतिहासकारानें तो पाहिला, तेव्हां त्याची स्थिति वर सांगितल्याप्रमाणें पुष्कळ ठिकाणीं होती.

**शीर शाहा** यास **सहसेराम** एथें गाडला. तेथें त्याची भव्य कबर एका तळावामध्यें अद्यापि आहे; त्या तळावाचा परिघ अर्ध कोश असून त्या कबरेचा भिंती कापलेल्या दगडाचा आहेत, आणि तिचा पायठण्यांचा रांगा पाण्यापर्यंत आणून पोंचविलेल्या आहेत.

१ नमाज पढविणारा.

२ नमाजीचा वेळ झाला असें ओरडत असतो तो.

# सिलीम शाहा सूर.

शीर शाहा याणें आपला वडील मुलगा आदिल् खान हा आपल्यामागें गादीचा वारीस ठरविला होता; परंतु तो स्वभावानें ढिला होता; आणि त्याचा भाऊ जल्लाल खान याची हुशारी जाहीर असून याणें आपल्या बापाचा लढायांत तलवार मारून मख्याति मिळविली होती; यामुळें पुष्कळ सरदारांचा मनांतून यास मदत करावी असें आलें. त्यांतून चार मुख्य सरदारांनीं तुझा जीवास आह्मी धोका पोंचूं देणार नाहीं आणि तुझा इतमामाची योग्य तजवीज करूं असें आदिल् खान यास वचन दिलें; तेव्हां त्यांचें ऐकून त्याणें आपल्या भावाचा वतीनें राज्याचा राजीनामा दिला. नंतर त्या लोकांनीं जल्लाल यास सिलीम शाहा या नावानें गादीवर बसवून दौंडी पिटविली; आणि बियाना शहराजवळ कांहीं प्रांत आदिल् याचा नेमणूकेस लावून दिला. पुढें सिलीम याचा कांहीं कृत्यांवरून आदिल् यास भीति वाटली, आणि त्यास अंदेशा येण्यास मजबूद कारणेंहि होतीं, असें दिसतें; कारण त्याविषयींचा जो वरील ठराव झाला, त्यास जामीन जे चार सरदार होते, त्यांतून एक खवास खान नामें शीर शाहा याचा मुख्य सरदार याणें आदिल् यास आपल्या पाठीस घातला आणि बंड करून सिलीम शाहा यास पदच्युत करण्याकरितां तो समोर राजधानीवर चालून आला. आपल्या जवळचा लोकांमध्यें फसाद होईल याविषयीं, व समोर उभे राहून बंडवाले आले होते त्यांविषयीं, अशी दोहोंकडून सिलीम यास

इ०स०१५४५ मे, ता० २५. हि०स०९५२ रबी अल् अव्वल् चं० १५. सिलीम याणें आपल्या वडील भावास ढुसकून लाविलें.

धास्ती होती; परंतु याणें आपल्या जलदीनें आणि दिलदारपणानें त्या सर्वांचे पुढचे बेत पूर्वींच उमगून काढिले, आणि शत्रूंचा पराजय करून, काळेंकरून तें बंड अगदीं मोडून टाकिलें. आदिल् हा बहारप्रांतांत पळून गेला; पुढें त्याचें काय झालें तें समजलें नाहीं.

जे उमरावलोक या फितूरांत गुप्तपणीं सामील झाले होते, ते पुढें त्या बंडांत मिसळले नाहींत, ह्मणून त्यांवरील बादशाहाचा वहमा नाहींसा झाला असें त्यांस वाटलें नाहीं. पुढें एकास गुन्हेगार ठरवून बादशाहानें शासन केलें; तेव्हां दुसरे लोक पुनः फितूरें करून राज्याचा गादीचा दुसरा अधिकारी उभा न करितां आपल्या संरक्षणार्थ शस्त्रें धरिते झाले.

मग उभय पक्षींचा लोकांचें पंजाबांत युद्ध होऊन बंडवाले लोकांचा पुनः मोड झाला. तेव्हां ते गकरलोकांमध्यें जाऊन मिळाले. त्या गकरलोकांचा देश मजबूद, आणि त्या बंडवाल्यांस नियाझी जातीचा अफगाणलोकांनीं सहाय केलें, यामुळें (इ० स० १५४७ हि० स० ९५४ पर्यंत) दोन वर्षें पावेतों तें बंड धुमसत होतें.

पुढें हुमायून हा काबूलप्रांत परत घेऊन, सिलीम शाहावर हल्ला करण्याकरितां तो प्रत्यक्ष सिंधुनद उतरला, असें यास एके दिवशीं कोणी वर्तमान सांगितलें. त्या वेळीं हा आजारी असून याणें जळवा लावविल्या होत्या; तथापि हें वर्तमान समजतांच हा तत्क्षणीं चटकन् उठला, आणि लागलाच कूच करण्याचा हुकूम देऊन, सायंकाळापूर्वीं दिल्लीपासून तीन कोशांवर जाऊन तळ देता झाला. जर कांहीं आवाईमुळें याणें आपली एवढी हुशारी दाखविली असली तर ती आवाईच

मुळीं खोटी होती. कारण हुमायून याचें सिंधुनदाअलीकडे कांहीं काम असल्यामुळें, तो अलीकडे उतरून आला होता; तें काम झाल्यावर तो काबूलास माघारा गेला. याशिवाय पुढें सिलीम शाहा याचा राज्यांत कांहीं बखेडा झाला नाहीं.

याप्रमाणें नऊ वर्षें राज्य करून सिलीम शाहा मरण पावला. याणेंहि आपल्या बापाप्रमाणें सुधारणूक केली; परंतु ती लोकोपयोगी कृत्यें करण्यामध्यें केली, कायद्यांमध्यें विशेष केली नाहीं. दिल्ली एथील राजमंदिराचा एक चौक याणें बांधिला, त्यास "नूरघर" असें ह्मणावें, असा हुमायून याणें हुकूम केला; त्याप्रमाणें अद्यापि बादशाहाचा हुजूरांत त्या भागास नूरघर ह्मणतात; परंतु बाकी सर्वत्र सिलीमघर असें त्याचें नाव प्रसिद्ध आहे.

सिलीम शाहा मरण पावला इ० स० १५५३, हि० स० ९६०.

या राजाचा कारकीर्दींत बियाना एथें शेख अल्लाई ह्मणून एका नवीन मताचा प्रवर्तक झाला. तो वेड मेहदी या पंथाचीं मतें उपदेशित असे. त्याची मनःपूर्वक आस्था, आणि प्रेमळ वाणी पाहून पुष्कळ लोक त्यास मिळाले. त्यांणीं आपली सर्व चीजवस्त एकत्र केली, आणि कित्येक आपल्या मुलांबाळांसहि सोडून त्या शेखाची भक्ति करूं लागले. खवास खान ह्मणून जा मोठ्या सरदाराचा बंडाविषयीं पूर्वीं लिहिलें आहे, तोहि एका वेळीं त्याचा शिष्यांतील होता. या शेखाचा पिसाटपणापासून प्रथम कोणास उपद्रव झाला नाहीं; परंतु पुढें याचा शिष्यांचें आचरण सहनशीलतेचा मर्यादेबाहेर जाऊं लागलें. तें असें कीं, जर कोणी मनुष्य

एकाजातीचा वेडगळ लोकांचा वृत्तान्त.

पापाचरण करतांना त्यांचा नजरेस पडला, तर त्यास
उपदेश करावा, आणि तो त्याणें न ऐकिल्यास त्याच
घ्यावा, हा आपला धर्म आहे, असें त्यांस वाटूं लागलें
सा प्रकार झाला, तेव्हां मुसलमान धर्मशास्त्री व राज
धानलोक यांस हें जड जाऊन याचा विचार करणें
वाटलें. मग त्यांणीं त्या शेखाचा इनसाफ करून
देहान्त शासन ठरविलें; परंतु बादशाहानें, ती शिक्ष
करून, त्यास देशपार करून नर्मदेवरील हिंदिया य
पाठविलें. त्या योगानें उलटा त्याचा मताचा विशेष प्रस
ला; कारण त्याणें तेथील सरदारास व किल्लेकरीलोकां
पल्या मतास मिळविलें, आणि आपल्या धर्माचा पूर्वी
विशेष फैलावा चालविला; तेव्हां बादशाहानें त्यास पु
ल्लीस बोलावून नेलें. तेथें त्यास मारून टाकण्याविषयीं
लोकांनीं बादशाहास आग्रह केला; तेव्हां पुष्कळ दि
लावून शेवटीं त्या शेखास फटके मारावे आणि मग त
आपल्या चुका कबूल करील तर तसें करण्याविषयीं
करण्यास त्यास फुर्सूद द्यावी; असा बादशाहानें हुकूम
त्या वेळीं तेथें पटकीचा वाखा उत्पन्न झाला होता
त तो शेख सांपडून इतका क्षीण झाला होता, कीं
कीरड्यास त्याचा प्राण गेला. तो मेल्यावर त्याचा
लोकांनीं कांहीं गडबड केली नाहीं, आणि ते हळूहळू
घळून गेले, असें दिसतें.

---

# महम्मद शाहा सूर आदिली.

सिलीम शाहा मेला तेव्हां त्याचा मुलगा १२ वर्षांचा होता; त्यास त्याचा चुलता **महम्मद खान** याणें मारून आपण गादी बळकाविली, आणि **महम्मद आदिल् शाहा** या नावानें राज्य करूं लागला. हा **आदिली** या नावानें विशेष प्रसिद्ध आहे. याचा पापाचा विसर पडण्याजोगी याची वर्तणूक नव्हती. हा अगदीं शुंभ होता; यास हलकट छिनाली, व नीच लोकांशीं संगति हीं आवडत. हा मूर्ख होता, यामुळें तुच्छवत् मानण्यास योग्य असे, तसा हा दुर्व्यसनी होता, यामुळें त्रासदायक असे.

महम्मद आदिली याणें आपल्या पुतण्यास मारून गादी बळकाविली. इ० स० १५५३, हि० स० ९६०.

याचे दुर्गुण व मूर्खत्व.

त्या वेळीं हेमूनामक एक हिंदु होता, त्याचें लहानसें दुकान असे; आणि त्याचा या हलक्या खानदानीपेक्षां त्याचें स्वरूप फारच खराब होतें, असें सांगतात; अशा त्या हेमूचा हातीं याणें सर्व आपला कारभार दिला. हेमू हा बाहेरून कुरूप दिसे, परंतु त्याची बुद्धि आणि त्याचा निग्रह हीं मोठीं होतीं; तेणेंकरून त्या वेळचा गर्विष्ट व लढाऊ बाणेदार उमरावलोकांवर आपली छाप बसवून, बादशाहाचा मूर्खत्वाचा व अनीतीचा भारानें जें राज्य रसातळास जाण्याचा रंगांत होतें, त्याचा याणें मोड होऊं दिला नाहीं.

हेमूनामक एका नीच हिंदूस याणें आपला मुख्य प्रधान केला.

त्याची बुद्धि व तेज.

आदिली हा गादीवर बसला नाहीं, इतक्यांत याणें

पादशाहाचा जुलूम.

मनस्वी उधळेपणा करून आपला खजीना रिता पाडला. जेव्हां याजवळ उधळण्यास स्वताचें कांहीं नाहींसें झालें, तेव्हां आपल्या मानकरीलोकांचे सुभे व जाहगीरी घेऊन हा आपल्या मीतींतील अयोग्य लोकांस देऊं लागला. अफगाणलोक हे कधींहि झाले तरी कैदेंत चालणारे नव्हत; तशांत त्यांचा अपमान केला असतां, ते मोठें वैषम्य मानितात, तेव्हां बादशाहा याणें जांचे मुलुक वगैरे घेतले त्यांस तें नुकसान सहन झालें नाहीं. एका समयीं एका लश्करी सरदाराची जाहगीर बादशाहानें आपल्या मीतींतील हलक्या मनुष्यास दिली, तेव्हां त्या सरदाराचा मुलगा पुढें सरसावला, आणि ह्मणाला " काय माझा बापाची जिनगी कुत्रेविक्यास देणार ? " त्या वेळीं त्यास दरबारांतून घालवून देण्याविषयीं कोणी यत्न केला, आणि जा मनुष्यास बादशाहानें ती देहेनगी दिली होती, त्याणें त्यास घालविण्याकरितां त्याची मान धरिली; तेव्हां त्या तरुण पुरुषानें आपली कटार काढून त्यास मारून टाकिलें. इतक्यांत त्यावर चोहींकडून लोक पडले, तेव्हां तो बादशाहावर धांवला; त्या वेळीं बादशाहा तक्तावरून उडी टाकून जनानखान्यांत धावला, तों याचा मागून तो मारेकरी दरवाजाशीं ठेपला; तथापि बादशाहानें संधि पाहून कडी लावून घेतली, इतक्यांत मागाहून त्या मनुष्यास लोकांनीं मारून टाकिलें, तेव्हां याचें अरिष्ट टळलें. असें झालें तथापि या गोष्टीचे वाईट परिणाम इतक्यांतच संपले नाहींत. पुढें

इ० स० १५५४, हि० स० ९६१. राज्यांत बंडावा झाला.

त्याच दिवशीं बादशाहाचा मुख्य उमरावलोकांतील एक दरबारांतून पळाला; आणि त्यास दुसरे बेदिल झालेले लोक मिळून त्यांणीं चुनारगडाजवळ बंड केलें. त्यांवर बादशाहानें स्वारी

करून त्यांचा पराजय केला; परंतु असें केल्यानें याचा कारभार कांहीं थावटला नाहीं. इकडे याचाच कुटुंबांतील इब्राहिम सूर याणें दिल्ली व आग्रा हीं बळकाविलीं. त्यास काढून लावण्याविषयीं याणें प्रयत्न केला, तो सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां ते प्रांत त्याचा स्वाधीन ठेवून आपण पूर्वेकडील प्रांतांचें राज्य करून राहणें, हें यास भाग आलें. या बंडवाल्यांचा जय झाला असें पाहून, दुसऱ्याहि जवळचा लोकांनीं ती संधि फुकट जाऊं दिली नाहीं.

दिल्ली व पश्चिमेकडील प्रांत हे बादशाहाचा ताब्यांतून गेले.

सिकंदर सूर ह्मणून शीर शाहा याचा दुसरा पुतण्या होता; त्याणें पंजाबामध्यें आपल्यास राजा ह्मणवून इब्राहिमावर स्वारी करून त्याचा पराजय केला, आणि दिल्ली व आग्रा यांतून त्यास काढून लाविलें; तेव्हां आदिली याचा हातांत जो मुलुक राहिला होता, त्यावर इब्राहिमास जाऊन पडावें लागलें. त्यास हेमू याणें टकर देऊन पराजित केलें, आणि बियानापर्यंत त्याचा पाठलाग केला; तेथें तो हेमूचा हातांत सांपडता, परंतु इतक्यांत बंगाल्यांत बंड झाल्यामुळें हेमूस तिकडे जावें लागलें. त्या वेळीं बंगालचा सुभेदार महम्मद सूर हा होता; तोच तो प्रांत बळकावून बसला. त्याजवर जाण्याकरितां हेमू हा जाऊन आपला धनी आदिली बादशाहा यास मिळाला. इतक्यांत माळव्यांत बंड झालें; आणि हुमायून याणें परत हिंदुस्थानांत येऊन सिकंदराचा पराजय करून, दिल्ली व आग्रा हीं घेतलीं, असें त्यास वर्तमान लागलें. ही अपायाची बातमी आली

सिकंदर सूर याणें पंजाबांत बंड केलें.

बंगाल्यांत बंड झालें.

माळव्यांत बंड झालें.

असतांहि हेमूनें बंगालचा राजावर जाण्याचा निश्चय केला. तो राजा आपल्या बळकावलेल्या प्रांताचा बाहेर कांहीं अंतरावर फौज घेऊन आला होता; तेथें त्याचें व हेमूचें युद्ध होऊन, हेमूस पुनः जय मिळाला, व महम्मद सूर लढाईंत पडला गेला.

हुमायून परत आला.

त्या वेळीं दुसऱ्या प्रांतांत बंडें चाललींच होतीं; परंतु हुमायून आग्र्यास आला, यापासून विशेष धास्ती पडूं लागली होती. त्याबराबर युन्ध करण्यास जाण्याचा तयारींत हा आहे तों हुमायून वारला आणि अकबर गादीवर बसला, असें यास वर्तमान समजलें. अकबर हा त्या वेळीं पंजाबांत होता. या अदलाबदलीमुळें हेमू यास आणखी हिम्मत चढून तो आपल्या नामधारी पादशाहास चुनारगड एथें ठेवून, तीस हजार लोकांनिशीं राजधानी घेण्यास निघाला. तो जसजसा आपल्या तर्फेचा प्रांतांतून जाऊं लागला, तसतसे त्यास अधिक लोक मिळून त्याची फौज वाढत चालली; नंतर त्याणें आग्र्यास वेढा देऊन तें शहर घेतलें, तेव्हां हुमायूनाबराबर जे सर्व मोगललोक होते, ते दिल्ली एथें तारदी बेग या सरदाराचा हाताखालीं जमले. त्यांचाहि हेमूनें पराजय केल्यावर तारदी बेग एकदम शहर सोडून निघून गेला: तेव्हां ही स्वारी करून आलेल्या लोकांचा मोड झाला असें बाहेरून दिसल्यावरून, पुढें लाहोरास जाऊन त्यांचें निर्दलन करून टाकावें, ह्मणून हेमूनें तयारी केली.

हेमूचा जय झाला.

अकबराचा छावणींतील बहुतेक लोकांचा मनोदय काबूलास परत जावें असा होता; त्या वेळीं अकबर याची

उमर फकत तेरा वर्षांची होती, आणि त्याणें सर्व कारभार बहिराम खान याजवर सोंपिला होता. तो सरदार मोठा शूर होता, ह्मणून त्याचा हिम्मतीनें मोगल वंशाच्या बचाव झाला. दुसऱ्या सरदारांचीं भितरीं बोलणीं नाकबूल करून, बहिराम खान हा हेमूवर चालून गेला; त्या वेळीं त्याचें लश्कर हेमूचा फौजेहून अगदीं कमी होतें. पुढें त्या दोघांचें पाणिपताचा मैदानांत मोठें निकराचें युद्ध झालें; त्यांत हेमूनें मोठा अकटोविकट पराक्रम केला, परंतु त्याचा पराजय होऊन त्यास शत्रूंनीं धरून बंदीवान् केलें. ( ता० ५ नोवेंबर, इ० स० १५५६ ).

हेमूचा अकबरानें पराजय केल्याबर तो मेला.

हेमू मेल्यावर आदिली यास आपलें गेलेलें राज्य परत मिळविण्याची आशा राहिली नाहीं; यानंतर तो कांहीं दिवसपर्यंत राज्य करित होता. पुढें बंगाल्यांत कोणी एका नवीन उत्पन्न झालेल्या राजाशीं लढत असतां तो मरण पावला.

महम्मद आदिली मरण पावला.

# प्रकरण चौथें.

## हुमायून यास पुनः राज्य प्राप्त झालें त्याविषयीं वर्तमान.

इराणदेशांतील सुफी वंशाचें वर्तमान.

इराणांत हुमायून याचा सत्कार.

हुमायून इराणदेशास गेला, तेव्हां तेथें सुफी वंशाचा दुसरा बादशाहा शाहा तमस्प नावाचा राज्य करित होता. त्याचा बापाची उत्पत्ति एका दरवेशाचा कुळांत झाली होती; तें कूळ धार्मिकपणामुळें मोठ्या महत्वास चढून त्याचें वजन विशेष वाढलें होतें. या घराण्यांतील लोकांनीं **शिया** मताचा मुसलमानी धर्म इराणदेशांत पुष्कळ प्रसृत केला होता, आणि या कुळांतील झालेला प्रथमचा राजा याणें तर त्या मताची सरकारी रीतीनें स्थापना केली. या मताविषयीं इराणी लोकांस मोठें पिसें असे. त्यामुळें या वंशास ते अद्यापि विशेष मान देत. **शिया** व **सुनी** या मतांमध्यें विशेष भेद नाहीं; तथापि त्यांचा द्वेष फार कठीण आहे. इराणी लोकांची या मतावर जी श्रन्धा आहे, ती धार्मिक व लौकिकीहि आहे. लौकिकी आहे असें ह्मणण्याचें कारण, इराणाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि मोठ्या राज्यांत शिया धर्माची प्रवृत्ति नाहीं. या मताची स्थापना

करणाऱ्याचा मागून लागलाच शाहा तमस्प हा गादीवर बसला, त्यामुळें हा त्या मताचा मोठा मनःपुरःसर भक्त असे, आणि लोकांसहि तें मोठ्या उत्सुकतेनें उपदेशित असे, त्यामुळें याणें जी हुमायून याशीं वर्तणूक केली, ती या मतभेदाचा बुद्धीनें केली. या दोहों पादशाहांचा जो व्यवहार झाला, तो एशियाखंडांतील जे स्वेच्छाचारी राजे, त्यांचा चमत्कारिक रीतीनुसारच झाला. हुमायून याची मोठी बडेजाव व आगतस्वागत करून शाहा तमस्प याणें त्याचा स्वीकार केला. प्रत्येक प्रांताचा सुभेदारानें याचा मोठा सन्मान केला; प्रत्येक शहरचे लोक यास सामोरे आले; यास राहण्यास जागा राजमंदिरांमध्यें मिळाल्या; आणि राजाप्रमाणें यास मेजवान्या झाल्या; याप्रमाणें याचा पैठणी आदर झाला, परंतु याची विशेष तरतूद राखली गेली नाहीं. पुढें जेव्हां हुमायून हा शाहा तमस्प याशीं वाद करी, अथवा त्याचा गर्व किंवा तब्यत यांचा कोणत्याहि प्रकारें आड येई, तेव्हां हें सर्व औदार्याचें सोंगहि नाहींसें होत असे. हा त्याचा राज्यांत पोंचल्यापासून याचें आगतस्वागत होत गेलें, तथापि प्रथम यास राजधानीजवळ येऊं दिलें नाहीं, आणि याची व बादशाहाची भेट होईपर्यंत पुष्कळ महिने गेले. दरम्यान याचा जो अति विश्वासु सरदार बहिराम खान त्यास याणें शाहा तमस्प याजवळ पाठविला. त्याची जी तेथें प्रतिष्ठा झाली, त्यावरून आपण अगदीं पराधीन झालों आहों, अशी हुमायून याची प्रथम खातरी पटली.

शाहा तमस्प याणें केलेली बडेजाव व आदरातिथ्य.

त्याचा दरारा व छांदिष्टपणा.

तो प्रकारः— आपल्या पंथाचे लोक एकत्र राहण्यास

त्याणें सक्तीनें हुमायूना-कडून शिया-धर्म कबूल करविला.

कांहीं तरी दर्शनीं चिन्ह असावें, ह्मणून इस्माय
ल सुफी याणें त्यांना एक तऱ्हेवार टोपी दिली
तिचा रंगावरूनच इराणी लोक हे सांप्रत आप
णास कझलबाश ऊर्फ "तांबड्या टोपीचे" अ
ह्मणवितात. या पंथाचा टोपीचा दुसऱ्या जा
तींचा मुसलमानांस फारच कंटाळा येई[1].

याप्रमाणें इराणची वहिवाट असतां, एके दिवशीं ब
हिराम खान हा दरबारांत गेला होता, तेव्हां शाहा तमस
याणें त्यास आपल्या तऱ्हेची टोपी घालावयाची आज्ञा के
ली; तेव्हां बहिराम खान याणें सांगितलें, कीं मी दुसऱ्या
राजाचा चाकर आहें, याकरितां माझानें हुकूमाशिवाय व
र्तणूक करवत नाहीं. तेव्हां तमस्प याणें त्यास सांगितले
कीं "तुझा मर्जीस येईल तसें तूं कर" परंतु त्या वेळीं त्या
फार क्रोध आला, असें उघड दिसलें; आणि त्या वेळीं त्या
णें त्या तकरारी वकीलास भिवविण्याकरितां कांहीं गुन्हेगा
लोकांस बलावून तेथचा तेथेंच त्यांचा शिरच्छेद करविला.

पुढें शाहा तमस्प याची व हुमायून याची जेव्हां भे
ट झाली, तेव्हां ती अगदीं बराबरीचा नात्यानें झाली, आ
णि तमस्प याचा मोठेपणास आणि त्याचा एथें आलेल्या
पाहुण्याचा अब्रूस सर्व प्रकारें योग्य अशा रीतीनें झाली
असें असतां ते दोघे पादशाह बसले नाहींत इतक्यांत तमस

---

१ एके वेळीं इराणी लोकांस खुश करून आपलें कार्य साधेल अ
वाटून, बाबर याणें ही टोपी आपल्या लश्करांत सुरू करण्याचा यत्न केल
त्या बंदोबस्तांत जरी याणें कांहीं धर्माची पालटापालट केली नाहीं, तरी
लोकांस नापसंत होऊन याचा राज्यास अपाय येण्याजोगी त्या कृत्यापासू
फसाद उत्पन्न झाली.

याणें हुमायून यास सांगितलें, कीं आपणास ही तकरारी टोपी घातली पाहिजे. हें बोलणें निघेल हें हुमायून यास ठाऊकच होतें; ह्मणून याणें त्या बोलण्याचा योग्य रीतीनें सत्कार करून तें एकदम कबूल केलें. हुमायून याणें ती टोपी घालतांच, शाहा तमस्प याचा नगाऱ्यांतून विजयध्वनि निघाला, आणि उभयतां राजांस तेथील इराणी उमरावलोकांनीं एकदम उठून सलामी केली. पुढें त्या दिवशीं धर्माविषयीं दुसरें कांहीं एकीकडे बोलणें झालें, त्यांत हुमायून याणें आपली दोरी तितकी सैल सोडिली नाहीं असें संभवतें; कारण दुसऱ्या दिवशीं जेव्हां शाहा तमस्प हा हुमायून याचा वाड्यावरून कोठें मवासास जात होता, तेव्हां हुमायून हा त्यास सलाम करण्याकरितां दरवाजाजवळ गेला, परंतु तमस्प हा याकडे न पाहतां यास चुरचुरत व खंती झालेला असा ठेवून चालता झाला. कांहीं दिवसांनंतर पुष्कळ जळाऊ लांकडें हुमायून याचा खर्चाकरितां आलीं, तेव्हां त्यांजबराबर असा निरोप आला, कीं जर तूं शिया धर्म न स्वीकारशील, तर हीं लांकडें तुझें सरण रचण्यास उपयोगीं पडतील. हुमायून याणें याचें उत्तर नम्रतेनें परंतु धैर्यानें पाठवून दिलें, आणि आपणास पुढें यात्रेस जाऊं द्यावें, ह्मणून परवानगी मागितली; परंतु तमस्प हा हटच धरून बसला, आणि ह्मणाला, कीं मी सुनीलोकांचा निःपात करण्याचा निश्चय केला आहे; यास्तव ज्या देशांत हुमायून स्वेच्छेनें आला आहे, तेथील धर्म त्याणें स्वीकारावा, नाहीं तर होईल तो परिणाम भोगावा.

ही भेवडावणी झाल्यानंतर **हुमायून** याजबरोबर बोलण्याकरितां **शाहा तमस्प** याणें एक **काजी** पाठविला. त्याणें यास तीन कागद दिले, आणि सांगितलें कीं यांतून तुझा इच्छेस येईल त्यावर सही कर. **हुमायून** याणें संतापून ते तिन्ही कागद एकामागून एक टाकून दिले, आणि एकदां त्वेषानें आपल्या लोकांस बोलावण्याकरितां झटकन् उठला. त्या काळीं त्या काजीनें आपलें बोलणें मोठ्या ममतेनें व चतुराईनें चालविलें होतें; त्याणें याचें सांत्वन करून याची खातरी केली, कीं जरी तूं स्वतः आपला जीव आपल्या धर्माकरितां दिलास, तरी चालेल; परंतु त्याकरितां आपल्या आश्रितांस फांशीं पाडावें हा कांहीं तुझा धर्म नव्हे, आणि या समयीं **शाहा तमस्प** याचें बोलणें पाडाव करण्याचें तुझाजवळ मजबूद साधन नाहीं, यास्तव तें कबूल करणें हा तुझा धर्म असून, यांत तुझें हितहि आहे.

जा कागदावर **हुमायून** याणें सही केली त्या कागदांत काय होतें हें या पादशाहाची हकीकत लिहिणारा लिहित नाहीं, अथवा कदाचित् त्यास तें माहित नसेल; **अबुल् फझल्** हा दरबारी सफाईनें धर्मांचा विषयच सोडून देतो, आणि या दोघांचें कांहीं वेळपर्यंत तरी वांकडें आलें होतें, याविषयीं उगाच सांगितलें न सांगितलेंसें करितो; परंतु मी शिया धर्म स्वीकारीन, व हिंदुस्थानांत तो सुरू करीन व तसाच **कंदाहार**चें राज्य अथवा तो सरहद्दीवरील प्रांत **तमस्प** याचा हवालीं करीन, इतके त्यामध्यें करार असावे, असें स्पष्ट दिसतें. यांतून शेवटचा करार तडीस गेला; परंतु जेव्हां दुसरा करार तडीस नेण्याचा वेळ आला, त्या वेळीं तो सिद्धीस नेणें अशक्य आहे असें पाहून हा उदासीन

झाला, आणि यामुळें आतां इराणचा पादशाहाशीं फूट पडली तर पडो, अशी याचा मनांत बेपर्वाई उत्पन्न झाली असावी, असें दिसतें. हुमायून हा मात्र म्हटल्याप्रमाणें शिया मतांत आला असें दिसतें; कारण याणें आर्देबिल् एथें शेख सफी याची कबर आहे, तेथें यात्रा केली; अशा प्रकारें मान देणें हें सुनी ह्मणविणाऱ्या पुरुषाचा वेषास नीट शोभत नाहीं.[२]

या कागदांविषयींचा तंटा संपल्यावर हुमायून याची दोन महिने कोणी वास्तपुस्त पाहिली नाहीं, आणि पुढें जरी तमस्प हा याची पुनः तरतूद ठेवूं लागला, तरी त्याचा प्रीतींतील जो धर्माचा विषय तो सोडूनहि, दुसऱ्या बाबदींमध्यें त्याचा क्रोधाविष्ट स्वभावाचा उसळी येऊं लागल्या. हुमायून याचा चालत्या काळांत त्या वेळचा राज्य करणाऱ्या राजेलोकांचे दैवयोग कसे आहेत हें शोधून काढण्याकरितां कांहीं भविष्य काढण्याचा प्रकार याणें चालविला होता; आणि त्या वेळीं याणें राजेलोकांचा जा प्रती लाविल्या होत्या, त्यांत आपल्यापेक्षां खालचा प्रतींत इराणचा राजाची गणना केली होती; हें हुमायून याचा कांहीं शत्रूंकडून तमस्प याणें ऐकिलेलें होतें. त्यावरून या प्रसंगीं

---

२ जा कागदांत शिया धर्म कबूल केला असें लिहिलें होतें, तो कागद हुमायून याणें आदराची किंवा अनादराची दुसरी कांहीं खुणा न करितां मोठ्यानें वाचला; आणि तें मत याणें स्वीकारावें असें जें मागणें होतें तें एवढ्या रुतीनें कबूल केलें, असें "मुन्तखिबुअल्तवारिख्" या इतिहासांत सांगितलें आहे. शिया व सुनी या दोन पंथांत कांहीं थोडा नमाज पढण्याविषयींचा वाद आहे, त्यांतून हा शिया मताप्रमाणें पढूं लागला, असें वरील ग्रंथांत आणखी लिहिलें आहे.

तमस्प याणें त्या गर्विष्टपणाविषयीं यास छेडिलें, आणि हुमायून हा जेव्हां आपलीं कारणें सांगावयास लागला, तेव्हां तमस्प याणें यास सांगितलें, कीं अशाच अभिमानामुळें तुला तुझा राज्यांतून गांवढळ लोकांनीं हाकून लाविलें आहे, आणि तूं आपल्या बायका व आपला मुलगा यांस शत्रूंचा हातांत ठेवून आला आहेस.

असें असतांहि इराणचा बादशाहाची जाहीर वर्तणूक जशी असावयाची त्याचप्रमाणें उदार व मनमिळाऊ होती. तो हुमायून याचा सन्मानार्थ मोठ्या शिकारीचे व मद्यपानाचे प्रसंग करित असे. पुढें हुमायून निघून जाण्याचा जेव्हां वेळ जवळ आला, तेव्हां तो याचा अतिशयच समाचार घेऊं लागला. एके दिवशीं आपल्या छातीवर हात ठेवून, जर तुझा योग्यतेप्रमाणें संगोपन करण्यामध्यें मजकडून कांहीं गेलें असलें तर मला क्षमा कर, अशी त्याणें हुमायून यास विनंती केली; आणि सिस्तानप्रांतांत बारा हजार घोंडेस्वार तुझा कुमकेस तयार असतील असें वचन देऊन, हुमायून यास निरोप दिला. तथापि आणखी एक वेळ इराणचा पादशाहाचा क्रोधाचा झपाटा बाहेर पडून, पुढें या दोन्ही राजांचा संबंध तुटावा, असा ईश्वरी संकेत होता. तो प्रकार असा झाला:—हुमायून यास कांहीं ठिकाणें पाहवयाचीं होतीं; तीं पाहत पाहत, मुक्काम करित करित हा जात होता; तो समूरचा मार्गानें सरहद्दीवर गेला नाहीं, त्यामुळें तमस्प हा कांहीं कामाकरितां आपल्या राज्यांतून फिरत होता त्याणें यास गांठलें; आणि हुमायूनाचे तंबू पाहतांच ह्मणाला "काय! हा अजून हा देश सोडून गेला नाहीं?" असें ह्मणून एक क्षणाचा विलंब न

करितां बारा फर्साखांचें ( ह्मणजे वीस कोशांचा वर ) कूच करावें, असा यास हुकूम करण्याकरितां त्याणें जासूद पाठविला.

यास बारा हजार घोडेस्वार मिळतील, असें सांगितलें होतें; परंतु सिस्तानामध्यें जाई, तों तेथें पादशाहाचा मुलगा मोराद मिर्झा हा १४,००० स्वार घेऊन आलेला यास आढळला. काबूलप्रांत हा अद्यापि कामरान याकडेसच होता. कंदहारावर हिंदाल याणें छापा घालून घेतलें होतें, परंतु तें कामरान याणें परत घेऊन आपल्या भावाचा अन्याय क्षमा केला; आणि त्यास गजनीचा सुभ्याचें काम देऊन, कंदाहारचा सुभ्याचें काम मिर्झा अस्करी यास सांगितलें. बाबर याणें सुलेमाननामक आपल्या सग्यास बदकूशानचा सुभ्याचें काम दिलें होतें, त्यांत बल्कप्रांताचा दक्षिण भाग आला होता; तो मुलूक कामरान याणें त्याकडून काढला. बल्क हें शहर व त्या प्रांताचा उत्तरभाग हा प्रदेश उझबेगलोकांचा ताब्यांत होता. शीर शाहा अद्यापि जीवंत होताच; त्यामुळें हिंदुस्थानावर स्वारी करून कांहीं मिळेल अशी आशा नव्हती.

इराणांत असतां हुमायूनाजवळ स्वतांचे सगळे ७०० लोक होते, आणि पुढें वर सांगितल्याप्रमाणें मदतीस इराणची फौज घेऊन आला, तेव्हां तरी बहुधा याचे स्वतांचे विशेषसे नव्हते; ते व इराणची फौज मिळून घेऊन हेलमंदनदीवर बोस्तनामक किल्ला आहे त्या किल्ल्यावर हा चालून गेला. तो लवकरच यास मिळाला. नंतर याची फौज कांहीं हरकत न येतां कंदाहारावर गेली ( मार्च, इ० स० १६४५ ).

इराणी लोक फार उतावीळ झाले होते, आणि मिर्झा अस्करी आपलें द्रव्य घेऊन पळून जाईल अशी त्यांस भीति होती ? त्यामुळें त्यांणीं प्रथम एक अस्ताव्यस्त रीतीनें हल्ला केला. तो किल्लेकऱ्यांनीं हटविला. नंतर हुमायून याणें विचार करून शहरास वेढा दिला. त्या वेढ्याचें काम पांच महिन्यांवर चाललें; तितक्या मुदतींत कामरान याची समजूत करण्याविषयीं यत्न करण्याकरितां हुमायून याणें बहिराम खान यास काबूलास पाठविलें; परंतु बहिराम खान याचा वकालतीपासून कांहीं निष्पन्न झालें नाहीं, आणि त्या देशांतील सरदार व इतर लोक यांतून कोणीच येऊन हुमायून यास पुष्कळ वेळपावेतों मिळाले नाहींत. त्यामुळें ते इराणी लोक बेदिल होऊं लागले, आणि आह्मी आपल्या देशास जातों, असें बोलूं लागले. पुढें सद्दी फिरली, आणि हुमायून याची चढती कळा आलीः— निरनिराळ्या प्रतीचे लोक काबूलाहून (कामरान याची चाकरी सोडून,) येऊन यास मिळूं लागले, आणि शेवटीं कंदाहारचा किल्लेदारांस अन्नपाण्याची चणचण पडल्यामुळें त्यांतून पुष्कळ लोक पळून आपल्या घरीं गेले, आणि दुसरे तटावरून खालीं उतरून हुमायून याचा लश्करांत मिळाले.

कंदाहार घेतलें.

तेव्हां मिर्झा अस्करी यास शरण यावें लागलें. त्या वेळीं बाबर याची बहीण ह्मणजे यांची आत इणें मध्यें पडून मी यास क्षमा करीन, असें हुमायूनाचें वचन घेतलें (सेपटेंबर, इ०स० १५४५). हुमायून यास पुष्कळ विपत्ति भोगाव्या लागल्या, आणि निराशाहि पुष्कळ झाल्या. तेणेंकरून याचें दिल सक्त झालें होतें, असें दिसतें. पूर्वीं याचा कृत्यांस गरीबपणाविषयीं

लोक दोष देत असत, परंतु सांप्रत तींच काळरूपी होऊं लागलीं. अस्करी याणें गळ्यांत नागवी तलवार बांधून ती खालीं लोंबत ठेवून आपल्यासमोर यावें, आणि अतिदीन रीतीनें आपण शरण आलों असें दाखवावें, अशी याणें त्याजवर सक्ती केली. तें संपल्यानंतर याणें त्यास बाहेरून औदार्यानें आपल्या बाजूस बसविलें; आणि आपण त्याचे अपराध क्षमा केले, आणि पुनः प्रीति करूं लागलों, असें हा सर्व प्रकारें दाखवूं लागला. या दोघांची समजूत होऊन ऐक्य झालें ह्मणून समारंभार्थ मोठें खाणें झालें; परंतु तो उत्साह भरांत आला, आणि सर्व भीति व संशय यांचा विसर पडला, तेव्हां इतक्यांत हुमायून इराणास पळून जात असतां अस्करी याणें यास पकडण्याकरितां बलूची सरदारांस कांहीं हुकूम लिहिले होते, ते याणें पुढें आणविले, आणि या पुराण्या द्वेषाचा कृत्यांचें निमित्त ठेवून, त्यास कैद करून सुमारें तीन वर्षेंपर्यंत बिड्या घालून ठेविलें.

तें याणें इराणी लोकांस दिलें.

कंदाहारचा किल्ला, व तेथें मिळालेलें द्रव्य हें हुमायून याणें इराणी लोकांचा स्वाधीन केलें; त्यानंतर त्यांचे बहुतेक लोक स्वदेशास गेले, पुढें मुराद मिर्झा व कांहीं त्याचा हाताखालचे किल्लेकरी लोक, जे तेथें राहिले होते ते, लोकांवर जुलूम करूं लागले; नंतर तो इराणी शाहजादा अकस्मात् मरण पावला, आणि हुमायून हा बाहेरून शाह तमस्प याविषयीं जरी अति प्रीति दाखवित असे, तरी याणें दोस्तीचा हक्कानें आपले लोक शहरांत घेववून पुष्कळ किल्लेकरी लोकांची कतल केली, आणि बाकीचांस स्वदेशास जाऊं दिलें, हें मोठें विलक्षण धार्मिक कृत्य केलें! या हकीकती प्रकरणीं

व इराणी फौज गेल्यावर तें याणें विश्वासघातानें परत घेतलें.

जें अबुल् फझल् याणें लिहिलें आहे त्यांतील वर सांगितलें हें हांशील आहे. हें कृत्य योग्य झालें याविषयीं अबुल् फझल् मोठें पांडित्य करितो, परंतु तसें थोथांड व ढोंग, आणि तो जा कृत्यांचें मंडन करितो अशीं विश्वासघाताचीं कृत्यें यांवर तैमूरलंगाचाहि हकीकतीमध्यें तोड झालेली मिळणार नाहीं.

अबुल् फझल् याणें सांगितलेले वकीली बहाने यांचा दोष हुमायूनाकडेस नाहीं असें संभवतें; हुमायून हा कदाचित् ह्मणेल कीं जी मजकडून सक्तीनें कबूलात करून घेतली, तिचाप्रमाणें मी वर्तावें हें कांहीं अवश्यक नव्हे. जरी हें बोलणें घटकाभर ऐकिलें, तरी धर्माविषयीं जो याचा मताचा पालट झाला त्यास तें कदाचित् लागू पडेल; परंतु जें कंदाहार देणें कबूल केलें, त्यास तें लागू पडत नाहीं. कारण इराणचा राजापासून जी याणें मदत घेतली, तिचें कंदाहार हें मोल होय. ती मदतहि यावरील सक्ती दूर झाली असतां याणें आपल्या कामास लाविली; तेव्हां पूर्वींचा करार याणें पुन: दृढ केला; असें असून तो करार मोडणें, आणि त्यांतूनहि वर सांगितल्याप्रमाणें लोकांचे प्राण घेणें, या कारणांवरून, कदाचित् कृतघ्नतेचा नसो, परंतु विश्वासघाताचा डाग यास लागतोच लागतो.

कंदाहारांत ठाणीं बसविल्यावर, हिंवाळा विलक्षण तीक्ष्णतेनें सुरू झाला असतांहि, हुमायून काबूलावर निघून गेला. हा पुढें जात चालला तसा याचा भाऊ हिंदाल हा येऊन यास मिळाला; आणि मागाहून कामरान याजकडील दुसरेहि इतके लोक यास येऊन मिळाले, कीं हा काबूलास गेला तेव्हां याबराबर युद्ध

काबूल घेतलें.

करणें अशक्य आहे, असें कामरान याणें पाहिलें, आणि सिंधुनदावरील बकरचा किल्ल्यांत तो पळून गेला; आणि तेथें सिंधचा राजा हुसेन अर्घून याचा हातांत आपली मान देता झाला. हुमायून हा काबूलशहरांत शिरला आणि आपला पुत्र अकबर यास स्वाधीन करून घेता झाला; त्या वेळीं अकबर याची दोहोंपासून तीन वर्षपर्यंत उमर होती.

बदकूशान हा प्रांत पुनः मिर्झा सुलेमान याचा हातांत सांपडला होता; तो घेण्याकरितां हुमायून हा कांहीं महिने काबूलास राहिल्यानंतर निघाला. याचा चुलत भाऊ यादगर मिर्झा, जो नुकताच येऊन यास मिळाला होता, त्याणें कांहीं नवीन फितूर चालविलें आहे असा वहमा आल्यावरून हुमायून यास योग्य वाटून याणें वरील स्वारीस निघून जाण्यापूर्वी त्यास मारून टाकिलें. याणें प्रथम काबूलचा सुभेदारास त्यास मारण्याचा हुकूम केला; परंतु हा हुकूम मी अम्मलांत आणणार नाहीं असें त्या सुभेदारानें तडक सांगितलें, तथापि त्यास कांहीं शिक्षा न करितां तें काम करण्याविषयीं हुमायून याणें दुसऱ्या मनुष्यास आज्ञा केली. हा त्या गोष्टींत विशेष चमत्कार आहे.

बदकूशानावर स्वारी.

हुमायून याणें बदकूशान एथें पुष्कळ महिने मुक्काम केला. तेथें हा राहिला असतां कामरान याणें सिंधमधून परत येऊन काबूलावर छापा घालून तें घेतलें. तेव्हां हुमायून हा भर हिंवाळ्यांत त्यावर स्वारी करून गेला, आणि त्याचा पराजय करून त्यास किल्ल्यांत पळविना झाला. हें वेढ्याचें

कामरान याणें काबूल परत घेतलें.

काम चाललें असतां या व दुसऱ्या प्रसंगीं हुमायून याचा हातांत जे बंदीवान् सांपडत, त्यांस हा मारून टाकित असे, कामरान हा याहूनहि विशेष दुष्ट कर्में करून याचा सूड घेई, आणि शाहजादा अकबर हा पुनः त्याचा हातांत सांपडला होता ह्मणून, जर तुह्मी अतःपर शहरावर गोळे टाकाल, तर मी याला तोफेचा तोंडीं देईन अशी त्याणें धास्ती घातली.

शेवटीं कामरान यास काबूल सोडून देणें प्राप्त झालें.

त्यांतून हुमायून याणें त्यास घालविलें.

तो रात्रीचा पळाला, आणि बल्कप्रांताचा दक्षिणेस गोरी एथें गेला, तेथें हुमायून याची एक टोळी येऊन, तिणें कांहीं वेळानें त्यास उठविलें, तेव्हां तो बल्क एथें उझबेगलोकांकडे गेला आणि त्यांचा मदतीनें त्याणें बदकूशान परत घेतलें. इतकें होई तों उन्हाळा गेला; पुढें बर्फामुळें हुमायून अडकून दुसऱ्या वर्षीं चांगली मुसूम सुरू होई तों त्याचा काबूलाहून कूच करण्याचा बेत राहिला. मुसूम सुरू झाल्यानंतर तो बदकूशान एथें गेला, आणि तेथें कामरान याचा पराजय करून त्यास तालेकान एथें घालविता झाला; पुढें त्यास

तो हुमायून यास शरण गेला, त्याशीं हुमायून ममतेनें वर्तला.

उझबेगलोकांकडून मदत मिळावयाची होती तिची आशा नाहींशी झाल्यामुळें त्यास शरण यावें लागलें (आगस्ट १५४८). या एका गोष्टीविषयीं वर जो इतिहास सांगितला, तो हुमायूनाचा राज्याची हकीकत लिहिणाराचा ग्रंथांतील आहे; त्या ग्रंथकारानें उभय पक्षींचीं दुसरीं

---

१ कामरान याणें पूर्वीं खबर न देतां प्रत्यक्ष अकबर यास तोफेचा गोळा लागावा अशा ठिकाणीं ठेविलें होतें, आणि ईश्वरानें अद्भुत चमत्कार करून प्रत्यक्षच धांवणें घेतलें, त्यामुळें त्या शाहजादाचा मृत्यु टळला;

बहुतेक दुष्ट कृत्यें सोडून दिलीं आहेत; आतां याविषयावर अबूल् फझल् याणें जें लिहिलें आहे त्यावरहि बेभरवसा करण्याजोगें कांहीं कारण नाहीं असें मला वाटतें. पुढें कामरान गेल्यावर काबूल एथील लोकांनीं बेइमानीपणा केला ह्मणून त्यांचें शासन करण्याकरितां हुमायून याणें तें शहर लुटविलें, असें तो हकीकत लिहिणारा सांगतो. ही गोष्ट अबूल् फझल् याचा लेखांत नाहीं.

या वेळीं हुमायून हा चांगल्या विश्वासानें व ममतेनें वर्तला; त्याणें कामरान याचें मोठ्या मायेनें आगतस्वागत केलें, आणि आपण तिघे भाऊ एकत्र झालों ह्मणून चौथा भाऊ मिर्झा अस्करी यासहि याणें सोडलें. नंतर ते जेवणाचा समारंभांत एका ठिकाणीं जमून त्यांणीं एकमेकांबराबर मीठ खाल्लें, आणि तेवढ्या वेळापुरता त्यांचा वैरभाव नाहींसा होऊन गोडी झाली.

यानंतर हुमायून हा परतून काबूलास आला. दुसऱ्या हेमंतऋतूचा सुमारास (इ० स० १५४९), बल्क एथें उझबेगलोकांवर हल्ला करण्याकरितां याणें स्वारी केली, आणि ऐबाकनामक लहानसा किल्ला घेतल्यावर, लागलाच मावरूल्नहरूभांत घेण्याविषयींचा मसलती हा करूं लागला. याप्रमाणें त्या वेळीं याचामध्यें साहसाचें वारें शेवटीं तरी आलेंसें दिसतें. पुढें हा बल्क एथें पोंचून तेथील किल्लेकऱ्यांनीं यावर हल्ला केला तो याणें हटविला, इतक्यांत कामरान हा बंड करून काबूलावर जात

हुमायून याणें बल्कप्रांतावर स्वारी केली.

कामरान याचें नवीन बंड.

असें अबुल् फझल् सांगतो, आणि त्या अद्भुत चमत्काराचें सविस्तर वर्णन करितो.

आहे, असें यास वर्तमान लागलें. त्या वेळीं हा काबूल एथें परत यावयास निघाला, तेव्हां मार्गांत उझबेगलोकांनीं याचा इतका लगट केला, कीं यास हळूहळू परत येण्याचें सोडून पळावें लागलें, आणि याचा लश्कराची अगदीं धांदल व अव्यवस्था होऊन तें मुस्कीलीनें निर्भय ठिकाणीं जाऊन पोंचलें. हा अनर्थ झाल्यामुळें याचा बाकी राहिलेल्या आश्रितांचें इमान ढळलें; नंतर पुढें कामरान याचीं व हुमायूनाची लढाई झाली, तींत याचे कांहीं मोठे मोठे सरदार यास सोडून गेले, आणि पुढें याचा पराजय झाला त्यांत हा मरून जाता; परंतु थोडक्यानें वांचला. तो असा, कीं कामरानाकडील एका शिपायानें यास घायाळ केलें, आणि तो पुनः वार करणार इतक्यांत हुमायून ओरडला " अरे मर्कटा ! तुझा हात कसा वाहतो ? " त्या वेळीं पादशाहाचा क्रोधाविष्ट चेहरा पाहून तो शिपाई गांगरून गेला, आणि त्याणें वार करावयाचा तो टाकून हुमायून यास परत जाऊं दिलें (इ० स० १५५० चा मध्याचा सुमारास ). नंतर त्या लढाईतून हुमायून हा फकत अठरा लोकांनिशीं पळाला, त्यांत याची हकीकत लिहिणारा जव्हेर हा होता. त्या वेळीं याचे फार हाल झाले, आणि यास वार झाला होता, त्यामुळें कांहीं वेळपर्यंत हा दुखणाईत पडलाः शेवटीं हा बदकूशान एथें पोंचला, तेथें मिर्झा सुलेमान याणें, मनापासून अशी, यास प्रथमच मदत दिली. हुमायून पळून गेल्यानंतर कामरान याणें पुनः काबूल घेतलें; तेव्हां अकबर हा पुनः त्याचा हातांत सांपडला. परंतु पुढील लढाईत हुमायून याचें दैव उघडलें, तेव्हां याणें काबूल घेऊन सर्व सपाट

बल्क एथून परत येत असतां फार आयास झाले.

हुमायून याचा पराजय होऊन याचें लश्कर यास सोडून गेलें.

देशांत आपली सत्ता बसविली ( इ० स० १५५१ ). त्या वेळीं कामरान यास खैबरनामक पहाडांत खलीलनामक एका जातीचा अफगाणलोकांजवळ आश्रयाकरितां पळून जावें लागलें.

क.मरान यास पुनः काढून लाविलें.

त्या लोकांनीं त्यास आश्रय दिला ह्मणून हुमायून याणें त्यांवर लवकरच स्वारी केली. त्या पहाडी लोकांनीं यावर येऊन रात्रीचा हल्ला केला; त्या प्रसंगांत याचा भाऊ हिंदाल हा मारला जाऊन, पेशावर व काबूल यांमधील खिंडींत बेसूतनामक किल्ला आहे तेथें जाऊन आश्रयास राहणें यास भाग आलें. अफगाणलोकांनीं याचा प्रथम मोड केल्याप्रमाणें पुढें लागलीच लगट केली नाहीं; आणि निरनिराळ्या कुळींतील लोक कामरान यास फेरपाळीनें मेजवान्या करिताहेत, इतक्यांत हुमायून हा पुनः लढाईस सिद्ध झाला आणि अफगाणलोकांचा पराजय करून याणें कामरान यास हिंदुस्थानांत पळविलें; तेथें शीर शाहाचा मागून सुलतान सिलीम गादीवर बसला होता, त्याचा आश्रयास राहण्याकरितां तो गेला ( इ० स० १५५२ ). तेथें त्यास कांहीं उत्तेजन मिळालें नाहीं ह्मणून तो गकर लोकांचा सुलतानाकडे पळाला; त्याणें शेवटीं विश्वासघात करून त्यास हुमायून याचा स्वाधीन केलें; याप्रमाणें शेवटीं त्यास काबूलांतून घालवून दिल्यापासून तीन वर्षांनीं तो सांपडला गेला ( सेपटेंबर इ० स० १५५३).

कामरान यास धरिलें. इ०स० १५५३, सेपटेंबर. हि० स० ९६१, रमजान.

कारमान यास हवालीं करून घेण्याकरितां हुमायून गकरलोकांचा मुलुकांत आला होता, आणि जेव्हां कामरान यास यासमोर आणिलें, तेव्हां तो मोठ्या गरीबीनें

पुढें आला, परंतु हुमायून याणें मोठ्या आदरानें त्याचा सत्कार केला, त्यास आपल्या उजव्या हातास बसविलें, आणि पुढें कोणी कलिंगड आणून दिलें, तेव्हां त्यांतील जो तुकडा आपण घेतला होता त्यांतून भावास अर्धा दिला. सायंकाळीं गायनाचा समारंभ झाला आणि रात्र खाण्यापिण्याचा आनंदांत गेली. दुसराहि दिवस त्याप्रमाणेंच गेला, तेव्हां, त्या दिवशीं आपल्या भावाचें काय करणार असें कांहीं प्रधानानीं हुमायून यास विचारिलें; तेव्हां याणें उत्तर दिलें, कीं "प्रथम गकरांचा राजास संतुष्ट करूया; मग मी जें योग्य असेल तें करीन."

दुसऱ्या दिवशीं त्या गकरी राजाची तृप्ति झाली; नंतर कामरान याचे डोळे काढून टाकावे असा ठराव झाला. हुमायूनाची हकीकत लिहिणारा जव्हेर जास त्या वेळीं कामरानाजवळ असण्याचा हुकूम झाला होता, तो या अनर्थाचें सविस्तर वर्णन करितो. प्रथम कोणीहि मनुष्य हें काम पतकरण्यास खुशी नव्हता, आणि बादशाहा याणें कूच करून निघायाचा वेळेस हा हुकूम केला, तेव्हां एका सरदारानें याचा मागून घोडा टाकिला, आणि तें काम करण्यास कोणी खुशी नाहीं, अशी अडचण निर्माण झाली आहे असें यास तुर्की भाषेंत समजाविलें; तेव्हां बादशाहानें त्याची छिःथू केली आणि तें काम तूंच कां केलें नाहींस, असें त्यास विचारिलें. तो सरदार परत आल्यावर मोठ्या दुःखानें तो हुकूम जवळचा लोकांनीं कामरान यास कळविला. नंतर एक टोंचण्याचें शस्त्र घेऊन त्याचा डोळ्यांत पुष्कळ वेळा भोंसकून त्यास अंध करून टाकिलें. कामरान याणें ते क्लेश कांहीं शोक नकरितां सहन केले;

परंतु शेवटीं जेव्हां लिंबाच्या रस व मीठ हें त्याचा डोळ्यांत भरलें, तेव्हां तो मोठ्यानीं ओरडला, कीं "हे ईश्वरा! हे परमेशा! मी या जगांत जीं पापें केलीं, त्यांचें मला एथें पुरें शासन झालें; याकरितां पुढील लोकीं मजवर दया कर."

कामरान याणें पुष्कळ वेळा अपराध केले, त्यामुळें त्यास धरल्याबराबर जरी लागलाच याणें त्याचा शिरच्छेद केला असता, तरी योग्य झालें असतें; परंतु वर लिहिल्याप्रमाणें तो हुमायून याचा हातीं सांपडल्यावर जी हुमायून याणें त्याची दशा केली, ती अगदींच अनुचित होय.

वर लिहिल्याप्रमाणें तो शेवटचा सोहळा पाहिल्यानंतर जव्हेर याचानें तेथें राहवेना, तेव्हां तो पुढें जाऊन छावणींत मिळाला, आणि मोठा दुःखित होऊन आपल्या डेन्यांत जाऊन बसला. बादशाहा याणें त्यास बलावून विचारिलें कीं हुकुमाशिवाय तूं कशासाठीं आलास? तेव्हां त्याणें उत्तर दिलें, कीं तें काम पुरें झालें. मग बादशाहानें त्यास सांगितलें कीं आतां तुला परत जाण्याचें कारण नाहीं; असें ह्मणून जी गोष्ट झाली तिजकडे दुसरें कांहीं लक्ष न देतां, पादशाहानें त्यास लागलाच कांहीं दुसऱ्या क्षुल्लक कामाबदल हुकूम दिला. वरील वर्तमान आल्यापासून बादशाहास आनंदापेक्षां लज्जा विशेष वाटली असेल, असें संभवतें; कारण हुमायून हा स्वभावानें ठक किंवा दुष्ट असा कांहींच नव्हता, आणि हा जर युरोपखंडांतील मिताधिकारी राजा असता, तर याणें दुसऱ्या चार्लसापेक्षां विशेष विश्वासघात केला असता, अथवा अधिक लोकांचे प्राण घेतले असते असें बहुधा झालें नसतें. यावरून वर झालेली गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे; कारण हा दोष कांहींसा

... पडतां आपलें काम चालावें असा होता. याचा हातून असें दुष्ट कृत्य झाल्याचें असें एवढेंच विलक्षण उदाहरण मिळतें; नाहीं तर याचा इतर साहजिक वृत्तींपासून हा परिणाम घडून यावा अशी याची प्रकृति नव्हती.

पुढें कामरान यापासून भीति नाहींशी झाली तेव्हां हुमायून याणें त्यास मक्केचा यात्रेस जाऊं दिलें; तिकडे तो पुढें लवकरच मरण पावला.

हा वृत्तान्त घडून आल्यावर हुमायून याची इच्छा काश्मीरावर जाण्याची होती, परंतु सिलीम शाहा चढाई करून आला असें ऐकून हा परत काबूलास गेला आणि दुसरें वर्ष काबूल व कंदाहार एथेंच काढिता झाला.

इकडे दरम्यान सिलीम शाहा मरण पावला; त्याचा मागून जो पादशाह गादीवर बसला, त्याचा अव्यवस्थेमुळें त्याचा राज्याचे पांच भाग पडून प्रत्येकांत निरनिराळा राजा झाला.

त्यांत सिकंदर शाहा याचा वांटणीस पंजाब आला होता; आणि त्याणें दिल्ली व आग्रा हीं शहरें बळकावून बसणाऱ्या इब्राहिम सूर नावाचा सरदारावर हल्ला करून त्यास त्याचा मुलुकांतून हांकून लाविलें होतें; इकडे खरा पादशाह आदिली हा दोघांहि बराबर लढाई करित होता. याहून अधिक अनुकूल संधि हुमायून यास मिळाली नसती; परंतु यास पूर्वींचा अपायांचें स्मरण होऊन हिंदुस्थानाविषयीं वाईट भविष्यें याचा मनांत येऊं लागलीं असें दिसलें.

श्रय केला, आणि एकदां हातांत घेतल्यावर याणें तें मोठ्या झपाट्यानें तडीस नेलें. हा १५००० घोडेस्वारांनिशीं काबूलाहून निघाला (जान्युआरि १५५५); पंजाबावर स्वारी करून सिकंदर याचा सुभेदाराचा पराजय करून लाहोर घेता झाला आणि त्या प्रांताचा बंदोबस्त करण्याकरितां तेथें राहिला.

हुमायून हिंदुस्थान घेण्याकरितां निघाला.

सिकंदर सूर हा मोठी फौज घेऊन हुमायून याजबरोबर युद्ध करण्याकरितां आला होता. मग त्या दोघांचा सरहिंद एथें प्रसंग होऊन हुमायून यास पुरा जय मिळाला, आणि याणें दिल्ली व आग्रा हीं शहरें लागलींच ताब्यांत घेतलीं. इकडे सिकंदर हा हिमालयाखालचा पहाडांत पळून गेला; तो पुनः थोडक्याच दिवसांत पळाला होता, तेथून परत आला, तेव्हां त्याजबराबर लढाई करण्याकरितां बहिराम खान याजबराबर शाहजादा अकबर यास देऊन हुमायून याणें पाठविलें.

सरहिंद एथें सिकंदर सूर याचा पराजय केला.

दिल्ली, व आग्रा हीं घेतलीं.

याप्रमाणें हुमायूनास राजधानी परत मिळाली; परंतु यास पूर्वीचा राज्यांतून थोडाच मुलुक प्राप्त झाला; आणि जो मिळाला होता, त्याचाहि फार दिवस उपभोग घेणें याचा नशीबीं नव्हतें. एके दिवशीं हा आपल्या किताबखान्याचा गच्चीवर फिरत होता, आणि नंतर जिना उतरूं लागला. (असल्या ठिकाणचे जिने घराचा बाहेरून अरुंद पायठण्यांचे बांधलेले असतात, आणि त्यांस बाहेरून सुमारें मुंढाहातभर उंचीचा देखणा आधार असतो.) हुमायून याणें,



उतरत असतां, मशीदींतून नमाज पढण्याकरितां जो बांग ह्मणजे लोकांस हाक मारितात तो ऐकिला; तेव्हां चालीप्रमाणें हा थांबला, आणि आपला धर्ममंत्र ह्मणावयाचा तो ह्मणून त्या बांग देणाराचें ओरडणें संपेपर्यंत तेथेंच बसून राहिला. नंतर हा काठी टेंकून उठूं लागला; तेव्हां त्या पायठण्यांचा घोंटींव संगमरमरी दगडावरून याची काठी सरली, आणि खालीं डोकें व वर पाय होऊन हा पादशाह खालीं पडला. त्या वेळीं धक्का लागून हा बेसावध झाला; परंतु कांहीं वेळानें जरी हा शुद्धीवर आला, तरी याला जी इजा झाली तिजवर औषधी उपाय चालण्याजोगी अशी ती नव्हती. पुढें हा अपाय झाल्यापासून चौथ्या दिवशीं, आणि दिल्लीस परत आल्यापासून सहा महिन्यांचा आंत, हुमायून हा ४९ व्या वर्षीं मरण पावला. हा आपल्या राजधानींतून सोळा वर्षें परागंदा होता, त्यांसुद्धां याणें एकंदर २६ वर्षें राज्य केलें.

याचा कारकीर्दींत जिकडील तिकडे व्यवस्था नीट झाली नाहीं, त्यामुळें राज्याचा आंतील स्थितींत कांहीं सुधारणुकी झाल्या नाहींत. बावर हिंदुस्थानांत आल्यानंतर मागून लवकरच खोंदेमीर नावाचा प्रसिद्ध इराणी इतिहासकर्त्ता त्याचा दरबारांत आला होता; तो, हुमायून गुजराथेंत स्वारीस जात असतां, याचा छावणींत मरण पावला. याशिवाय दुसरी कांहीं सांगावयासारखी हुमायून याचा कारकीर्दीमध्यें गोष्ट घडून आली नाहीं.

# भाग पांचवा.



## अकबर सिंहासनारूढ होईपर्यंत हिंदुस्थानाची स्थिति.

## प्रकरण पहिलें.

### दिल्लीचें राज्य मोडल्यानंतरचा हिंदुस्थानांतील स्वतंत्र राज्यांचा इतिहास.

अकबराचा वेळीं सर्व हिंदुस्थान एका छत्राखालीं आलें, आणि त्याचा राज्यांतील निरनिराळया मतींचा रयतेचा परस्परांशीं संबंधांमध्यें पुष्कळ तफावत पडली; असा विषय कथन करण्याचा आतां समय पोंचला आहे; तेव्हां असें एकराज्य होण्यापूर्वींचे भिन्न भिन्न लोकांचे वृत्तान्त शोधून पाहणें, आणि अकबराचा राज्याचा आरंभीं, ह्मणजे फेरफार होण्याचा सुरुवातीस, निरनिराळया लोकांची वास्तविक स्थिति कशी होती, याचा या समयीं शोध लावणें, हें योग्य आहे.

महम्मद तघलख याचा कारकीर्दींत दिल्लीचें राज्य

महंमूद तघलखाचा वेळीं दिल्लीचें राज्य मोडून त्यांतून जीं राज्यें झालीं तीं.

ईशान्येस हिमालयपर्वतापर्यंत होतें; वायव्येस सिंधुनदास लागलें होतें; पूर्वपश्चिमेस त्यास सागराची मर्यादा होती, आणि नैर्ऋत्येकडे मुंबईपासून रामेश्वरापर्यंत सरासरी रेषा काढली तर त्या धुंदरट सरहद्दीपलीकडील लांब व अरुंद प्रदेश सोडून बाकी सर्व दक्षिणेकडील हिंदुस्थान त्याचा दक्षिणमर्यादेंत येत होतें; परंतु या मर्यादांमध्येंहि एक मोठा प्रदेश स्वतंत्र राहिला होता; आणि दुसऱ्याविषयीं तर मुसलमानांस शोधहि लागला नव्हता.

तैलंगण व कर्नाटक हे देश हिंदुलोकांनीं परत घेतले.

दिल्लीचा बादशाहांस ज्याचा शोध न लागला, असा जो मुलुक वर सांगितला, तो आंवढ्याचा राजाचा होता. आंवढ्यादेश हा जंगली असून गंगेचा मुखापासून गोदावरीचा मुखापर्यंत विस्तृत होता. त्याची लांबी २५० कोशांहून कांहीं कमी होती; आणि त्यामध्यें १५० पासून २०० कोशपर्यंत रुंद इतक्या देशाची व्याप्ति होती. याहूनहि मोठा विस्तृत प्रदेश उत्तरहिंदुस्थानाचा वायव्येस राजपूतलोकांचा हातीं होता. त्यावर मुसलमानांचा अम्मल पक्का बसला नव्हता; तेवढाच स्वतंत्र राहिला होता, असें वर वर्णन केलेलें आहे.

महम्मद तघलख् याचा अव्यवस्थेमुळें राज्यांत जे बखेडे उत्पन्न झाले, त्यांत तैलंगण व कर्नाटक एथील राजांनीं पुनः आपले हिंदूंचे देश हिंदूंचा स्वाधीन करून घेतले. महम्मद तघलख् याचा पूर्वींच थोड्या दिवसांवर तैलंगणचा राजास वरंगूळ एथून काढून देऊन दक्षिणेस पळविलें होतें; तो पुढें आपला जुना देश घेण्याकरितां परत आला.

कर्नाटकचे राजे हे नव्या वंशाचे होते. त्यांणीं बल्लाळ राजांचा ठिकाणीं आपली स्थापना केली, आणि तुंगभद्रेचा कांठीं विजयनगर हें आपली राजधानी केली. या दोन्ही राजांनीं मिळून लवकरच मुसलमानलोकांस उत्तरेस कृष्णेपर्यंत, आणि पश्चिमेस हैदराबादेचा रेखावृत्तापर्यंत, तसेंच हटविलें; त्यांणीं आपल्या दक्षिणेकडील दक्षिणहिंदुस्थानांतील प्रांत आपल्या ताब्यांत आणिले, आणि आपल्या जवळचा मुसलमान राजांजवळ बराबरीचा नात्यानें भांडण्याजोगीं राज्यें केलीं. या दोहोंतून पश्चिमेकडील विजयनगरचें राज्य हें पहिल्यापासून दोहोंमध्यें मोठें होतें, तें तेलंगणचा राज्याहून पुष्कळ दिवस चाललें; आणि तें मोडण्यापूर्वीं त्या राज्याची सत्ता व बडेजाव हीं पुष्कळ वाढलीं होतीं; मुसलमानलोक हिंदुस्थानांत आल्या दिवसापासूनहि पूर्वींचा कोणत्याहि वंशांतील हिंदु राजांची बहुधा याहून जास्त बढती झालेली नव्हती.

हिंदुलोकांनीं इ० स० १३४४ मध्यें हा मुलुक पुनः घेतला; त्यापूर्वीं (इ० स० १३४० चा सुमारास) बंगालप्रांतांत बंड झालें होतें. पुढें इ० स० १३४७ त दक्षिणेंत मोठें बंड होऊन, दिल्लीचा बादशाहांची सत्ता नर्मदेपलीकडे हटून गेली.

दिल्लीचें राज्य आणखी मोडलें.

पुढें इ० स० १३५१ त महम्मद तघलख् मेला, त्यामुळें राज्याची आणखी विटंबना होणें ती कांहीं वेळपर्यंत बंद राहिली; परंतु चौदाव्या शतकाचा अखेरीस शेवटचा तघलख् पादशाह महमूद हा लहान असतां, गुजराथ, माळवा, व जवानपुर, हीं राज्यें स्वतंत्र झालीं; त्यांतून बंगाल्यापासून अयोध्येचा मध्यभागापर्यंत गंगेवरील प्रदेश

जवानपुराखालीं होता. यानंतर लवकरच इ०स०१३९८ मध्यें तैमूरलंगाची लाट फिरली. तेव्हां बाकी राहिलेल्या प्रांतांतील सुभेदारांनीं खांका वर केल्या;त्यामुळें दिल्लीचा राज्याची मर्यादा दिल्लीशहराजवळील थोड्याशा कोशांवर येऊन ठेपली.

या गेलेल्या देशांतून कांहीं देश कसे परत मिळाले, त्याचें वर्णन पूर्वींच आलें आहे. आतां हीं राज्यें स्वतंत्र झाल्यापासून कशीं वाढत गेलीं, आणि अकबर गादीवर बसला त्या वेळीं त्यांची स्थिति कशी होती, याचें मी या भागांत वर्णन करितों. त्यांतून दक्षिणेंतील राज्यें मोठीं होतीं सबब त्यांचें प्रथम वर्णन करितों.

---

## १ दक्षिणेंतील राज्यें.

दक्षिणेंतील ब्राह्मणी राज्य, इ० स०१३४७ पासून इ० स० १५१८ पर्यंत.

महम्मद तघलख् याचा कारकीर्दींत हसन गंगू याणें आपलें बंड तडीस नेऊन, दक्षिणेंत ब्राह्मणी वंशाची गादी स्थापिली. हें राज्य त्याचा वंशजांकडे तेरा पिढ्यांपावेतों, मिळून १७१ वर्षें, चाललें.

ब्राह्मणी राजांचें दिल्लीचा बादशाहाशीं युद्ध चालत असतां, विजयनगर व वरंगूळ एथील हिंदु राजे हे त्यांस सहाय असत; परंतु जेव्हां मुख्य शत्रूपासून त्यांची सुटका

(१) हिंदुस्थानाचा साधारण इतिहासास या निरनिराळ्या राज्यांचा सविस्तर हकीकतीचें अगदीं जरूरच आहे असें नाहीं; ह्मणून मी तीं पुरवणीमध्यें घालून त्यांतील सारांश, व त्यांपासून झालेले परिणाम, इतका विषय मूळग्रंथांत लिहिला आहे.

होऊन ते सर्व स्वतंत्र झाले, तेव्हां त्यांचें (धर्मभेदामुळें) साहजिक वैमनस्य पुनः सुरू झालें. मग त्यांचें भांडण पुष्कळ दिवस चाललें होतें; त्यांत शेवटीं मुसलमानलोकांची फत्ते झाली. ब्राह्मणी राज्याचा कारकीर्दींत मुसलमानलोकांनीं कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील प्रदेश विजयनगरचा राजांपासून जिंकून घेतला, आणि वरंगूळचें राज्य जमीनदोस्त केलें. पुढें ब्राह्मणी राज्याची समाप्ति होण्याचा थोडेंच अगोदर मुसलमानलोकांनीं आंवढ्यादेशांतील थोडासा प्रांत घेऊन, पूर्वेस मच्छलीपट्टनापर्यंत, व पश्चिमेस गोव्यापर्यंत, इतका मुलुक घेतला.

हिंदुलोकांशीं मुसलमानांचा व्यवहार विशेष होऊं लागला.

या लढाया पुष्कळ दिवस बहुधा बराबरीचाच नात्यानें चालल्या होत्या, आणि त्यांतहि कधींकधीं उभय पक्षांचा शत्रु उत्पन्न झाला असतां, दोन्ही लोक एकत्र मिळत असत; या कारणामुळें हिंदुलोकांशीं वर्तणूक करत्ये वेळीं मुसलमानांचा दरारा कांहींसा कमी होत गेला होता, असें दिसतें. दोन्ही धर्मांतील पुष्कळ लोक मन मोकळें करून एकमेकांचा चाकरीस राहात. माळव्याचा मुसलमान राजानें जेव्हां ब्राह्मणी राज्यावर एकदां स्वारी केली, तेव्हां त्याचा निवडक फौजेंत १२००० अफगाण व राजपूतलोक होते, असें ह्मणतात; आणि विजयनगरचा देवराज राजा याणें आपल्या फौजेचा भरतीस मुसलमान ठेविले होते, त्याचा सरदारांस जमीनी लावून दिल्या होत्या; आणि त्यांस उत्तेजन यावें या हेतूनें आपल्या राजधानींत एक मशीद बांधिली होती.

ब्राह्मणी राजांजवळ परदेशीय व स्वदेशीय लश्करचे

दरबारांत व लश्करांत शिया व सुनी या मतांचा लोकांची स्पर्धा चालली.

लोक असत, त्यांमध्यें स्पर्धा उत्पन्न होऊन त्यांचा घरगुती बंदोबस्तांत पुष्कळ गडबड होत असे. एशियाखंडांतील बहुतेक एकसत्ताक राज्यांत लोकांस दबावण्याकरितां राजाचा सर्व भरवसा लश्करावर असतो; नंतर इतर फौजेचा बंदोबस्त करण्याकरितां परदेशी लोकांची हुजूर बादशाही फौज ठेविलेली असल्ये; त्यांस ममूलुक असें ह्मणतात; त्यांवर बादशाहाचा सर्व भरवसा असतो; आणि हे ममूलुकलोक शेवटीं राज्य बळकावून बसतात; अशी रीति आहे. दक्षिणेमध्यें असा क्रम झाला नाहीं. जा फौजेचा सहायानें ब्राह्मणी वंशास गादी मिळाली तींत बहुतकरून परदेशी लोक होते, आणि त्यांमध्यें सर्वांहून विशेष भरवशाचे हुजूर पाहऱ्याचे अमुक लोक असे नव्हते, असें दिसतें. पुढें कालेंकरून देशी लोकांची फौज वाढत गेली; त्यामुळें त्यांचें व परदेशी लोकांचें पारडें बहुधा चांगलें समतोल झालें, तेणेंकरून राजांवर कोणत्याहि पक्षाचा काइम पगडा पडला नाहीं.

जेव्हां हें राज्य दिल्लीचा बादशाहांपासून स्वतंत्र झालें, त्या वेळीं परदेशी लोकांत मुसलमान झालेले मोगल बहुधा पुष्कळ होते. पुढें इराणी, तुर्की, जार्जी, सर्कोशी, कल्मूक व दुसऱ्या जातींचे तातार, या जातींचे परदेशी लोक होते, असें फिरिस्ता वर्णन करितो. परदेशी लोक हे बहुधा शिया मताचे होते; यावरून जो स्वदेशी व परदेशी या लोकांचा कलह होत असे, तो बहुधा शिया व सुनी या मतांचा भेदापासून असे; ते भांडणारे लोक निरनिराळ्या देशांत पैदा झाले त्यावरून नसेल, असें वाटतें.

देशी लोकांस दक्षणी ह्मणत, व पश्चिमकिनाऱ्यावरील[२] बंदरांतून हबशीलोकांचे थवेचा थवे येऊन त्यांस मिळत असत. ते लोक बहुधा सुनी असावे, असें दिसतें.

पुढें इ० स० १४३७ मध्यें दुसऱ्या अल्लाउद्दीनाचा कारकीर्दींत या दोन्ही पक्षांचा स्पर्धेचा कळस झाला; त्यामुळें हमेशा द्वेष व बखेडे होऊं लागले, तेणेंकरून दरबारांत फितूरें चालूं लागल्यामुळें, आणि युद्धांत परस्परांस सहाय न केल्यामुळें दोन्हींकडून राज्याचें नुकसान होत असे. कडक राजांचा कारकीर्दींत हे लोक मट्ट बसत; पुढें ब्राह्मणी वंशाचा समाप्तीचा सुमारास त्या वंशांतील **महमूद** ह्मणून एक दुर्बल राजा झाला; तो कांहीं वेळ परदेशी लोकांचें ऐके, व कांहीं वेळ दक्षणी लोकांचें ऐके; असा तो बाहुल्यासारखा होता; परदेशी लोकांचा मुख्य सरदार **युसफ आदिल्खान** या नावाचा एक तुर्क होता; आणि **निजाम ऊल्मुल्क बहिरी** नामें एका बाटलेल्या हिंदूचा पुत्र,हा त्या वेळीं दक्षणी लोकांचा मुख्य सरदार होता.

ब्राह्मणी राज्य मोडून त्याचीं पांच राज्यें झालीं. इ० स० १४८९ पासून १५१२. विजापुरचें राज्य.

जेव्हां ब्राह्मणी राज्यांत दक्षणी लोकांचें वर्चस्व झालें, तेव्हां **युसफ् आदिल्खान** हा **विजापुरास** आपल्या सुभ्यावर गेला, आणि पुढें तेथें आपणास राजा असें ह्मणवूं लागला. याचा वंशास **आदिल्शाही** असें ह्मणतात.

---

(२) इराणी अथवा मोगली पक्षाचाहि लोकांचा भरतीस मुख्यत्वेंकरून समुद्रकिनाऱ्यानें लोक येत असत. त्या वेळीं आरबलोक हे अगदीं थोडके आले, त्याचें कारण बराबर समजत नाहीं.

अहमदनगरचें राज्य.

पुढें **निजाम उल् मुल्क बहिरी** यास **कासिम बरीद** नावाचा एका तुर्कानें मारेकरी घालून मारविलें, तेव्हां **निजाम** याचा मुलगा **अहमद** याणें **अहमदनगर** एथें **निजामशाही**नामक वंशाची स्थापना केली.

त्या वेळीं **महमूदाचा** दरबारांत **कासिम बरीद** करील ती पूर्वदिशा, असें झालें; आणि **कुतब कूली** नामें एक इराणांतून आलेला तुर्की सरदार, आणि एका मुसलमान झालेल्या हिंदूपासून उत्पन्न झालेला **इमादुल्मुल्क** दुसरा सरदार, असे दोन मोठे सरदार स्वतंत्र झाले; परंतु कांहीं वेळपर्यंत त्यांणीं राजे असें आपणास ह्मणविलें नाहीं. यांतून **कुतब** याणें हैदराबादेजवळ **गोंवळकोंडें** एथें **कुतबशाही** वंशाची स्थापना केली; आणि **इमादुल्मुल्क** याणें वऱ्हाडप्रांतांत **इलीचपुर** एथें **इमादशाही** राज्य स्थापिलें. पुढें कित्येक नामधारी ब्राह्मणी राजांचा हाताखालीं **कासिम** याचा मुलगा **अमीर बरीद** याणें कारभार चालविला, परंतु शेवटीं तें सोंग टाकून त्याणें **बेदर** एथें **बरीदशाही** वंशाची स्थापना केली. यापुढें ब्राह्मणी राजांचें कोठें वर्णन केलेलें नाहीं.

गोंवळकोंड्याचें राज्य.

वऱ्हाडचें राज्य.

बेदरचें राज्य.

या राज्यांचा इतिहास.

हीं राज्यें झाल्यावर शिया व सुनी या लोकांचे आंतल्या आंत तंटे चालले; तशाच या राजांचा, आपसांत व उत्तरेकडील जवळचा मुसलमान राजांशीं, लढाया व मिलाफ झाले; या सर्व गोष्टींनीं त्या वेळचा इतिहास बराच चित्रविचित्र दिसतो; परंतु पुढें मोगली राज्याचा आगींत या सर्वांचा होम झाला,

त्यामुळें वरील गोष्टींचें सर्व महत्व नाहींसें झालें आहे.

या लोकांनीं हिंदूंपासून जो देश घेतला, त्या घेण्यापासून पुढें राहण्याजोगे परिणाम झाले. विजयनगर एथील राजे यांची दक्षिणेंतील मोठ्या राजांत पुष्कळ दिवस गणना होत असे, आणि मुसलमानलोकांचा ठरावांत व तहांत ते शिरत असत; परंतु शेवटीं इ० स० १५६५ त या पाखंडी[३] राजांची सत्ता व गर्व हीं वाढल्याचा मुसलमानलोकांस हेवा उत्पन्न होऊन, त्या वेळीं विजयनगर एथें राम राजा राज्य करित होता, त्यावर सर्वांनीं मिळून कट केला. नंतर उभय पक्षांचा सैन्यांचें तालिकोटाजवळ कृष्णेचा कांठीं युद्ध झालें. त्यामध्यें, जेव्हां मुळीं मुसलमान हिंदुस्थानांत येऊं लागले त्या वेळीं जसे त्याचे लोक पुष्कळ असत तसेच पुष्कळ होते, व लढाईहि तशीच निकराची झाली, आणि तिचा परिणामहि मोठाच झाला; त्याच प्रमाणें पूर्वीचा वेळचा क्रूरपणाहि या लढाईत पुनः उद्भवला असें दिसतें; कारण हिंदुलोकांचा पराजय झाल्यानंतर त्यांचा जो वृद्ध व शूर राजा जास कैद करून नेलें होतें, त्याचा या लढाईनंतर शिरच्छेद करून टाकिला, आणि अलीकडेपर्यंत विजापुर एथें याचें शिर विजयचिन्हादाखल राखून ठेविलें होतें.

इ० स० १५६५ जान्युआरि ता० २५ हि० स० ९७२, जमादि उस्सानी चं० २०. तालीकोटची लढाई.

वरील लढाईत विजयनगरचा राज्याचा नाश झाला; पूर्वीं त्या राज्यानें बहुतेक दक्षिणहिंदुस्थान त्या वेळीं व्यापिलें होतें. परंतु हें राज्य घेतल्यापासून मुसलमानांचा फारसा फायदा झाला नाहीं; कारण मुसलमान राजांचा परस्परस्पर्धेमुळें

विजयनगरचा राज्याचा मोड झाला.

(३) मुसलमान हे दुसऱ्या सर्व लोकांस पाखंडी ह्मणतात. भा० क०.

एकमेकांचें राज्य वाढविण्याचा ते आड येत असत, त्यामुळें त्या मुलुकांतून यांचा हातास कांहीं न लागतां तेथें लहान लहान रजवाडे, व पूर्वीचा कारकीर्दीतील बंडखोर सरदार, हे सत्ता करूं लागले. हे पुढें जमीनदार व पाळेगार या नावानें मख्यात झाले आहेत[४].

गोंवळकोंड्याचा राजांस बराच देश घेण्यास साधलें. वरंगूळ एथील राजानें पुनः डोकें वर करण्याचा यत्न केला होता, परंतु मुसलमानांनीं तो देश पुरा जिंकून तैलंगणाचे दुसरे भाग, व पेनारनदीपर्यंत कर्नाटक इतका मुलुक घेतला. इतकेंहि केलें तथापि महम्मद तघलख याचा वेळीं जो देश मुसलमानांचा हातून गेला, तो सर्व त्यांचा हातांत परत आला असें नाहीं; परंतु औरंगझेबाचा कारकीर्दीपर्यंत मुसलमानांची गति याहून अधिक झाली नाहीं.

---

## २ उत्तरहिंदुस्थान व त्याजवळील प्रांतांतील राज्यें.

महमूद तघलख याचा कारकीर्दींत गुजराथ व माळवा हीं राज्यें स्वतंत्र झालीं, आणि जेव्हां तैमूरलंगाचा

(४ राम राजाचा भावानें आपलें ठाणें आणखी पूर्वेस नेलें, आणि शेवटीं मद्रासेचा वायव्येस सुमारें ३५ कोशांवर चंद्रगिरि एथें जाऊन राहिला; तेथें त्याचा वंशजानें इ० स० १६४० त इंग्रेजलोकांस प्रथम वसाहतीचें ठिकाण दिलें.

स्वारीनंतर दिल्ली एथील बादशाहीचा किताब नाहींसा झाला, तेव्हां बहुधा एथील अधिकारी आपणास राजे ह्मणवूं लागले. दक्षिणेंतील बंडांत खानदेश हा सामिल नव्हता; परंतु पुढें तेथील सरदारांनींहि आपल्या उत्तरेकडील शेजाऱ्यांचा कित्ता घेतला.

वरील तीनहि प्रांत एकाच वेळीं बंड करून दिल्लीचा सत्तेखालून निघाले, परंतु त्यांचें आपसांत एक दिल नव्हतें; आणि पुढें त्यांचा इतिहासामध्यें जो कांहीं परस्परांचा संबंध आहे, तो त्यांचा लढायांपासून झालेला आहे; कांहीं दोस्तीपासून झालेला नाहीं.

गुजराथचें राज्य.

गुजराथचा राजांचा मुलुक मातबर, परंतु लहान असून त्याभोंवते डोंगर आणि रानें होतीं; त्यांत लुटारु लोक राहत असत, आणि सभोंवार मोठे बलाढ्य शत्रु होते. असें असतांहि ब्राह्मणी राज्याची समाप्ति झाल्यानंतर जे सर्व छोटेखानी राजे झाले, त्यांमध्यें हे राजे फार प्रसिद्ध होते. यांणीं दोन वेळा माळवाप्रांत जिंकून शेवटीं तें राज्य आपल्या राज्याशीं मिळविलें. यांणीं मेवाडचा राजपूत राजांचे पुष्कळ वेळा पराजय केले, आणि चितूरनामक जी त्यांची प्रख्यात राजधानी, ती घेतली. यांणीं खानदेशावर आपली एका प्रकारची छाप बसविली, आणि अहमदनगर व वऱ्हाड एथील राजांपासूनहि कर घेतला; एक वेळ सिंधुनदापर्यंतहि यांणीं फौज नेली, आणि पुष्कळ वेळा पोर्तुगीस लोकांबराबर समुद्रांमध्यें युद्धें केलीं, त्यांविषयीं पोर्तुगीस लोकांचा इतिहासांत प्रसिद्धि झालेली आहे.

यांचा देश हुमायून याणें घेतला होता, असें वर्णन

पूर्वींच केलेलें आहे; परंतु पुढें लागलीच जी धांदल झाली तींत यांणीं तो परत घेतला; तो, अकबर गादीवर बसला तेव्हां, स्वतंत्र होता.

माळव्याचें राज्य.

माळव्यांतील राजाचा उत्तरहिंदुस्थानांतील व दक्षिणेंतील जवळचा राजांशीं वारंवार लढाया होत असत. पुढें या राज्यांत एका हिंदु सरदाराचें महत्व फार वाढलें. त्याणें आपल्या शौर्यानें व बुद्धिबलानें बादशाहास अडचणींतून सोडविलें; परंतु शेवटीं त्याणें सर्व राजाधिकाराचा ग्रास करून, सर्व हुद्यांवर राजपूतलोक नेमले. पुढें जेव्हां त्या राजाचा मुसलमान भाईबंद गुजराथचा राजा हा स्वारी करून त्यास सहाय आला, तेव्हां त्या सरदाराची सत्ता नाहींशी झाली. ही गोष्ट या राज्याचा इतिहासांत मोठी चमत्कारिक आहे.

दुसरीं मुसलमानी राज्यें.

खानदेश, बंगाल, जवानपुर, सिंध, व मुल्तान, या सर्व प्रांतांतील मुसलमानलोकांचीं राज्यें अकबराचा राज्याचा आरंभीं स्वतंत्र होतीं, परंतु त्यांचा निराळा इतिहास विशेष सांगण्याजोगा नाहीं.

राजपूतस्थानें.

वर सांगितलेलीं सर्व राज्यें हीं सर्व महमूद तघलख याचें राज्य मोडून त्यांतून झालीं; परंतु यांशिवाय हिंदुस्थानांतील अगदीं पूर्वींचा राज्यांतून कांहीं राज्यें त्या वेळेपर्यंत स्वतंत्र राहिलेलीं होतीं, आणि तीं अद्यापिहि स्वतंत्र राज्यांत मानिलीं जात आहेत.

जेव्हां सुल्तान महमूद याणें प्रथम स्वारी केली, त्या

हिंदुस्थानांत मुसलमान लोकांचें राज्य चालू झाल्यानंतर राजपूतलोकांचा स्थितींत झालेले फेरफार.

वेळीं जा राजपूतलोकांची सत्ता हिंदुस्थानांत चालत होती, त्यांचीं राज्यें जसजशीं मोडत गेलीं तसतसे ते लोक इतर लोकांत मिसळत चालले, आणि जेथें जेथें मुसलमानलोकांशीं टकर देण्याजोगा त्यांचा मुलुक होता, तीं तीं ठिकाणें खेरीज करून, इतर ठिकाणीं त्यांचें राजेपण नाहींसें झालें. गंगायमुनाकांठचे राजपूतलोक व तसेच मुसलमानांचा हातांत आलेल्या मुलुकांतील बहुतकरून सर्व लोक यांची स्थिति पालटून ते जसे हल्लीं आहेत त्याप्रमाणें होऊन गेले; ह्मणजे जरी त्यांचा पाणीदारपणा, व लढाऊ रोख, हे गुण पुढें राहिले, तरी त्यांस शेतकीची सवय लागून राज्याचा व्यवस्थेमध्यें आपणास अधिकार असावा अशी हांव त्यांस पुढें राहिली नाहीं.

उत्तरहिंदुस्थानाचा मध्यभागावरील सपाट प्रदेशांत आणि त्याचा पश्चिमेपासून सिंधुनदापर्यंत जो रेतीचा मुलुक लागला आहे, तेथील राजपूतलोक मात्र स्वतंत्र राहिले होते. या प्रांतांमध्यें जितका जितका प्रदेश मजबूद असे, तितके तितके तेथें मुसलमानलोकांचे हल्ले कमी होत असत. मेवात, बुंदेलखंड, व बागेलखंड, इत्यादि प्रांत हे यमुनेजवळ उतरणीवर आहेत, आणि त्या नदीवरील सपाट प्रदेशाजवळ आहेत; तथापि हे प्रांत खडकाळ व तुटलेले आहेत, त्यामुळें याच प्रांतांतील रजवाडे लोक हे पुष्कळ वेळा बंडें करित असत असें आपल्या अनुभवास येतें. तसेच रतनभोर, ग्वालेर, कालिंजर, इत्यादि किल्लेहि या प्रांतांतच आहेत. हे दिल्लीचा बादशाहांनीं एकदां घेतले, पुनः गेले, आणि पुनः घेतले; असें बहुधा प्रत्येक कारकीर्दींत झालेलें आहे.

उत्तरहिंदुस्थानचा मध्यभागचा सपाट जमीनीस वरील प्रांताच्या कांहींसा आश्रय आहे परंतु जयपुराकडून मुसलमानलोकांस येण्यास सुलभ मार्ग आहे, त्यामुळें तें संस्थान बहुधा हमेशा दिल्लीचा बादशाहांचा हुकुमतींत वागत होतें. वरील प्रदेशाचा सपाट भागांत अजमीर व माळवा हीं संस्थानें होतीं, तीं पूर्वींच मुसलमानलोकांनीं घेऊन पुढें सुलभ रीतीनें आपल्या हातांत राखिलीं. उदेपुरचा राण्याचा राज्याचा पूर्वभाग, म्हणजे मेवाडप्रांत, हाहि तसाच निराश्रित होता; परंतु आरावलीपर्वत आणि त्यांस लागून गुजराथेचा उत्तरसीमेवर जा टेंकड्या व जीं रानें आहेत, त्यांमध्यें त्या राजास पळून जाण्यास जागा होती, तेथें कोणत्याहि शत्रूचें त्यावर चाललें नसतें. जोदपुर ऊर्फ मारवाड एथील राजा, तसाच त्याचा सगा बिकानेरचा राजा, जसलमीरचा राजा, आणि दुसरे कांहीं लहान राजे, यांचा देशांतील कांहीं भाग सुपीक होता, परंतु त्यांत कितीएक ठिकाणीं मध्यें मोठें जंगल होतें, व कितीकांचा सभोंवार जंगल होतें, त्यामुळें त्या जंगलाचा त्यांस आश्रय असे.

राजपूतलोकांमध्यें कांहीं जाहगीरदार लोक असत, आणि कांहीं भाईबंदीचा संबंधानें आपल्या राज्यांची व्यवस्था चालवीत; ते मोठे सत्वशील असत, आणि त्यांचा परस्परांविषयीं दृढ प्रीतिभाव असे, त्याविषयीं पूर्वींच वर्णन केलें आहे.[५] त्यांचे हे गुण अकबराचा कारकीर्दीपर्यंत कमी झाले नव्हते.

अकबर गादीवर बसला त्या वेळीं राजपूत राजांची स्थिति.

अकबर बादशाहा गादीवर आला, त्यावेळीं निरनिराळ्या राजपूत राजांची स्थिति खालीं लिहिल्याप्रमाणें होती.

(५) पृष्ट १६२ पाहा.

मेवाडचें राज्य.

उदेपुरचा राणा याचा वंश व कूळ यांची रामापासून उत्पत्ति होऊन, अयोध्येहून कोणी पुरुषानें येऊन यांचें राज्य स्थापिलें, अशी दंतकथा आहे. पुढें या राजांनीं आपली गादी गुजराथेंत स्थापिली; नंतर तेथून गुजराथेचा उत्तरेस पहाडांत ईदर एथें ते जाऊन राहिले, आणि कर्नल टाड्ड याचा अभिप्रायाप्रमाणें शेवटीं ख्रिस्ती शकाचा आठव्या शतकाचा आरंभीं त्यांणीं चितूर एथें आपली गादी स्थापिली. पुढें अल्लाउद्दीन याणें इ०स०१३०३ मध्यें चितूर घेतलें, व राणा हमीर याणें पराक्रम करून तें लागलेंच त्यापासून परत घेतलें. यापूर्वीं इतिहासांत या राजांची प्रसिद्धि नव्हती. राणा हमीरानंतर एकामागून एक बलाढ्य राजे होऊन त्यांणीं सर्व राजपूतसंस्थानांमध्यें आपली छाप बसविली, व त्याच योगानें पुढें राणा संग याणें सर्व राजपूतलोकांचा जमाव करून बाबराबराबर युद्ध केलें. त्या लढाईत संग याचा अगदीं पराजय झाल्यामुळें त्याचा वंश बलहीन झाला. पुढें कांहीं कालानंतर त्याचा नातू विक्रमाजित याचा नाकर्तेपणामुळें त्या राज्याची इतकी नातवानी आली, कीं गुजराथचा राजा बहादुर शाह याणें चितूर घेतलें, आणि तो पुढें कांहीं करता, परंतु त्याणें चितूर घेतल्यावर लागलाच हुमायून याणें त्याचा पराजय केला. तेव्हांपासून अकबर गादीवर येईपर्यंत उदेपुरचे राणे स्वस्थपणीं आपलें राज्य करित होते. आणि राजपूत राजेलोकांमध्यें त्यांची उच्च पदवी पूर्ववत् प्रमाणें राहिली होती, परंतु त्यांचा राजकीय सत्तेचा पगडा जो एकदां नाहींसा झाला, तो पुनः हातीं आला नाहीं, आणि पुढें शीर शाहाचा कारकीर्दींत दिल्लीचा बादशाहांचें वर्चस्व त्यांस

कबूल करणें भाग आलें. या राजांस पूर्वीं घेलोती
ह्मणत असत; पुढें सेसोदी असें ह्मणूं लागले.

मारवाडचें राज्य.

याहून दुसऱ्या प्रतीचें मोठें राज्य मारवाड
राठोर वंशाचा राजांचें होतें. त्यांची राज
जोदपुर एथें होती. जेव्हां शाहाबुद्दीन याणे
नोजचा राज्याचा (इ०स० ११९४) त मोड केला, तेव
राज्य राठोर वंशाचा राजपूतांकडे चालत होतें. तो दे
सलमानलोकांनीं घेतल्यावर कांहीं राठोरलोक गंगेचा
राहिले होते, ते समयविशेषीं मुसलमानलोकांवर बंडें
तथापि पुढें हळू हळू त्यांस परतंत्रतेची सवय पडून गेल
रंतु कनोज एथील शेवटचा राजाचे दोन नातू यांचा
खालीं दुसरे कांहीं राठोरलोक जमा होऊन त्यांस स्व
पेक्षां स्वतंत्रता आवडून ते तो देश सोडून उत्तरहिंदुस
तील मधील उंचवट्याचा प्रदेश पूर्वेस, आणि सिंधु
श्चिमेस, या दोहों सीमांमध्यें जें ओसाड जंगल आहे
गेले, आणि तेथें जाट या जातीचे जुने लोक होते
जिंकून, व दुसऱ्या राजपूतलोकांचा कांहीं यांचा पूर्वी
हतीकरितां गेलेल्या लहान लहान जमाती होत्या
मुलुक छिनावून घेऊन, त्यांणीं एक मोठें व बलाढ्य
रचिलें. पुढें कांहीं काळानंतर या वंशांतील धाकट्या

बिकानीरचें राज्य.

त्यांतील पुरुषांनीं बिकानीर नावाचा नि
राज्याची स्थापना केली ( इ०स० १४५९ )
णि पूर्वीपेक्षां त्या जंगलाचा जास्ती भाग
शीर शाहा याणें राजा मालदेव यावर स्वारी केल
वेळापर्यंत या राठोरलोकांस मुसलमानांनीं उपद्रव

नाहीं, असें वाटतें; आणि शीर शाहाची वावटळ निघून गेल्यावर पुनः राठोरलोक हे स्वतंत्र झाले असें संभवतें. अकबराचा कारकीर्दीचा आरंभीं राजा मालदेव हा जीवंत होता.

वरील रेतीचा मैदानाचा पश्चिमभागीं भाटी नावाचे लोक राहत असत. त्यांचा राजाचें ठिकाण जसलमीर हें असे. आपण यदुकुलांतील आणि यमुनाकांठचा मथुराशहराहून आलों, असें हे ह्मणतात. जेव्हां कृष्णानें द्वारका वसविली त्या वसाहतींत हे आलेले होते. तो मरण पावल्यानंतर यांस लोकांनीं गुजराथेंतून हांकून लाविलें; नंतर हे सिंधुनदाकडे निघून गेले. त्यापुढें पुष्कळ काळपर्यंत यांचा इतिहास राजपूती दंतकथांचा अति निबिड जालांत गुंतलेला आहे. कर्नल टाड याचा अभिप्रायाप्रमाणें इ० स० ७३१ पासून त्या कथांत इतिहासाचा संबंध लागतो; त्या सुमारास हे लोक सिंधुनदापासून पंचवीस कोशांत जसलमीराचा उत्तरेस तानोत एथें राज्य करूं लागले. पुढें इ० स० ११५६ त यांणीं आपली राजधानी जसलमीर एथें नेली. याशिवाय यांचा इतिहासांत विशेष सांगावयासारखी मोठी गोष्ट झालेली नाहीं. अकबराचा राज्यापूर्वीं या राजांचा मुसलमानांशीं प्रसंग कधीं विशेष झाला नव्हता.

जसलमीरचें राज्य.

अंबेर ऊर्फ जयपुरचे राजे हे कच्छ वंशांतील होते. अर्वाचीन काळीं उदेपुरचे राणे, व जोदपुरचे राजे यांचा बरोबर यांची योग्यता झाली आहे, परंतु यांची प्रसिद्धि अकबर गादीवर आल्यापासून झाली. हे पूर्वीं अजमीराखालचे पुरातन

अंबेर ऊर्फ जयपुरचें राज्य.

मांडलिक असत, आणि तें राज्य मुसलमानांनीं घेतल्यावर बहुधा हेहि मुसल्मानांचा तंत्रानें राहिले असावे. बहुधा पंधराव्या शतकांत जवळचीं राज्यें दुर्बल झालीं होतीं, तेव्हां यांणीं आपली महती वाढविली असेल; कारण जा वेळीं अकबरानें जयपुरचा राजाचा मुलीशीं आपलें लग्न केलें, त्या पूर्वींच यांची लोकांमध्यें योग्यता विशेष असावी.

हारावतीचें राज्य.

हार वंशाचे राजे हे जेथें राज्य करित, असत त्यास हारावती असें नाव पडलें आहे. मुसलमान हिंदुस्थानांत येण्यापूर्वीं अजमीर एथें जो वंश राज्य करित होता, त्यापासून यांची उत्पत्ति असून, त्यांणीं सांमतचें राज्य संपादन केलें. त्यांची इ० स० १३४२ मध्यें बुंदी एथें राजधानी होती. ते कांहींसे उदेपुरचा राण्यांशीं मांडलिकांचा संबंधानें असत. अकबराचा कारकीर्दीपूर्वींच त्यावेळचा हारावतीचा राजानें अफगाणांचा पादशाहाचा सुभेदारापासून रतनभोरचा प्रसिद्ध किल्ला घेतला. तेथपर्यंत मुसलमानी इतिहासांत यांचें वर्णन नाहीं.

रेतीचा मैदानांतील लहान लहान राज्यें.

या मोठ्या राज्यांशिवाय दुसरीं रेतीचा मैदानांत पुष्कळ लहान लहान राज्यें होतीं:— पारकर एथें चव्हाण, उमरकोट एथें सोद राजे, इत्यादि होते; हे मारवाडचा वैराणाचा अति पश्चिमटोंकास होते, यामुळें मुसलमानांचें वारें त्यांस पोंचलें नाहीं. परंतु शिरोहि, झालोर, इत्यादि राज्यें, हीं, आरावलीपर्वताचा पायथ्यास जो सुपीक देश आहे, त्यामध्यें होतीं, आणि अजमीराहून गुजराथेंत जो रस्ता जातो त्यावरच होतीं, त्यामुळें ते लोक हमेशा त्यांवर हल्ले

करून खंडण्या घेत असत.

तसेंच मधील उच्च प्रदेशाचा पूर्वेकडील सपाटीवर मेवात, ग्वालेर, नरवड, पना, ऊर्चा, चंदेरी, आणि दुसरीं बुंदेलखंडांतील संस्थानें, यांवर बाबर व शीर शाहा हे वारंवार हल्ले करित असत. हीं संस्थानें बहुधा जुनाट राजपूत घराण्यांकडे चालत होतीं, आणि अकबराचा राज्याचा आरंभीं हीं सर्व दिल्लीचा गादीस कर देत असत. उत्तरहिंदुस्थानाचा मध्यभागाचा उत्तरप्रदेशाचा पूर्वेकडील लहान राज्यें.

काश्मीरापासून बंगालचा आखातापर्यंत हिमालयपर्वतांतील जीं लहान संस्थानें होतीं, त्यांमध्यें तेथील राजे राज्य करित असून, तीं स्वतंत्र होतीं. दुसरे स्वतंत्र प्रदेश.

सर्व हिंदुस्थानभर पुष्कळ पहाडी व जंगली लोक हे जिंकिलेले नव्हते; परंतु ते स्वतंत्र होते, असें ह्मणतां येत नाहीं. हे लोक वस्तींतून उठून गेलेले अशांसारखे होते, परंतु ते केव्हां केव्हां हल्ले करून लोकांस उपद्रव देत असत.

---

# प्रकरण दुसरें.



## मुसलमानी राज्याची अंतर्गत स्थिति.

अकबर गादीवर आला त्या वेळीं दिल्लीचा मुसलमानी राज्याची आंतील स्थिति कशी होती हें आपणास वर वर समजतें; विशेष आंतील माहिती काढण्याचें साधन सांपडत नाहीं.

राजाची सत्ता.

मुसलमानी शास्त्राप्रमाणें मुसलमानांचा राजास पसंत करून नेमावें, आणि जर तो कुराणाचा आज्ञा प्रसिद्धपणें तोडील, अथवा मोठा अपराध करील, तर त्यास लोकांनीं पदच्युत करावा, असा शास्त्रविचार आहे; परंतु आचार ह्मटला, तर राजाधिकार वंशपरंपरेनें चालत असून राजाची सत्ताहि स्वेच्छेप्रमाणें असे. राजानें मुसलमानी कायद्याप्रमाणें चालावें असा सर्वांचा अभिप्राय खरा, परंतु उलमा[1] लोक अथवा दुसरे कोणी सरकारी कामगार यांजवळ यास कायद्याप्रमाणें वर्तविण्याचें कांहीं साधन नव्हतें; गांवगन्नाचा व्यवस्थेचा पाटिलकीचे वगैरे बंदोबस्त, तसेच जमीनदार वगैरे लोकांचा प्रांतांतील मूळचे देशी अधिकार ( ज्यांचें पुढें वर्णन केलें जाईल, ) आणि दुसरीं कांहीं पडून आड येण्याचीं साधनें, इतक्या गोष्टींनीं साधारण प्रसंगीं बादशाहाचा स्वेच्छाचारीपणास अटकाव होत असे; परंतु जेव्हां कांहीं गोष्ट करण्याविषयीं निश्चय

1 विद्वान् लोक मा० क०.

करून तो आपलेंच घेऊन उठे तेव्हां त्याचा परिहार करण्यास लोकांजवळ बंडाशिवाय दुसरा उपाय नसे.

जसा राजा स्वतः चपल असे, अथवा वजीराची हुशारी असे, त्याप्रमाणें वजीरातीचें काम उणें अधिक चाले. कितीएक कारकीर्दींत वजीरच अखत्यारीनें कारभार चालवी. कांहीं कारकीर्दींमध्यें इतर प्रधानांमध्यें त्याची मुख्य पायरी, इतकाच त्याकडे अधिकार असे. दुसऱ्या प्रधानलोकांकडे त्यांचीं त्यांचीं खातीं असत, परंतु त्यांचे तनखे साफ तोडून दिलेले नसत.

प्रधानलोकांची स्थिति.

या राजांजवळ रयतेची हजेरी लवकर लागे; ते अर्जोची स्वतः चौकशी करीत, आणि दररोज दरबार भरलें, ह्मणजे तेथें पुष्कळ कामकाज पाहात; असें केल्यानें कांहीं गोंधळ होऊन वेळ फुकट जात असेल खरा, परंतु त्यामुळें त्यांस पुष्कळ ठिकाणची बातमी कळत असे, आणि त्यांचे ठराव व राज्याची रीति हीं लोकांस प्रसिद्धपणें समजत असत.

कारभाराची रीति.

प्रांतांतील सुभेदार लोकांस राज्यसंबंधीं सर्व अधिकार बजावण्याचा अखत्यार असे. त्यांचा हाताखालचा पुष्कळ अम्मलदारांचा नेमणूका बादशाहाकडून होत, परंतु सर्वांवर त्याचा हुकूम असे. शिवाय बहुतेक प्रांतांमध्यें वतनदार हिंदु रजवाडे होते; यांतून जे अतिशय नमून असत, ते तेथील सुभेदारास आपला करभार देऊन, लागल्यास आपल्या कायमचा व प्रसंगवशात् ठेवलेल्या फौजेनिशीं त्यास मदत देत; जा कामांत जरूर वाटे, त्या कामांत सुभेदार हा आपली हुकुमत त्यांवर चालवी, परंतु तो त्यांचा नेहमींचा

प्रांतांची स्थिति.

कारभारांत हात घालित नसे. जे पहाडी वगैरे कडव्या मुलुकांतील व प्रांतांचा सरहद्दीवरील मोठमोठ्या प्रदेशांतील सरदार लोक असत, ते विशेष स्वतंत्र असत, आणि फकत मुख्य सरकारास साधारण रीतीनें मान देऊन प्रांताचा बंदोबस्ताचा कामास मदत करीत.[२]

बादशाहाची फौज दोन प्रकारची असे; कित्येकांस बसावयास सरकारी घोडे असत, व कित्येक घोडे व हत्यारें आपलीं आणीत. यांतून दुसऱ्या प्रकारचे लोक हे लहानमोठ्या टोळ्यांनीं येत, आणि त्यांचे सरदारहि स्वतांचे असत. दिल्लीचा बादशाहांचा कारकीर्दीत अखेरीस जाहगीरीचा हक्क नव्हता. पुढें **फिरूज शाहा तघलख्** याणें प्रथम जमीनीचा नेमणूका बदल मुशाहिरा दिल्या, असें ह्मणतात. **अल्लाउद्दीन खिलजी** हा आपले सरदार स्वतंत्र होतील या भीतीनें जमीनीचा नेमणूका मुळींच कोणासहि न देण्याविषयीं फार जपत असे.

लश्कराची स्थिति.

बहुतेक सुभेदारलोकांजवळ कांहीं नेमणूकी बादशाही फौज असे, व शिवाय त्या त्या ठिकाणीं शिबंदी ठेविलेली असे. कधीं बखेडा झाला असतां हुजूरून निराळ्या सरदारांबराबर कुमकेस फौज येई; ती फौज जर पुष्कळ

२ अशा प्रकारचा वंशपरंपरेचा सरदारांस प्रथम जमीनदार असें म्हणत असत. पुढें मुसलमानलोकांनीं गर्वानें उदेपुर व जोदपुर यांसारख्या स्वतंत्र राजांसहि हा किताब दिला, आणि हे आपले मांडलिक असा अभिमान वागवूं लागले; तथापि जा लोकांकडे सरकारी महसूलाची नेमणूक लावून दिलेली आहे, तसेच जे परगणाखात्याचे व गांवखात्याचे अम्मलदार आहेत, त्या सर्वांचा जमीनदार या शब्दांत समावेश व्हावा, इतकें या शब्दाचें जें महत्व कमी झालें, हें पाहूं गेलें असतां अर्वाचीन काळीं झालें आहे.

असली, तर तिजवरील सरदाराचा अधिकार बहुतकरून सुभेदाराचा अधिकाराइतका असे.

कोणे प्रसंगीं मोठें लश्कर जमा करावयाचें असल्यास कुमका पाठविण्याविषयीं सुभेदार लोकांस हुकूम जात, तेव्हां ते जमीनदारलोकांचा तैनातीचे लोक मिळवीत; प्रांताचा खात्याचा शिबंदीचे लोक जितके काढवत तितके निराळे काढीत; आणि जर त्यांचा हात चांगला चालत असला, तर त्या त्या प्रसंगाकरितां नवीन लोकहि ठेवीत.

मुसलमानी राज्याचा मूळसित्धांताप्रमाणें कायदा हा राजसत्तेपासून स्वतंत्र आहे, ह्मणजे राजसत्तेला कायद्याचा तंत्रानें वागणें आहे. तथापि न्यायाचा कामांत खलीफाचा अधिकार अगदीं नव्हता असें नाहीं, परंतु त्या कामांत आणि लश्करी व राजकीय व्यवहारांमध्येंहि कुराणांतील कानूंप्रमाणें, तसेंच पैगंबराचे ठराव आणि त्याची वहिवाट यांप्रमाणें, आणि आपल्या पूर्वीं जे खलीफा होऊन गेले, त्यांचे ठराव, आणि त्यांची वहिवाट यांप्रमाणें; इतक्या आधारानें त्याणें चालावें असें असे. थोडक्याच काळामध्यें असें झालें, कीं, निवाड्यांची संख्या वाढून, आणि विद्वान् नैय्यायिकांचे ग्रंथ होऊन एक मोठें धर्मशास्त्राचें भारूड जमलें; तेव्हां त्याचा अर्थ लोकांस कळविण्याकरितां निराळ्या धंद्याचे लोक लागूं लागले. शिवाय जसजसें मुसलमानलोकांचें राज्य वाढत चाललें, तसतसा देशरिवाजाप्रमाणें, आणि पादशाहांचा बुध्धीप्रमाणें कुराणाचा व्यतिरिक्त एक सार्वजनीन (ह्मणजे एका प्रकारचा साधारण) कायदा उत्पन्न झाला. या दोन तऱ्हांचा कायद्यापासून दोन

कायदेप्रकरण.

निरनिराळ्या प्रतींचीं न्यायाचीं ठिकाणें उत्पन्न झालीं. एक काजीचें दरबार; त्यामध्यें महम्मदी कायदा मात्र कबूल होत असे, आणि त्या कायद्यास अनुसरून तेथें काम चाले, व त्या दरबारासंबंधी वहिवाटीचे नियम ठराविलेले असत; दुसरीं सरकारचा अम्मलदारांचीं दरबारें; त्यांचा अधिकार मनस्वी, आणि अनियमित असे.

लग्न, दत्तविधान, स्थावरजंगम मिळकतीचा वारसा आणि साधारण रीतीनें असार्वजनिक मत्तेचा स्वामित्वा-विषयींचीं सर्व प्रकरणें, यांचे दिवाणी इनसाफ वाजवी रीतीनें काजीसमोर यावे; तसेंच राज्यामध्यें अथवा लोकांचा स्वस्थतेमध्यें बखेडा उत्पन्न करण्याचा बाबदींत गुन्हे असतील ते खेरीज करून, बाकी सर्वांचा इनसाफ काजीनेंच करावा, असें असे.

पादशाही अम्मलदारांचा अधिकार इतका स्पष्ट रीतीनें नेमून दिलेला नव्हता. जेथें सरकारचा अम्मलदारांमध्यें तंटे पडून काजीचा आवांक्याबाहेर असण्याजोगे पक्षकार बलाढ्य असतील, तेथें त्यांचा दिवाणी तंट्यांमध्यें हे अम्मलदार वाजवीच पडत असतील; तसेंच हिंदुलोकांचा कज्जांत, जेथें मुसलमानी कायदा लागू होत नसेल, तेथें ती उणीव हे लोक योग्य रीतीनें पुरी पाडित असतील; आणि जमीनीचा बाबदींतील पुष्कळ तंट्यांमध्यें सरकारचे महसूली अम्मलदार हे साहजिकच पंचाईत करित असतील, असें आपणास सहजच अनुमान करितां येतें. बंडवाले, कितूरी लोक, राजरस्त्यांतील दरवडेखोर, तसेंच सरकारचा पैसा खाणारे अथवा दुसऱ्या रीतीनें सरकारचा प्रत्यक्ष गुन्हा करणारे लोक यांचा फौजदारी कज्जांमध्यें इनसाफ

करण्याचा अधिकार सरकारचा वरील अम्मलदारांकडेसच होता, तें बाजवीच होतें; तथापि सुभेदार व त्याचा हाताखालचे अम्मलदारलोक हे, याच प्रकारचा इनसाफांकडेस मात्र आपलें लक्ष द्यावें, दुसऱ्यांकडे देऊं नये, असें बारीकसारीक पाहत नसत; त्यांकडेस जा सर्व फिर्यादी येत त्या ते घेत; पुष्कळ कज्जांमध्यें ताबडतोब इनसाफ करीत, आणि जा कज्जांत मुसलमानी कायद्याचा मुद्द्यांवर इनसाफ राही, ते कज्जे काजींकडे पाठवीत; तसेंच जांमध्यें विशेष अर्थ नसे, अथवा जांत कांहीं लाभाचें संधान दिसत नसे, तेंहि काजींवर सोंपवीत. निरनिराळ्या बादशाहांचा कारकीर्दींत काजींचा सत्तेचें मान बदलत असे. कोण्या वेळीं प्रांतांतील अदालतीचा दरबारांतहि मोठे प्रसिद्ध विद्वान् काजीलोक यांचा नेमणूका असत, तसेंच प्रसंगवशात् सुभेदारांचा सत्तेचा आडहि काजी येत असत; त्यावरून अशा वेळीं त्यांचा सत्तेस मान असे, असें अर्थात् अनुमान केलें पाहिजे. लग्नें लावणें, खतें नोंदणें, व त्यांवर सईशिक्का करून देणें, व अशींच साधारण लहानसहान कामें हल्लीं काजींकडे राहिलीं आहेत; याच प्रमाणें पूर्वींहि कधीं कधीं काजींची महती बुडालेली असे, असें संभवतें.

धर्माविषयीं.

या बादशाहांचा कारकीर्दींत धर्मसंबंधीं नेमणूकी खातें नव्हतें, ह्मणजे धर्मसंबंधीं राजकीय कारभार नसे. राजा असो, किंवा रयत असो, जो कोणी मशीदीची स्थापना करील, तो, तेथील इमाम ( ह्मणजे उपाध्याय ) व दुसरे पूजेचा कामास लागणारे चाकरलोक, यांचा निर्वाह चालण्यास द्रव्य ठेवी. मोठे धार्मिक लोक व त्यांचे वंशज, यांस वेतनें करून दिलेलीं असत; आणि

त्यांचा कबरांकडेहि नेमणुका लावून दिलेल्या असत. या सर्व नेमणूकांचे, अथवा सरकारांतून झालेल्या असतील त्यांचे तरी, उद्देश तडीस गेले, किंवा नाहीं, हें पाहण्याकरितां दर एक परगण्यांत सदर ह्मणून एक अम्मलदार नेमलेला असे; आणि या सर्व सदरांचा मुख्य सदरुस्सदूर ( ह्मणजे दानाध्यक्ष ) याची नेमणूक असे. जा जा नेमणूका लावून दिलेल्या असत, त्या त्या पैशाची व्यवस्था बराबर होत आहे किंवा नाहीं हें पाहणें हें त्याचें काम असे. परंतु त्या नेमणूका कोणाकडे चालाव्या त्याचा ठराव करणें हें दान देणारा ठरवित असे; आणि तें बहुतकरून नेमणूकवाल्याचा मर्जीवर, आणि जवळपासचा विद्वान् लोकांचा मर्जीवर असे.

मौलवीलोकांविषयीं.

धर्मोपदेशकांचा नेमणूकी अभाव नसे, परंतु मौलवी ऊर्फ मुल्ले या दरजाचे लोक असत; त्यांतून न्यायाधीशीचा, वकालतीचा व धर्मोपदेशकांचा, या सर्व जागा बहुधा अथवा किंबहुना सार्वकाळहि भरित असत. हे लोक कायदा व धर्मशास्त्र यांमध्यें पंडित असत; परंतु केवळ धर्मोपदेशक असत, असें ह्मणवत नाहीं. कोणी मनुष्य विद्वत्तेनें आणि योग्यतेनें मोठा झाला, ह्मणजे कित्येक मौलवीलोकांतील मुख्यांची सभा होऊन तींत त्याची परीक्षा घेत व त्याला एक चमत्कारिक रीतीचें पागोटें बांधून समारंभानें त्यास मौलवीपणाची पदवी देत. त्याला कांहीं शपथ वाहवी लागत नसे; अथवा मौलवी झाला ह्मणून कोणाची हुकुमत त्यावर चालत नसे; परंतु लोकापवादाची भीति आणि बढतीची आशा एवढ्यांची मात्र त्याला अटक असे.

धर्मोपदेशकांहून अगदीं भिन्न असे पुष्कळ गोसावी लोक असत, त्यांस इराणांत दरवेशी ह्मणतात, परंतु हिंदुस्थानांत फारकरून फकीर ह्मणतात. कोणा लोकांचा धार्मिकपणापासून या पंथाचें मूळ होऊन, पुढें हा मुसलमानी धर्मावर जसा एक मोठा व्रणच वाढला आहे. प्रथम मुसलमानांमध्यें कोणी पीर नव्हते; पुढें पाखंडी लोकांशीं लढाया करतांना जे महम्मदी धर्माचे प्रख्यात भक्त मरून गेले, त्यांचे लोकांनीं प्रथमतः पीर बनाविले. पुढें हळू हळू,हठयोग करून धर्माचा विचारांतच ज्यांणीं आयुष्य घालविलें,त्यांसहि लोकांनीं बहुधा ते जीवंत असतांच पीर करून सोडिलें. या पीरांचे पुढें शिष्य झाले, त्यांणीं काळेंकरून आपले पंथ केले, आणि त्यांमध्यें कांहीं बोलण्याचा खुणा, व दुसरे कांहीं गुप्त विचार शिकवून व तसेच चमत्कारिक पोषाग व नेमधर्म लावून देऊन, आपआपला पंथ ओळखतां यावा अशी यत्ता केली. यांतून पुष्कळ पंथ लवकरच लयास गेले, आणि दुसऱ्यांचे नवनवे पंथ झाले. कांहीं फकीरलोक आपल्या मुख्यांजवळ राहत असत; दुसरे, धर्माचें ठिकाण पाहून, अथवा दुसऱ्या कारणानें एकत्र जमत असत, परंतु हिंदूंचा बैरागीलोकांसारखे यांचे मठ नव्हते.

फकीरलोकांविषयीं.

या पीरलोकांत जे मोठे प्रख्यात झाले, ते मोठीं भविष्यें सांगत, तीं उतरत, तसेच त्यांचा नमाजांपासून चमत्कार होत, याप्रमाणें त्यांचे शिष्य बढाया सांगीत; परंतु ते पुरुष स्वतः धुतारे नव्हते. आतां अर्वाचीन काळीं दुसरे हलक्या मतींचे फकीर झाले, ते लोहचुंबक, फासफरस, इत्यादि चमत्कारिक पदार्थांचा सहायानें लबाड्या करून, व

हस्तकौशल्याचा योगानें जादूगिरी करून, आपणांमध्यें अपूर्व सामर्थ्य आहे, असें दाखवीत. उत्तम मतीचा फकीरांतून पुष्कळांचा पादशाहलोकहि अतिशय मान ठेवित असत, आणि ते फकीर आपली गरीबी दाखवून आपण उपवास काढितों असें जरी सांगत, तरी त्यांस मोठ्या समारंभानें राहण्याची सवय असे, किंवा ते अतिशय द्रव्याचा धर्म तरी करित असत[3] यामुळें त्यांचें कधीं कधीं एवढें स्तोम वाढे, कीं सरकारचाहि मनांत त्यांविषयीं द्वेष उत्पन्न होई. लोकांनीं मोठे पवित्र मानिलेले असे पीर यांणीं राज्य बुडविण्याकरितां वास्तविक फितूरें केल्यावरून अथवा फितूरांचे त्यांजवर वहमे आल्यावरून त्यांचे शिरच्छेद केले गेले; अशीं पुष्कळ उदाहरणें घडून आलेलीं आहेत.[4]

(३) बहाउद्दीनझकराया हा चौदाव्या शतकाचा आरंभीं मेला. यास अद्यापि मोठ्या पवित्र पीरांतला असा मानितात. हा मेला, तेव्हां यानें आपल्या वारसांस अपार द्रव्य मागें ठेविलें.

(४) इबन भतूता नावाचा एक अफ्रिकेंतील फिरस्ता गृहस्थ हिंदुस्थानांत आला होता. तो चौदाव्या शतकाचा मध्यास झालेलीं या सर्व प्रकारचीं उदाहरणें देतो. त्याचा वेळीं एका मोठ्या फकीरास फितूराचा गुन्ह्यावरून फांशीं दिलें असें पूर्वींच वर्णन आलें आहे. खरे तपस्वी असून ज्यांचा कांहीं डौल नाहीं असे पुष्कळ लोक यास आढळले, परंतु आपण बहुधा मुळींच अन्नाशिवाय असतों असें ढोंग करणारा असा एक पुरुष, व शंभर वर्षांपूर्वी मेलेल्या खलीफास (पाहिल्याची) आठवण आहे असा आव घालणारा असा दुसरा पुरुष, असे ढोंगी हि गृहस्थ त्यास भेटले होते. वरलिांतून पहिल्या फकीरानें इबन भतूता याचा मनांतल्या गोष्टी सांगितल्या आणि पुढें काय होणार तीं भविष्यें सांगितलीं. दुसऱ्या एका फकीराजवळ सात बोकड असत, ते कुत्र्यांसारखे त्यामागून जात; आणि एक सिंह असे, तो व हरीण एका ठिकाणीं दोस्तीनें राहत असत.

तेराव्या शतकांत व चौदाव्या शतकाचा आरंभीं या धर्मिष्ट लोकांचें प्रकरण खूब माजलें होतें. त्या वेळचा व पुढीलहि पुष्कळ पीरांस लोक अद्यापि भजतात, आणि त्यांना नवस करितात व त्यांचा उरूसांसहि जातात; परंतु त्यांचे अनुयायी जे फकीर त्यांस जरी कदाचित् पूर्वी मान देत असले, तरी पुष्कळ दिवसांपासून त्यांचें वजन नाहींसें झालें आहे.

थोथांडांविषयीं.

त्या वेळीं पुष्कळ थोथांडें चालू असत, त्यांतून पुष्कळांचा धर्माशीं संबंध नसे, आणि कितीएक धर्माचा विरुद्धहि असत. फलज्योतिष, होरा सांगणें, जादू करणें, व दुसरे असेच फंद करणें, हें मूळीं महम्मद याणें मना केलें असून, त्यांवर लोकांचा अपार भरवसा असे. हें तर असो, परंतु हिंदूंचेहि आचार, आणि त्यांचा धर्मातून उद्भवलेल्या कुत्सित कल्पना यांचें प्राबल्य वाढू लागलें. खरे मुसलमान ग्रंथकार यांणीं जोगीलोकांचा चमत्कारांवर कुराणांतील चमत्कारांप्रमाणें पूर्ण भरवसा ठेवून त्यांचें वर्णन केलें आहे; त्या काळीं जादूवर सर्वत्र भरवसा ठेवित असत; शकून व स्वप्नें यांजकडेस अतिशय लक्ष देत असत; धर्माविषयीं पाखंडी विचार मनांत येऊन असा भोळाभाव उत्पन्न झाला असेल असेंहि ह्मणवत नाहीं; अकबर हा हीं थोथांडेंहि कबूल करी, आणि त्याचा मुलगा जहान्गीर हा तर त्यांचा दास असे; असें असून औरंगजेब, हा धर्माभिमानी असतांहि, या गोष्टींस जितका तुच्छवत् मानित असे, असें कोणीच मानिलें नसेल.

शिया धर्म हा जसा दक्षिणेमध्यें पसरला, तसा उत्तर-

थांड फार होतें.

त्या वेळीं हिंदुलोकांस कांहींसे तुच्छवत् मानित असत, परंतु त्यांशीं द्वेष करित नसत. त्यांवर अजीया ह्मणून शिरगणतीची पट्टी होती, व तसेच द्वेषबुद्धीनें त्यांचामध्यें व मुसलमानांमध्यें दुसरे भेद केलेले होते; परंतु त्यांचा धर्मसंबंधीं आचारांत त्यांना उपद्रव देत नसत. कांहीं लश्करी सरदार हिंदु असत असें जांचें पूर्वीं वर्णन आहे, ते कदाचित् हिंदु जमीनदार आपल्या तैनातीचे लोक घेऊन आलेले असतील, परंतु ते सरकारांतून नेमलेले सरदार नसतील. पुष्कळ हिंदुलोकांस दिवाणी कामें देत असत, आणि त्यांतून मुख्यत्वेंकरून महसुली व हिशेबी देत असत, असें वर्णन आहे. हेमू व मेदिनीराय यांकडेस तर त्यांचा यजमान बादशाहांनीं सर्व राज्याचा अधिकार दिला होता, आणि मुबारिक खिलुजी याचा वेळीं सर्व दरबारची चर्या व कारकीर्दीचा रोंख हिंद्वी होता.

हिंदुलोकां-विषयीं.

मुसलमानी धर्मांत पुष्कळ हिंदुलोक केव्हां आले, अथवा त्या येणारांचें धर्मांतर कोणचा रीतीनें झालें, याविषयीं अभिप्राय देणें कठीण आहे. कारण या लोकांची प्रत्यक्ष स्थिति पाहून या प्रकरणीं आपणास विशेष समजत नाहीं. बंगालचा पूर्वेकडील

धर्मांतरा-विषयीं.

५ जेव्हां मी हिंदुस्थानांत आलों, तेव्हां महसूलाचे अम्मलदार, सावकार, व कामगारलोक, हे सर्व हिंदु होते, असें बाबर याणें सांगितलें आहे.

ल्ली व आग्रा या राजधान्यांजवळ त्याहून फार थोडें[६] आहे.

मुसलमानांचा शस्त्रांचा भीतीनें, अथवा त्यांचा मतांच्यें नवल वाटून प्रथम पुष्कळांनीं धर्मांतर केलें; परंतु पुढें, जेव्हां त्यांचे मतवाद चालू झाले, आणि हटाग्रह कमी झाला, तेव्हां अर्थातच धर्मांतराचा विरुद्ध वृत्ति लोकांमध्यें सहजच उत्पन्न झाल्या.

सांप्रत हिंदुस्थानांतील एकंदर वस्तीचा एक अष्टमांशाहून जास्त मुसलमान नाहींत. पूर्वीं बाहेरील प्रांतांतून पुष्कळ मुसलमान येत असत, आणि याप्रमाणें त्यांचा येण्याचा क्रम पुष्कळ दिवस चालला होता; तशीच मुसलमानलोकांवर बादशाही सरकारची मेहेरबानीची नजर असे, आणि आपल्या मुलांचें संगोपन करण्याची त्या लोकांस पुष्कळ सोय असे; यामुळें सहजच प्रजा विशेष होऊन ८०० वर्षेंपर्यंत त्या लोकांची संख्या वाढली असावी. तेव्हां यावरून पुष्कळ हिंदूंनीं धर्मांतर केलें नसावें असें वाटतें. आतां सांप्रत सर्व देशांतील वस्तीचा अष्टमांश मुसलमान आहेत, असें वर सांगितलें; हे सर्व जरी मूळ हिंदु असून धर्मांतरानें मुसलमान झाले असतील, तरी दुसऱ्या मुसलमानीं

६ गंगेचा पूर्वेकडील बंगालप्रांतांत वस्तीचा मानाप्रमाणें निमेहून जास्त मुसलमान आहेत; परंतु बंगालचा बहुतेक दुसऱ्या भागांत मुसलमानलोकांची चतुर्थांश वस्ती आहे, परंतु बहारचा पश्चिमेस काशीप्रांतांत सुमारें २८ वर नाहीं, बहारचा पश्चिमभागास एकंदर वस्तीचा एक तेरांश मुसलमान होते, असें बुकानन साहेबाचा ग्रंथांत आहे.

महसूला-विषयीं. कांचा कारकीर्दींत जशी होती, तीच पद्धति यांणीं चालविली होती असें संभवतें. कारण जे फेरफार शीर शाहानें आरंभिले, व अकबरानें तडीस नेले, ते ती पद्धति अधिक पक्की करण्याकरितां केलेले होते; ती अजीं बदलण्याकरितां केलेले नव्हते. तथापि नवीन राज्यांचा घडामोडींचा घालमेलींत, व परकीय राजांचा मूर्खपणामुळें महसूलाचा कामांत पुष्कळ अनर्थ होऊन जुलूम झाले असतील.

लोकांचा स्थितीविषयीं. लोकांचा नेहेमींचा स्थितीवरून त्यांवर जुलूम होत असे, असें दिसत नाहीं. जा इतिहासकारानें इ० स० १३५१ तागाईत इ० स० १३९४ या वेळचा फिरूज शाहा बादशाहाचा कारकीर्दीचा वृत्तान्त लिहिला आहे, त्याणें त्या वेळीं रयत कशी सुखी होती; त्यांचीं घरें व त्यांतील सामान किती चांगलें असे, आणि त्यांचा बायका सर्वत्र सोन्यारुप्याचे दागिने कसे घालित असत; याविषयीं पुष्कळ वर्णन केलें आहे. हा ग्रंथकार मोठा खुशामती आहे, यामुळें यावर विशेष भरवसा ठेवितां येत नाहीं. परंतु याणें पुष्कळ गोष्टी वर्णन केल्या आहेत, त्यांत प्रत्येक रयतलोकाजवळ एक चांगला मंचक आणि सुंदर बाग हीं असत, असें वर्णन केलें आहे. तेव्हां त्याणें या गोष्टी फकत जाणविल्या आहेत, एवढ्यावरूनच त्या वेळीं लोकांचा सुखाकडे विशेष सूक्ष्म लक्ष असे, असें दिसतें; असें दुसऱ्या अर्वाचीन ग्रंथकाराचा

... असावी.

निकोलो डि कांटी नामें एक फिरस्ता गृहस्थ इ० स० १४२० चा सुमारास हा देश फिरला, त्याणें जी गुजराथेची स्थिति पाहिली, तिजविषयीं फार वर्णन केलें आहे; त्याणें गंगाकांठचा अथवा बहुधा मेग्नाकांठचा देश पाहिला; तो शहरांनीं भरून गेलेला असून, त्यासभोंवते सुंदर बाग व उपवनें हीं होतीं; पुढें चार मख्यात शहरें त्यास लागून शेवटीं तो महाराज्य शहरास पोंचला; तें शहर सोनें, रुपें, आणि जवाहिर यांणीं भरलेलें, व बलाढ्य होतें, असें त्याणें वर्णन केलें आहे.

देशाचा स्थितीविषयीं.

शहरें व व्यापार यांविषयीं.

सोळाव्या शतकाचा आरंभीं बारबोसा व बारतेमा यांणीं या देशांमध्यें पर्यटन केलें, त्यांचा लेखांवरूनहि वरील हकीकती खऱ्या आहेत असें मत्यंतर मिळतें. त्यांतून मुख्यत्वेंकरून बारबोसा याणें खंबायत शहराचें वर्णन केलें आहे; तें असें कीं तें चमत्कारिक व मजबूद बांधलेलें असें शहर आहे; त्यासभोंवतील देश सुंदर व सुपीक आहे; त्या शहरांत सर्व देशांतील सावकार लोक आलेले आहेत व फ्लांडर्स शहरासारखे कारीगर व कारखानदार लोक यांणीं तें भरून गेलें आहे; या प्रकारचें तें वर्णन आहे. महम्मद तघलखाचा कारकीर्दींत बेबंद राज्य व जुलूम जिकडे तिकडे चालत असतां, इ०स०१४४० किंवा १४५० चा सुमारास, इबन भतूता याणें या देशांत पर्यटन केलें; तो जा प्रांतांतून गेला त्यांत बहुतकरून बंडें चाललीं होतीं; तथापि पुष्कळ मोठीं व भर वस्तीचीं शहरें व नगरें आपणास लागलीं असें त्याणें वर्णन केलें आहे, त्यावरून, त्या वेळचा



येऊन वर्णन केलें आहे, त्यांत हल्लीं युरोपीयन लोकांस जसा हा देश आवडत नाहीं, त्याचप्रमाणें त्यासहि हा आवडत नव्हता असें त्याणें लिहिलें आहे; तथापि हा देश मोठा संपत्तिमान् व भव्य, व एथें सोन्यारुप्याची समृद्धि होती, असें वर्णन केलें आहे. तशीच एथील वस्ती दाट, व प्रत्येक व्यापारांत व धंद्यांत कुशल असे अपार लोक हें पाहून त्यास आश्चर्य वाटलें होतें, असें दिसतें.[७]

---

(७) हिंदुस्थानाचा समृद्धीविषयीं वर वर्णनें आलीं आहेत; परंतु बाबर याचा वेळीं काल्पीजवळ, आणि करा व माणिकपुर या परगण्यांत हत्ती पुष्कळ असत, आणि माळव्याचा पूर्वेस कोलाऱ्याजवळ त्याच जनावरांचा एक कळप अकबरासहि भेटला होता, असें वर्णन आहे; त्यावरून वरील ठिकाणें रानांमध्यें होतीं, आणि तें जंगल नंतर नाहींसें झालें, असें आपणास कदाचित् अनुमान करितां येईल. पुढें तरी हे हत्ती जे नाहींसे झाले ते मुसलमान शिकारी लोकांचा उद्योगानें नाहींसे झाले, देशाची सुधारणूक होऊन नाहींसे झाले, असें नाहीं, असें माझें मन धांवतें. बाबराचा पूर्वीं सुमारें दोन शें वर्षांवर इब्न भतूता याणें आपला ग्रंथ लिहिला, त्या वेळीं करा व माणिकपुर हे दोन प्रांत हिंदुस्थानामध्यें अतिशय दाट वस्तीनें भरलेले होते, असें तो वर्णन करितो. दुसरें असें दिसतें, कीं थोडकासा डोंगरी देश आणि थोडें जंगल एवढें हत्तींस राहण्यास पुरे असावें; व ते आपला भक्ष शोधण्याकरितां वसाहतीचा मुलुकांत जात असावे; आणखी असें आहे कीं हत्तींचा वस्तीमुळें जवळ मनुष्यांची वस्ती होत नाहीं, असा कांहीं अवश्यक कार्यकारणसंबंध नाहीं; कारण बंगालचा भर वस्तीचा मुलुकाजवळ राजमहालपर्वतांत अद्यापि गेंडे पुष्कळ आहेत; आणि वऱ्हाडप्रांताचा उत्तरेस मोठें अरण्य आहे, तरी त्यांत गेंडे व हत्ती यांतून कांहींच नाहींत, अथवा कदाचित् थोडे असल्यास ते लोकांनीं बाळगलेले हत्ती पळून गेलेले असतील, असें अनुमान करितात.

... कमी नव्हती. इ० स० १४४२ त तैमूरलंग याचा नात्वाकडून अब्दुरिझाक-नामक वकील आला होता; त्याणें दक्षिणहिंदुस्थान हा देश पाहिला, व त्याचें त्याणें वर्णनहि केलें आहे. हा देश त्या वेळीं मोठ्या भरभराटींत होता, याविषयीं या सर्व ग्रंथ-कारांचें एकमत आहे.

जांणीं जांणीं विजयनगर पाहिलें, त्यांणीं त्यांणीं त्या नगराचा विस्तार, आणि त्याची शोभा हीं अतिशय व-र्णन केलीं आहेत. जशीं दुसऱ्या ग्रंथकारांनीं दिल्ली व क-नोज या शहरांचीं वर्णनें केलीं आहेत, त्याप्रमाणेंच यांणीं विजयनगरचें व तेथील राहणाऱ्या लोकांचा श्रीमंतीचें आणि राजाचा डामडौलाचें वर्णन केलें आहे.

याशिवाय दुसऱ्याहि शहरांचें वर्णन केलेलें आहे; दक्षिणहिंदुस्थानाचा टोंकास मधुरानामक नगर नुकतेंच मुसलमानलोकांनीं त्या वेळीं घेतलें होतें, तें दिल्लीसारखें होतें, असें इबन भतूता वर्णन करितो. दोन महिनेपर्यंत मलबारांतून जात असतां, एक वीतभर जागाहि शेतभातीशिवाय रिकामी नव्हती; तसाच प्रत्येक गृहस्थाचा बाग असून त्याचा सभोंवता लांकडांचा कठडा व त्या बागामध्यें घर, असें होतें, असें भतूता सांगतो.

त्या वेळचीं बंदरें दुसऱ्या सर्व गोष्टींहून वर्णनीय असत. पूर्वेचा व पश्चिमेचा दोन्ही किनाऱ्यांवरील बंदरें हीं मोठीं शहरें होतीं, तेथें पृथ्वींतील सर्व देशांतून सावकार लोक येऊन राहत असत आणि आफ्रिका, आरबस्तान, इराण,

चालत असे.

पुढील बादशाहांचा इतिहासकारांनीं आपल्या यजमानांची स्तुति करण्याकरितां पूर्वींचा बादशाहांनीं जी सुधारणूक केली तिची किम्मत कमी केली आहे. आपल्या यजमानानें डांक बसविली, असें एक वर्णन करितो; मोठे रस्ते बांधून बाजूनें धर्मशाळा बांधिल्या व दुबाजू झाडें लाविलीं, ही सुधारणूक आपल्या यजमानानें केली असें दुसरा इतिहासकार ह्मणतो; आणि हिंदुस्थानांतील बहुतेक उपयोगी कल्पना या अकबरानें काढिल्या असें अबुल् फझल् वर्णन करितो. परंतु महम्मद तघलखाचा वेळींच घोड्यांची व कासीदांची नियमित डांक होती असें इबन भतूताचा ग्रंथावरून समजतें; आणि जेव्हां गांवचा पाटीलकीचे वगैरे बंदोबस्त झाले, त्या वेळींच एका प्रकारची पायदळी कासीदांची डांक थोडी बहुत चालू झाली असावी, असें दिसतें.

रस्त्यांची सुधारणूक शीर शाह याचा कारकीर्दींत झाली असेल, तर असो; परंतु त्याचा पूर्वीं दोन शें वर्षांवर मलबारप्रांतांत राजरस्त्यावर बहुतेक ठिकाणीं झाडांची छाया आणि दरएक मजलेवर धर्मशाळा, आणि विहिरी हीं

---

८ इराण, आर्बस्तान व जवळील देश यांतील तारवांशिवाय मलबारचा कितीएक बंदरांत चीनदेशांतील "जंक" नामें मोठे बगळे येत असत.

९ दर एक गांवास एक गांवचा हलकारा असे. तेव्हां थोडक्या खर्चानें बातमी जलद जावी ह्मणून परगण्याचे अम्मलदार आपलीं पत्रें बहुतकरून गांवगन्ना पेंडावर सहजच पाठवित असतील.

अलीकडे लागला आहे; तो ख्रिस्ती सनापूर्वी तीन शें वर्षांचा असावा, असें सर्व प्रमाणांवरून वाटतें. त्यांत लोकोपयोगी राजरस्त्यांवर झाडें लावावीं, व विहिरी खणाव्या, याप्रकरणीं राजानें एक विशेष हुकूम केला आहे.

नाण्याविषयीं.

अकबर याणें सोन्याचें किंवा रुप्याचें नाणें प्रथम पाडिलें असें, अबुल् फझल् याणें नाहीं, परंतु दुसऱ्या कांहीं ग्रंथकारांनीं, वर्णन केलें आहे. परंतु हें ह्मणणें सर्व इतिहासाशीं मिळत नाहीं; कारण जरी पूर्वी हिंदूंमध्यें या धातूंची चलन नसली, तरी ख्रिस्ती शकाचा आरंभाचा सुमारास त्यांणीं बल्क प्रांतांतील युनानी लोकांची चलन आपण घेऊन या देशांत चालू केली होती, असें दिसतें. पुढें समानी वंशाचे राजे व खलीफालोक, यांचा कारकीर्दीमध्यें जी नाण्याची चाल होती, ती गजनवी राजांचानें टाकवली नसेल; आणि मार्सडन याणें दिल्लीचा बादशाहांचा नाण्यांचा जो संग्रह केला, त्यांत दुसऱ्या नंबरचें नाणें अल्तमश् नामें पादशाह जो इ० स० १२३५ त मरण पावला, त्याचा वेळचें रुप्याचें होतें.

निरनिराळ्या पादशाहांचा कारकीर्दीस जा निरनिराळ्या नाण्यांची चलन असे, त्यांचा किम्मती मुकरर करणें हें कठीण आहे; आणि त्या करणें झाल्यास असल्या विषयांचा शोध करण्याचा जा पुरुषास अभ्यास असेल, त्याणेंच पुष्कळ दिवसपर्यंत शोध केला, तर मात्र त्यांचा किम्मतींविषयीं कदाचित् निश्चय करितां येईल. पहिले राजे हे खलीफांप्रमाणें दिनार व दर्हम या चलनी चालवित असत; त्यानंतर



व भाव हीं बसविलीं; तींच पुढें मोगललोकांचा राज्याची अखेरी होईपर्यंत तशींच राहिलीं, आणि सांप्रत जें नाणें चालत आहे, तेंहि त्याच आधारावर पाडलेलें आहे.

शिल्पविद्ये-विषयीं.

पूर्वींचा मुसलमानलोकांची शिल्पविद्येमध्यें किती निपुणता होती, याविषयीं त्यांचा जा इमारती राहिल्या आहेत त्यांवरून कांहींसें अनुमान करितां येतें. कुतबमनोऱ्याजवळ एक अपुर्ती मशीद आहे, तिला नोकदार एकेरी मेहराबीचा कमानी आहेत. त्या अतिशय उंच असून त्यांवर शोभिवंत भरगच्ची नकशीदार लेख आहेत[१०]. या प्रकारचा जा फार जुन्या कमानी हिंदुस्थानांत आहेत, त्यांतील या आहेत. यांतील मधली कमान हि॰ स॰ ५९४ ह्मणजे इ॰ स॰ ११९७ यांमध्यें संपली असें तिजवरील लेखावरून समजतें. यापुढें जे अकबरापर्यंत राजे झाले त्यांचा वेळचा इमारतींस लहान एकेरी मेहराबदार कमानी आहेत, त्यांवरून तेव्हांचा मेस्त्रीलोकांस मोठा घुमट बांधण्याचें कसब नव्हतें, असें दिसतें. त्यांचा मशीदीमध्यें दर चार खांबांवर एक लहान घुमटी,

१० अलूतमश बादशाह यानें कुतबमनोरा हा इ॰ स॰ १२१० व १२३६ यांमध्यें संपविला. त्याचा दरवाजांस एकेरी मेहराबदार कमानी आहेत. जुनी व नवी दिल्ली यांमधील मोडलेल्या इमारती एवढ्या जरी नीट तपासून पाहिल्या, तरी तेवढ्यानेंच हिंदुस्थानांतील लोकांची शिल्पविद्येमध्यें गति किती झाली होती, तें समजेल आणि तेणेंकरून पूर्वेकडील देशांत शिल्पविद्येचा प्रसर कसा झाला, त्याविषयींची पुष्कळ माहिती होईल.

रील तऱ्हा मशीदींस पूर्वींपासून लागू केलेली होती या कारणामुळें, पुढें जरी मोठे घुमट बांधण्याजोगे कसबी कारीगर झाले, तरी त्यांणींहि हीच तऱ्हा कायम ठेविली असेल, असें संभवतें; कारण फिरूज तघलख् याचा कारकीर्दींत इ० स० १३८७ त दिल्ली एथील काळी मशीद बांधिली, तीं जुन्याच पत्धतीची आहे. असें असतां ग्यासुद्दीन तघलख् हा इ० स० १३२५ त मरण पावला असून त्याचा कबरेवर एकच मोठा घुमट बांधिलेला आहे.

पूर्वींचे घुमट सखल व सपाट असत ते जहान्गीर किंवा शहाजहान याचा वेळापर्यंत हळूहळू उंच होत चालले; ते पुढें पुढें अर्धवर्तुळाहूनहि उंच होऊन वाटोळ्या पायावर उठवलेले असे बांधूं लागले. निरनिराळ्या वेळचा कमानीहि निरनिराळ्या प्रकारचा बांधलेल्या आहेत. पूर्वींचा कमानी साध्या गॉथिक[११] पद्धतीचा आहेत आणि अगदीं अलीकडचा आहेत त्या घोड्याचा नालासारख्या असून पाकळ्यांचा आहेत. अकबर राज्यावर आल्यानंतरचा जा इमारती बांधलेल्या आहेत, त्या नाजूक असून पूर्वींचांपेक्षां फार उंच व मोठ्या शोभिवंत आहेत. पूर्वींचा जरी ओबडधोबड आहेत तरी त्यांचें मोठें प्रचंड व नीरस स्वरूप पाहिल्यानें मनावर विलक्षण ग्रह होऊन जातो.

हिंद्वी शिल्पकामांत जशी एकेरी मेहराबदार कमानीची

---

११ गाथिक ही समकोणाकृति एकेरी मेहराबदार कमान बांधण्याची युनानी लोकांची एक पत्धति आहे.

आहेत, परंतु सर्वांस पाहिल्यानें या दोहोंचा सारखेपणा दिसतो; परंतु हिंद्वींत घुमटांचा प्रचार फार असून त्यांचा विशेषात्कार आहे, आणि गलथ्यांचा रेषा सरळ असतात; हा या दोन्ही तऱ्हांमध्यें मोठा भेद आहे. या देशांत जा जुन्या इमारती आहेत त्यांची बाकी सर्व तऱ्हा गाथिक आहे; परंतु त्यांचा गलथा भव्य व एकसारिखा पातळ दगडी चिपांचा असतो, व तो फार बाहेर आलेला असतो आणि त्यास त्याच दगडाचा मोठ्या ठोकळ्याचा आधार असतो.

या हिंद्वी इमारतींत पुष्कळ बुरूज व कळस असतात; परंतु तेणेंकरूनहि ही तऱ्हा गाथिकेशीं जास्त मिळती होत नाहीं. कारण हे बुरूज बहुधा विरळाच गायदूम होतात, व फार बारीक होतात असें कोठेंच नाहीं; तसेंच सर्व बुरूजांवर घुमट असतात, त्यांचे परिघ केव्हां केव्हां बुरूजांचा पेक्षां मोठे असतात.

रीतिभातीं विषयीं.

पूर्वींचा मुसलमानांचीं शरीरें दृढ, आणि निरोगी असत. एक जाड कपड्याचा तोकडा झगा हा त्यांचा पोषाग असे, आणि ते हमेशा मोठे जोडे घालीत. औरंगझेबाचा वेळचे मुसलमान शरीरानें कृश, काळे, आणि रोगानें पिकटलेले, असे बहुधा असत; आणि ते अतिशय तलम मलमलीचे सफेत झगे घालीत; त्यांचा दुणी कमरेपासून खालीं अतिशय पसरून त्यांचे उघडे पाय व बिरंगवलेले जोडे हेहि दिसत न दिसत. हा बदल कसा होत गेला, आणि तशाच लोकांचा रीतिभाती कशा बदलल्या याचा

दिसतें. चौदाव्या शतकाचा मध्यास लोक विड्याचीं पानें खात असत व चमत्कारिक पक्वान्नें करित असत; आणि त्यांचा रीतिभातीहि विलक्षण झालेल्या होत्या, असें इबन भतूता वर्णन करितो. पुढें सोळाव्या शतकाचा आरंभीं बाबर हिंदुस्थानांत आला, तेव्हां त्यास जा गोष्टींची सवय होती, तसें इकडे कांहीं नाहीं, असें पाहून त्यास त्रास आला. पुढें मोगललोकांचा कारकीर्दीस प्रारंभ झाल्यानंतर, उझबेग व अफगाण या लोकांशीं वैमनस्य पडल्यामुळें, आणि इराणी

---

१२ बाबर याणें हिंदुस्थानाविषयीं जी हकीकत लिहिली आहे, ती फार मनोरंजक आहे. युरोप अथवा काबूल एथून जे लोक हिंदुस्थानांत येतात, ते प्रथम आले ह्मणजे त्यांची या देशावर फार अप्रीति असत्ये, तशी बाबर याची विशेष अप्रीति जागृत असतां, त्याणें हें वर्णन केलेलें आहे. तो असें लिहितो कीं " हिंदुस्थान या देशावर आवड बसण्यास एथें आनंदकारक गोष्टी फार नाहींत. एथील लोक देखणे नाहींत. दोस्तांचा सहवासापासून होणारीं सुखें व मोकळ्या मनानें वागण्यापासून आनंद हे यांचा स्वप्नींहि नाहींत. यांस काल्पनिकपणा नाहीं; विशाल बुद्धि नाहीं; यांचा रीतिभातींत सौजन्य नाहीं; दया व कनवाळूपणा, हीं यांस नाहींत; शिल्पकामें योजण्याची अथवा करण्याची बुद्धि नाहीं; नकाशे काढण्याचें हस्तकौशल्य व ज्ञान हीं नाहींत; यांचा देशांत बसायास चांगले घोडे नाहींत; खायास चांगलें मांस नाहीं; चांगलीं द्राक्षें, अथवा तर्बुजें नाहींत; फळफळावळ नाहीं; बर्फ अथवा गार पाणीहि नाहीं; यांचा बाजारांत चांगलें अन्न किंवा रोटी मिळत नाहीं; एथें हमामखाने नाहींत; विद्यालयें नाहींत; मेणबत्त्या नाहींत, मशाली नाहींत, व एकहि मेणबत्तीचें घर नाहीं." पुढें मेणबत्तीच्या घराबदल जा ओंगळ वस्तूचा ते उपयोग करितात तिची बाबर याणें निर्भर्त्सना केली आहे.

लोकांचा सारख्याच असाव्या, अशी अकबराची शिस्तच होती. अशी मिसळ झाल्यामुळें लोकांचे स्वभाव पाहिल्यापासून नरम पडत गेले, परंतु यापासून सरकारचा शिस्तींत कांहीं फेरपालट होई, तों पुष्कळ काळ लागला. सुलतान महमूद याचा व त्यांचा वंशजांचा कारकीर्दींत क्रूरतेचीं व विश्वासघाताचीं जितकीं कृत्यें झालीं, त्यांहून गुलाम राजांचा कारकीर्दींत पुष्कळ झालीं; पुढील वशांचा कारकीर्दींत जीं अशीं घोर कर्में झालीं तीं बहुधा पादशाहाचा दुष्ट स्वभावामुळें, अथवा परदेशी फौजेचा बंडांमुळें झालीं. मोगल वंशाचा बहुतेक बादशाहांचा कारकीर्दींत राज्याचा साधारण स्थितीमध्यें युरोपीयन राज्यांत जशीं शांतता व नियमितपणा हीं असतात, तशीं बहुतकरून होतीं.

मुसलमानी व्युत्पत्तीविषयीं. वरील मुदतींत हिंदुस्थानांत शुद्ध मुसलमानी व्युत्पत्तीचा भर झाला. पुढें अकबर गादीवर आल्यापासून ती मागें पडली. हिंदुलोकांपासून आणि युरोपीयन लोकांपासून विद्या मिळवून, मुसलमानांनीं शास्त्रीय विषयांमध्यें कांहीं सुधारणुका केल्या;

१३ अखेरीस इराणी व हिंदी या लोकांचा इतका बेबनाव झाला, कीं पूर्वी जा इराणी लोकांचा कित्ता हिंदुस्थानी मुसलमान घेत असत त्यांस औरंगझेब अनाडी जंगली लोक असें लेखूं लागला. जेथें त्यांचें नाव आलें, तेथें पुढें "जंगलचे राक्षस" असें पद्यात्मक रचना करून याणें त्यांस नाव दिलें नाहीं, असें झालेंच नाहीं.

असे भले वाटते.

पूर्वीं हिंदुस्थानांतील ग्रंथकारांनीं संस्कृतांत ग्रंथ केले आहेत, त्यांपेक्षां मुसलमान ग्रंथकारांनीं विशेष चांगले इतिहासपर ग्रंथ केले आहेत. हें वर्चस्व त्यांस आरबांपासून प्राप्त झालें आहे. मुसलमान ग्रंथकार हे साधारण विषय लिहूं लागले असतां पुष्कळ वेळा लांबट भारूड लिहितात, आणि उपयोगाचा गोष्टींविषयीं कांहींच सांगत नाहींत. तसेंच यांचामध्यें नैय्यायिक कौशल्य, आणि तत्वविचारक्षम बुद्धि, हीं कमी असून, प्रसंगवशात् क्षुल्लकपणा, आणि अतिशयोक्ति, हे दोष यांचा लेखांत असतात; असें असतां एकामागून एक कसकशा बिना घडत गेल्या, त्यांची सरळ हकीकत, भूगोलसंबंधीं माहिती, कालमानावर सूक्ष्म लक्ष आणि जा ग्रंथकारांचा ग्रंथांवरून मजकूर उतरून घेतला असेल, त्यांचीं नावें सांगण्याविषयींची जी स्तुत्य चाल, इतके गुण मुसलमानांचा इतिहासांत आहेत, त्यामुळें त्यांचे ग्रंथ ब्राह्मणांचा धुंदरट कादंबऱ्यांपेक्षां अगणितपट चांगले आहेत.

भाषेविषयीं.

सांप्रतचा हिंदुस्थानी मुसलमानांचा अर्वाचीन भाषेविषयीं विशेष माहिती लागत नाहीं, ही मोठी आश्चर्यकारक गोष्ट आहे. दिल्लीचा राज्याची स्थापना झाल्यानंतर एतद्देशीय लोकांशीं नेहेमींचें संघट्टण पडल्यामुळें, व तसेंच आपल्या बायकामुलांचें भाषण ऐकिल्यामुळें, मुसलमानलोकांस दिल्लीकडील भाषा सहजच बोलतां येऊं लागली असावी. या भाषेचे मूळशब्द बहुतेक संस्कृत होते; परंतु पुढें त्यांस उपसर्ग व प्रत्यय लागून,

अर्वाचीन काळचा हिंदुस्थानी भाषेंतील शब्दांची रचना झाली, असावी. या भाषेंत मिसळ झाल्याशिवाय फार दिवस गेले असतील; परंतु ती भाषा कसकशी फिरून, तींतून हल्लींची कशी उत्पन्न झाली असेल, याचा अद्यापि कोणी पूर्वेकडील देशसंबंधीं भाषाभिज्ञानें शोध लाविला नाहीं.

जेव्हां तैमूरलंग स्वारी करून हिंदुस्थानांत आला होता, त्या वेळीं भाषेंत बदल होऊन, हल्लींप्रमाणें ती झाली असें एक अर्वाचीन मुसलमान ग्रंथकार लिहितो; परंतु ही स्वारी वर्षाचा आंत आटोपली, आणि तिजमध्यें असंख्य लोकांचे प्राण गेल्याची आठवण मात्र मागें राहिली; तर अशा हल्ल्यानें सर्व देशांतील लोकांचा भाषेचा फेरफार होईल, असें अनुमान करवत नाहीं; तथापि पंधराव्या शतकाचा आरंभास हिंदुस्थानी भाषेमध्यें बराच फेर झाला असेल, असें संभवत नाहीं असें नाहीं. हिंदुस्थानी भाषेचा मूळपाया कनोज प्रांतांतील बोलीवर रचलेला आहे, आणि बाराव्या शतकाचा अखेरीपर्यंत पंजाबप्रांत मात्र मुसलमानांचा हातांत होता, तेव्हां त्या वेळापर्यंत हिंदुस्थानी भाषेचा विशेष प्रसर झाला असेल, असें दिसत नाहीं.

सोळाव्या शतकाचा आरंभाचा सुमारास जयपुर एथें एका हिंदु कवीनें ग्रंथरचना केली आहे; तींत केव्हां केव्हां त्याणें फारसी शब्दांचा उपयोग केला आहे; असें मिस्तर कोलब्रूक याणें लिहिलें आहे; आणि मुसलमान कविहि प्रथम वर सांगितलेल्या दिल्लीजवळील शुद्ध देशी भाषेंत लिहित असत, तिला हिंदी ऊर्फ हिंदवी असें ह्मणत असत, असें कोलब्रूक याचाच ग्रंथांत आहे. पुढें इ० स० १७५२ मध्यें

हिंदुस्थानांतील कवींविषयीं एक फारसी ग्रंथ केलेला आहे, त्यांत कांहीं काव्यांचे वेंचे दिलेले आहेत, ते सर्व मुसलमानांनीं केलेले असूनहि, त्या ग्रंथाचा अगदीं अखेरीजवळजवळ फारसी व आरबी वेंचे घातलेले आहेत.

अर्वाचीन हिंदुस्थानी भाषेमध्यें वल्ली हा पहिला प्रसिद्ध कवि होय. त्याणें सतराव्या शतकाचा मध्यास आपले ग्रंथ केले. त्यामागून हल्लींपर्यंत पुष्कळ कवि झाले आहेत; परंतु बहुतकरून त्यांणीं आपल्या काव्यांत इराणीलोकांचा कित्ता उतरला आहे. फरदूसीनें महमूदावर निंदापर काव्य केलें आहे, त्याप्रमाणें विवक्षित पुरुषांवर काव्यें करण्याची फारसी व आरबी कवींची चाल असे, असें दिसतें. असें असतां मनुष्यांवर नीतिपर काव्यें करण्याचें सोडून हिंदुस्थानी कवींनीं एशियाखंडांतील लोकांचा रीतिभाती व गृहस्थिति, यांवर तशीं काव्यें करण्याचा प्रचार चालू केला आहे, एवढें मात्र कृत्य याणीं स्वबुद्धीनें केलें, असें संभवतें. या प्रकारचें उत्कृष्ट काव्य अठराव्या शतकांत सोदा या नावाचा कवि झाला त्याणें केलें आहे.

बंगाल, गुजराथ, इत्यादि प्रांतांतील बोलींमध्यें व दक्षिणेंतील भाषांमध्येंहि पुष्कळ आरबी व फारसी शब्द मिसळले आहेत, परंतु त्यांपासून हिंदुस्थानीसारख्या दुसऱ्या नवीन भाषा उत्पन्न झाल्या नाहींत.

# भाग सहावा.



## अकबर पादशाह.

## प्रकरण पहिलें.

इ० स० १५५६ पासून इ० स० १५८६ पर्यंत
झालेलीं वर्तमानें.

अकबर गादीवर आला. इ० स० १५५६, हि० स० ९६३.

अकबराचा बाप वारला, तेव्हां याचें वय फकत तेरा वर्षें चार महिन्यांचें होतें. त्या उमरीप्रमाणें याचा पराक्रम, व बुद्धि, हीं जरी विलक्षण होतीं, तरी राज्याचा कारभार याचा हातून होण्याजोगा हा नव्हता, हें उघडच होतें. हुमायून याणें जी फौज पंजाबांत पाठविली होती, तिजबराबर अकबर यास नामधारी मुख्य करून पाठविलें होतें; परंतु तिचें वास्तविक आधिपत्य बहिराम खान याकडे दिलेलें होतें. पुढें अकबर गादीवर आल्यावरहि बहिराम खान याचें महत्व त्याच प्रमाणें राहिलें होतें. त्यास खानबाबा असा किताब देऊन, सर्व राज्याचा अधिकार त्यावर अखत्यारीनें संपविलेला होता. खानबाबा याचा अर्थ " राजाचा बाप " असा होतो.[1]

(१) तुर्की लोकांमध्यें ' अता बेग ' हा किताब, साधारण आहे; त्याचें फारसींत खानबाबा असें भाषांतर होतें. त्या दोहींचा अर्थ मोठा बाप असा होतो.

बहिराम खान हा जातीचा तुर्की होता, आणि हुमायून यास हिंदुस्थानांतून हांकून दिलें, त्यापूर्वी तो त्याचा तैनातींतील एक प्रसिद्ध सरदार होता. शेवटीं जेव्हां शीर शाह याणें हुमायूनाचा मोड केला, तेव्हां बहिराम याची व हुमायून यांची चुकामुक पडली; नंतर तो पुष्कळ संकटांतून निभावून आणि साहसें करून, गुजराथचा मार्गानें सिंधमध्यें गेला, आणि हुमायून परागंदा झाल्यावर तिसऱ्या वर्षी त्यास जाऊन मिळाला. अडचणीचा वेळीं हा गृहस्थ किती उपयोगी पडेल, याविषयीं त्या परागंदा झालेल्या मंडळीनें पूर्वीच बराबर धोरण बांधिलें होतें, असें दिसतें. बहिराम खान जातांच सर्व मंडळीनें त्याचा आनंदानें स्वीकार केला, तेव्हांपासून पुढें हुमायून हा सर्व सरदारांपेक्षां यावर अतिशय भरवसा ठेवूं लागला. जर बहिराम याचा नियहाप्रमाणें हुमायून हा कांहींसा कारभार चालविता, तर त्याचें विशेष कल्याण झालें असतें. बहिराम खान.

जेव्हां हुमायून मरण पावला, तेव्हां बहिराम हा सिकंदर सूर याबराबर लढाई करित होता. तो सूर उत्तरेकडील पहाडांत निघून गेला होता, तथापि आपणास दिल्ली व पंजाब यांचा राजा असें अद्यापिहि ह्मणवित असे. हुमायून मरण पावल्यानंतर राज्याचा नवीन बंदोबस्त झाला न झाला होता, इतक्यांत बदकूशान एथील मिर्झा सुलेमान याणें काबूल व तिकडील हुमायून याचा सर्व मुलुक घेतला, असें बहिराम यास वर्तमान समजलें. या अपायास काय उपाय करावा असा विचार करित आहे, इतक्यांत मोगललोकांस हांकून काबूलप्रांत हातांतून गेला.

लावण्याकरितां व सिकंदर सूर याचें बंड मोडण्याकरितां, अशा दोहों हेतूंनीं सुलतान आदिली याचा वतीनें हेमू हा फौज घेऊन येत आहे अशी यास बातमी लागली. या लढाईचा परिणाम कसा झाला, तें पूर्वींच सांगितलें आहे. त्या प्रसंगीं अफगाणलोकांचा मोड झाला. हेमू हा जीवाची आशा सोडून लढत होता, आणि त्यास डोळ्यांतून तीराचा मारक वार होऊन तो घायाळ झाला असतांहि युद्ध करित होता. शेवटीं तो आपल्या हत्तीवर निश्चेष्ट होऊन पडला, तेव्हां त्यास कैद करून अकबराचा डेऱ्यांत आणिलें. अकबरानें, त्यावर प्रथम तरवारीचा हात टाकून एवढया मोठ्या आपल्या धर्मबाह्य शत्रूचा प्राण घेऊन गाजी ह्मणून जो किताब मुसलमानलोक फार चाहतात, तो मिळवावा, अशी बहिराम याची मर्जी होती. अकबर हा मूल होता, परंतु पाणीदार होता. याणें सांगितलें कीं घायाळ झालेल्या शत्रूवर मी हात टाकणार नाहीं. त्या वेळीं असा नीतीचा विचार करित बसण्याची अकबराची वृत्ति पाहून बहिराम यास संताप आला, आणि त्याणें एका घायानें हेमूचा शिरच्छेद केला.

इ० स० १५५६ता०५ नोवेंबर. हि० स०९६४मोहरम चं०२. हेमूचा पराजय, व त्याचें मरण.

यानंतर लवकरच अकबर याणें दिल्ली व आग्रा हीं घेतलीं. पुढें थोडक्याच दिवसांत सिकंदर सूर पहाडांतून परत आला आणि त्याणें पंजाबप्रांत घेतला. असें वर्तमान लागल्यावरून यास पुनः परत पंजाबावर स्वारी करावी लागली. याणें सपाट देश लवकर परत घेतला, तेव्हां

दिल्ली व आग्रा हीं घेतलीं. पंजाबांत स्वारी केली.

(२) पृष्ठ ३९९ पाहा.

सिकंदर हा माणकोटचा मजबूद किल्ल्यांत पळून गेला. तेथें त्याणें हटाग्रहानें युद्ध केलें. शेवटीं आठ महिनेपर्यंत लढाई केल्यानंतर, तो बादशाहाशीं बोलणें लावून शरण आला. तेव्हां अफगाण वंशाचा कोणी पुरुष त्या वेळीं बंगाल्यांत राज्य करित होता, तिकडे अकबरानें त्यास जाऊं दिलें.

सिकंदर सूर शरण आला.

मोगल वंशाची पुनः स्थापना या वेळापासून झाली असें ह्मटलें असतां चालेल; तिला मूळ कारण बहिराम खान हा होता. त्या एवढा असा कधीं पूर्वीं कोणत्याहि रयतेस अधिकार मिळाला नव्हता; परंतु त्याचा अधिकाराचा या सुमारास कळस होऊन, पुढें त्याची उतरती कळा येणार, असें इतक्यांतच दिसून येऊं लागलें होतें.

बहिराम खान याचा जुलूम.

बहिराम यामध्यें युद्धकौशल्य विशेष होतें, आणि राज्य कारभारामध्यें त्याचें धारिष्ट व झपाटा फार होता; यामुळें जा जा अडचणी आल्या, त्यांतून तो पार पडला. याहून जर किंचित् ढिला सरदार असता, तर त्या वेळीं तो गडबडून गेला असता. याचा स्वभाव मनस्वी, व रांठ होता; परंतु हुमायून याचा फौजेंतील लोक हे बारा ठिकाणचे भुरटे होते; त्यांमध्यें कैद बसविण्यास हाहि स्वभाव आवश्यक होता. कारण हुमायून याचा वेळेस त्या फौजेचा बखेडा मोडला नव्हता; तेव्हां पुढें बाळराजाचा हातांत सत्ता आल्यानंतर बहिरामासारखा कारभारी नसता, तर ती फौज लवकरच राज्याचें गाडें उलटून टाकिती. या कारणास्तव राज्याचा रक्षणास त्याचा सत्तीचें जेथपर्यंत जरूर होतें, तेथपर्यंत कोणी त्याचा अम्मलाविषयीं कुरकुर केली नाहीं. परंतु पुढें

राज्य बुडून जाण्याचें तूर्तातूर्त भय नाहींसें झालें, तेव्हां त्याची कारकीर्द लोकांस सलूं लागली, आणि त्याचा स्वभावांत कांहीं मोठे दुर्गुण होते, त्यामुळें तो लोकांस विशेष दुःसह होऊं लागला. बहिराम याचा स्वभाव कठोर आणि तीक्ष्ण होता; त्याची बोलण्याचालण्याची रीति उद्दामपणाची व दराऱ्याची होती; आपल्या अधिकाराविषयीं तो अतिशय जपत असे; लोकांनीं आपणास अपार मान द्यावा व आपली कैद बाळगावी, असें त्यास वाटत असे; आणि आपल्या कृपेशिवाय दुसऱ्या द्वारानें कोणासहि कितीहि थोडा अधिकार अथवा महत्व मिळालें असतां त्यास सहन होत नसे.

या गुणांनीं त्यास लवकरच पुष्कळ द्वेषी उत्पन्न झाले.

सर्वांस नाखुशी उत्पन्न झाली.

पुढें बादशाहाहि तारुण्यांत येऊं लागला, तसा आपल्या प्रधानाचा धनीपणाचा हुकुमतीमुळें आपण शून्यवत् होऊन गेलों याविषयीं यास वाईट वाटूं लागून बहिराम खानावरून याचीहि मर्जी काळेंकरून उतरली; तशांत बहिराम खान याणें आपल्या सत्तेचा बळानें कांहीं अन्याय केले, तेणेंकरून अकबरास फारच कोप आला. तो प्रकार असाः—

पूर्वीं जेव्हां हेमूबरोबर लढाई झाली, त्या वेळीं एके दिवशीं अकबर शिकारीस गेला होता; अशी संधि पाहून दिल्लीचा जुना सुभेदार तारदी बेग यास बहिराम खान याणें मारून टाकिलें. तारदी हा बाबराचा एक मीर्तीतील सोबती होता, आणि हुमायून हा परागंदा झाला होता, तेव्हां त्याजबरोबर हाहि फिरत होता. पूर्वीं एके समयीं वेळ आली नसतां तो दिल्ली सोडून देऊन पळून गेला, त्यामुळें तो शिक्षेस पात्र झाला होता, हें खरें आहे; तथापि अशा मोठ्या

प्रसंगीं नावास तरी बादशाहाचा हुकूम घ्यावयाचा तो बहिरामानें घेतला नाहीं. दुसरें, एके दिवशीं मनोरंजनार्थ अकबर हत्तींची लढाई करवित होता, तेव्हां त्या हत्तींतून एक हत्ती खेळावयाचा जाग्यावरून पळाला; त्याचा शत्रु दुसरा हत्ती त्याचा मागून लागला, आणि पाठीकडून तमासगीर लोकांचा एक मेळा जमून चालला. याप्रमाणें जातां जातां तो हत्ती बहिरामाचा डेऱ्यांत घुसला, आणि त्याचे त्याणें कांहीं तंबू पाडिले. त्या वेळीं बहिराम याचा जीवासहि किंचित् जोखमच होतें, आणि त्याचा सभोंवती तर सर्व एकच गोंधळ आणि कल्होळ होऊन गेला. पादशाहानें ही आपली अप्रतिष्ठा केली असें वाटून, बहिरामास संताप आला, आणि हा आपल्यास मारण्याचा गुप्त बेत असेल असाहि कदाचित् त्याचा मनास संशय लागून, त्याणें त्या हत्तीचा महाताचा शिरच्छेद करविला, आणि कांहीं वेळपर्यंत बादशाहाशींहि वांकडी बुद्धि ठेवून खुनसीपणानें वागूं लागला. पुढें बहिराम याजबराबर टकर देण्याजोग्या एका मोठ्या मानकऱ्यास एका हलक्या गुन्ह्यास्तव त्याणें ठार मारून टाकिलें. खुद्द पादशाहाचा गुरु "पीर महम्मद खान" याचाहि काळ आला होता, पण वेळ आली नव्हती. त्यासहि मक्केचा यात्रेचा निमित्तानें काढून लाविलें. बहिराम याचा अशा संशयी प्रकृतीमुळें बादशाहाचा हुजूरांतील लोकांस सार्वकाल त्रास होऊं लागला. तेव्हां त्यांणीं त्याचा त्रासानें उद्युक्त होऊन जो त्याचा मनांत त्या सर्वांचा शत्रुत्वाविषयीं संशय आला होता, तो खराच करून देण्याचा उद्योग केला. शेवटीं अकबरास त्रास उत्पन्न होऊन याणें आपणास बहिरामाचा कैदेंतून सोडविण्याचा यत्न केला,

आणि आपल्या हुजूरचा लोकांबराबर मसलत करून, एके दिवशीं शिकारीस गेला असतां, आपली आई आजारी पडली आहे असें अकस्मात् निमित्त करून, कोणाचा ध्यानीं मनीं नसतां परत दिल्लीस आला, आणि जसा बहिरामखानाचा शहांतून सुटला, तसा लागलाच याणें जाहीरनामा लाविला, कीं आजपासून माझें राज्य मी स्वतः चालविणार, यास्तव प्रजांनीं माझा हुकुमावांचून कोणाची आज्ञा मानूं नये. तेव्हां बहिरामाचे डोळे उघडले, आणि त्याणें बादशाहाचा भरवसा आपणावर पुनः बसावा ह्मणून यत्न केला; परंतु ती घडी निघून गेली. त्याणें आपल्या दोन आश्रितांस दरबारांत पाठविलें, परंतु या नम्रतेनें अकबराचा क्रोध कांहीं कमी न होतां, याणें त्या वकीलांची भेटहि घेतली नाहीं, आणि कांहीं वेळानें त्यांस तुरुंगांत टाकिलें.

अकबर कारभार करूं लागला. इ० स० १५६०, मार्च हि० स० ९६७ जमादि उल् आखर चं० २८

अशी उघड फूट पडल्यापासून जो साहजिक परिणाम व्हावयाचा तो लवकरच घडून आला; वजीराचा पडता काळ आला, तेव्हां सर्व लोक त्यास सोडून बादशाहाचा भजनीं लागले; कारण बहिरामाचा सक्त शिस्तीपेक्षां अकबराचा तारुण्यांतील सद्गुणांपासून, अथवा कांहीं दुर्गुणांपासूनहि, देशाचें कल्याण होईल अशी सर्वांस आशा लागली.

याप्रमाणें आपलें ओझें स्वतः उचललें पाहिजे असें पाहून, आपला गेलेला अधिकार मिळविण्याकरितां बहिरामानें पुष्कळ बेतांचा घाट घातला. एकदां बादशाहास पकडण्याचा त्याणें विचार केला; नंतर माळव्यामध्यें स्वतंत्र राज्य स्थापावें असें मनांत आणिलें; परंतु त्यास उत्तेजन येण्याजोगें सहाय मिळालें नाहीं, आणि बहुधा आपल्या जुन्या

धन्याचा मुलावर शस्त्र उचलावें असें त्याचा मनांतूनहि नव्हतें, असें वाटतें; या कारणास्तव तो गुजराथेंतून तारवांत बसून मक्केस जाण्याचा बाहेरून बेत घालून, नागोर एथें जावयास निघाला. तेथें आपलें दैव उघडेल अशा कांहीं आशेनें तो दिवस काढित राहिला. शेवटीं तुह्मास तुमचा कामावरून दूर केलें आहे, याजकरितां तुह्मी क्षण न लावितां यात्रेस निघून जावें, असा अकबराकडून निरोप आला; तेव्हां तो आपलीं निशाणें, नौबती, व दुसरीं राजचिन्हें बादशाहास पाठवून खासगी रीतीनें गुजराथेकडे जाण्यास निघाला. पुढें अकबराचा कांहीं कृतींवरून पुनः त्याची बुद्धि फिरली, आणि कांहीं लोक जमा करून त्याणें उघड बंड करून पंजाबावर हल्ला केला. तिकडे त्यास लोक अनुकूल झाले नाहींत, त्यामुळें त्याची उमेद खचली. नंतर अकबर याणें त्यावर स्वतः स्वारी केली, आणि त्यास पकडण्याकरितां जिकडे तिकडे टोळ्या पाठविल्या; त्यांतून एका टोळीनें त्याचा पराजय करून त्यास पहाडांत पळविलें. शेवटीं नाइलाज होऊन तो बादशाहास शरण आला. त्या प्रसंगीं त्याणें वजीर असतांना जे आपणावर मोठे उपकार केले होते, ते अकबर विसरला नाहीं. बहिराम खान यास बऱ्याच पल्ल्यावर याणें आपले मुख्य मानकरी सामोरे पाठविले, आणि त्यास एकदम आपल्या डेऱ्यांत आणण्याची आज्ञा केली. जेव्हां बहिराम अकबरासमोर आला, तेव्हां तो बादशाहाचा पायीं पडला, आणि त्याला पूर्वींचा आठवणी होऊन मोठ्यानें स्फुंदों लागला. अकबरानें त्यास स्वहस्तें उठवून आपल्या उजव्या बाजूस बसविलें, आणि त्याचा सन्मान

इ० स० १५६०, सेप्टेंबर हि० स० ९६८, मोहरम.

बहिराम शरण आला; त्यास अकबर याणें क्षमा केली.

करण्याकरितां त्यास पोषाक देऊन, आपल्या हाताखालचा एक मुख्य सुभा घ्यावा, अथवा दरबारामध्यें मोठ्या हुद्याने राहवें, अथवा अन्नूनें रुखसत घेऊन मक्केचा यात्रेस जावें; या तिहींतून कोणती एक पतकरेल ती गोष्ट करावी, असें अकबरानें त्यास सांगितलें. बहिराम हा अभिमानी असून शहाणा होता; ह्मणून त्याणें शेवटील मार्ग स्वीकारिला. त्यास बादशाहानें पुष्कळ पेनशनाची नेमणूक करून दिली. नंतर तो मक्केस जाण्याकरितां गुजराथेंत गेला; तो पुढें जाहाजांत बसून जाण्याची तयारी करित असतां, जा एका अफगाणाचा बाप त्याणें पूर्वीं हुमायूनाचा कारकीर्दींत लढाईमध्यें मारला होता, त्या अफगाणानें येऊन त्याचा प्राण घेतला.

बहिराम मरण पावला.

या वेळीं अकबराचें वय १८ वर्षांचें होतें. त्या उमरीप्रमाणें पाहिलें असतां, याणें जो बोजा डोकीवर घेतला होता, तो याचा शक्तीबाहेर होता; तथापि स्वभावतः हा विलक्षण हुशार असून, याला शिक्षाहि उत्तम मिळालेली होती. याचा जन्म विपत्तींतच झाला, आणि लहानपणीं यास कैद भोगावी लागली; याचा बापाचा लढायांत याचा धीर चेपला होता, आणि बहिराम खान याचा हात चालत होता, तेव्हां आपली नाजूक स्थिति पाहून याची दीर्घदृष्टि प्रखर झाली होती. याचा रीतिभाती मनमिळाऊ आणि शरीराचा बांधा निटस असून, हा बळकट व चपळ होता, आणि कसरतींमध्यें उत्कृष्ट हुशार असे. हा अतिशय धीट होता, इतका कीं शिकणाऊ घोडे व हत्तीहि जेरीस आणित असे; तसाच केव्हां केव्हां अविचारानें वाघ व दुसरीं जंगली

बादशाहाची अडचणीची स्थिति.

जनावरें यांशीं कुस्ती करित असे. असा धीट स्वभाव असून आपली कीर्ति व्हावी असा यास मनापासून हव्यास होता; तथापि युद्धांत जय मिळवून जितकी याची कीर्ति झाली, त्याचप्रमाणें याणें आपला राज्यकारभार शहाणपणानें व उदार बुद्धीनें केला त्यावरूनहि झाली आहे.

हिंदुस्थानामध्यें जितक्या वंशांचा मुसलमान राजांनीं राज्य केलें, त्यांतून बहुतेकांस आधार होता; मोगल वंशाचा मात्र पाया अति दुर्बल असून तो केव्हां मोडेल याचा भरवसा नाहीं, असा होता. गजनी व घोर या राजांचीं हिंदुस्थानांतील मुलुखाजवळ पूर्वीचीं स्वराज्यें होतीं, त्यांचा त्यांस आश्रय असे; तसाच, तुर्कीलोकांची हमेशा हिंदुस्थानांत वाहणी चाललीच होती, तिचा गुलाम वंशाचा राजांस आश्रय असे. बाबर हा कांहीं अंशीं काबूलीच होऊन गेला होता, तथापि जेव्हां कामरान याणें तो प्रांत घेतला, तेव्हां त्याचा हिंदुस्थानाशीं संबंध तुटला; आणि पुढें हा अफगाणांचा प्रतिस्पर्धी झालेला होता, तेणेंकरून तिकडील मोठे लढाऊ लोक मोगलांचे शत्रु झाले व हिंदुस्थानी मुसलमानहि तसेच होऊन गेले. मोगल पादशाहांचा राज्यांत जे त्यांचा पक्षाचे उचल्ये लोक आले होते, त्यांचें लक्ष मात्र या बादशाहांचा फायदा झाला असतां आपलें हित होईल यावर असून, एवढ्यावरूनच त्यांचा एक विचार असे, आणि तेवढेच कायते मोगलांचे हितेच्छु असत.

याप्रमाणें या वंशाचा बादशाहांस मूळ आधार चांगला नव्हता, त्यामुळें शीर शाहा याणें हुमायूनास अल्पायासानें काढून लाविलें. हा मोगलांचा दुबळेपणा अकबराचा कारकीर्दीचा आरंभींहि थोडासा अनुभवास येत

होता. अशा स्थितींत स्वतांची पादशाही राखण्यास अकबराचा सर्व पूर्वोक्त मोठ्या गुणांची जरूरच लागली.

पुनः सर्वराज्य मिळवून तें मजबूद करण्याविषयीं अकबराचा बेत.

अकबर हा स्वभावानें उदार, व मनाचा मोकळा होता; त्यामुळें, व बहुधा वरील कलमांतील आपल्या वंशाचा दुबळेपणाचा विचार मनांत आणून, सर्व हिंदुलोकांचा आपण पुढारी होऊन जातिभेद व धर्मभेद मनांत न आणितां, या विस्तीर्ण देशांतील लोकांचा एक कट करावा असा याणें मोठें पोट करून निश्चय केला; आणि हाच उद्देश आपल्या कारकीर्दीचा अखेरीपर्यंत एकसारिखा राखिला होता. याणें हिंदुलोकांस त्यांचा योग्यतेप्रमाणें व पदवीप्रमाणें अधिकार दिले, आणि तसेच सर्व जातींचा मुसलमानांसहि योग्यतेनुसार शिकस्त चाकरी दिली. तेणेंकरून याचा सर्व राज्यांतील प्रजांची यावर भक्ति बसून त्या एकदिल होऊन गेल्या; परंतु हें सर्व हळूहळू काळेंकरून झालें.

अकबर राज्यावर आला तेव्हां— ( १ ) आपल्या सरदारलोकांवर अम्मल बसवावयाचा, ( २ ) बादशाही मुलुक गेला होता तो परत घ्यावयाचा, ( ३ ) आणि त्या मुलुकांचा आंतील बंदोबस्त, जो पूर्वींचा घालमेलीमध्यें बिघडून गेला होता, तो नीट करावयाचा, या तीन गोष्टी जरूर करावयाचा होत्या.

याचा राज्याचा विस्तार.

पहिल्या वर्षीं पंजाबप्रांत आणि दिल्ली व आग्रा या सभोंवतालचा देश, एवढाच मुलुक अकबराकडे होता. तिसऱ्या वर्षीं लढाईशिवायच यास अजमीरचें राज्य मिळालें, आणि चवथ्या वर्षाचा आरं-

भींच ग्वालेरचा किल्ला मिळाला. पुढें याणें बहिराम खान यास कामावरून घालवून दिलें, त्यापूर्वी लवकरच याणें लखनौ शहरांतून, व पूर्वेस जवानपुरपर्यंत गंगाकांठावरील प्रदेशांतून, अफगाणलोकांस काढून लाविलें.

इ० स० १५५९हि० स०९६६.

त्या मुलुकांत सूर यांचा घराण्याचे अद्यापि आश्रित राहिले होते. शेवटील पादशाहा आदिली याचा मुलगा दुसरा शीर शाहा हा त्यांचा मुख्य होता. पुढें अकबर गादीवर आल्यावर शीर शाहा याणें आपलें राज्य मिळविण्याचा हेतूनें मोठी फौज घेऊन जवानपुरावर स्वारी केली; परंतु अकबराचा सरदार खान झमान याणें त्याचा अगदीं मोड केला. पुढें आपला धनी लहान, व त्याजवळ विशेष लश्कर वगैरे नाहीं, या कारणास्तव त्यास तुच्छ मानून खान झमान हा अकबरास लुटीचा वांटा देईना, आणि स्वतंत्रतेचा बाणा दाखवूं लागला. तेव्हां त्या बेकैद सुभेदाराचा घरीं अकबर हा स्वतः गेला, तेणेंकरून तो कांहींसा मार्गावर आला; परंतु त्याचा जो बेकैद स्वभाव होता, तो साफ न मोडतां तितक्या वेळापुरता मात्र वरमलासा झाला.

अकबराचा सरदारांचा बेकैदपणा व त्यांचीं बंडें.

इ० स० १५६०हि० स०९६८.

पुढें माळव्यामध्येंहि असेंच घडून आलें. तो प्रकारः— बाज बहादुर नामें एक अफगाणलोकांचा सरदार माळव्यांत राज्य करित असे. त्यास घालवून देण्याचा बहिराम खानाचा कारकीर्दींत यत्न चालला होता; पुढें तो उद्योग अकबरानें विशेष झपाट्यानें चालविला. त्या कामास आदम खान यास लाविला होता; त्याणें बाज बहादुर याचा

पराजय करून, त्यास काढून लाविलें;[३] परंतु तोहि खान झमान याप्रमाणेंच आपण मिळविलेलें बळकावून बसला. तो उघड बंड करील इतकी अकबरानें वाट पाहिली नाहीं; परंतु त्वरेनें त्याचा छावणीवर कूच करून त्याची दुष्ट मसलत फसवून टाकिली. आपणावर असा प्रसंग अकस्मात् बेतेल अशी आदम खान यास अगा नव्हती, आणि त्याची कांहींच तयारी नव्हती; तेव्हां तो लागलाच शरण आला. अकबरानें लागलाच त्याचा अपराध त्यास क्षमा केला, परंतु पुढें लवकर त्या सुभ्यावरून त्यास दूर करून, आपला पूर्वींचा गुरु पीर महम्मद खान यास तें काम सांगितलें.

इ० स० १५६० हि० स० ९६८ साबान.

हा पुरुष विद्वान् होता, परंतु याचा पूर्वींचा धंदाप्रमाणें अथवा हल्लींचा स्थितिप्रमाणें जे कांहीं गुण याचामध्यें असावे, ते कांहींच नव्हते. पुढें बाज बहादुर याणें

३ या लढाईंत एक खेदकारक गोष्ट घडून आली. ती अशी; बाज बहादुर याची एक हिंदु रास होती; ती हिंदुस्थानामध्यें जा अति सुंदर स्त्रिया होऊन गेल्या, त्यांसारखी स्वरूपवान् होती. ती जशी रूपानें सुंदर होती, तशीच गुणांनींहि युक्त होती. ती हिंदवी भाषेंत कवन करित असे. जेव्हां बाज बहादुर पळून गेला, तेव्हां ती आदम खान याचा हातांत सांपडली. त्याणें तिची फार विनवणी केली, आणि शेवटीं जुलूम करीन अशी भीति घातली; तेव्हां तिणें लाचार होऊन अमुक वेळीं तूं आलास, तर तुझा स्वीकार करीन, अशी वेळ मुकरर केली, आणि आपला, अति मोठा पोषाग घालून त्यावर उमदे सुवासिक पदार्थ शिंपडून आपल्या तोंडावरून पदर ओढून पलंगावर निजून राहिली. तिचा जवळचा लोकांस वाटलें, कीं ही निजली आहे, परंतु पुढें आदम खान जवळ येत आहे तों तिला जागी करूं पाहतात, तों तिणें विष खाऊन आपला प्राण दिला, असें त्यांस समजलें.

लाविला. शेवटीं त्याचा पराजय होऊन तो नर्मदेंत बुडून मेला, आणि तो सर्व मांत बाज बहादुर याचा हातीं ला- . पुढें अकबर याणें लागलाच अब्दुल्ला खान उझबेग यास पाठविलें; त्याणें बाज ब- हादुर याचा शेवटीं मोड करून टाकिला. नंतर कांहीं दिवसांनीं बाज बहादुर हा अकबराचा चाकरींत शिरला. अकबराचा स्वभाव उदार असे, त्यामुळें हा जिंकलेल्या शत्रूंस आपल्या पदरीं ठेवी, तेणेंकरून त्यांना शेवटीं असा उपजीविकेचा मार्ग सांपडत असे.

इ० स० १५६१, हि० स० ९६९.

आदम खान हा चाकरीवरून दूर झाला, तथापि त्याचा दर्प मोडला नाहीं. पुढें अकबराचा वजीराशीं त्याची कांहीं स्पर्धा होऊन, अकबर बसला होता त्या खोलीजवळील दुसऱ्या खोलींत तो वजीर नमाज पढत असतां त्याला कटार भोंसकून त्याणें मारून टाकिलें. तो गोंगाट ऐकून अकबर धांवून आला, आणि प्रथम आपल्या वजीरास मारल्याबद्दलचा सूड आपल्या हातानें घ्यावा, असा यास उचल भरला. परंतु याणें आपला क्रोध आवरून तलवार म्यानांत घातली, आणि जेथें हा खून घडला, त्या उंच इमारतीवरून त्या खुनी मनुष्यास लोटून देऊन त्याचें पारिपत्य केलें. अब्दुल्ला खान हाहि माळव्यामध्यें तसाच बेकैद झाला, त्यामुळें तो मांत घेतल्यापासून एक वर्षाचा आंत अकबरास त्यावर स्वतः स्वारी करणें भाग आलें. अकबरासमोर तो उभा

इ० स० १५६२ हि० स० ९७०.

इ०स० १५६३, हि०स० ९७०।७१.

राहिला, परंतु त्याचा मोड होऊन तो पळाला, आणि गुजराथचा राजाचा आश्रयास जाऊन राहिला. अकबराचा लश्करांत दुसरे कितीएक उझबेग सरदार होते, ते आदम खान याची दशा पाहून नाखुश झाले. त्यांस असा अंदेशा आला, कीं हा पादशाह बाबराचा वंशज, त्यामुळें आमचा जातीशीं द्वेष करितो. तसेंच हे व दुसरे कितीएक लश्करी सरदार, आपल्या दरजाचा लोकांवर आतां शिस्त बसणार ह्मणून हवालदिल झाले होते, आणि तसें नव्हावें या बुद्धीनें त्यांणीं बंड केलें. त्यांस खान झमान हा मिळाला आणि असफ् खान नामें दुसराहि मानकरी येऊन मिळाला. बुंदेलखंडाचा सरहद्दीवर नर्मदेचा कांठीं गरानामक संस्थान होतें, तेथें एक-राणी राज्य करित असे, तिजवर असफ् खान हा स्वारी करून गेला; त्याजबराबर तिणें युद्ध केलें, त्यांत तिचा फौजेचा मोड झाला, आणि तिला पुष्कळ वार झाले; तेव्हां शत्रूंचा हातीं न सांपडावें ह्मणून तिणें आपणास कटारीनें भोंसकून घेतलें. तिचा खजीना मोठा होता, तो असफ् खान यास सांपडला. तो बहुतेक त्याणें छपावून ठेविला. त्या चोरीचा पत्ता लागल्यामुळें, असफ् खान हा वर सांगितल्याप्रमाणें, बंडवाले लोकांस मिळाला.

उझबेग सरदारांनीं बंड केलें.

या बंडवाल्या लोकांबराबर दोन वर्षांवर लढाई चालली होती, तींत कधीं जय होई, कधीं मोड होई; पुष्कळ सरदार एकदां शरण येत, पुनः फितून बंड करीत. हें बंड बरेंच मोडलें होतें, इतक्यांत अकबराचा भाऊ हकीम याणें पंजाबप्रांतावर स्वारी केल्यामुळें, यास तिकडे जावें लागलें.

तिकडील बंदोबस्तास यास बरेंच महिने लागले. नंतर परत आल्यावर पाहतो तों बंडवाले लोक पुनः जोर धरून अयोध्या व अलाहबाद या सुभ्यांतील बहुतेक प्रांत बळकावून बसले. त्या वेळीं पावसाळ्याचा भर होता, तथापि क्षणभर विलंब न लावितां यानें त्यांजवर स्वारी केली, आणि गंगेपलीकडे त्यांस हांकून दिलें; त्या वेळीं नदीस पूर आला होता, तेव्हां आपण निर्भय आहों असें त्यांस वाटलें होतें. इतक्यांत एके दिवशीं बादशाहानें त्या जलमय प्रदेशांतून मोठी मजल केली; घोडे व हत्ती यांजवर दोन हजारांहून कमी इतकें आपलें बिनीचें लश्कर बसवून रात्रीचा प्रहरीं गंगा पोहून गेला, आणि रात्रभर चूपी राहून सूर्योदयाचा सुमारास शत्रूंवर हल्ला करिता झाला. थोडकेसे घोडेस्वार येत आहेत, असें बंडवाल्यांस वर्तमान होतें; परंतु असा आपणावर एकदम हल्ला येईल असा त्यांचा आवांका नव्हता. पुढें त्या हल्ल्याचा पहिल्याच गुल्लींत, खान झमान मारला गेला; आणि दुसऱ्या एका बंडवाल्या सरदाराचा घोडा मारला जाऊन तो धरला गेला. त्यामुळें त्या लोकांचा फौजेची मोठी संख्या होती ती फुकट जाऊन, ते अस्ताव्यस्त झाले, आणि दाणादाण होऊन भयाभंगास गेले. हा विलक्षण शौर्याचा पराक्रम अकबरासच साजे. येणेंकरून हें सात वर्षें चाललेलें बंड यानें मोडून टाकिलें.

तें सात वर्षें युद्ध करून अकबरानें मोडलें.

जेव्हां हुमायून मरण पावला, तेव्हां त्याचा लहान मुलगा मिर्झा हकीम हा काबूलचा नामधारी राजा होता. पुढें लवकरच वर सांगितल्याप्रमाणें त्याचा सगा बदकूशानचा राजा मिर्झा

काबूलाकडील हकीकत.

सुलेमान याणें स्वारी करून तो मुलुक घेतला. त्यापासून अकबर याणें पुनः तो मुलुक परत घेतला, तथापि तो पुढें वास्तविक रीतीनें कधींहि अकबर याचा ताब्यांत राहिला नव्हता. त्या राज्याचा कारभार शाहजादा हकीम याची आई मोठ्या हुशारीनें पाहत असे. तिला बाहेरील शत्रूंपेक्षां तिच्या स्वतांचे वजीर फितूरें करून बंडावे करीत, त्यांपासून विशेष भीति असे. एके वेळीं अशा प्रकारचा बंडाव्यांतून तिणें नुकताच आपल्या संस्थानाचा बचाव केला होता; इतक्यांत उझबेगलोकांचा वरील बंडाचा पूर्वी अबुल् मवाली व शर्फुद्दीन या दोन अकबराचा सरदारांनीं नागोर एथें (इ०स० १५६१ ह्मणजे हि०स० ९६९त) बंड केलें, आणि त्यांजवर पादशाहाची फौज आली तिचा पराजय करून दिल्लीवर चाल केली. पुढें त्यांस अकबरानें हटवून लाविलें, तेव्हां ते आपला बचाव करण्याकरितां सिंधुनद उतरून आपल्या राहिलेल्या फौजेसुद्धां काबूलास जाते झाले. तेथें वर सांगितल्याप्रमाणें राज्याची स्थिति होती, त्यामुळें त्यांचा चांगला सत्कार झाला.

अकबराचा भाऊ शाहजादा हकीम याची नामधारी कारकीर्द.

मिर्झा हकीम याचा आईस हे लोक येऊन मिळाल्यावर, थोडक्याच दिवसांनीं तिचें मन वळून तिणें आपल्या राज्याचा सर्व कारभार अबुल् मवाली याजवर सोंपला. त्या स्वकार्यसाधकानें प्रथम प्रधानगिरी चांगली चालविली, परंतु बेगमेचा अधिकार नीट बसवावा हें त्याचा मनापासून फार दूर होतें. त्याचे गुप्त हेतु निराळेच होते. पुढें जेव्हां राज्यामध्यें त्याचा तर्फेची फळी तयार झाली, तेव्हां त्याणें मारेकरी घालून त्या बेगमेचा प्राण घेतला,

आणि सर्व सत्ता आपल्या हातांत आणिली. हें वर्तमान होतांच हकीम याणें मिर्झा सुलेमान यास बोलाविलें. त्याणें येऊन लढाई केली, तींत अबुल् मवाली याचा पराजय होऊन तो मारला गेला (इ०स० १५६३). पुढें जेव्हां मिर्झा सुलेमान परत गेला तेव्हां तो आपला बांधव हकीम याचा हवालीं काबूल ठेविलासा करून गेला; परंतु वास्तविक पाहतां, त्याणें आपला एक आश्रित त्यावर पंतोजीसारखा ठेविला होता. त्याची हुकुमत फार त्रासदायक होऊन हकीमानें त्यावर उठावा केला, त्यांत पुढें सुलेमान याचा व याचा तंटा होऊन त्यांत हकीम हरला, आणि यास सुलेमान याणें काबूलांतून हांकून लाविलें. हें वर्तमान वरील उझबेग सरदारांबरावर अकबराची लढाई चालली होती, तिचा शेवटचा वर्षीं झालें; त्यापूर्वीं अकबर याचा जसा हात चाले, तशी हकीम यास हा मदत करित असे; असें असतां, उझबेगलोकांचें बंड मोडण्यामध्यें आपला भाऊ अगदीं गुंतून गेला आहे असें पाहून, आपला स्वार्थ साधण्याकरितां याचें नुकसान करण्याचा हकीमानें एकदम निश्चय केला, आणि लाहोर बळकावून बहुतेक पंजाब हस्तगत करून घेतला. त्यास अकबर याणें हिंदुस्थानांतून हांकून लाविलें, (नोवेंबर इ०स० १५६६). इतक्यांत त्या वेळीं काबूलांत प्रसंगवशात् हिलाची घडामोड झाल्यामुळें, याचें काबूलास परत जाणें झालें, आणि तो प्रांत त्यास मिळाल्यावर त्याणें स्वस्थपणीं पुष्कळ दिवस तेथें राज्य केलें.

हकीम याणें पंजाबावर स्वारी केली.

सुल्तान मिर्झा नामें मोगल वंशांतील शाहजादा

संबळ एथील सुभ्याचें, काम त्यास सांगितलें. पुढें वरील बंडावे चालले असतां, आणि उझबेग सरदारांचा बंडाचा मोड होण्यापूर्वी जिकडे तिकडे बखेडे झाल्याची संधि पाहून, संबळ एथें त्याचे चौघे मुलगे, व तिघे पुतण्ये यांणीं बंड केलें. त्यांचा आयासाशिवाय मोड झाला, आणि ते गुजराथेंत पळून गेले, तेव्हां त्यांपासून भीति अगदीं नाहींशी दिसूं लागली ( इ० स० १५६६ ); तथापि त्यांणीं गुजराथेंत कळ पेटविली, तिचा शेवट गुजराथचें राज्य हातीं आलें तेव्हां झाला.

ते गुजराथेंत पळाले.

वरील बखेडे चालत असतां कितीएक गोष्टी घडून आल्या, त्यांपासून सांगावयासारखे विशेष परिणाम झाले नाहींत; तथापि त्या वेळीं लोकांची स्थिति कशी होती हें त्यांवरून कांहींसें दिसून येतें.

किरकोळ बिना.

शर्फुद्दीन याचें बंड सुरू असतां, एका दिवशीं अकबर हा एका प्रसिद्ध पीराचा दर्शनास जात होता, तेव्हां वाटेंत एक तीरंदाज याचा लोकांत मिसळून चालला होता; तो शर्फुद्दीन याचा असें पुढें समजलें. त्या तिरंदाजाचा डोक्यावरून एक पक्षी उडून जात होता, त्यास मारण्याचा निमित्तानें त्याणें बाण सज्ज केला, आणि एकदम हात खालीं करून बादशाहावर नेम धरून बाण मारिला, तो याचा खांद्यांत कितीएक तसू जाऊन रुतला. जवळचा लोकांनीं लागलेंच त्यास पकडलें, आणि अकबर यास विनंती

आणि ते सांगण्यापूर्वी याचा शिरच्छेद करूं नये. परंतु अकबर ह्मणाला, कीं अशा प्रसंगीं जर तो कांहीं कबूल झाला, तर चोर सोडून सन्याशी सुळीं जाण्याचा विशेष संभव आहे. असें ह्मणून याणें त्याचा शिरच्छेद करविला. दुसऱ्या एका वेळीं ख्वोजा मवजीम नामें अकबराचा, आईकडून, जवळचा सगा होता. त्याणें, क्रोधांध होऊन, आपल्या बायकोचे अतिशय हाल केले. तेव्हां तिचा सोयऱ्यांनीं अकबराची प्रार्थना केली, कीं त्याजवळ रदबदली करून तो आपल्या जाहगीरीवर निघून जाणार आहे तेव्हां बायकोला त्याणें तिचा आईजवळ ठेवून जावें असा त्यास कबूल करावा. त्याप्रमाणें एके दिवशीं शिकारीस जात असतां संधि पाहून मवजीम याचें घर दिल्लीजवळ होतें, तेथें अकबर भेटावयास गेला. परंतु त्या राक्षसानें याचा येण्याचा उद्देशाचा तर्क बांधून अकबर घोड्यावरून खालीं उतरे, तों धांवत आपल्या जनानखान्यांत जाऊन कटार मारून आपल्या बायकोचा प्राण घेतला, आणि ती रक्तानें भरलेली कटार खिडकींतून बादशाहाजवळचा लोकांत टाकून दिली. पुढें अकबर घरांत शिरला, तों मवजीम हा तलवार बांधून लढावयास सिद्धच होता; त्याचा एका गुलामानें बादशाहावर तलवार टाकिली, परंतु थोडक्यांत निभावलें आणि जवळचा लोकांनीं त्या गुलामास कापून काढिलें, नाहीं तर अकबर मारला जाता. या त्याचा दुष्ट कर्मानीं अकबरास संताप येऊन, मवजीम यास खालीं डोकें व वर पाय करून यमुनेंत टाकून द्यावें अशी याणें आज्ञा केली.



पावला.

एका वेळीं अकबर कूच करून जात असतां स्थानेश्वर एथें एक मोठी वार्षिक यात्रा होती; तेथें एका स्नानाचा जाग्यासाठीं हिंदु बैराग्यांचे दोन मोठे मेळे चालीप्रमाणें लढावयास तयार झाले होते. प्रथम त्यांची सामोपचारानें समजूत करण्याचा सर्व प्रकारें अकबरानें यत्न केला; परंतु सर्व व्यर्थ गेलासें पाहून, यानें त्यांस लढाई करून निकाल करूं देण्याचा निश्चय केला, आणि पुढें त्यांची लागलीच झटापटी लागली, ती आपण पाहत उभा राहिला. शेवटीं एका पक्षाचा जय झाला, तेव्हां ते आपल्या शत्रूंची कतल करून टाकितील, ती न व्हावी, ह्मणून आपल्या पाहऱ्याचा लोकांस त्या विजयी झालेल्या पक्षाचा गोसाव्यांचा आवर करण्याविषयीं यानें हुकूम दिला, आणि याप्रमाणें लढाई बंद करून टाकिली.

बाहेरील राज्य कारभार.

याप्रमाणें आपल्या राज्याचा रक्षणार्थ पूर्वीचा लश्करी सरदारांबराबर व शीर शाहा याचा वंशजांबराबर अकबराचा लढाया झाल्या. इतक्यांत याचा उमरीचीं पंचवीस वर्षे गुजरून गेलीं; परंतु तेवढ्या काळांत यानें आपले शत्रु बाहुबलानें चुरडून टाकिले होते, किंवा कृपेनें वळवून घेतले होते. असें झाल्यामुळें परदेशांविषयीं विचार करण्यास यास फुरसूद सांपडली. प्रथम याची दृष्टि राजपूत राजांचा मुलुकावर गेली. जयपुरचा राजा बहारमल्ल याचें अकबराशीं नेहमीं



**दास** या दोघांसहि अकबरानें बादशाही लश्करांत मोठे अधिकार दिले.

बहिराम याची सत्ता नाहींशी झाल्यावर ( **इ० स० १५६१, हि० स० ९६९** ) **अकबरानें मारवाडावर** फौज पाठविली, आणि **मीर्त्त**नामक मजबूद किल्ला घेऊन, तेथील लोकांस हात दाखविला; परंतु त्याप्रमाणें पुढें याचानें पुरावा झाला नाहीं. नंतर **चितूर** ऊर्फ **उदेपुरचा** राण्यावर याणें शस्त्र धरिलें. त्या वेळीं **बाबर** याचा प्रतिस्पर्धी **राणा संग** याचा मुलगा **उदयसिंग** हा चितूर एथें राज्य करित होता, तो दुर्बल होता. जेव्हां **अकबर** स्वारी करून जवळ आला, तेव्हां तो **चितूर** सोडून **गुजराथचा** उत्तरेस जो पहाडी व जंगली मुलुक आहे, तिकडे निघून गेला. तो नाहींसा झाल्यामुळें किल्ला लवकर हातीं आला, असें नाहीं. कारण **उदयसिंग** गेला, तरी **जयमल्लनामक** एक मोठा शूर व बुद्धिमान् सरदार मजबूद फौजेसहित किल्ल्यांत होता. हा किल्ला पूर्वी दोन वेळा **मुसलमानांनीं** घेतला होता, तथापि तो आहेपर्यंत आपल्या राज्यास भय नाहीं अशासारखा **मेवाडचे राजपूत** त्यास मानित असत; त्यामुळें **अकबरास**, बाहेर खंदक खणून, मोठ्या तजविजीनें व बेतानें चाल करावी लागली. हा वांकडेतिकडे खंदक खणून, त्यांतील मातीचे आधाराकरितां ढीग करित असे, आणि टोपल्यांत माती भरून एकावर एक रचित असे. याचा खंदकांचें वर्णन **फिरिस्ता** याणें सूक्ष्म

इ० स० १५६७।६८, हि० स० ९७५.

रीतीनें केलें आहे; ते अर्वाचीन काळचा युरोपखंडांतील खंदकांप्रमाणेंच बहुतकरून होते. असे खंदक पाडून मोर्चे उभारून किल्ला पाडण्याकरितां तोफा सुरू करण्याचा अकबराचा इरादा नव्हता; फक्त सुरुंग पाडण्याकरितां तटाजवळ जावयास मिळावें अशी याची मसलत होती. त्याप्रमाणें दोहों ठिकाणीं याणें सुरुंग पाडले, आणि फौजेची तयारी करून सुरुंगांस आग घातली. भडाका झाला ह्मणजे हल्ला करणाऱ्या लश्करानें पुढें घसरावें, असा संकेत होता; तो एक सुरुंग मात्र उडाला होता, त्या खेंडारांतून एक टोळी जात असतां दुसरा सुरुंग उडाला; तेणेंकरून दोनहि टोळ्यांतील पुष्कळ लोक मेले गेले, आणि सर्वांस दहशत पोंचून ते सर्व हल्ला करावयास आलेले लोक लागलेच पळून गेले.

नंतर अकबरास वेढ्याचें काम पुनः सुरू करावें लागलें. पुढें प्रसंगवशात् एका रात्रीस आपले खंदक पाहण्यास जात असतां जयमल्ल हा किल्ल्यावर मशालीचा उजेडानें आपल्या मोर्चाजवळ येऊन कांहीं दागदुजीची देखरेख करित आहे, असें अकबर याणें पाहिलें; तेव्हां लागलीच त्यावर नेम धरून याणें स्वहस्तें गोळी मारली, ती दैववशात् त्यास मस्तकांत लागून तो मरून गेला. आपला शूर सरदार मेला असें पाहून किल्लेकऱ्यांची हिम्मत खचली, आणि आपल्या नेहेमींचा वेडेपणाप्रमाणें वेडेपणा करून जेथें किल्ला शत्रूंनीं फोडला होता तीं खेंडारीं सोडून देऊन ते किल्ल्यांत निघून गेले, आणि तेथें चालीप्रमाणें मोठ्या समारंभानें जीव देण्याचा निश्चय करिते झाले. नंतर त्यांणीं जयमल्ल याचा प्रेताबरोबर सर्व स्त्रिया जाळून टाकिल्या, आणि सर्व पुरुष मुसलमानांचा हातून मरण पावण्याचा संकल्पानें किल्ल्यांतून

बाहेर निघाले; मग तटावर कोणी अटकाव करण्यास नाहीं, यामुळें मुसलमानलोक वर चढून आले होते, त्यांणीं त्यांस मारून टाकिलें. त्या वेळीं आठ हजार लोक मेले गेले, असें राजपुतांचा हकीकतीवरून समजतें, आणि याहूनहि पुष्कळ लोक मेले गेले, असें मुसलमान ग्रंथकार वर्णन करितात(४). याप्रमाणें राजधानी नाहींशी झाली, तथापि तो राणा रानांमध्येंच स्वतंत्र राहिला. पुढें (बहुधा इ॰स॰ १५७८ ह्मणजे हि॰ स ९८६ मध्यें) उदयसिंग याचा मुलगा राणा प्रताप हा गादीवर असतां, कोमुलनेर व गोगुंद नामें त्याचे मजबूद किल्ले मुसलमानांनीं घेतले; तेव्हां त्यास कांहीं वेळपर्यंत सिंधुनदाकडे पळून जावें लागलें. परंतु तो राजा शूर आणि उद्योगी होता; आपल्या बापासारखा नव्हता; त्यामुळें त्याणें निग्रह करून, अकबर मरावयाचा पूर्वीं आपला बहुतेक मैदान मुलुक परत घेतला, आणि उदेपुरनामक नवी राजधानी वसविली. तेथें त्याचे वंशज अद्यापि राज्य करित आहेत. सर्व राजपूत राजांचा घराण्यांपैकीं याचा घराण्यांतील राजांनीं मात्र दिल्लीचा बादशाहांशीं शरीरसंबंध केला नाहीं; आणि दुसऱ्या राजांनीं यवनांशीं संबंध केल्यामुळें ते बाटले असें मानून त्यांजबराबरहि यांणीं संबंध तोडून टाकिलेला आहे.

इ॰ स॰ १५६८, मार्च. हि॰स॰ ९७५, साबान.

असे संबंध व्हावे, हें अकबराचा मनांतून फार असे,

---

(४) दोन हजार लोकांनीं आपल्या स्वतांचा बायकामुलांचे, हात बांधून, असे कांहीं आपण शत्रूंकडील बंदीवान् घेऊन जात आहों असें दाखवून, जी मुसलमानांची फौज हल्ला करून आली होती, तींतून निघून गेले, आणि अशा विलक्षण युक्तीनें आपला बचाव करिते झाले.

आणि यापुढें जे बादशाह झाले त्यांणींहि बहुत कालपर्यंत ती चाल तशीच ठेविली होती. जयपुर व मारवाड या दोन घराण्यांतील खुद याचा दोन राजपूत राण्या होत्या, आणि याचा वडील पुत्राचें जयपुरचा एका राजकन्येशीं लग्न झालें होतें. अशा संबंधांमध्यें नवऱ्यावर बायकोचें वजन साहजिकच पडत असे. तिचा मुलांस मुसलमानी आईचा पोटीं झालेल्या प्रजेप्रमाणेंच गादीचा हक्क असे, आणि एकंदराखालीं हा संबंध अगदीं बराबरीचा नात्यानें होई, तेणेंकरून आपली ज्ञाति भ्रष्ट होत्ये यामुळें अशा संबंधांचा त्रास न येतां, बादशाहाचा कुटुंबांत मोठ्या अब्रूनें सोयरीक होत्ये असें वाटूं लागून सर्व राजपूतलोक लवकरच त्याची इच्छा करूं लागले. दुसऱ्या वर्षी अकबर याणें रतनभोर व कालिंजर हे मजबूद पहाडी किल्ले घेतले. त्यांतून रतनभोरचा किल्ल्यावर अकबर स्वतः गेला होता. पुढें एका प्रसंगीं हा जोदपुरचा सरहद्दीवर गेला असतां, तेथील वृद्ध राजा मालदेव याणें आपला दुसरा मुलगा आपल्याबदल भेटावयास पाठविला.

इ० स० १५७०, हि० स० ९७८. त्यांत आपला अपमान झाला असें अकबरास वाटून यास क्रोध आला, आणि याजकडे कांहीं वाजवी रीतीनें धनीपणा नसतां याणें त्याच वंशांतील धाकट्या घराण्याचा बिकानीरचा

इ० स० १५७२ हि० स० ९८० राजा रायसिंग यास जोदपुरचा मुलुक कागदपत्रानिशीं बक्षीस करून दिला; तथापि रायसिंग यास तो मुलुक मिळाला नाहीं. पुढें मालदेव मरण पावल्यावर, त्याचा मुलगा शरण गेला; तेव्हां त्याजवर अकबरानें अतिशय कृपा करून त्याचा मोठा सन्मान केला.

यानंतर अकबर याणें दुसरें मोठें साहस करून

ती प्रकारें गुजराथचा राजा बहादुर शाह म- रण पावल्यावर, त्याचा पुतण्या दुसरा महमूद हा राजा झाला. तो मरण पावल्यावर त्याचा प्यारींतील ऐतमाद खान नामें एका हिंदु गुलामानें महमूदाचा ह्मणून कोणी एक मुलगा पुढें करून त्याचा नावानें राज्य चालविलें; त्यास तिसरा मुझफ्फर ह्मणतात. या ढोंगी आगंतुकास जेंगीझ खान नामें दुसऱ्या एका सरदारानें अडथळा केला; ज्या मिर्झालोकांनीं पूर्वी इ० स० १५५६ त बंडावा केला असें सांगितलें आहे, ते पळून येऊन याचाच आश्रयास राहिले होते. पुढें त्या मिर्झालोकांची मिझाज अकटोविकट वाढून त्यांचें व त्यांचा आश्रयदात्याचें भांडण झालें. त्यांत कांहीं वेळ त्यांचा जय झाला; परंतु पुढें जेंगीझ याणें त्यांस गुजराथेंतून हांकून लाविल्यावर, अकबरानें इ० स० १५६८ त चितूर घेतलें. त्यानंतर लौकरच, त्यांणीं माळवा बळकावण्याचा यत्न केला. त्या वेळीं अकबर याणें त्यांवर लागलीच फौज पाठविली. परंतु तिचें कांहीं कारण लागलें नाहीं; कारण इतक्यांत जेंगीझ खान यास कोणी मारेकरी घालून मारिलें. त्यामुळें गुजराथेंत गोंधळ झाला अशी संधि पाहून, आपलें कांहीं कार्य साधेल तर पाहवें या हेतूनें ते मिर्झालोक गुजराथेंत परत गेले. हे बखेडे इ० स० १५७२ पर्यंत एकसारखे धुमसत चालले होते, तेव्हां बादशाहा याणें गुजराथ आपल्या ताब्यांत घेऊन सर्व प्रांतांतील अव्यवस्था मोडून टाकावी अशी ऐतमाद खान याणें अकबर यास विनंती लिहून पाठविली. त्याप्रमाणें

प्रांत घेतला.



जमादि उल्
अव्वल. सतां, गुजराथचा नामधारी राजा मुझफ्फर हा त्यास भेटावयास आला, आणि त्याणें (विधिपूर्वक) आपलें राज्य अकबराचा स्वाधीन केलें. नंतर अकबरानें त्या प्रांतांतील बंडवाले सरदार यांस जिंकिलें; मिर्झालोकांस पकडण्याचा, अथवा त्यांचें लश्कर तरी फितवून टाकण्याचा यत्न केला; आणि सुरत शहरास स्वतः वेढा दिला. अकबर जाण्याचा पूर्वीं जे मुख्य मिर्झा तेथें जाऊन राहिले होते, ते थोडक्या लोकांनिशीं निसटून जाऊन गुजराथचा उत्तरप्रांतांत त्यांची मुख्य फौज होती, तिला मिळवून घेण्याकरितां यत्न करित होते. इतक्यांत त्यांस मध्यें तोडून पाडण्याकरितां, अकबरानें अकस्मात् त्वरेनें स्वारी केली, आणि ते जाऊन मुख्य फौजेस मिळण्यापूर्वीं त्यांस गांठिलें. या स्वारींत अविचारानें जलदी करून अकबर पुढें गेला, तों याची व एक हजार शत्रूंची समोरासमोर गांठ पडली; आणि त्या वेळीं याचे मागलेपुढले सर्व लोक आले तरी, सगळें १५६ मनुष्य जमा झालें. इतक्या थोड्या लोकांनिशींहि याणें हल्ला सुरू केला, त्यांत याचा मोड झाला, आणि एका मजबूद निवडुंगांचा कुपणाचा आश्रयानें ठाणें धरून यास राहवें लागलें. तेथें तीन घोडेस्वारांहून जास्ती एका रांगेनें जाण्यास मार्ग नव्हता. एथें शत्रूंनीं याचा फार लगट केला, आणि एकदां हा आपल्या लोकांपासून वेगळा पडून याचा समाप्तीची वेळ जवळ आली होती; परंतु याचा लहानशा टोळींत पुष्कळ

मोठा पराक्रम करून अकबराचा प्राण वांचविला, आणि शेवटीं याची फत्ते केली. तथापि शेवटीं ते मिर्झालोक आपल्या लष्करांत जाऊन मिळाले. पुढें त्यांची वाताहत होऊन दशा झाल्या; एक गुजराथेंत मारला गेला; बाकीचे मुख्य मिर्झा उत्तरहिंदुस्थानांत शिरले; आणि नागोराजवळ राजा रायसिंग याचा हातून पराभव पावून संबळ एथें आपल्या पूर्वींचा ठिकाणीं गेले. तेथून त्यांस हांकून लाविल्यावर त्यांणीं पंजाबप्रांतांत लूट केली, आणि पुनः सिंधुनदाकडे पळून गेले. शेवटीं ते बादशाहाचा सरदारांचा हातीं सांपडून मारले गेले. त्या मिर्झांपैकीं एक हुसेननामक गुजराथेंतून खानदेशाजवळचा डोंगरांत पळून गेला; तेथें त्याची कोणी वास्तपुस्त न पाहतां तो तसाच राहिला होता. याप्रमाणें कांहीं महिनेपर्यंत राहून, गुजराथदेश आपल्या ताब्यांत आणून अकबर आग्र्यास परत जाता झाला.

इ० स० १५७३, जून ता० ४. हि० स० ९८१, सफर चं० २.

हा आपल्या राजधानींत जाऊन एक महिना झाला नाहीं तों यास कळलें, कीं मिर्झा हुसेन हा पुनः गुजराथेंत शिरला, आणि त्यास मागचा राजाचा एक मुख्य सरदार मिळून, त्यांणीं बादशाहाचा फौजेस स्वतांचा सांभाळ करण्याचीच पंचाईत पाडिली. इतक्यांत पावसाळाहि सुरू झाला होता, तेणेंकरून यथास्थित तयारीनिशीं फौज नेणें हें अशक्य होऊन गेलें होतें; परंतु अकबराचें चांचल्य व धारिष्ट हीं विशेष असत, त्या वेळीं याणें स्वतः तिकडील



करच मुख्यत्वेंकरून मोठमोठे तिन शें सरदार लोक सांडण्यांवर बसवून स्वतः निघून गेला. याणें अडचणीचे दिवस असतांहि सवा दोन शें कोशांची मजल इतक्या त्वरेनें मारिली, कीं आग्रा सोडल्यापासून नवव्या दिवशीं आपले लोक जमवून तीन हजार लश्करानिशीं जाऊन शत्रूस तोंड दिलें. बंडवाल्यांपेक्षां याचें लश्कर अगदीं कमी होतें; परंतु बादशाहाची स्वारी वेताळासारखी अकस्मात् आल्यानें ते आश्चर्यचकित झाले. तशांत ते एका शहरास वेढा देण्याचा कामांत गुंतले असून त्यांतील किल्लेकऱ्यांनीं येऊन त्यांवर हल्ला केला होता; त्यामुळें अकबर याणें जरी अविचारानें एकाएकी हल्ला केल्यामुळें पूर्वींप्रमाणेंच पुनः याजवर बेतली होती, तथापि शेवटीं याचा जय झाला; दोन्ही बंडवाले मरून गेले; आणि तिकडील पुरा बंदोबस्त करून स्वस्थता झाल्यावर अकबर आग्र्यास परत आलों[५].

---

(५) ही लढाई सुरू होण्याचा पूर्वीं अकबर हत्यारें बांधून तयार होत असतां, एका राजपूत राजाचा लहानता मुलगा मोठी चिलखत घालून तयार होता. ती चिलखत त्याचा शक्तीबाहेर वजन होती, त्यामुळें तिचा भारानें तो चूर झाला होता. तेव्हां अकबरानें एक आपला तलम पोषाक देऊन त्याचा भारी घेतला, आणि दुसऱ्या राजाला पोषाक नाहींसा पाहून ती जड रिकामी राहिलेली चिलखत अकबरानें त्यास घालावयास सांगितली. हा दुसरा राजा त्या तरुण राजपूताचा बापाचा प्रतिस्पर्धी होता, ह्मणून त्यास आपल्या बापाचा चिलखतीची अशी वाट झालीसें पाहून संताप आला; आणि बादशाहानें दिलेली चिलखत त्याणें फाडून टाकिली, आणि मी मुळींच चिलखतीशिवाय युद्धांत जाईन असें त्याणें

त दुसऱ्या शीर शाहाचा पराजय झाल्यावर, कांहीं बहारप्रांत याचा ताब्यांत आला होता. बाकी तो प्रांत, व त्याचा पूर्वेकडील सर्व देश तसाच जिंकावयाचा राहिला होता. हुमायून परत राज्यावर येण्याचा पूर्वींच सुल्तान आदिली याचा कारकीर्दींत बंगाल्यांत बंड होऊन, हा वेळपर्यंत तेथें अफगाण राजे राज्य करित होते. सांप्रत दाऊदनामक राजाची कारकीर्द चालू होती. त्याचा वजीरानें त्यास पदच्युत करून टाकण्याची जवळ जवळ मसलत आणिली होती. पुढें त्या द्वाड वजीरास दाऊद याणें मारून टाकविलें, तेणेंकरून राज्यांतल्या राज्यांत कलह माजला.

बंगालप्रांतावर स्वारी केली.

या बखेड्यांची संधि पाहून अकबर याणें दाऊदाकडून आपणास खंडणी देण्याची कबूलात करून घेतली. पुढें थोडा वेळ स्वस्थता झाली असें पाहून त्या पाऊलबुद्धि राजानें पुनः स्वतंत्र होण्याचा डौल घातला. तेव्हां ही संधि नीट आहेशी पाहून बादशाहा त्यावर स्वतः स्वारी करून गेला. त्या वेळीं पावसाचा टोंभ चालला असतां, अकबर आग्र्याहून निघाला; आणि आपला सामानसरंजाम व कांहीं लश्कर असें याणें गंगायमुनेवरून जलमार्गानें पाठविलें. हा बहारप्रांतांतून जात असतां, बहुधा कोणी

---

सांगितलें. हा आपला अपमान केला त्याविषयीं अकबर विशेष बोलला नाहीं; तथापि इतकें ह्मणाला, कीं माझा सरदारांस स्वतांपेक्षां विशेष संकटांत पाडावें असें मी होऊं देणार नाहीं; याजकरितां जर तुह्मी चिलखत न घालाल तर मीहि चिलखतीशिवाय लढाईस जाईन.



ती मुलूख घेण्यास आपले सरदार ठेवून, आपण स्वतः आग्र्यास माघारा गेला.

बंगालमांत थोड्या आयासानें हातीं लागेल असें यास वाटलें होतें; परंतु तसें झालें नाहीं. दाऊद हा प्रथम आंवळ्यामांतांत पळून गेला. तथापि त्याणें पुढें दोन वेळा बादशाही फौजेशीं टकर देऊन तिला हटविलें. शेवटीं त्याच्या मोड होऊन त्यास बंगालचा आखातापर्यंत शत्रूंनीं हांकून लाविलें. तथापि त्यामध्यें सामर्थ्य होतें, त्यामुळें त्याणें तह करून आंवळ्यामांत हा आपणा स्वतांकरितां राखून ठेविला. ( राजा तोडरमल्ल नामें जा अकबराचा प्रसिद्ध प्रधानानें महसूलाविषयीं बंदोबस्त केला, तो या लढाईत एक मुख्य सरदार होता ). पुढें तह झाल्यावर तो व दुसरे सरदार लोक यांस परत दिल्लीस नेलें, आणि एक मोठ्या हुद्याचा सरदार बंगालचा सुभेदार करून ठेविला. पूर्वीं त्या प्रांताची राजधानी गौड ऊर्फ लकनौती ह्मणून होती; ती सोडून तेथील राजांनीं दुसऱ्या ठिकाणीं गादी नेली होती; अकबराचा या नवीन सुभेदारानें पुनः आपलें ठाणें गौड एथें नेलें. तेथील हवा न मानून तो मरण पावला. त्यामागून अकबरानें जो सुभेदार नेमला, त्याणें आपलें काम ताब्यांत घेतलें न घेतलें, इतक्यांत दाऊद याणें पुनः लढाई सुरू करून बंगालमांत घेतला. तेव्हां बादशाहाचा लोकांस एका ठिकाणीं जमून बहारमांतांतून कुमक येण्याची वाट पाहात राहवें लागलें. पुढें लढाई झाली तींत दाऊद याचा पराजय होऊन तो मारला गेला. तेथपर्यंत बहारमांतांतील रोठस

केला; तेव्हां तो किल्ला शेवटीं याचा स्वाधीन झाला. याप्रमाणें बंगाल व बहार हे प्रांत पुनः दिल्लीचा राज्यांत मिळून, हिंदुस्थानामधील अफगाण राजांचें पुरें वाटोळें झालें.

इ० स० १५७६ हि० स० ९८४

बंगालप्रांताची स्थिति.

बंगाल व बहार यांत स्वस्थता राहण्याजोगी त्या प्रांतांची स्थिति नव्हती. दक्षिणेस डोंगरी व जंगली मुलुक; उत्तरेस मोठे पहाड, व विस्तीर्ण अरण्यें; आणि समुद्रकिनाऱ्याजवळ चिखलट पाणथळ जमीनी व त्यांत आणखी जंगलें; या सर्व ठिकाणांतून बंडखोर लोकांस निर्भय लपून राहण्यास जागा होती. तशांत लोकांमध्यें बेदिली उत्पन्न होण्यास कारणेंहि थोडीं होतीं, असें नाहीं. बंगाल्यांत पूर्वी मोगलांचा अम्मल बसला नव्हता; तो अफगाणांचा वसाहतीनें भरून गेला होता; आणि उत्तरहिंदुस्थान मोगलांनीं घेतल्यावर जे अफगाण त्यांचा चाकरींत राहत नसत, ते बंगाल्यांत येऊन राहत. त्यामुळें एथें अफगाणांची संख्या फार वाढून गेली. तशांत मुलुकाची अस्वस्थता असल्यामुळें जे मोगल सरदार बंगाल्यांत येऊन राहत, त्यांचें फावे. ते अफगाणांचा जाहगीरी बळकावून त्यांचें उत्पन्न आपण खात, आणि बाकीचें उत्पन्न लश्करी कामाकडे लागलें असा हिशेब देत. जेव्हां अकबरानें महसूलाचा मोठा बंदोबस्त केला, त्या सुमारास बंगाला खालसा झाला होता; तेव्हां तेथील सुभेदारास हुजूर खजीन्यांत रसद भरणा करण्याचा हुकूम गेला, आणि सर्व जाहगीरींचा सक्त तपास

बंगाल्यांतील लश्करानें बंड केलें.

स आपलें सामर्थ्य किती आहे हें चांगलें माहित होतें; त्यामुळें **अकबराचे** हे नवीन कायदे त्यांगीं न मानून, प्रथम **बंगाल्यांत**, व नंतर लवकरच **बहारांत** बंड केलें. याप्रमाणें आपण मिळविलेला सर्व मुलुक जाऊन तीस हजार लोकांचें मोठें लश्कर आपणाबरोबर लढायास सिद्ध झालें आहे, असें **अकबरानें** पाहिलें. प्रथम पुष्कळ वेळा पादशाहाचा लश्कराचा मोड झाला, त्यानंतर **अकबरानें राजा तोडरमल्ल** यास तो प्रांत घेण्यास पुनः पाठवून दिलें. त्याणें प्रथम बराच बंदोबस्त केला; त्यांत हिंदु जमीनदार लोकांजवळ त्याचें वजन असे, त्यामुळें त्याचें बरेंच साधलें. पुढें **दिल्लीचा** वजीराकडून कांहीं पैक्याचा भरणा करण्याचा बाबदींत त्रासदायक मागणी आली, त्यामुळें पुष्कळ लोक फितून गेले; त्यांत बंडवाल्यांशिवाय दुसरे सरदारहि गेले. शेवटीं **तोडरमल्लामागून अझीझ ऊर्फ अझीम खान** याची नेमणूक झाली. त्याणें पुष्कळ सरदारांस लांचा दिल्या; लश्करांतील जा **अफगाण** व **मोगललोकांकडे** पूर्वीचा जाहगीरीचा जमीनी होत्या, त्या त्यांचा पुनः चालू केल्या; आणि याप्रमाणें तें बंड सुरू झाल्यापासून तिसऱ्या वर्षाचा अखेरीस समाप्तीस गेलें.

इ० स० १५७९हि० स०९८७.

**अफगाण-लोकांचें बंगाल्यांत बंड.**

वर सांगितल्याप्रमाणें **मोगलांचे** आपसांत कलह लागले, असें पाहून **दाऊद खान** याचे जुने **अफगाण** आश्रित हेहि रिकामे बसले नाहींत.

णि थोडक्याच दिवसांत **आंवढ्यामांत** व **वर्दवानमांता**-जवळील **दामोदरनदीपर्यंत** मुलुक घेतला. वरील बंड मोडल्यावर **अझीझ** परत गेला होता; तेव्हां ही नवीन लढाई चालविण्यास **राजा मानसिंग** यास **अकबरानें काबूला**-हून पाठविलें. जो मुलुक **अफगाण** बळकावून बसले होते, त्यांतच तो शिरला आणि हल्ली जेथें कलकत्ता शहर आहे, तेथें पावसाळची छावणी देऊन राहिला. पुढें त्याचा फौजेंतल्या एका मोठ्या टोळीचा शत्रूंनीं पराजय केला, आणि तिजवरील मुख्य **मानसिंगाचा** मुलगा होता, त्यास कैद करून नेलें. याप्रमाणें त्याची स्थिति बरीशी दिसली नाहीं; इतक्यांत दैववशात् **कुत्तू** मेला ( इ० स० १५९० ), आणि त्याचा मुलाचा कारभार **ईसा** पाहूं लागला. **ईसा** हा शहाणा व अल्पसंतोषी होता. कुत्तूचा मुलास **आंवढ्यामांत** देऊन त्यांणीं पादशाहाचा आश्रयानें ह्मणजे रयतेसारखें वागावें असा **मानसिंग** याणें त्याजबराबर लवकरच ठराव केला. पुढें दोन वर्षांनंतर **ईसा** मरण पावला. त्याचा मागून जो कारभारी झाला, त्याणें **जगन्नाथाचा** मोठ्या देवालयाचें उत्पन्न जप्त केलें, तेणेंकरून सर्व लोक त्याचा त्रास करूं लागले. ही त्याची चुकी पाहून **अकबरानें** आपलें कार्य साधावयाकरितां पुनः फौज देऊन **मानसिंगास** पाठविलें. त्याणें **बंगालचा** सरहद्दीवर **अफगाणांचा** पराजय करून त्यास **कटकमांतांत** हांकून लाविलें. आणि कित्येकांस जाहगीरी देऊन व कित्येकांवर सक्ती





चा बंदोबस्त झाला.

कुतूचा एका मुलानें पुनः बंड केलें, तथापि यानंतर बंगाल्यामध्यें अफगाणांचें वर्चस्व नाहींसें झालें असें ह्मणावयास चिंता नाहीं.

शाहजादा हकीम याचें बंड.

अकबराचे सरदार बंगाल्याचा बंदोबस्त करित होते, इतक्यांत अकबराचा भाऊ मिर्झा हकीम जो पुष्कळ दिवसपर्यंत काबूलांत राज्य करित होता, त्यास आणखी राज्य मिळविण्याचा लोभ उत्पन्न होऊन, त्याणें पंजाबावर पुनः स्वारी केली. त्या वेळीं पंजाबांत राजा मानसिंग हा सुभेदार होता. तो त्यासमोरून पळून लाहोरास येऊन आश्रयानें राहिला. हकीम याणें लाहोरास वेढा दिला, तेव्हां तो वेढा उठवून सर्व प्रांत बंडवाल्यांचा हातून सोडविण्यास अकबरास स्वतः फौज घेऊन जाणें आलें. हा आला तेव्हां मिर्झा हकीम पळाला याप्रमाणें हकीम याणें आपल्या राज्यावर हल्ला केला, त्याबद्दल त्यास शिक्षा करण्याजोगें अकबरास सामर्थ्य होतें; ह्मणून हकीम याचा पाठलाग करित हा सिंधुनद उतरला, याचा भाऊ थोडासा यास आडवा आला; परंतु त्याचा मोड करून याणें काबूल घेतलें. त्या वेळीं मिर्झा हकीम पहाडांत पळून गेला; परंतु तो शरण आल्यावर अकबरानें औदार्यानें त्याचें राज्य त्यास परत दिलें. यानंतर पुढें हकीम हा आपल्या भावाचा हुकुमांत वास्तविक राहिला होता, असें संभवतें.

इ॰स॰ १५८१ फेब्रुआरि, हि॰ स॰ ९८९ मोहरम.

काबूल घेतलें.

परत जाता झाला. जातांना वाटेंत सिंधुनदावरील मुख्य तरीचा कांठावर याणें एक किल्ला बांधिला, आणि त्यास अटकबारनशी असें नाव दिलें. अटकाचा किल्ला बांधिला. तो अद्यापि अटक या नावानें प्रसिद्ध आहे.

गुजराथचा राजा मुझफ्फर शाह याणें आपली गादी सोडल्यानंतर तो अकबराचा स्वारीबराबर आग्र्यास आला. तेथें त्यास कांहीं दिवसपर्यंत गुजराथेंतील बंड. दरबारामध्येंच ठेविलें होतें. पुढें अकबरानें त्यास जाहगीरी करून दिली, आणि तेथें राहण्यास त्यास परवानगी दिली. त्याप्रमाणें तो तेथें इ० स० १५७३ पासून १५८१ पर्यंत राहिला, व त्याविषयीं पुढें कांहीं अंदेशा आला नव्हता. अकबरानें या प्रसंगीं मोठें पोट करून मुझफ्फर खान यावर जे उपकार केले, व असेंच दुसऱ्याहि प्रसंगीं जें औदार्य केलें, त्याबद्दल याला पुष्कळ प्रायश्चित्त करावें लागलें. पुढें गुजराथेंत नवीन फितूरें होऊन, पूर्वीचा बंडाव्यांतील शीर खान फुलादी नामें एक मुखराणी याणें उत्तरहिंदुस्थानांतील जाहगीरीवरून पळून यावें, आणि आपल्या जुन्या राज्याचा धनीपणा घ्यावा, असें मुझफ्फर यास बोलावणें पाठविलें. इ० स० १५८१. हि० स० ९८९. पुढें बंड झालें, तें इतकें वाढलें, कीं बादशाही फौजेस माघारें घेऊन गुजराथेचा उत्तरेस पाटण एथें पडून राहवें लागलें. इकडे मुझफ्फर शाह याणें अहमदाबाद, भडोच, आणि बहुतकरून सर्व गुजराथप्रांत हस्तगत करून घेतला. त्या बंडाचा बंदोबस्ताकरितां बहिराम



स०९९२, मोहरम. काठेवाडांतील बहुधा स्वतंत्र झालेल्या अशा राजांचा आश्रयास जाऊन राहिला. त्याणें **मिर्झा खान** याचे हल्ले परतवून पुष्कळ वेळा आपलें राज्य परत मिळविण्याविषयीं यत्न केले, परंतु ते निर्फळ झाले. इकडे तो जेथें पळून जाऊन राहिला होता, तेथें **मोगलांनीं** त्याचा पाठलाग करण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केले, परंतु कोण्या वेळीं यांचा जय व्हावा, कोण्या वेळीं त्याचा जय व्हावा, असें पुष्कळ वेळ चालून उभय पक्षींचें नुकसान मात्र फार झालें; शिवाय दुसरा कांहीं परिणाम झाला नाहीं.

एका वेळीं, **इ० स० १५८९ त अझीझ** याणें **काठेवाडचा** दक्षिणेकडील समुद्रकिनाऱ्यापर्यंत चाल करून मोठी लढाई मारली; तींत सांगावयासारखा जय मिळाला नाहीं, व पुढें **मोगल**लोक माघारें निघून गेले. यानंतर चार वर्षांनीं, आणि मूळ बंड उत्पन्न झाल्यापासून बारा वर्षांनीं **मुझफ्फर शाह** हा वसाहतीचा प्रांतांत लूट करण्याकरितां आला होता, तेव्हां तो धरला गेला, आणि पुढें त्यास **आग्रा** एथें दरबारांत नेत असतां, वाटेंत त्याणें वस्तऱ्यानें आपला गळा कापून प्राण दिला.





## इ० स० १५८६ पासून अकबराचा मरणापर्यंत झालेलीं वर्तमानें.

मुझफ्फर शाह पळून गेल्यानंतर अकबर हा दक्षिणेंतील राजांचा तंट्यांत (इ०स०१५८५ पासून) पडूं लागला. याचे यत्न प्रथम सिद्धीस गेले नाहींत; त्याविषयीं सविस्तर हकीकत पुढें सांगितली जाईल; दरम्यान याचा उत्तरेकडील राज्याचा कारभारच यास पुरेसा झाला.

अकबर दक्षिणेंतील कारभारांत हात घालूं लागला.

इ० स० १५८६ मध्यें याचा भाऊ मिर्झा हकीम मरण पावला. त्याचा मुलुक आपल्या ताब्यांत घेण्यास यास कांहींच अडचण पडली नाहीं. परंतु इतक्यांत त्यास वर्तमान लागलें कीं उझबेगलोकांचा खान अब्दुल्ला याणें मिर्झा सुलेमान यास बदकूशानप्रांतांतून घालवून दिलें. तो खान पुढें चाल करून येईल या भीतीनें बहुधा याणें स्वतः काबूलावर स्वारी केली; परंतु अब्दुल्ला खान बदकूशान घेऊन स्वस्थ राहिला, आणि अकबरानेंहि तो आपला वडिलार्जित मुलुक परत घेण्याचा यत्न न केल्यामुळें कांहीं तंटा झाला नाहीं. या वळीं बादशाह उत्तरेचा पहाडांजवळ गेलेला होता. त्यांतील बहुतेक मुलुक याचा ताब्यांत आला होता, तेणेंकरून (तिकडील बाकीचे प्रांत घेण्याचा लोभानें) याणें नवीन लढाया

अकबरानें सिंधुनदावरील अटक एथें ठाणें नेलें.



प्रथम याणें काश्मीरदेश घेतला. तो प्रकारः— काश्मीरचें राज्य पहिल्यापासून प्रसिद्ध आहे. तेथील मुलुक मोठा विस्तीर्ण मैदान असून, त्याची उंची हिमालयाचा निमेहून जास्त आहे, व हा प्रांत त्या पर्वतांचा गर्भांतच आहे. त्याचा उंचीमुळें उत्तरहिंदुस्थानांतील गर्मीचा तेथें उपद्रव होत नाहीं; आणि त्याचा सभोंवती पर्वताचा आश्रय आहे, त्यामुळें उंच प्रदेशांतील वाऱ्याचा सोंसाटाहि तेथें बाधत नाहीं; तेणेंकरून त्या देशांतील हवा सुंदर असून सभोंवारचा पर्वतांवर बर्फ पडलें असतांहि या देशांत सार्वकाळ वनस्पति हिरव्या चार असतात, व एथें एकसारखा वसंतऋतूच आहे असा भास होतो. निरनिराळ्या देशांत होणारे वृक्ष या प्रदेशांत पसरले आहेत, आणि नाना प्रकारचीं फळें व अपरिमित जातींचीं फुलें हीं पर्वतांतून व खालचा तळवटांतून आपसुखानें वर्षाव करित आहेत; खालचा सपाट देशांत खिंडींतून झरे उत्पन्न होऊन, अथवा पर्वतांतून धोधे निघून, जिकडेतिकडे उदकाचा प्रसर झाला आहे, आणि तें पुष्कळ ठिकाणीं सांचून तलाव झाले आहेत; त्यांतून दोन तलावांचा किनाऱ्यांची शोभा व तेथील बागाईताची शोभा वर्णनीय आहे. हे तलाव केवळ या देशाचें नाक आहेत.

काश्मीर घेतला.

या भूमंडलावरील इंद्रभुवनास जाण्यास कांहीं मोठ्या कठीण व भीतीचा वाटा आहेत, त्यांतूनच कायती गति आहे. तिकडील जाण्याचा रस्ता एकंदराखालीं उभा चढाव आहे, तथापि पुष्कळ ठिकाणीं खडकाळ डोंगरांतून चढावयाचा

रस्ते आहेत, त्यांचा खालीं पहाड फार तुटलेले असून खालून मोठ्या नद्या वेगानें वाहत आहेत; पुढें जेथें काश्मीरांत उतरावयाची वाट आहे, तितक्या उंचीचा पर्वतांतील भाग चढून गेलें, ह्मणजे तेथें एका ऋतूमध्यें बर्फ पडून कांहीं वाटा अडतात, आणि कांहीं ठिकाणीं तर पुढें जाण्याचा रस्ताच बंद होतो.

या प्रकारचा काश्मीर देशांत फार प्राचीन कालापासून चौदाव्या शतकाचा आरंभापर्यंत पुष्कळ दिवस हिंदु राजे राज्य करित होते; आणि कदाचित् कधीं कधीं तातार राजांचीहि सत्ता असे. पुढें तो मुलुक एका आगंतुक मुसलमानाचा हातांत सांपडला. तेव्हांपासून, अकबर स्वारी करून गेला तेथपर्यंत, तेथें मुसलमानच राजे सत्ताधारी होते.[1] त्यांचा कुटुंबांत आंतल्याआंत कलह चालले अशी संधि पाहून या साहसी बादशाहास तो देश घेण्याची इच्छा उत्पन्न झाली; आणि अटक एथें राहत असतां इ० स० १५८६ मध्यें मिर्झा

इ० स० १५८६, हि० स० ९९४.

(१) संस्कृतांत राजतरंगिणीनामक काश्मीरदेशाचा इतिहास लिहिलेला आहे. संस्कृत भाषेमध्यें एवढाच इतिहासपर ग्रंथ आहे, अशी याची प्रसिद्धि आहे. हा चार ग्रंथकारांनीं लिहिलेला आहे; त्यांतून पहिल्यानें आपला भाग इ० स० ११४८ त लिहिला आहे, परंतु त्यांत पूर्वींचा इतिहासकारांचा ग्रंथांतील वेंचे सफाईनें दिले आहेत, त्यावरून त्याचा लेख खरा असेल असा भरवसा बसतो. सर्व इतर इतिहासाप्रमाणें या ग्रंथाचा पहिला भाग दंतकथांनीं भरलेला आहे, परंतु इ० स० ६०० चा सुमारापर्यंतचा चिना व त्यांचा तारिखा हळू हळू मिळत्या आणलेल्या आहेत; आणि या वर्षांपुढील सालवारी अगदीं बरोबर आहे.



सुलेमानाचा मुलगा शाहरोख मिर्झा (जाला अब्दुल्लाखान याणें बदक्शानांतून घालवून दिल्यावर तो अकबराचा चाकरीस राहिला होता, तो ) व आपला मेहुणा जयपुरचा राजा भगवानदास, यास त्या देशांतील धनी आपसांत भांडत असतां तो आपल्या तोंडांत टाकावा ह्मणून याणें पाठविलें.

हें लश्कर जाऊं लागलें, तेव्हां मार्गांत त्यास वर लिहिलेल्या अडचणींनीं हरकत झाली; त्यांतून बर्फामुळें विशेष झाली; शेवटीं जा एका नाक्यावर काश्मीरचा राजाचा पाहरा नव्हता, त्या मार्गानें ते त्या देशांत शिरले; तथापि तो मुलुक नापीक, आणि पहाडांतून त्यांत मनुष्यांची गति होणें कठीण, त्यामुळें त्यांची सामग्री खपून गेली, आणि पुढें राहिलेल्या अडचणी त्यांस फार भारी दिसून आल्यामुळें त्या दोन्ही सरदारांनीं त्या वेळचा काश्मीरचा अधिकाऱ्याबराबर तह केला. त्यांत त्याणें अकबराचें वर्चस्व कबूल केलें, परंतु बादशाहानें आपल्या प्रांताचा कारभारांत हात घालूं नये असें ठरविलें. अकबरानें हा करार नापसंत केला, आणि दुसऱ्या वर्षी मोठी फौज पाठविली; तिणें बरेंच काम केलें. त्या वेळीं काश्मीरामध्यें आंतल्याआंत तंटे लागलेले होते; आणि जा नाक्यानें अकबराचें लश्कर त्या मुलुकांत जावयाचें, त्याचा संरक्षणार्थ जे लोक ठेविलेले होते, त्यांतहि ते तंटे धुमसत होते. पुढें अकबराची फौज जातांच, त्यांतून कांहीं लोक या फौजेस मिळाले, आणि बाकीचे आपलें ठाणें सोडून राजधानीस पळून गेले. तेवढी आडकाठी ओलांडून गेल्यावर काश्मीर पादाक्रांत होऊन गेला. तेथील राजा मोगलांस शरण आला; त्यास

अकबरानें दिल्लीचा दरबारांतील उमरावलोकांचा पायरीप्रमाणें ठेवून बहारप्रांतांत मोठी जाहगीर लावून दिली. यानंतर नवीन घेतलेल्या मुलुकांतील मौज मारण्याकरितां अकबर काश्मीरास गेला, आणि पुढें सगळ्या कारकीर्दीत आणखी सगळा दोन वेळा हवेकरितां हा त्या प्रांतांत गेला होता, परंतु अकबरानंतर जे पादशाह झाले ते हें रम्य स्थल पाहून दर उन्हाळ्यामध्यें मोठ्या प्रीतीनें हवा खाण्यास तेथें जात असत. अद्यापिहि एशियाखंडांत, अथवा किंबहुना सर्व जगामध्येंहि, काश्मीर ही अतिशय रम्य जागा अशी प्रख्यात आहे.

ईशान्येकडील अफगाणांवर लढाया.

अकबरानें जी काश्मीरावर वरील स्वारी केली तिला कांहीं कारण नव्हतें. ती संपल्यानंतर याणें पेशावराचा तळवटासभोंवती पहाडी मुलुकांत जे ईशान्येकडील राहणाऱ्या कुळींतील अफगाण राहतात त्यांवर स्वाऱ्या केल्या; त्या करण्याचें कांहीं कारण होतें; परंतु त्यांणीं हटाग्रहानें याशीं टकर दिली, त्यामुळें त्यांत अकबरास विशेष लाभ झाला नाहीं.

त्या अफगाणांचा जातीचें व त्यांचा मुलुकांचें वर्णन.

वरील तळवटाचा विस्तार मोठा असून त्यांत पीकहि अपार होतें. त्या जमीनीमध्यें हिंदुस्थानांतील सुपीक जमीनीचे गुण असून, पश्चिमेकडील समशीतोष्ण देशांतील पुष्कळ अनुकूलताहि तेथें आहेत. त्या प्रदेशाचा उत्तरेस हिंदुकुशनामक मोठा पर्वत आहे; पश्चिमेस सुलेमाननामक उंच पहाड आहे; दक्षिणेस खैबरनामक त्याहून सखल डोंगर आहे, त्याचा विस्तार सुलेमान पहाडापासून सिंधुनदापर्यंत आहे; एवढ्या चतुःसीमेंतील मुलुक हा अफगाणांचा खास मुलुकापैकीं सुमारें दहावा हिसा आहे. एथील

युसफझै जातीचे
अफगाणलोक राहतात. त्यांचें कुळ ईशान्येकडील सर्व अफगाणांत मोठें आहे, आणि बाकीचा अफगाणलोकांचा त्यांवरून नमूना घेण्याजोगे असे ते आहेत. पेशावर प्रांताचा तळवटाचा उत्तरभागाचाहि त्यांचा देशांत समावेश होतो, आणि तेथून पुढें हिंदुकुशनामक बर्फानें आच्छादित झालेल्या पर्वतापर्यंत त्यांचा मुलुक लागत गेला आहे. त्यामध्यें १५ पासून २० कोशपर्यंत लांबीचा, व तितक्याच रुंदीचा कांहीं खिंडी आहेत. त्यांचा दुबाजूंस दुसऱ्या खिंडी लागत गेल्या आहेत. त्या खिंडींचीं तोंडें अगदीं अरुंद होत आलीं असून, त्यांतून कित्येकांचा परिघास मोठमोठे उंच तुटलेले कडे आहेत; अथवा कित्येक रानांमध्यें, आणि अटव्य अरण्यांमध्यें गुडूप होऊन गेल्या आहेत. त्या सर्वांचें सौंदर्य व हवा काश्मीराचा शोभेची व हवेची बरोबरी करितात. अशा मुलुकांत कोणी शत्रु आला असतां तो अगदीं गोंधळून जातो, आणि त्याला अडचणी पुष्कळ येतात. परंतु तद्देशीय लोकांस एका खिंडींतून दुसऱ्या खिंडींत जाण्याचा वाटा माहित असतात, आणि रस्ते मळलेले नसतांहि त्यांना मार्ग उमगून काढतां येतात, त्यामुळें त्यांस सहज इकडून तिकडे जातां येतें. या देशांतील मूळ लोक हिंदु होते. ते प्राचीन काळचा पारोपामीसादी लोकांचे वंशज होते असें संभवतें. त्यानंतर अलीकडे कांहीं जातींचा अफगाणलोकांनीं येऊन त्यांस जिंकून गुलामांसारिखें केलें होतें, आणि या वेळापूर्वी सुमारें १०० वर्षांवर कंदाहाराजवळून युसफझै

चा मुलुक घेतला. याप्रमाणें त्यांचा मुलुक असून, त्यांची सत्ता पुष्कळ लोकांवर असे, यामुळें त्या युसफझै लोकांस आपल्या श्रीमंतीचा गर्व असे. शिवाय ते पहाडी लोक, त्यामुळें त्यांस स्वातंत्र्याचा अभिमान साहजिकच असे. त्यांतून त्यांचें राज्य लोकसत्ताक असे, त्यामुळें त्यांचें मान जरा विशेष वाढलें होतें. त्यांचा दर एक कुळाचा वंशपरंपरेचा मुख्य सरदार असे; तथापि जेव्हां स्वस्थता असे, तेव्हां ते आपल्या जातींतील लोकांचे अभिप्राय घेऊन दुसऱ्या जातीचा लोकांस कळवीत. याशिवाय त्यांस दुसरा कांहीं अधिकार नसे. प्रत्येक गांवचे लोक आपआपला आंतील कारभार पाहात; कज्जाकफावती झाल्यास त्यांचा पंचाईतीनें निकाल होत असे; आणि कांहीं तरी कारणास्तव बहुधा हमेशा गांवचा चावडीवर लोकांचा सभा भरत असत; शिवाय लोक आरामाकरितांहि येऊन चावडीमध्यें बसत असत. तसेंच कोणी पांथस्थ येणाऱ्या जाणाऱ्यास अथवा दुसऱ्या कोणी गृहस्थास भेजवानी करावयाची झाली, तर ती तेथें करित असत. त्यांचा जमीनीचे सारखे विभाग केलेले होते, आणि ते तसेच सारखे राहवे ह्मणून त्यांचे पुनः पुनः विभाग करित असत. हे अफगाण आपल्या हिंदु रयतस चांगल्या रीतीनें पाळीत, परंतु त्यांजकडे कांहीं राज्यकारभार नसे; हे लोक आपल्या रयतेपेक्षां देखणे असत, व तशीच त्यांची रीतभातहि त्यांहून चांगली असे.

दक्षिणेकडील सपाट देशांत व सखल डोंगरी मुलुखांत



असे; परंतु
सुलेमानी पर्वतांत जे कांहीं जातींचे अफगाण राहत असत, त्यांचा मुलुक अधिक डोंगरी असून युसफझैलोकांपेक्षां ते कमी सुधारलेले होते. बाबर बादशाहानें या ईशान्येकडील दुसऱ्या अफगाणांस आपल्या ताब्यांत आणण्याचा यत्न केला, आणि तो थोडासा सिद्ध झाला होता; परंतु युसफझैलोकांशीं त्याचें कांहीं चाललें नाहीं; त्याणें त्यांची समजूत पाडण्याचा यत्न केला, व त्यांचा मुलुकांत जेथें त्याची गति झाली, तो मुलुक लुटूनहि टाकिला; परंतु सर्व व्यर्थ गेलें.

सांप्रत या लोकांशीं अकबराचा तंटा चालण्याचें कारण उत्पन्न झालें, तो प्रकारः— पूर्वीं पुष्कळ वर्षांवर या कुळींचा अफगाणांमध्यें एक तऱ्हेचें वेड भरलें होतें; सांप्रत बेझिदनामक एक पुरुष आपणास पैगंबर असें ह्मणवूं लागला; त्याणें कुराण टाकून देऊन या जगामध्यें सर्वत्र ईश्वर आहे, सर्व वस्तूंचें तत्व तोच आहे, त्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं, तो सर्व पूजेचा त्रास करितो, आणि लोकांनीं उपोषणादि हठ्योग करावे हें त्यास आवडत नाहीं; परंतु त्याचा पूर्ण अवतार असा मी पैगंबर आहें, याजकरितां माझा सर्व आज्ञा लोकांनीं पूर्णपणें मानाव्या; असें नवीन मत तो प्रतिपादित असे. आपल्या पंथाचा लोकांनीं पाखंडी लोकांचा जमीनी घ्यावा व मालमत्ता बळकावावी अशी त्याणें आपल्या शिष्यांस आज्ञा केली; आणि काळेंकरून सर्व पृथ्वीचें तुह्मांस राज्य मिळेल असें त्यांस तो सांगूं लागला. त्या पंथाचे लोक लवकरच पुष्कळ जमले. ते

[illegible] व खैर या पहा-
डांमध्यें आपला अम्मल बसविला आणि जवळचा ह्मणजे आजूबाजूचा लोकांवरहि तो आपला पगडा चालवूं लागला. त्याचें मकरण पुष्कळ दिवस इतकें माजलें, कीं त्याचा बंदोबस्त करण्याविषयीं पादशाहास यत्न करणें भाग आलें. त्यास गर्व विशेष असे, आणि शिष्यमंडळीचा त्याजवर अतिशय भरवसा असे; यामुळें त्याणें समोर मैदानामध्यें पादशाहाचा लश्कराबरोबर धट्टाईनें युद्ध केलें. त्यांत त्याचे पुष्कळ लोक मरून जाऊन, त्याचा मोड झाला, आणि तो पुढें लवकरच थकून त्रासानें मरण पावला. त्याचा मुलांनीं त्याचीं हाडें खणून काढून एका लहानशा तारवांत घालून तें तारूं आपल्या जिलबीस फिरविण्याचा क्रम चालविला; परंतु त्यांचा पहाडी मुलुकाचा सरहद्दीपलीकडे त्यांची विशेष भीति नव्हती. पुढें इ० स० १५८५ चा सुमारास त्याचा लहान मुलांपैकीं जल्लाल नामें एका मुलानें आपली हुकुमत चालविली, आणि मोठा तडाका मारिला; तेव्हां काबूलचा सुभेदाराचानेंहि स्वबळानें त्याबराबर टकर देववली नाहीं. जेव्हां शाहजादा हकीम वारला, आणि काबूल खुद अकबराचा ताब्यांत आला, तेव्हां पादशाहानें तेथील काम राजा मानसिंग यास सांगितलें. तो मोठा बुद्धिमान् असून पादशाहाचा सगा होता; शिवाय त्याचा वतनी राज्यांतूनहि त्यास मदतीकरितां फौज न्यावयास सांपडे; परंतु इतक्याहि गोष्टी अनुकूल असतां त्याचानें वरील मकरणाचा पक्का बंदोबस्त झाला नाहीं, त्यामुळें त्या अफगाणांचा बंदोबस्त करावा हाहि वरील सिंधुनदाकडेस





[illegible] एक पुष्कळ टोळ्या पाठविल्या, आणि त्यांणी युसफझैलोकांबरोबर लढाई सुरू केली; त्यापूर्वीच पुष्कळ दिवसांवर युसफझैलोकांनीं रोशनयेलोकांबरोबर तंटा करून त्या पंथाचीं मतें सोडून दिलीं होतीं.

युसफझैलोकांनीं मोगलांचा लष्कराचा नाश केला. इ० स० १५८६.

या लष्कराबरोबर बादशाहानें आपला दुधभाऊ झैन खान, व आपला अति मोठा प्यारा राजा बीरबल हे दिले होते. ही लढाई एवढी मोठी अगत्याची मानित असत कीं, अबुल् फझल् व बीरबल या दोघांनीं, लष्कराचा एका भागाचें आधिपत्य आपणांतून कोणास द्यावें याविषयीं चिठ्या टाकिल्या, आणि त्यांमध्यें आपलें नाव आलें नाहीं ह्मणून या तलवार मारण्याचा प्रसंगास आपण मुकलों, असें पाहून मी खिन्न झालों असें खुद्द अबुल् फझल् याणेंच आपल्या ग्रंथांत वर्णन केलें आहे. अबुल् फझल् याचा भाऊ फैझी हाहि त्या लष्कराबरोबर होता. त्यांणीं सपाट मुलुक लवकरच लुटून फस्त केला. पुढें राजा बीरबल एका खिंडीतून वर जावयास लागला, तों जातांना वाटेस त्या पर्वताचा दरींमध्यें तो हळूहळू गोंधळून गेला; आणि त्यांतून पलीकडे बाहेर निघण्यास मार्ग न सांपडून त्यास तें साहस सोडून देऊन पुनः सपाट मुलुकांत यावें लागलें. झैन खान हा विशेष नियहानें पुष्कळ खडकळ व भयंकर पर्वतांतून पार गेला; आणि एक चांगलेंसें ठिकाण पाहून आसपासचा लोकांवर कैद बसविण्याकरितां त्याणें एक किल्ला बांधला. परंतु इतक्या वेळांत त्याचे लोक अगदीं थकून गेले

मिळाला. पुढें अकबरानें त्यांस आणखीहि कुमक पाठविली, नाहींतर दोघांचानेंहि मिळून ही लढाई पुढें चालवली नसती.

ही फौज आल्यानंतर त्यांणीं लढाई पुढें चालविली, बीरबलाचें व झैन खानाचें वांकडें होतें, त्यामुळें झैन खान याणें पुष्कळ रीतीनें निषेध केला असतांहि अफगाणलोकांवर सर्व फौजेनिशीं एक निकराचा हल्ला करावा, असा त्यांणीं निश्चय केला. तो ठराव झाल्याप्रमाणें ते पहाडांत चालून गेले. तों लवकरच त्यांना एक कठीण घाट लागला. तो बीरबल चढून गेला, परंतु माथ्यावर जाऊन पोंचला, तों त्याचा साऱ्या दिवसाचा थकलेल्या लश्करावर अफगाणांनीं मोठ्या झपाट्यानें हल्ला केला; तेव्हां त्याचा फौजेची वाताहत होऊन जास जशी वाट फुटली, तिकडून ते लोक खालीं सपाट प्रांतांत आले. झैन खान घाटाचा पायथ्यास राहिला होता, त्यावरहि त्या वेळीं अफगाणलोकांनीं हल्ला केला; परंतु त्याणें ती रात्र व दुसऱ्या दिवशीं कांहीं वेळपर्यंत आपला शर्तीनें बचाव केला. नंतर त्या दोघांही सरदारांनीं मुक्काम करून आपलें फुटलेलें लश्कर एका ठिकाणीं मिळविलें. मग शत्रूंबराबर तह करावा असें झैन खान याचें बोलणें पडलें, परंतु बीरबल त्याचें कांहींच सांगितलेलें ऐकेना. शेवटीं अफगाणलोक आपल्या फौजेवर रात्रीस छापा घालून आपला पुरा नाश करणार असें बीरबलास वर्तमान लागल्यावरून झैन खान याची सल्ला घेतल्याशिवाय तो आपले लोक घेऊन निघाला, आणि खालचा सपाट



त्या लोकांनी त्यास वरील वर्तमान पोंचविलें असावें. कारण तो वरील खिंडीचा नाक्यावर पोंचला नाहीं, इतक्यांत सर्व बाजूनीं अफगाणलोकांनीं त्यास घेरलें; बाणांची व दगडांची वृष्टि करून त्यास जेर केलें; आणि पहाडांवरून नागव्या तरवारी हातांत घेऊन त्याचा आश्चर्यचकित झालेल्या फौजेवर ते तुटून पडले. त्या वेळीं आपल्या फौजेंत व्यवस्था राखण्याचे जे याणें यत्न केले, ते सर्व व्यर्थ गेले; याचा सर्व लश्करास पळ सुटला, आणि घाटामध्यें माणसें, घोडे, व हत्ती, यांची एकच गर्दी होऊन गेली; तेव्हां बीरबलाचा लश्कराचा मोड होऊन अफगाणांनीं मोठी कतल केली; त्यांत बीरबल व पुष्कळ नामांकित सरदार मारले गेले. इकडे झैन खान मैदानामध्यें होता, तथापि त्याचीहि दशा कांहीं त्याहून चांगली झाली नाहीं. तो परत येत असतां अफगाणांचे तीरंदाज, बरकंदाज, व गोफीणवाले, असे थव्यांचे थवे त्याचा सभोंवार मिळालेले असत; त्यांतून हा दिवस होता तों बराच निभावून परत चालला होता; पुढें रात्र पडली, तेव्हां कांहीं वेळपर्यंत त्या लोकांनीं त्याजवर हल्ला केला नाहीं. त्यामुळें त्याला किंचित् विसावा मिळाला. इतक्यांत “ अफगाण आले ! ” अशी आवाई उठली, तेव्हां त्या रात्रीचा अंधारामध्यें त्याचे लोक अस्ताव्यस्त होऊन त्यांस पळ सुटला; त्यांत पुष्कळ लोक मेले, व त्यांहूनहि अधिक लोकांस धरून शत्रूंनीं कैद केलें. झैन खान हा पायांनीं निघून मोठ्या शर्तीनें अटकेस येऊन पोंचला.

आणि त्याणें झैनखानाची भेट घेतली नाहीं. बीरबलाचें
प्रेत मुळींच सांपडलें नाहीं, त्यामुळें तो अद्यापि कैदेंतील लोकांमध्यें जीवंत आहे, अशी आफवा निघून ती लोक खरी मानूं लागले. अकबरानेंहि त्या गप्पेस उत्तेजन दिलें; तेणेंकरून पुढें पुष्कळ दिवसांनंतर एक धुतारा तें नाव धारण करून उत्पन्न झाला. हा दुसरा बीरबल दरबारांत पोंचण्याचा पूर्वींच मरण पावला; तेव्हां आपला दोस्त वारला, ह्मणून बादशाहानें पुनः सूतक धरिलें. बीरबलामध्यें वास्तविक योग्यता होती; आणखी मनमिळावू गुणहि त्यामध्यें होते, त्यामुळें बादशाहाची त्यावर इतकी मर्जी बसली; त्याचें संभाषण मोठें मनोरंजक असे, आणि त्याचीं पुष्कळ समयोचित भाषणें अद्यापि हिंदुस्थानामध्यें चालत आहेत.

वरील अनर्थ झाल्याचें वर्तमान बादशाहाचा लश्करांत पोंचतांच सर्वांस धास्ती पडली, तेव्हां बादशाहानें राजा **तोडरमल्ल** याचा हाताखालीं शाहजादा मुराद नामें एक आपला मुलगा देऊन अफगाणांची पुढें चाल बंद करण्याकरितां लश्कर देऊन पाठविला. पुढें पहिली धास्ती नाहींशी झाल्यावर, शाहजादा मुराद यास परत बोलावून घेतलें. आणि तोडरमल्ल व राजा मानसिंग हे त्या फौजेचे मुख्य करून ठेविले.

युसफझैलोकांचा प्रथम लाग साधला त्याप्रमाणें पुढें कांहीं करण्याचा त्यांणीं उद्योग केला नाहीं. तोडरमल्ल व मानसिंग यांणीं त्यांचा देशामध्यें निरनिराळ्या ठिकाणीं ठाणीं देऊन किल्ले बांधिले, आणि सपाट देशामध्यें त्यांची शेतकी बंद केली. या योगानें ते लोक अगदीं ठराव न करितां



...मध्यें समजूत तरी झाली होती; तेणेंकरून दक्षिणे...
डील व पश्चिमेकडील पर्वतांमध्यें जल्लालाचा हाताखालीं...
द्यापि रोशनयेलोक उभे होते, त्यांजबरोबर युद्ध करण्या...
मानसिंग यास फुरसूद झाली.

मग त्याणें त्याच उन्हाळ्यांत त्यांवर स्वारी केल...
तींत त्यास पुष्कळ जोखम पोंचलें, परंतु शेव...
इ० स० १५८६, हि० स० ९९५. थोडासा जय मिळाला. तथापि रोशनयेलो...
आपलें सावरून राहिले, आणि त्यांवर दुसऱ्...
वर्षापर्यंत सरकारचा पगडा पुनः बसला नाहीं...
मग मानसिंगानें काबूलाहून फौज घेऊन हल्ला केल...
आणि अकबरानें खाऱ्या पर्वताचा दक्षिणे...
इ० स० १५८७, हि० स० ९९५. सिंधुनद उतरून त्यांचा पाठीमागून येऊ...
त्यांवर पडावें अशी दुसरी फौज पाठविली...
त्या वेळीं जल्लाल याचा अगदीं मोड झाला...
तथापि त्याणें लवकरच लढाई पुनः सुरूकरून पुष्कळ वर्षे चा...
इ० स० १५८७ पासून इ० स० १६०० पर्यंत. लविली, आणि त्या वेळीं बादशाही लोकांचे व...
युसफझैलोकांचे मधून तंटे होत, तेणेंकरून...
त्यास फार अनुकूलता झाली; तथापि त्या लढा-...
यांपासून निरंतर राहण्यासारखा असा कांहीं...
परिणाम झाला नाहीं; परंतु वरील मुद्दतींत लागवड होण्या-...
जोगे सपाट प्रदेश व खिंडींतील मुलुक, यांमध्यें मोगललो-...
कांनीं शेतकी बंद करून टाकिली, तेणेंकरून पुष्कळ वेळा...
अन्नसामग्री नाहींशी होऊन जल्लाल यास आपला मज-...
बूद मुलुक सोडून जेथें आपणास विशेष फायदा व्हावयाचा...

पहाडांत व एका वेळीं उझबेगलोकांचा अब्दुल्लानामक खान याचा दरबारांत पळून जावें लागलें; तथापि तो हमेशा परत येऊन पुनः हल्ले करित असे. शेवटीं त्याणें इ० स० १६०० मध्यें बरीच बळकटी करून गजनी हें शहर हस्तगत करून घेतलें. जल्लालाचा हा शेवटचा पराक्रम; पुढें त्यास लौकरच मोगलांनीं शहरांतून हांकून काढिलें; तें शहर पुनः मिळविण्याचा त्याणें यत्न केला, त्यांत त्याचा पराजय होऊन त्यास वार झाले; आणि तो पळून परत जात असतां त्याचा पाठलाग करून तो निर्भय स्थानीं पोंचण्याचा पूर्वीं शत्रूंनीं त्यास गांठून मारून टाकिलें.

पुढें जहान्गीर व शाहजहान या दोन पादशाहांचा कारकीर्दींत हें धर्मयुद्ध जल्लाल याचा गादीचा अधिकाऱ्यांनीं चालविलें होतें; शेवटीं रोशनयेलोकांचा उत्साह नाहींसा झाला. तथापि अफगाणांचा स्वतंत्रतेविषयींचा होष जसा पूर्वीं होता, तसाच राहिला. कारण स्वतंत्रतेची इच्छा ही अफगाणांस साहजिकच होती, तिला रोशनये यांचा मतापासून मुळींच विशेष सहाय झालें नव्हतें. पुढें औरंगझेब बादशाहाचा कारकीर्दींत ईशान्येकडील अफगाणांपासून जितकी भीति उत्पन्न झाली, तितकी पूर्वींकधींच पडली नव्हती; तसेंच युसफझैलोकांवर प्रथम मोगल बादशाहांकडून, आणि पुढें इराण व काबूल एथील पादशाहांकडून पुष्कळ हल्ले आले ते सर्व त्यांणीं परतविले; आणि अद्यापिहि त्या भांडखोर लोकांनीं आपली स्वतंत्रता तीळभर कमी होऊं



अखेरीचा सुमारास जवळचा देशांत फौज पाठवून ते घेण्या-स अकबरास फुरसूद सांपडली; आणि जल्लाल मरण्यापूर्वी सिंध व कंदाहार, हे दोन मोठे प्रांत याणें घेतले.

सिंधदेश घेतला.

तो प्रकारः— सिंधदेशामध्यें अर्घून वंशाचा राजा-मागून दुसऱ्या आगंतुक वंशाचे सरदार राज्य करित होते. त्यांमध्यें पुढें आपसांत कांहीं तंटे लागले. ती संधि पाहून अकबरानें दिल्लीचा बादशाहाचा मुलुकांपैकीं तो जुना प्रांत परत घेण्याचा प्रयत्न केला. त्या वेळीं अकबर हा स्वतः लाहोरास होता; तेथून याणें उत्तरेकडून सिंधमुलुकांत शिरून सेवणचा किल्ल्यास वेढा देण्याकरितां फौज पाठविली. 'लाड' ऊर्फ खालचा सिंधदेश याचें सेवण हें द्वार असून, सर्व देशाचा बचाव होण्यासहि मोठी नाक्याची जागा असे. त्या वेळीं तो सिंधचा अधिकारी आपली

इ० स० १५९१, हि० स० ९९९.

---

(२) अबुल फजल् याणें या लढायांचा इतिहास लिहिला आहे, त्यांत "या वेळीं बंडवाल्यांस केरासारखे झाडून टाकिले, व ते इराण व तुराण (तातार) या देशांत पळून गेले, आणि बिजावर, स्वाद, व तीरा या अनुपम सुपीक व हवाशीर देशांतून निःपात करून टाकिला असें वर्णन केलें आहे. असें असून पुढें १५ वर्षेपर्यंत यांबराबर झालेल्या लढायांचीं वर्तमानें लिहून, अकबर १४ वर्षे पंजाबांत राहिला होता, तो रोशनयेलो-कांचें बंड मोडण्याकरितां व ईशान्येकडील अफगाणांचा बंदोबस्त करण्या-करितां राहिला होता, असें हाच ग्रंथकार लिहितो. याप्रमाणें या ग्रंथ-काराचा लिहिण्यांत मेळ नसून जेथें पाहिजे तेथें हा स्तुति करितो. हा दोष यामध्यें आहे. (हें मूळग्रंथांतील टीपेचा मजकूर धरून लिहिलें आ-हे. (भा० क०).

रदारांस अडचणी पडून, त्यांचानें त्याजवर हल्ला करवेना आणि तो इतका जवळ असल्यामुळें वेढ्याचेंहि काम चालवेना. अशा अडचणींमध्यें बादशाहानें हुशारी करून उमरकोटाचा वाटेनें दुसरें लश्कर पाठविलें. तेणेंकरून त्या सरदाराची तारंबळ झाली, आणि तो जें ठाणें धरून राहिला होता त्यामुळें जो त्या सरदारास फायदा होत होता तो नाहींसा झाला, आणि थोडक्याच दिवसांनीं त्यास सर्व मुलुक बादशाहाचा हवालीं करावा लागला. त्याची बादशाहानें चांगली तजवीज केली, आणि, आपल्या उदार रीतीप्रमाणें, त्यास आपल्या राज्यांतील उमरावलोकांत मोठी पदवी दिली. इ० स० १५९२ हि० स० १०००.

वरील लढाईत सिंधदेशचा राजाजवळ पोर्तुगीस लश्कर होतें, आणि शिवाय युरोपीयन लोकांप्रमाणें पोषाग केलेले २०० एतद्देशीय लोक होते, असें **अकबरनाम्यांत** लिहिलेलें आहे. यावरून हिंदुस्थानामध्यें हल्लींचा रीतीचे असे हे पहिले "शिपाई" असें म्हटलें पाहिजे.

त्याच अधिकाऱ्याजवळ एका किल्ल्यावर **आरबी** फौज होती, असें वर्णन आहे. या **आरबी** लोकांस पुढें पुष्कळ राजे फार चाहून आपल्या लश्करांत ठेवूं लागले, परंतु हे प्रथमचेंच; या पूर्वीं कोठें अशी **आरबी** फौज ठेवलेली माझा पाहण्यांत आली नाहीं.

हुमायूनानें विश्वासघातानें कंदाहार बळकावल्यावर, इराणचा शाहानें तें परत घेण्याविषयीं पुष्कळ यत्न केले; परंतु प्रथम त्याचें कांहीं चाललें कंदाहार परत घेतलें.



हि तसेच बखेडे उत्पन्न झाल्यामुळें अकबराचेंहि त्याप्रमाणें फावलें. कंदाहार एथील इराणी सरदारांचीं आपसांत भांडणें लागलीं; त्यांतून एक हिंदुस्थानांत पळून आला, आणि शेवटीं सर्व लोकांची दृष्टि इकडे लागली; त्यामुळें अखेरीस अगदीं बार मारल्याशिवाय कंदाहारचें शहर व प्रांत हीं दोन्ही मोगलांस मिळालीं.

इ० स० १५९४, हि० स० १००३.

अकबराचा या कृतीनें इराणचा बादशाहाशीं याचें कांहीं वितुष्ट पडलें नाहीं. पूर्वीं पुष्कळ दिवस इराणचा व दिल्लीचा दरबारांमध्यें दोस्तीचा व्यवहार बंद पडला होता; परंतु शाह अब्बास यास त्या वेळीं इराणांतच काम पुष्कळ होतें, आणि उझबेगलोकांनीं युद्ध करण्यास त्यास अकबराचा सहायाचें अगत्य होतें; त्यामुळें त्याणें दोन्ही दरबारांमध्यें पुनः स्नेहभाव आरंभिला, आणि आपल्या हातांतून गेलेलें कंदाहार पुनः घेण्याची संधि केव्हां येईल ती तो स्वस्थपणीं वाट पाहत राहिला; परंतु ती अकबर मरे तोंपर्यंत आली नाहीं.

मागें सांगितल्याप्रमाणें काबूलाचा ईशान्येकडील अफगाणलोकांबरोबर जी अकबराची लढाई चालली होती, ती सांप्रत पहाडी मुलुकांत मात्र होती; यास्तव कंदाहार प्रांत मिळाल्यामुळें याचें सिंधुनदापलीकडील वंशपरंपरेचें सर्व राज्य याचा स्वाधीन झालें. इकडे इ० स० १५९२ मध्यें

उत्तरहिंदुस्थानाचा पुरा बंदोबस्त केला.

…ड शाह, त्याची नरडी पिळून टाकलेली होती; आंब-क्यामांत ताब्यांत आल्यामुळें सर्व बंगालदेश सर झाला होता. इ० स० १५९३ त मुझफ्फर शाह मेल्यामुळें गुजराथेंतील सर्व बखेडे संपले होते; उदेपुरचा राणा मात्र स्वतंत्र राहिला होता, परंतु बाकी राजपूत रजवाडे जे पूर्वीं द्वेषधारी मांडलिक असत, ते अकबराचे मीतींतील व उपयोगी आश्रित होऊन गेले होते याप्रमाणें त्या सुमारास सर्व उत्तरहिंदुस्थान याचा ताब्यांत आल्यामुळें नर्मदेपर्यंत उत्तरेकडील जेवढा देश याचा सत्तेखालीं आला होता, तेवढा कोणत्याहि पूर्वीचा राजास प्राप्त झाला नव्हता.

यानंतर अकबरानें दक्षिणेमध्यें राज्य वाढविण्याचें मनांत आणिलें. पूर्वीं इ० स० १५८६ चा सालीं अहमदनगरचा चौथा राजा मूर्तेझा निजाम शाह राज्य करित होता. त्यास वेड लागलें याकरितां राज्याचा कारभार करण्याचा आपणास हक असावा ह्मणून त्याचा भाऊ बुऱ्हाण भांडूं लागला. त्याचा पक्ष अकबरानें स्वीकारून त्याचा मदतीस माळव्यांतून एक लश्कर पाठविलें; ती स्वारी फसली, नंतर बुऱ्हाण हा कांहीं वर्षें अकबराचा आश्रयास राहिला होता. मागून त्याचा भाऊ मेल्यानंतर, इ० स० १५९२ त अकबराचा मदतीशिवाय बुऱ्हाण यास त्याचें वडिलार्जित राज्य मिळालें; परंतु त्यांत आपसांत कलह चालले होते, आणि त्याचे शेजारी विजापुरकर राजे यांशीं लढाई चालली होती. पुढें थोडे दिवस राज्य करून बुऱ्हाण मरण पावला, तेव्हां हे सर्व बखेडे अधिकच वाढले, आणि इ० स० १५९५ त अहमदनगर एथें

दक्षिणेंत स्वारी.



गितली; तेव्हां त्याचा बोलावण्यावरून शाहजादा मुराद गु
जराथेंतून फौज घेऊन दक्षिणेंत आला; आणि खानिखाना
न मिर्झा खान माळव्यांतून लश्कर घेऊन आला. दोघांचे
फौजांचा मिलाफ अहमदनगरापासून थोड्या अंतरावर
झाला. इतक्यांत जा सरदारानें मोगलांस बलाविलें
होतें. त्यासच राजधानींतून जावें लागलें; आणि
तेथें बहादुर निजाम शाह नामें मुलगा गादीवर बसून,
त्याची आत चांद बीबी इची सत्ता चालू
झाली; ती आपल्या लहान भाचाचा तर्फे-
नें कारभार करित असे. हिंदुस्थानाम-
ध्यें जा मोठ्या मरुयात स्त्रिया होऊन गेल्या,
त्यांमध्यें ही एक नामांकित होती. मोगल-
लोक येतात असें तिला समजतांच तिणें आपला सगा वि-
जापुरचा राजा याची समजूत पाडिली, आणि
दुसऱ्या पक्षाचा लोकांचेंहि एकदिल केलें.
मोगललोकांची सत्ता वाढल्यापासून सर्वांस एकसारखेंच
भय आहे, याकरितां या वेळीं तरी सर्वांहीं मिळून त्यांशीं
लढावें असें तिणें समजाविलें. तिचें बोलणें इतकें त्वरित
पटलें, कीं नेहंगनामक एक हबशी सरदार
( जो वरील चार फळ्यापैकीं एकीचा मुख्य
होता तो ) लागलाच तिला मिळण्याकरितां
निघाला; आणि अहमदनगरास मोगललोक
वेढा देत आहेत, तों त्यांतून रस्ता काढून आंत शिरला;

इ०स० १५९५ नोवेंबरचा सुमारास हि०स० १००४, रबीउलूअखेरचा अखेरीचा सुमारें.

चांद बीबी.

तिणें अहमदनगराचें संरक्षण केलें, तो प्रकार.



येत होतें, त्यास आऊन मिळाले. या तयारीमुळें शाहजादा मुराद हा तें शहर घेण्याविषयीं अधिक उत्सुक झाला; त्याणें मोठ्या झपाट्यानें वेढ्याचें काम चालविलें, आणि तटाखालीं दोन सुरुंग पाडले; परंतु चांद बीबीनें, कामगारांची स्वतः देखरेख करून, आणि बाकीचांप्रमाणें आपणहि संकटें भोगून, उलट दुसरे दोन सुरुंग लावले. तेणेंकरून यांचे सुरुंग फुकट गेले. नंतर मोगलांनीं तिसरा सुरुंग पाडिला, आणि तो लटका पाडण्याची शत्रु तजवीज करीत तों पूर्वींच उडविला; तेव्हां आंतून उलट सुरुंग पाडित होते, ते त्या भडाक्यानें उडून मरून गेले; तटास मोठें खिंडार पडलें, आणि त्याचा रक्षणार्थ जे लोक होते त्यांस अकस्मात् दहशत पडून तेहि, आपलें ठाणें सोडून जाऊन, जे शत्रूंचे लोक हल्ला करण्याकरितां येत होते, त्यांचा रस्ता खुला करून ठेवण्याचा बेतांत होते, इतक्यांत चांद बीबी, भरचिलखत अंगांत चढवून, तोंडावर पदर, व हातांत नागवी तलवार घेऊन, धांवत आली; आणि त्या लोकांस थांबवून, आणि मोगलांचा पहिला हल्ला हटवून, जो जो इलाज त्या ठिकाणीं होण्याजोगा होता तो तो करून, त्यांजबरोबर लढत राहिली; तटाखालचा खंदकांत जी लोकांची गर्दी झाली होती, तिजवर तिणें बाण, दारू, व दुसरे ज्वालाग्राही पदार्थ यांचा पूर सोडिला; तोफा लागू केल्या; आणि गोळ्या व तीर यांचा पाऊस पाडिला; इकडे समोरचा दरवाजावरील किल्लेकऱ्यांनीं मोठ्या निग्रहानें टक्कर मारिली; याप्रमाणें सायंकाळपर्यंत





पाहून सर्व किल्लेकरी व गांवचे लोक, यांस रणोत्सव चढ-
ला; आणि तिणें रात्रभर आपला उद्योग व हिम्मत हीं क-
मी केलीं नाहींत, त्यामुळें दुसरा दिवस उजाडला तों तें खिं-
डारें बुजवून नवे सुरुंग पाडल्याशिवाय त्यांतून वर लश्कर
जाऊं शकणार नाहीं, इतका तिणें उंच तट तयार केला, असें
**मोगलांचा** दृष्टीस पडलें. इतक्यांत तिचे सहाकारी राजे ज-
मून जवळ येत चालले होते, आणि जरी त्यांपेक्षां **मोगलां-**
ची लढाईची तयारी जास्त होती, तथापि एका लढाईचा प-
रिणामावर भरवसा ठेऊन, आपले सर्व अर्थ जोखमांत घा-
लावे अशी त्यांची इच्छा नव्हती. इकडे आपण जो कर
केला आहे त्याचें आयुष्य थोडें आहे, अशी
**चांद बीबीची** खातरी होती; त्यामुळें **अहमद-**
नगरचा राजानें नुकताच **वऱ्हाडप्रांत** घेतला
होता, तो तिणें **बादशाहाचा** हवालीं केला; आणि
दोघांचा तह होऊन उभय पक्षांचे लोक खुशी
झाले.[३]

तह झाला. हि॰ स॰ १००४, रजब. इ॰ स॰ १५९६, फेब्रुआरीचा सुमारें.

(३) दक्षिणेमध्यें **चांद बीबी** मोठी लोकप्रिय पराक्रमी स्त्री हो-
ऊन गेली; तिजविषयीं अद्यापि पुष्कळ दंतकथा प्रसिध्द आहेत. तिणें
मोगललोकांवर रुप्याचे गोळे मारिले, असें **खाफी खान** याणेंहि वर्णन
केलें आहे. याविषयीं लोकांमध्यें अशी प्रसिध्द कथा आहे, कीं जेव्हां
तिचे गोळे संपले, तेव्हां प्रथम तिणें तांब्याचें नाणें, मग रुप्याचें, मग सो-
न्याचें, असें अनुक्रमानें तोफांत घालून मारिलें. आणि शेवटीं; जेव्हां रत्नांचे
गोळे मारावयास आरंभ करावा लागला, तेव्हां ती तह करण्यास कबूल
झाली.

चांद बीबीनें महम्मद खान नामें सरदारास आपला पेशवा⁴ ह्मणजे मुख्य प्रधान नेमला होता. त्याणें तिजवर फितूर करून शेवटीं शाहजादा मुराद याजवळ मदत मागितली. त्या वेळीं मुराद याचें वऱ्हाडप्रांताचा सरहद्दीविषयीं दक्षिणचा राजांबरोबर भांडण चाललें होतें; पुढें उभय पक्षींचे लोक लढाईस तयार झाले, आणि पूर्वींचा तह होऊन एक वर्ष झालें नाहीं तों पुनः जाजती लश्कर मिळवून त्यांणीं प्रसंग केला.

पुनः लढाई सुरू होऊन सर्व दक्षिणेंत पसरली.

या वेळीं खानदेशचा राजा आपणास अकबराची रयत असें ह्मणवित असे; तो मोगलांचा पक्षास येऊन मिळाला, आणि गोंवळकोंड्याचा राजा विजापुर व अहमदनगर एथील राजांस आपल्या लश्करानिशीं येऊन सामिल झाला. त्यांची लढाई गोदावरीचा कांठीं झाली; ती दोन दिवसपर्यंत मोठ्या झपाट्यानें चालली होती; परंतु तींत कांहीं शेवट झाला नाहीं. आपला जय झाला असें मोगललोक ह्मणूं लागले; परंतु त्यांणीं पुढें पाय टाकला नाहीं. याप्रमाणें त्यांचा मोड झाला असें पाहून, आणि शाहजादा मुराद व खानि खानान यांचें वांकडें पडल्यामुळें दोघांसहि अकबरानें परत बोलाविलें. वरील इतिहास लिहिणारा

इ. स० १५९६ चा डिसेंबरांत, अथवा १५९७ चा जान्युआरींत.

(४) पेशवा ह्मणजे अग्रगण्य अथवा नायक (नाईक); हा किताब ब्राह्मणी राजांचा वेळीं प्रथम चालू झाला. पुढें सातारचा राजाचे ब्राह्मण प्रधान, जांणीं पुष्कळ वर्षेंपर्यंत मराठी राज्य चालविलें, त्यांस पेशवे ह्मणत; त्यावरून या किताबाची विशेष प्रख्याति झाली आहे.



यास दूर करून जरूर लागल्यास लष्कराचें आधिपत्य घ्यावें ह्मणून दक्षिणेंत पाठविलें. नंतर त्याणें लिहून पाठविल्यावरून, आपणास स्वतः दक्षिणेंत गेलें पाहिजे अशी अकबराची खातरी झाली, ह्मणून सिंधुनदाजवळील देशांत चौदा

अकबर स्वतः दक्षिणेंत आला.

वर्षें राहिल्यानंतर इ० स० १५९८ चा अखेरीचा सुमारास हा पंजाब सोडून निघाला, आणि इ० स० १५९९ चा मध्याचा अगोदर नर्मदेवर येऊन ठेपला. हा येण्यापूर्वींच दौलताबादेचा मजबूद किल्ला मोगलांनीं घेतला होता; तसेंच दुसरेहि पुष्कळ पहाडी किल्ले सुमारें त्याच वेळीं त्यांचा हातांत गेले होते. पुढें तापीचा कांठीं बऱ्हाणपुर (बुऱ्हाणपुर) एथें बादशाही फौज येऊन पोंचली, तेव्हां अकबरानें आपला मुलगा दानियल् व खानिखानान यांस अहमदनगरास वेढा देण्याकरितां पाठवून दिलें; त्या वेळीं, चांद बीबीचा राज्यांत पूर्वीं कधीं झाला नव्हता इतका बखेडा होऊन गेला होता. पूर्वीं मोगललोकांनीं वेढा दिला, त्याचा आरंभीं नेहंगनामक जो हबशी सरदार तिला येऊन मिळाला होता त्याणें सांप्रत अहमदनगरास वेढा दिला होता. पुढें जसें मोगलांचें लष्कर जवळ आलें, तसा तो निघून गेला; तथापि, आपसांत तंटे लागलेले होते यामुळें आपल्याचानें राज्याचें संरक्षण होणार नाहीं अशी निराश होऊन, चांद बीबीनें मोगलांशीं तहाचें बोलणें लाविलें होतें; इतक्यांत तिचा प्रतिस्पर्ध्यांनीं चेतविल्यावरून लष्करी लोकांनीं तिचा महालांत शिरून तिला

तट फोडून द्वार केलें; त्यांतून गर्दी करून शहर घेतलें; आणि जितके लढाऊ लोक होते त्यांतून एकाचाहि प्राण ठेविला नाहीं; तेथील लहान राजा मोगलांचा हातांत सांपडला त्यास त्यांणीं कैद करून ग्वालेरचा किल्ल्यावर अटकेस टाकिलें. याप्रमाणें जरी राजधानी हातांत आली, तथापि तें राज्य प्राप्त झालें नाहीं. पुढें दुसरा एक नामधारी राजा गादीवर बसला; शेवटीं इ० स० १६३७ मध्यें शाहजहान पादशाहाचा कारकीर्दींत या वंशाची समाप्ति झाली. अहमदनगर घेतलें, इ० स० १६०० जुलैचा सुमारास; हि० स० १००९ सफर.

अहमदनगरास वेढा देण्याचा पूर्वीं अकबर व त्याचा मांडलिक खानदेशचा माजी राजा यांचा बेबनाव झाला; त्यामुळें अकबरानें त्याचा मुलुक मात्र खास अम्मलांत आणिला. तो देश घेण्यास अकबरास एक वर्ष लढावें लागलें, आणि अहमदनगर हातीं आल्यानंतर कांहीं महिन्यांनीं अशीरगडचा किल्ला हातीं घेऊन खानदेश पुरा ताब्यांत आला. मग खानदेश व वऱ्हाड या दोन्ही प्रांतांतील सुभ्यांचें काम शाहजादा दानियल् यास सांगून, त्यास खानि खानान हा प्रधान करून देऊन, आणि दक्षिणेंतील फौजेचें आधिपत्य, व अहमदनगरची लढाई, हीं अबुल् फझल् याजवर सोंपून आपण आग्र्यास गेला. अकबर जाण्याचा पूर्वीं विजापुर व गोंवळकोंडें एथील बादशाहांकडून याकडेस नजराणे घेऊन वकील आले होते; त्यांचा याणें स्वीकार करून आपला खानदेश घेतला. अकबर उत्तरहिंदुस्थानांत परत गेला; इ० स० १६०१ चा अवेलीस, व हि० स० १००९ चा अखेरीस.



मुलगा दानियल् याचें विजापुरकरांचा मुलीशीं लग्न लाविलें.

त्याचा मुलगा सिलीम याणें दांडगाई केली.

आपला वडील मुलगा सिलीम याणें दांडगाई केली, हें वर्तमान अकबरास लागल्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें यास परत जावें लागलें.[५] त्या वेळीं सिलीमाची उमर ३० वर्षांची झाली होती. त्याची हुशारी कमी होती असें नाहीं, परंतु त्यास मद्य व अफीण[६] यांचें अतिशय व्यसन लागून त्याची तब्यत संतप्त होऊन, त्याची अक्कलहि कांहींशी कमी झाली होती. अबुल् फझल् यास तो आपल्या हाडवैऱ्याप्रमाणें मानित असे; आणि त्याचाच गाऱ्हाण्यांमुळें व द्वेषामुळें त्याचा समजुतीसाठीं अकबरानें अबुल् फझल् याचा कांहीं दिवस

---

(५) हा पुढें जहान्गिर या नावानें बादशाह झाला.

(६) सिलीम याणें स्वतांविषयीं अशी हकीकत लिहिली आहे, कीं मी तारुण्यांत असतां, अर्ध्या शेराचा एक प्याला, असे निदान वीस प्याले मद्य दररोज पीत असें; आणि जर हा शराब (ऊर्फ शरबत) मिळाल्याशिवाय एक तास गेला, तर माझे हात कांपूं लागत, आणि माझानें स्वस्थपणीं बसवत नसे; पुढें मी सिंहासनावर बसल्यानंतर फकत पांच प्याले पीत असें आणि तेहि रात्र पडल्यानंतर घेत असें. याप्रमाणें किती दिवसपर्यंत हा बेतावर राहिला होता तें समजत नाहीं. मुसलमानी राजे व बडे लोक; यांमध्यें त्या वेळीं मद्यपानाचें व्यसन विशेष असे, असें दिसतें. बाबर व हुमायून हे दोघेहि फार पीत असत, आणि तुर्की वंशांतील सर्व राजांचा तसाच कल होता, असें दिसतें. इराणदेशांतील सुफी वंशाचे शाह, जांस त्यांचा कुटुंबाचा धार्मिकपणामुळें नुकतेंच मोठें पद प्राप्त झालें होतें, ते एकान्तीं तर अतिशय मद्यपान करितच असत; आणि शिवाय त्यांचे मद्यापानाचे प्याले व चंबू हे त्यांणीं सोन्याचे व जवाहिराचे करविले होते. त्यांचीच त्यांचा दरबाराचा शोभेमध्यें बहुतेक शोभा असे.

पाणउतारा करून, पुढें त्यास दक्षिणेंत घालवून दिलें होतें. पुढें जेव्हां आपण दक्षिणेंत निघून आला तेव्हां आपल्या मागें सिलीमानें राज्य करावें, असें अकबरानें ठरविलें; त्यास अजमीर एथील सरसुभेदार नेमून, उदेपुरचा राण्याबरोबर जी लढाई चालली होती तिचें काम त्यावर सोपलें; आणि त्यास लढाईमध्यें मदत करण्यास व इतर मसलती सांगण्यास राजा मानसिंग यास पाठविलें. असें झाल्यावर प्रथम पुष्कळ वेळ गमावून नंतर तो आपल्या कामावर गेला, आणि तें त्याणें बरेंच तडीस नेलें होतें; इतक्यांत उसमाननामक सरदारानें बंगाल्यांत बंड केलें असें त्यास वर्तमान लागलें. त्या वेळीं मानसिंग हा बंगालचा सुभेदार होता, त्यास ती बातमी लागतांच तो आपल्या कामावर लागलाच निघून गेला; तेव्हां सिलीम याजवरील दाब नाहींसा होऊन, तो मोकळा झाला, आणि पादशाहाची सर्व फौज दुसऱ्या ठिकाणीं गुंतली आहे असें पाहून उत्तरहिंदुस्थानांतील सर्व प्रांत आपण स्वतः बळकवावे असा त्यास लोभ उत्पन्न झाला. नंतर तो आग्रा एथें कूच करून गेला; परंतु तें शहर आपल्या हवालीं करण्याविषयीं त्याणें मागणें केलें असतां तेथील सुभेदारानें कांहीं खुसपट काढून त्याचा हातीं वाटाण्यांचा अक्षता दिल्या; त्यामुळें तो पुढें अलाहबादेस गेला, आणि आसमंतात् भागचे अयोध्या व बहार हे प्रांत हस्तगत करून घेता झाला. शिवाय त्याणें अलाहबाद एथील ३०,००,०००, रुपयांचा खजीना बळकावला, आणि पादशाह असा किताब धारण केला.

इ० स० १६००, नोवेंबरचा सुमारास; हि० स० १००९, शाबान.

या वर्तणूकेनें अकबरास कितीहि दुःख झालें असेल

तें असो; तथापि आपल्या मुलानें निकरास जाऊं नये. अशा रीतीनें वर्तणूक करण्याचा याणें निश्चय केला, आणि या उद्देशानें अकबरानें त्यास एक सामोपचाराचें पत्र लिहिलें; त्यांत अशा वर्तणुकेचा परिणाम काय होईल, याविषयीं त्यास सावध केलें; आणि जर तूं आपल्या रीतीचा मार्गावर येशील तर माझी तुजवरील ममता कमी होणार नाहीं, अशी मी तुझी खातरी करितों असें लिहिलें. या उपदेशामागून लागलाच स्वतः अकबर आग्र्यास आला, तेव्हां सिलीम याणें मोठ्या नम्र वचनांनीं त्यास उत्तर पाठविलें, आणि बाहेरून पित्यास भेटण्याची इच्छा आहे असें दाखवून इतावा शहरापर्यंत प्रत्यक्ष कूचहि करून गेला. हा वास्तविक लढाईचा उद्देशानें गेला, अथवा आपल्या रक्षणाविषयीं त्यास धास्ती होती ह्मणून गेला, हें समजत नाहीं; परंतु त्याणें आपली पराकाष्ठा करून लश्कर मिळविलें, तेव्हां त्याचा एवढा जमाव झाला, कीं पुढें येणें असल्यास थोड्या लोकांनिशीं यावें, अथवा अलाहबादेस परत निघून जावें असा त्यास अकबरानें निरोप पाठविला. त्यांतून सिलीम याणें दुसरा मार्ग पतकारिला. तो परत गेला, तो कांहीं पितापुत्रांचा ठराव होऊन गेला असावा असें संभवतें; कारण त्याचें अलाहबादेस जाणें झाल्यानंतर, बंगाला व औंवळ्यामांत हे अकबरानें सिलीम याचा नेमणूकीस दिले, आणि मी विश्वासानें आणि पुत्रधर्मानें वागेन असें त्याणें पुनः बाहेरून कबूल केलें; परंतु हें केवळ त्याचें बकध्यान होतें; कारण त्या वेळीं अबुल् फझल् यास दक्षिणेंतून अकबरानें परत बोलाविल्यावरून तो थोड्या लोकांनिशीं ग्वालेरीकडे येत होता; तेव्हां त्याणें आपली जी

नुकसानी केली असें सिलीम याचा मनांत वागत होतें, तिजबदल सूड घेण्याची ही संधि आलीशी पाहून, ती त्याणें जाऊं न देतां, बुंदेलखंडांतील ओर्का संस्थानाचा राजा नरसिंग देव याशीं मसलत केली, आणि त्या नरसिंग देवानें संकेतानें त्यास एका आड वाटेनें घेऊन गांठलें. त्या प्रसंगीं अबुल् फझल् मोठ्या शौर्यानें लढला तथापि तो व त्याचे बहुतेक लोक मारले गेले, आणि नरसिंग देवानें अबुल् फझल् याचें डोकें शाहजादा सिलीम याजकडे पाठवून दिलें.[७] या दुष्ट कृत्यानें सिलीम याणें आपला काल्पनिक सूड उगविला; परंतु आपल्या बापाचा काळिजांत अति तीक्ष्ण बाणच मारिला. वरील दुःखकारक वर्तमान ऐकून अकबर अतिशय विव्हल झाला, आणि भारी रडून दोन अहोरात्रींत याणें कांहीं खाल्लें नाहीं, व हा निजलाहि नाहीं. नरसिंग देव याचा कुटुंबाचीं माणसें पकडण्यास आणि त्याचा मुलुक लुटून फस्त करण्यास अकबरानें लागलीच फौज पाठविली.

अबुल् फझल् याचा खून. इ० स० १६०२, हि० स० १०११.

(७) सिलीम हा पुढें बादशाह झाल्यावर त्याणें आपली हकीकत लिहिली आहे, तींत हा खून आपण करविला असें तोच कबूल करितो; परंतु कुराण सोडून देण्यास; व महम्मदास ईश्वरानें पैगंबरी दिली नाहीं असें मानण्यास अकबरास अबुल् फझल् याणें बुद्धि दिली, ह्मणून मी त्यास मारविलें असा तो आपणास निर्दोषी ठरवितो. त्याच कारणास्तव आपल्या बापाचा विरुद्ध मी बंड केलें असें तो प्रतिपादन करितो. नरसिंग देव हा अकबराचा सर्व देशांतून निभावला होता; त्या खुनी मनुष्यास सिलीमानें गादीवर आल्यावर मोठा अधिकार देऊन त्याची बढती केली, हा एक प्रथम पराक्रम केला. पुढें तो हमेशा त्यावर कृपा करी व भरवसा ठेवित असे.

असें यास माहित नव्हतें, असें दिसतें, कारण वरील गोष्ट होऊन गेल्यानंतर सिलीम याबराबरील व्यवहार बंद करावयाचा तो एकीकडे ठेवून, त्याची आई मेल्यानंतर जा सिलीमानामक पादशाहाचा राणीनें त्यास मांडीवर घेतलें होतें, तिला माध्यस्थ घालून त्याची समजाविशी करून त्याचें व आपलें अगदीं सख्य पाडून घेण्याचा यत्न केला.

सिलीम व अकबर यांची एकी झाली.

या प्रकारानें इच्छिलेलें कार्य झालें, आणि सिलीम लवकरच दरबारांत जाऊन बाहशाहास शरण आला. अकबरानें नेहेमींप्रमाणें ममतेनें त्याचा सत्कार केला, आणि पादशाही राजचिन्हें धारण करण्यास त्यास अधिकार दिला. नंतर लवकरच पुन: लश्कर घेऊन उदेपुरचा राण्यावर जाण्याची त्याची नेमणूक केली, परंतु पुष्कळ निमित्तें करून त्याणें आपलें कूच करणें लांबणीवर टाकिलें, आणि अशा रीतीचा लढाईत पडण्याविषयीं आपली नाखुशी दर्शविली; तेव्हां कितीहि नुकसान झालें तथापि आपली व मुलाची फूट पडूं द्यावयाची नाहीं, या हेतूनें त्यास अलाहबादेस परत जाण्यास अकबरानें परवानगी दिली; तेथें तो बहुधा स्वतंत्रच असे.

इ० स० १६०३ हि० स०१०१२.

सिलीम याची आणखी वाईट वर्तणूक.

अलाहबादेस गेल्यावर तो अतिशय व्यसनासक्त झाला. त्याचा वडील मुलगा खुशूरू हा भारी हलकटपणा व दुर्व्रात्यपणा करी, तेणेंकरून सिलीम याची त्यावर इतराजी होण्यास कांहीं कारण होतें; परंतु सिलीम हा

मानसिंगाची बहीण इचा ) मनास इतकी लागली कीं तिणें विष खाऊन प्राण दिला; तेणेंकरून सिलीम याचा क्रोधाग्नि जो पूर्वींच तप्त झाला होता, त्यांत आणखी तेल पडलें. मग सिलीमाचा रागीटपणा इतका वाढला, कीं त्याचे चाकर लोक त्याजवळ येण्यास भिऊं लागले; आणि अकबराचा कारकीर्दींत पूर्वींचा बादशाहांचा वेळांतल्या सारखीं दुष्ट कर्मे होण्याचीं फार दिवस बंद झालीं होतीं, त्यामुळें यापुढें सिलीम हा जीं अति क्रूर कर्मे करूं लागला तीं ऐकून लोकांचा आकांत झाला, आणि अकबराचा दयालु स्वभावास तर त्यांणीं फारच वीट आणिला.[८]

पुढें आपल्या मुलाशीं कोणत्या रीतीनें वर्तावें त्याविषयीं बादशाहास मोठी विवंचना पडली; तेव्हां स्वतः आपल्या मुलास भेटून कांहीं वळेल तर पाहवें असा याणें निश्चय केला; आणि अलाहबाद एथें जाण्याकरितां निघाला. हा एकदोन मजला कूच करून गेला होता, इतक्यांत आपली आई अतिशय आजारी आहे असें यास वर्तमान लागलें; तेव्हां हा परतला; याची व याचा आईची जीवंतभेट मात्र झाली, व ती मरण पावली.

---

( ८ ) एके वेळीं सिलीम याणें एका गुन्हेगाराची जीवंतपणीं चामडीं सोलून काढण्याचा हुकूम दिला. तें वर्तमान अकबरास समजलें तेव्हां याला त्या गोष्टीचा जो वीट आला तो पोटांत माईना; ह्मणून हा ह्मणाला, कीं मेलेल्या जनावराचें चामडें सोलून काढलें असतां जास वाईट वाटतें अशा पुरुषाचा मुलगा मनुष्यांशीं इतक्या क्रौर्यानें वर्तून कसा दोषी होत असेल, त्याचा मला आचंबा वाटतो.



आग्रा एथें जाऊन खचितच बापास शरण जा-
वें असा त्याणें निश्चय केला. असें करण्यास
एक तर आपल्या पुत्रधर्मानें, अथवा स्वाभावि-
क भीतीनें हा उद्युक्त झाला असावा; अथवा आपण दर-
बारांत राहिलों असतां, त्यांत आपला विशेष फायदा होई-
ल, या बुद्धीनें कदाचित् तसें करण्यास तो प्रवृत्त झाला अ-
सावा.

सिलीम आग्र्यास गेला.

सिलीम आग्र्यास गेला, तेव्हां बादशाहानें त्याचा
ममतेनें सत्कार केला; परंतु थोडा वेळपर्यंत त्यास
कैदेंत ठेविलें. त्याला अटक केल्यामुळें त्याची
विशेष फजीती होऊं नये ह्मणून, अथवा तो मद्य-
पान विशेष करी तें बंद करावें ह्मणून, त्यास बाद-
शाहानें एका वैद्याचा स्वाधीन केलें. पुढें थो-
डक्याच दिवसांत त्यास मोकळा करून अकबरानें त्यावर
कृपा केली.

त्यास बादशाहानें प्रथम कैद ठेवून पुढें लागलाच मोकळा केला.

असें झालें तथापि त्याचा व्रात्य स्वभाव कमी
झालासा दिसत नाहीं, आणि तो आपला मुलगा
खुशूरू याशीं द्वेष करूं लागला; त्यामुळें एके वेळीं
अकबराचा देखत हत्तींची लढाई चालली असतां
त्या दोघांमध्यें बखेडा झाला; असें होतांच बाद-
शाहाची पुनः प्रसिद्धपणें मर्जी उतरून जाण्याचा प्रसंग आ-
ला होता. त्या तंट्यांत आपल्या बापाप्रमाणेंच खुशूरूनेंहि
मोठा नेट धरिला होता, आणि सिलीमावर अकबराचा
फार राग होई, असा जितका त्याचानें अकबरास चेतवला

तो आपला मुलगा खुशूरू याबरोबर भांडला.

हि पूर्वींच फार दिवसांपासून खुशूरूचा बेत होता, असें दिसतें; आणि त्याप्रमाणें आपणास राज्य न देतां खुशूरूस द्यावें असा अकबराचा भरपूर विचार होता, अशी सिलीमाची खातरी झाली होती, असें त्याणें आपली हकीकत लिहिली आहे तिजवरून दिसतें. परंतु अकबर व सिलीम या दोघांचीहि वास्तविक मर्जी सिलीम याचा अगदीं लहान मुलगा खुरम याजवर होती, त्यामुळें आपल्यापेक्षां त्याची हे फार आवड करितात असें मनांत आणूनच खुशूरू हा बहुधा नाखुश होऊन गेला होता.

अकबराचा तिसरा मुलगा दानियल् मरण पावला.

थोड्या वर्षांपूर्वीं अकबर याचा दुसरा मुलगा मुराद हा मरण पावला होता. त्याचा तिसरा मुलगा दानियल् याचेंहि अतिशय मद्यपानानें शरीर तुटून गेलें होतें, आणि मी दारू पिणार नाहीं अशी त्याणें आपल्या बापाजवळ शपथ वाहिली होती. पुढें अकबरानें त्यासभोंवते इतके आपले लोक ठेविले होते, कीं त्यास आपली मद्यपानाची इच्छा पुरवून घेण्यास संधि मिळेना; परंतु त्याची वासना अनिवार होऊन तो एका बंदुकेचा नळींतून गुप्तपणें दारू नेऊं लागला, आणि याप्रमाणें त्यास हवी तितकी दारू मिळूं लागल्यामुळें लवकरच त्याचा समाप्तीचा वेळ आला. दानियल् तिसावे वर्षीं मरण पावला. तें वर्तमान अकबरास समजतांच त्याची त्यावर फारच प्रीति असे त्यामुळें याचा स्वभावाप्रमाणें यास फार क्लेश झाले. याप्रमाणें यास स्वतांचा कुटुंबांत विपत्ति प्राप्त झाल्या, आणि याचे जिवलग मित्र





दिसतें; आणि इ० स० १६०५ चा सप्टेंबरमहि-

अकबर आजारी पडला.

न्याचा मध्याचा सुमारास याचा वाखा जास्त होऊन क्षुधा अगदीं नाहींशी झाली. पुढें हा आतां बरा होण्याची आशा राहिली नाहीं, असें थोडक्याच काळांत दिसून आलें. शेवटीं मरावयाचा पूर्वी दहा दिवस अकबरानें अगदीं आंथरूण धरिलें. अकबर अखेरपर्यंत शुद्धीवर होता, परंतु यापुढें त्यास कारभार करण्याचें सामर्थ्य राहिलें नव्हतें. पुढें याचा मागें कोण गादीवर बसतो,

अकबराचा मागें गादी चालण्याविषयींचा मसलती.

इकडे सर्वांचा दृष्टि लागल्या, आणि दरबारामध्यें फळ्या पडून त्यांचे आपसांत कलह माजले. आपल्या मागें सिलीमानें गादीवर बसावें, असें पूर्वींच अकबरानें ठरविलें होतें; तशांत बादशाहाचे दुसरे मुलगेहि मरून हा एकटाच राहिला होता; तथापि त्याणें बंड केल्यामुळें त्याचा मान कमी होऊन त्याची कांहींशी सांप्रत अप्रतिष्ठा झाली होती, आणि त्याचा हाताखालची फौज व दुसरे अधिकाराखालचे लोक या सर्वांपासून तो दूर झालेला होता. असें असतां तिकडे राजा मानसिंग हा खुशरूचा मामा, आणि अझीझनामक

सिलीम यास राजपद न प्राप्त होण्याविषयीं केलेला कट फुकट गेला.

खाने आझिम या किताबाचा अकबराचा मुख्य सरदार, याचा मुलीशीं खुशरूचें लग्न झालें होतें; या दोघां सरदारांनीं आपला अल्पवयी नातलग खुशरू याचा अधिकार वाढल्यानें आपली सत्ता जास्त होईल

ली. ( आग्रा एथें जो सरकारवाडा आहे तोच शहरचा बाले-किल्ला आहे. ) वरील झालेला प्रकार पाहून आपल्या देहावर कांहीं संकट पडेल अशी सिलीम यास वास्तविक भीति पडली; त्यामुळें तो आजारीपणाचें निमित्त करून राजमंदिरांत जाईनासा झाला. त्याचा मुलगा शाहजादा खुरम हा अगदीं लहान होता, तथापि त्याणें आपल्या बापाचें सांगणें ऐकिलें नाहीं, व आपल्यासहि जडजोखीम होईल यावर लक्ष दिलें नाहीं; त्याणें सांगितलें कीं आजोबा जीवंत आहेपर्यंत मी त्याचापासून कधीं हालणार नाहीं. सिलीम न आल्यामुळें अकबरास दुःख झालें, परंतु तो न येण्याचें कारण याचा मनांत आलें. त्याची भेट व्हावी अशी अकबरानें वारंवार आपली उत्कंठा प्रकट केली, आणि माझा मागें हाच राज्याचा वाजवी मालक आहे असें पुनः याणें स्पष्ट सांगितलें; आणि खुशरूस बंगालप्रांत देऊन त्याची सोय काढावी अशीहि याणें इच्छा दर्शविली. सिलीम याचा पक्षास कांहीं दरबारांतील मोठे प्रतिष्ठित मानकरी हेहि अद्यापि होते; त्यांणीं यत्न केल्यामुळें, आणि बादशाहानेंहि वर सांगितल्याप्रमाणें आपला अभिप्राय दर्शविल्यामुळें, सिलीमाचा विरुद्ध पक्षास जे कमी पायरीचे सरदार मिळाले होते, ते सर्व तो पक्ष सोडून याला मिळाले. नंतर जर आपण यापुढें आग्रह केला, तर आपणास कोणी मदत करणार नाहीं असें, अझीझ याचा लवकरच दृष्टीस पडून, त्याणें शहाणपण करून सिलीम याजबरोबर गुप्तपणें बोलणें लाविलें. मानसिंग याजवर अझीझाप्रमाणें



नहि आर्जवाचें बोलणें पडल्यावरून त्याणेंहि शेवटीं सिलीमास मदत करण्याचें कबूल केलें. नंतर सिलीम राजवाड्यांत गेला. त्या वेळीं अकबर मरणोन्मुख झाला होता, तथापि याणें त्याचा प्रीतीनें सत्कार केला. पुढें अकबराचा काळ झाला त्या वेळची हकीकत सिलीम याणें मात्र लिहिलेली आहे. तो प्रकार सिलीम वर्णन करितो, कीं जा खोलींत अकबर निजलेला होता, तेथें सर्व उमरावलोकांस बलावून आणण्याची त्याणें मला आज्ञा केली; त्या वेळीं अकबर ह्मणाला कीं " जा लोकांनीं मजबराबर इतकीं वर्षें श्रम केले, आणि मला कीर्ति मिळवून दिली. त्यांशीं तुझें वांकडें असावें हें मला सहन होत नाहीं. " पुढें ते सर्व जमल्यानंतर त्यांजवळ त्याणें सुयुक्त संभाषण केलें, आणि आशाभरित दृष्टीनें त्यांकडे पाहून मी कोणाचा अपराध केला असेल, तर मला क्षमा करावी, असें मागणें मागितलें. त्या वेळीं सिलीम अकबराचा पायांजवळ लोटांगण घालून ढळढळां रडूं लागला; परंतु अकबरानें त्यास आपली आवडती तलवार खुणेनें दाखविली, आणि आपल्या देखत ती कमरेस बांधण्याविषयीं त्याला खुणा करून दाखविल्या. इतका तो त्या वेळीं ग्लान झाला होता, नंतर ती त्याची ग्लानी जाऊन पुनः तो सिलीमाजवळ बोलूं लागला, आणि आपल्या कुटुंबांतील बायकामनुष्यांचा सुखाची चांगली तजवीज पाहवी, आणि आपले जुने दोस्त व आश्रित यांचा विसर पडूं नये, अशी मोठ्या उत्कंठेनें त्यास आण

बलावून आणविलें, आणि त्याचा समक्ष मुसलमानी धर्माप्रमाणें नमाज पढून जसे सर्व चांगले मुसलमान संस्कार करून मरून जातात, त्याप्रमाणें करून हा मरण पावला. इ० स० १६०५ ता० १३ आक्टोबर. हि०स० १०१४.

अकबराचा शरीराचा बांधा मजबूद असून, हा सुंदर होता. याची मुखचर्या मनोरंजक होती, व याची चालचर्या मोठी वेधक असे.[१] याचें शरीरसामर्थ्य व उद्योग हीं दोन्ही फार होतीं. हा तारुण्यांत मद्यपान व उत्तम प्रकारचें खाणें पिणें इत्यादियांत सुख मानित असे, परंतु पुढें लवकरच हा सावध होऊन मितहारी झाला. वर्षांतून अमुक दिवस मांस भक्षण करावयाचें नाहीं, असा याचा नियम असे; ते दिवस एकंदर वर्षांत सर्व मिळून तीन महिने भरत. याची नेहेमीं थोड्या झोपेनें तृप्ति होई, आणि याला शास्त्रीय विषयांची फार प्रीति असे. त्यामुळें पुष्कळ वेळा रात्रींचा रात्री हा जागरणांत घालवित असे. अकबर हा बहुधा सार्वकाळ लढायांत गुंतलेला असे, आणि हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याहि पादशाहापेक्षां याणें आपल्या मुलुकाचा व्यवस्थेमध्यें पुष्कळ चांगले फेरफार केले; तथापि याणें आपल्या त्याचा स्वभाव.

(१) गोव्याहून जेसुइट पंथाचे पोर्तुगीस लोक अकबराचा दरबारांत गेले होते, ते याविषयीं असें वर्णन करितात, कीं अकबर हा सुमारें "५० वर्षांचा होता. याचें शरीर युरोपीयन लोकांसारखें गोरें होतें, आणि याची बुद्धि विशाल होती. याणें आह्मा सर्वांचा विलक्षण स्नेहभावानें स्वीकार केला." इत्यादि.



फुरसूद सांपडत असे. जनावरांचा झोंब्या, व तसेच शारीरबलानें व कुशलतेनें कसरत करितात ती, हीं पाहण्याची यास मोठी प्रीति असे; तथापि याला शिकारींत विशेष आनंद होत असे; आणि त्यांतहि वाघ मारून टाकणें व जंगली हत्तींचा कळपाचा कळप पकडणें यांत ( साहस व श्रम यांची गोडी घेण्याची याला प्रीति असे यामुळें ) यास विशेष आनंद होई. फकत कसरतीकरितांच हा कधीं कधीं श्रम घेत असे — एकदां लगत दोन दिवसांत हा अजमीराहून आग्र्यास ( ११० कोश ) घोड्यावर बसून गेला आणि त्याच प्रमाणें याणें पुष्कळ मजला केल्याशिवाय हा दिवसांत १५ किंवा २० कोशपर्यंत पायीं चालत जात असे. याचा विलक्षण शौर्याचा उदाहरणांनीं तर याचा इतिहास भरून गेला आहे. जसा प्रसंगीं विचार करून हा जोखमांत पडत असे, तशीं अरिष्टांत पडावें अशी कांहीं याला स्वाभाविकच प्रीति असूनहि हा साहस करण्यास उद्युक्त होत असे. इतकेंहि असून यास युद्धाची विशेष प्रीति होती असें नाहीं. युद्धाचें कारण पडे, तेव्हां हा युद्धप्रसंगांत जाऊन तेथें आपली सर्व बुद्धि व सामर्थ्य, हीं खर्चून युद्ध करी; परंतु लढाईचा शेवट झाला, ह्मणजे पुढील काम आपल्या सरदारांवर सोंपवून आपण परत जाऊन राज्याची व्यवस्था पाहवयास लागे. कधीं कधीं याचा लढाया फार वाढत गेल्या; परंतु याणें जे प्रांत घेतले, ते पुरे जिंकून घेतले. दिल्लीजवळचा मुलुक खेरीज करून, बाकी हिंदुस्थानाचा

असें नाहीं; परंतु जे देश याणें घेतले, ते पूर्वी दिल्लीचा पादशाहांचा ताब्यांत होते; यास्तव जर ते परत जिंकून घेण्यास हा यत्न न करिता, तर त्या वेळचा लोकांत याची स्तुति न होतां, निंदाच झाली असती.

---

